

*शोभना रानडे लिहितात–*



हे पुस्तक मला इतके वाचनीय व चिंतनीय वाटले की त्याचा लेखक जणू माझ्याशी बोलतो आहे, चर्चा करतो आहे असा भास अनेकदा झाला. हरमन मायनर हे वंदनीय महापुरुष आधुनिक जगातील 'अवतार' होते. हा महापुरुष करुणावान, वत्सल होता. त्याच्यात ज्ञान लपलेले होते. करुणा प्रकट होती. त्याच्यासारखी सेवा आपल्या हातून व्हावी अशी मनोमन मी प्रार्थना करीत असते. कारण ईश्वरापाशी 'किती सेवा' हा प्रश्न नाही, 'कशी सेवा' हा प्रश्न आहे. त्याचे उत्तर या पुस्तकात सापडेल. महाराष्ट्रातील पहिले बालग्राम विनोबांच्या जन्मगावी– त्यांच्या घरात गागोदे ता. पेण येथे सुरू झाले. हे पुस्तक त्यांच्या जन्मशताब्दी वर्षात जन्मदिनी प्रसिद्ध होत आहे हा सुयोग ! बालकांच्या विकास चळवळीतील हे 'सुंदरकांड' आहे.

माझ्या अंतःकरणात जी प्रेरणा झाली तीच अनेक सहृदय वाचकांच्या मनात या पुस्तकाने होईल यात संदेह नाही. त्यामुळे समाजजीवन अधिक समृद्ध होईल. उपेक्षित आणि वंचितांना मायेचा स्पर्श लाभल्याने सुदृढ, विचारी नागरिक त्यातून निर्माण होतील. बालमातांना दृष्टी मिळेल आणि भारतात हरमन मायनर प्रगट होईल. आत्म्याचे अमरत्व सिद्ध होईल. हरमन मायनरने जे जगाला दिले, पण त्याच्या मृत्यूनंतर जे लाभत आहे ते त्याच्या जिवंतपणी पण मिळाले नव्हते.



# हर्मन मायनर

शोभना रानडे

# हर्मन मायनर

## बालग्रामचा जनक

लेखक
हान्स्हाइन्स राइनप्रेख्ट

अनुवादक
शोभना रानडे

बालग्राम
एस.ओ.एस. चिल्ड्रेन्स व्हिलेजेस, महाराष्ट्र

हरमन मायनर
बालग्रामचा जनक

लेखक : हान्सुहाइन्स राइनप्रेख्ट

अनुवाद : शोभना रानडे

प्रकाशक :
© बालग्राम,
एस.ओ.एस. चिल्ड्रेन्स व्हिलेजेस, महाराष्ट्र
५ कोरेगाव रोड, पुणे ४११ ००१.

प्रथमावृत्ती : ११ सप्टेंबर ९४
विनोबा जन्म शताब्दीवर्ष दिन

अक्षरजुळणी :
रेखांकन
१००६ सदाशिव पेठ,
पेरुगेटजवळ, पुणे ३०

मुद्रक :
साप्ताहिक मुद्रण
१०२५ सदाशिव पेठ,
नागनाथ पार, पुणे ३०.

मुखपृष्ठ : सतीश देशपांडे

किंमत : १५० रुपये.

# ऋणनिर्देश

डॉ. हर्मन मायनर यांच्यावरील हे पुस्तक मूळ ऑस्ट्रियन भाषेतील. त्याच्या इंग्लिश भाषांतरावरून सुगम असे मराठी भाषांतर सौ. शोभना रानडे यांनी केले आणि मराठी वाचकांना ते उपलब्ध करून दिले.

सौ. रानडे यांनी स्वतंत्र लेखन केले. त्याचप्रमाणे अनेक पुस्तकांचे भाषांतरही केले आहे. मूळ आसामी भाषेतील अनेक पुस्तकांचे त्यांनी मराठीत रुपांतर केले व त्यामुळे एक सिद्धहस्त लेखिका म्हणून त्या परिचित आहेत.

परंतु त्यांचा मूळ पिंड समाजसेविकेचा आहे आणि त्यांच्या समाजसेवा कार्याला त्यांनी अविरत लोकशिक्षणाची जोड दिली आहे. १९४२च्या स्वातंत्र्य लढ्यात त्यांनी भाग घेतला, परंतु स्वातंत्र्योत्तर काळात मात्र सक्रिय राजकारणापासून त्या कटाक्षाने दूर राहिल्या.

१९४८ साली खुद्द मॉंटेसरी बाईकडून बालशिक्षणाचे धडे त्यांना मिळाले आणि त्यानंतरच्या काळात स्त्रियांचे आणि मुलांचे शिक्षण आणि कल्याण याला त्यांनी आपले आयुष्य वाहून घेतले. पुण्यामध्ये त्यांनी मॉंटेसरी ट्रेनिंग कोर्स सुरू केला. आसाम आणि महाराष्ट्रात अनेक ठिकाणी बालवाड्या उघडल्या. विनोबाजींच्या भूदान चळवळीत त्या सहभागी झाल्या आणि मैत्री आश्रम आणि आदिम जाती सेवक संघाच्या सचिव म्हणून त्यांनी काम पाहिले. विनोबाजींच्या प्रेरणेने अखिल भारतीय 'स्त्री शक्ती जागरण'च्या निमंत्रक या नात्याने त्यांनी पवनार येथे आंतरराष्ट्रीय पातळीवर तीन वेळा महिला परिषदा आयोजित केल्या. १९६९ साली पूर्व विभागामध्ये महात्मा गांधी जन्मशताब्दी उत्सवाची धुरा निमंत्रक या नात्याने त्यांनीच वाहिली. १९७२ ते १९७९ या काळात त्या महाराष्ट्र कस्तुरबा ट्रस्टच्या प्रतिनिधी, १९७४ पासून महाराष्ट्र राज्य ग्रामदान मंडळाच्या अध्यक्षा, १९७३ पासून गांधी नॅशनल मेमोरिअल सोसायटी, पुणे संस्थेच्या विश्वस्त सचिव, १९८५ मध्ये पुणे विद्यापीठाच्या सिनेटच्या सभासद, १९८७ मध्ये बालग्राम महाराष्ट्र संस्थेच्या अध्यक्षा आणि १९९१ अखिल भारतीय महिला परिषदेच्या अध्यक्षा अशा एकाहून एक जबाबदारीच्या जागा त्यांनी भूषविल्या आणि समर्पित भावनेने काम करून कर्तबगारीने प्रत्येक क्षेत्रात आपला ठसा उमटविला. गांधी स्मारक समितीच्या वतीने त्यांनी प्रथमच खेड्यांमध्ये काम करणाऱ्या समाज कार्यकर्त्यांसाठी अखिल भारतीय

पातळीवर समाज कार्यकर्ता प्रशिक्षण अभ्यास क्रम सुरू केला. तसेच अखिल भारतीय पातळीवर ग्रामोद्योग विद्यालय सुरू केले. इ.स.२००० पर्यंत सर्व महिलांना साक्षर करण्याचे स्वप्न त्या उराशी बाळगून आहेत आणि ह्या स्वप्नपूर्तीसाठी आज वयाच्या ६७व्या वर्षीही तारुण्यातील अवखळ उत्साहाने त्या कार्यरत आहेत.

गागोदे या गावी १९७४ साली पहिले बालग्राम सुरू करून महाराष्ट्रातील बालग्राम चळवळीची त्यांनी मुहूर्तमेढ रोवली. त्यानंतर सासवड आणि धारणी येथेही त्यांनी ग्रामीण आणि आदिवासी, अनाथ, बेघर मुलांसाठी बालग्रामांची स्थापना केली. बालग्राम महाराष्ट्राच्या संस्थापक सदस्य आणि विश्वस्त म्हणून १९७५पासून त्या क्रियाशील आहेत. बालग्राम चळवळीने महाराष्ट्रात खोलवर मूळ धरले आणि तिची जोमदार वाढ झाली, याला त्यांचे प्रयत्न आणि नेतृत्व मोठ्या प्रमाणावर कारणीभूत आहेत. त्यांच्या कल्याणकारी कार्याचा गौरव शासनाकडून आणि अनेक सेवाभावी संस्थांकडून उत्स्फूर्तपणे झाला. १९८३ साली त्यांना बालकल्याण सेवे-बद्दल राष्ट्रीय पुरस्कार मिळाला. १९८९ साली महाराष्ट्र शासनाने त्यांना 'दलित मित्र' पुरस्कार दिला. त्याच वर्षी नेहरू चिल्ड्रेन्स म्युझियम, कलकत्ता या संस्थेने 'नेहरू फेलो ॲवॉर्ड' ह्या सन्मानासाठी त्यांची निवड केली. त्यांच्या अध्यक्षीय कार-कीर्दीला पुणे बालग्रामची निवड 'राष्ट्रीय पुरस्कारा'साठी झाली. डॉ.हर्मन मायनर वरील हे मराठी पुस्तक म्हणजे बालकल्याणाची जी वाट आजवर त्या चालल्या, त्या वाटेवरचा ऐक मैलाचा दगड आहे. अजून वाट चालायची आहे.

'महाराष्ट्रातील प्रत्येक जिल्ह्यात एक बालग्राम' हे त्यांचे एक स्वप्न आहे !





## SOS MOVEMENT IN INDIA

I am extremely happy that a translation in Marathi of the book on DR. HERMANN GMEINER is being brought out by Smt. Shobhana Ranade, President Balgram-SOS Children's Villages Maharashtra. The book on Dr. HERMANN GMEINER was written by Dr. Hansheinz Reinprecht, the First Secretary-General of SOS Kinderdorf International who is a well-known writer and has written a number of books on the life of SOS Founder, Dr. HERMANN GMEINER, his work and the Children's Welfare movement in Europe, with good insight and comparisons into institutional life. The whole concept of SOS Children's Villages was Dr. HERMANN GMEINER'S idea and was built on the foundation of family as a model and with emphasis on the development of a Child in Distress within a nurturing social, cultural and national milieu.

Dr. HERMANN GMEINER had to face untold difficulties and opposition before setting up the first SOS Children's Village in Imst in Austria. Over the years it has become a movement all over the world. Dr GMEINER is now legendary figure, the Father of the SOS Movement.

I had the good fortune to meet Dr. GMEINER and his delegation in the early sixties when he visited India at the invitation of Pandit Jawaharlal Nehru, the first Prime Minister of India. It was then that I visited the SOS Headquarters in Austria and stayed in one of the Children's Villages. The experience was an enlightening one and I visualised that this concept would come as a blessing for thousands of abandoned and destitute children in India.

The year 1964 saw the birth of SOS Movement in India when the first SOS Village was established in Greenfields (Faridabad - Haryana). Today there are 27 SOS Children's Villages throughout

the length and breadth of our country covering practically every state in the country. There are 72 allied projects like SOS Youth Villages, Balsadans, Balwadis, Schools, Vocational Training Programmes, Mother and Child Health Centers. SOS Services and programmes encompass the lives of over 10000 children. India has the largest SOS programmes for any single country in the world.

Government of India in the Ministry of Social Welfare have accepted the SOS pattern of Child Care and have recommended it in their National Plan of Action for, International Year of the Child - 1979 to Other Child Care Institutions in the country for adoption.

SOS Children's Villages have responded to many difficult situations arising out of natural calamities and other tragedies over the years. In Assam, work commenced in the aftermath of the ethnic disturbances in 1983 and in response to the appeal of the Government of India. The State today has a full fledged programme with 3 SOS Children's Villages, 2 SOS Youth Villages and an up-coming Community Development Programme. At Bhopal,in the aftermath of the Gas Tragedy, a SOS Children's Village was opened which is now functioning. New dimensions are being added with the construction of pre-school and community facilities. From Punjab a number of children of families affected by the disturbances in the state have been brought to the SOS Children's Village in Delhi (Bawana). Plans are afoot to set up a SOS Children's Village in Punjab and Punjab Government have responded favourably in this regard. The devastating earthquake in Uttar Kashi in October 1991 brought in its wake not only miseries and destruction but also left behind many orphaned children. A few of these children have been brought to Bhimtal (Utter Pradesh), where facilities for 5 new Family Homes are being added in SOS Children's Village.

The SOS Children's Villages Movement has today spread to



all parts of the world including China, Russia and Eastern Europe and covers 5 continents. It is a model not only for the developing world but also to Europe and North and South America.

The Balgram-SOS Children's Villages Movement formed in Maharashtra came up with the establishment of the first model Children's Village at Pune in 1979. The 'Balsadans' or single family homes concept has spread to many parts of the state at taluka level at places like Amravati, Lonavala, Dharni, Hadapsar, Panhala and Saswad etc. and covers practically all the districts. The efforts of my colleague in this great task - pioneers like Shri. D. J. Jadhav, Shri. Pratap Pawar and many other distinguished individuals who played a founding role will always be cherished and remembered. The movement has flowered in Maharashtra under the able guidance of its President Smt. Shobhana Ranade.

This translation, done with great pains and care by Smt. Shobhana Ranade will go a long way in helping grassroot workers undrestand in depth the implications of the SOS work and act as a guide for the Marathi speaking people. I would like to thank the translator who is an active social worker, a great adiministrator, President of the All India Women's Conference and Kasturba Gandhi Trust Movement, President of Balgram - SOS Children's Villages of Maharashtra, and is involved in many other tasks, for the great effort.

**J. N. KAUL**
**PRESIDENT**
**SOS CHILDREN'S VILLAGES OF INDIA**

## भारतातील 'एस.ओ.एस्. - बालग्राम' चळवळ

डॉ. प्रा. हर्मन मायनर ह्यांच्या जीवनावरील पुस्तकाचा मराठी अनुवाद सौ.शोभना रानडे प्रकाशित करीत आहेत, ही अत्यंत आनंदाची गोष्ट आहे. महाराष्ट्रातील एस. ओ. एस्. बालग्राम चळवळीच्या त्या अध्यक्षा आहेत. डॉ. हर्मन मायनर ह्यांच्या जीवनावरील मूळ पुस्तक डॉ. हॅन्शीज रिंप्रीट यांनी लिहिले. एस.ओ.एस. किंडरडॉफ ह्या आंतरराष्ट्रीय संघटनेचे ते पहिले सेक्रेटरी-जनरल. ते एक नावाजलेले लेखक असून, त्यांनी एस्.ओ.एस्. चे संस्थापक डॉ. हर्मन मायनर ह्यांचे जीवन, कार्य आणि युरोपमधील बाल-कल्याण चळवळ ह्या विषयावर अनेक पुस्तके लिहिली. त्यातून विषयाचा वेध घेणारी त्यांची नजर आणि तिने टिपलेली संस्थांतर्गत जीवनाची तौलनिक चित्रे पाहावयास मिळतात. एस.ओ.एस्. बालग्राम चळवळीच्या कल्पनेचे बीज सर्वप्रथम डॉ. मायनर ह्यांच्या मनोभूमीमध्ये अंकुरित झाले आणि आदर्श कुटुंब-कल्पनेच्या पायावर त्याचा वृक्ष साकार झाला. संकटग्रस्त बालकांच्या सर्वांगीण विकासावर त्यांचा भर असून, त्याचा परिपोष अनुरूप अशा सामाजिक, सांस्कृतिक आणि राष्ट्रीय वातावरणामध्ये केला जातो. पहिल्या एस्.ओ.एस्. बालग्रामची ऑस्ट्रिया मध्ये स्थापना होईपर्यंत डॉ. हर्मन मायनरना किती अडचणींना तोंड द्यावे लागले आणि किती विरोध सहन करावा लागला, हे न सांगितलेलेच बरे ! इतक्या वर्षांनंतर आता मात्र बालग्राम चळवळीला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झाले आहे. आंतरराष्ट्रीय बालग्राम चळवळीचे जनक डॉ. हर्मन मायनर आता एक ऐतिहासिक व्यक्तिमत्त्व बनले आहेत.

भारताचे पहिले पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू ह्यांच्या निमंत्रणावरून डॉ. मायनर साठीच्या दशकात भारताच्या भेटीला आले. त्या वेळी त्यांनी आणि त्यांच्या शिष्टमंडळाला भेटण्याचा सुयोग मला लाभला. त्यानंतर एस्.ओ.एस.च्या आंतरराष्ट्रीय मुख्यालयाला– ऑस्ट्रियाला मी भेट दिली. तिथे मी एका बालग्राममध्ये राहिलो. ह्या अनुभवाने मला नवी दृष्टी लाभली. बालग्रामची कल्पना भारतातील हजारो निराधार, निराश्रीत मुलांच्या दृष्टीने वरदान ठरेल असे मला वाटते.

१९६४ सालात एस्.ओ.एस. बालग्राम चळवळीला भारतामध्ये हरियानातील फरिदाबादमधील ग्रीनफील्ड येथे भारतातील पहिल्या बालग्रामची स्थापना झाली. दक्षिणोत्तर आणि पूर्वपश्चिम भारतवर्षाच्या बहुतेक सर्व राज्यांमध्ये आता एकूण



सत्तावीस बालग्रामे विखुरली आहेत. याखेरीज एस्.ओ.एस. युवाग्राम, बालसदने, बालवाड्या, शाळा, व्यवसाय प्रशिक्षण केंद्रे, माता-बाल संगोपन केंद्रे अशा विविध स्वरूपाचे एकूण बहात्तर प्रकल्प आज ठिकठिकाणी कार्यान्वित आहेत. एस.ओ.एस. ने पुरविलेल्या सुविधा आणि कार्यक्रम यामुळे दहा हजारपेक्षा अधिक बालकांचे जीवन उजळून निघाले आहे. अशा स्वरूपाचे कार्यक्रम राबविण्यामध्ये जगातील अन्य कोणत्याही राष्ट्रापेक्षा भारत आज आघाडीवर आहे.

भारत सरकारच्या समाज-कल्याण मंत्रालयाने एस.ओ.एस.ची बालकल्याण पद्धती स्वीकारली असून, आंतरराष्ट्रीय बालक-वर्षाच्या (सन १९७९) कृतीशील राष्ट्रीय कार्यक्रमांमध्ये तिचा समावेश करण्याची इतर बालकल्याण संस्थांनाही शिफारस केली आहे.

इतक्या वर्षात नैसर्गिक आपत्ती आणि इतर दुर्घटना ह्यांच्या फेऱ्यामध्ये एस्.ओ.एस्. बालग्रामांना अनेक कठीण प्रसंगांना तोंड द्यावे लागले. १९८३ मध्ये, आसाममध्ये उफाळलेल्या वांशिक संघर्षानंतर भारत सरकारच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन तिथेही बालग्रामचे कार्य सुरू झाले. आज त्या राज्यामध्ये सर्वांगाने परिपूर्ण अशी तीन बालग्रामे, दोन युवाग्रामे आणि उभारणीच्या प्रगत अवस्थेमध्ये असलेली समाज-विकास प्रकल्प सुरू झाले आहेत. भोपाळमधील वायूगळतीच्या दुर्घटनेनंतर तेथे एस्.ओ.एस्. बालग्रामची स्थापना झाली. आज ते बालग्राम पूर्णपणे कार्यान्वित आहे. पूर्व प्राथमिक शाळा आणि सामाजिक सुविधा पुरविण्यासाठी आवश्यक त्या बांधकामाची जोड त्याला देण्यात येत आहे. पंजाबमधील उत्पातांची झळ लागलेल्या कुटुंबातील मुलांना दिल्ली (बवाना) येथील बालग्राममध्ये आणण्यात आले आहे. पंजाब मध्ये एस्.ओ.एस्. बालग्राम स्थापन करण्याची कल्पना विचाराधीन असून, त्याबाबत पंजाब सरकारकडून अनुकूल प्रतिसाद मिळाला आहे. ऑक्टोबर १९९१मध्ये उत्तर काशीमध्ये झालेल्या भयानक भूकंपामध्ये फार मोठ्या प्रमाणावर हानी झाली. लोकांच्या वाट्याला अतोनात दुःख आले आणि विशेषतः अनेक निराश्रीत, बेघर मुले रस्त्यावर आली. यातील काही मुलांना उत्तर प्रदेशातील भिमताल येथील बालग्राम मध्ये आणण्यात आले आणि त्यांच्यासाठी तेथे पाच नवीन बालसदने उभारण्यात आली.

एस्.ओ.एस्. बालग्राम चळवळ आज जगाच्या पाठीवर पाचही खंडांमध्ये पसरली आहे. चीन, रशिया आणि पूर्व युरोपीय राष्ट्रांमध्येही तिने आता मूळ धरले आहे. बालग्रामची कल्पना केवळ विकसनशील देशांसाठीच नसून, युरोप आणि

उत्तर-दक्षिण अमेरिकेतील राष्ट्रांसाठीसुद्धा ती आदर्शवत ठरली आहे.

१९७९ मध्ये पुण्यात एस्.ओ.एस्.च्या नमुनेदार बालग्रामची स्थापना झाली आणि महाराष्ट्रातील बालग्राम चळवळ वाढीला लागली. 'बालसदन' म्हणजे एकेरी कुटुंबाची कल्पना महाराष्ट्रामध्ये तालुका-पातळीवर अनेक ठिकाणी रुजली. अमरावती, लोणावळा, धारणी, हडपसर, पन्हाळा, सासवड अशी एका मागोमाग एक अनेक बालसदने जवळजवळ सर्व जिह्यांमध्ये स्थापन झाली. ह्या महान कार्यासाठी ज्यांनी अथक प्रयत्न केले, ते माझे संस्थापक सहकारी श्री. डी. जे. जाधव, श्री. प्रताप पवार आणि इतर अनेक मान्यवर व्यक्ती, ज्यांनी संस्थापनेच्या कार्यामध्ये बहुमोल कामगिरी बजावली, त्यांची आठवण आपल्या अंतःकरणात सतत जागती राहील. महाराष्ट्रामध्ये बालग्राम-चळवळीची मुहूर्तमेढ रोवण्याचे महत्त्वपूर्ण कार्य त्यांनी केले आहे. सध्याच्या अध्यक्षा, सौ. शोभना रानडे ह्यांच्या समर्थ नेतृत्वाखाली आज महाराष्ट्रामध्ये ही चळवळ फोफावली आहे.

सौ.रानडे यांनी हे परिवर्तन घडवून आणण्यासाठी पुष्कळ कष्ट केले. संस्थांची काळजीपूर्वक जोपासना केली. तळागाळातील कार्यकर्त्यांना एस.ओ.एस.ची कार्यपद्धती आणि तिचे महत्त्व पटवून देण्यामध्ये आणि मराठी भाषिकांना योग्य वाट दाखविण्यामध्ये त्यांच्या कार्याचा फार मोठा वाटा आहे. अनुवादिका, सौ. रानडे एक कृतीशील समाजसेविका आणि समर्थ प्रशासक आहेत. अखिल भारतीय स्त्री संघटना, कस्तुरबा गांधी निधी, बालग्राम-एस्.ओ.एस्. चिल्ड्रेन्स व्हिलेजीस महाराष्ट्र इ. संस्थांच्या अध्यक्षपदाची धुरा त्या वाहात आहेत. त्याचबरोबर अनेक सामाजिक प्रकल्पांमध्ये त्यांचा सहभाग आहे. त्यांनी चालविलेल्या ह्या महान योगदानाबद्दल मी त्यांचा मनःपूर्वक आभारी आहे.

**जे. एम. कौल**

प्रेसिडेंट

एस. ओ. एस. चिल्ड्रेन्स व्हिलेजेस ऑफ इंडिया



# In Gratitude

I met Mr.Hansheinz Reinprecht, author of the HERMANN GMEINER BOOK in August 1990 at Vienna, when he presented a copy of this book to me. Though the book was published in 1978, I had the opportunity to read it after 12 years, now and after going through it in a single long sitting, I intensely felt that, I missed a good, great book for so long a period.

This book is not only the life sketch of Dr. Hermann Gmeiner, Father of the SOS Children's villages in the world, but a vivid account of how the very concept of children's Village was born in a small village in Austria, which followed a struggle, internal and external, to surmount the difficulties after difficulties which he faced with dauntless courage and unshakable confidence and furthered the cause of homeless and parentless orphan children. In the process of reporting on children's village movement the author himself sacrificed his own career and dedicated himself to this mission.

I was so much overwhelmed by the lively account of the SOS Children's Village movement all over the world from its inception that I must give expression to my thoughts and feelings. I made up my mind to carry the contents of this valuable book to my countrymen, particularly those from Maharashtra, Translation of this book in Marathi can take it to the widely scattered population in maharashtra to interior villages, to tribal areas, to mothers and children from number of Balgrams in Maharashtra. This can spark off many more minds and ultimately strengthen this movement. No sooner this idea seized me than I took upon myself translatinon of this book in Marathi and within a couple of months while I was still on tour of the continent and the United States, I completed the translation of the entire book.

Author **HANSHEINZ REINPRECHT** readily and happily gave his consent for publication of this book, in fact he was

indeed the source of my inspiration and but for him this book might not have seen the light of the day.

When I returned to India in November 1990, the Board of Trustees and the Board of Directors of Balgram Maharashtra, enthusiastically upheld the idea of publishing this book in Marathi. Mr. J. N. Kaul president, SOS Children's Villages of India also favoured this idea and extended all cooperation and financial assistance for its publication.

In India, the movement started in 1964. The former Prime Minister late Smt. Indiraji Gandhi was the founder President and Mr. J. N. Kaul present President has been associated with it since beginning, There can be no better authority than Mr. Kaul to write on the History and development of SOS Children's Villages movement in India. An article on this topic written by Mr. Kaul is therefore included in this book, Similarly in Maharashtra it was Mr. D. J. alias Babasaheb Jadhav former Director of Social Welfare Maharashtra and nurtured Balgram Movement in Maharashtra during last 15 years. He is a moving spirit and a personal witness to all events - great and small from the time Balgram Maharashtra was registered and the first stone of Yerwada Balgram was laid and therefore I felt that inclusion of his article in this book will fulfill the purpose of this book. His article gives a lively account of the past present and future of this movement in Maharashtra.

I am presenting this book to Shri. D. J. Jadhav who dedicated his whole life after retirement to the Children's cause, and who is instrumental in creation of opportunities of a bright future for thousands of orphan, homeless children all over Maharashtra. I shall ever remain in gratitude to **MR. HANSHEINZ REINPRECHT,** who inspired me for this contribution of mine, which I hope will further the cause of children in this part of the world.

**SHOBHANA RANADE**
President, SOS Children's Village



# अनुवादकाची प्रस्तावना

युरोपच्या दौऱ्यावर असताना, ऑगस्ट १९९० मध्ये माझा मुक्काम व्हिएन्नाला होता. त्या वेळी 'हर्मन मायनर बुक'चे लेखक खुद्द श्री. हॅनशिज रिनप्रीट यांचेकडून त्या पुस्तकाची एक प्रत मला भेट मिळाली. त्यातील संदेश सद्यःस्थितीला एवढा अनुकूल आहे की, त्याने माझ्या मनाचा ठाव घेतला. पुस्तक बाजूला ठेवणे मला जमलेच नाही. एका बैठकीतच मी ते वाचून संपविले. १९७८ साली प्रकाशित झालेले हे पुस्तक वाचण्याची संधी मला तब्बल बारा वर्षांनी लाभली, याची माझ्या मनाला रुखरुख लागून राहिली.

जगभर पसरलेल्या बालग्रामांचा जन्मदाता हर्मन मायनरचे व्यक्तिचित्रण ह्या पुस्तकात केले आहे. ह्या माणसाच्या मनात फुललेला माणुसकीचा स्फुलिंग ऑस्ट्रियाच्या एका खेड्यात आकार घेतो. नंतर एका विश्वव्यापी चळवळीमध्ये त्याचे रुपांतर होते आणि लाखो निराधार मुलांना आशेचा किरण लाभतो. त्याची ही कथा ! अन्य कोणत्याही मानवी सुधारणेच्या कार्यात असामान्य प्रेम, श्रद्धा, धैर्य, चिकाटी, विश्वास यांचा जसा प्रत्यय येतो, तसा तो या कथेतही येतो.

पुस्तकाच्या वाचनाचा माझ्या मनावर इतका खोल ठसा उमटला की, या पुस्तकाचा मराठी अनुवाद करण्याचा मी निश्चय केला. डॉ. मायनरचा संदेश त्यामुळे महाराष्ट्राच्या खेड्यापाड्यात, आदिवासी विभागात सर्वत्र पोहोचावा, ही त्यामागील प्रेरणा ! मनातला विचार मी लगेच कृतीत आणला आणि युरोप-अमेरिकेचा माझा दौरा चालू असतानाच पुस्तकाचा अनुवाद मी पूर्ण केला. त्यानंतर श्री. हॅनशिज रिनप्रीट यांना जेव्हा मी भेटले, तेव्हा मराठी प्रकाशनाला त्यांनी तत्काळ संमती दिली. एवढेच नाही तर सर्वतोपरी मला उत्तेजनही दिले.

नोव्हेंबर १९९० मध्ये मी भारतात परतले, तेव्हा बालग्राम महाराष्ट्राचे विश्वस्त मंडळ आणि संचालक मंडळ यांनी मोठ्या उत्साहाने अनुवाद प्रकाशनाची कल्पना उचलून धरली. भारतीय बालग्राम चळवळीचे अध्यक्ष, श्री.जे.एन. कौल यांनाही प्रकाशनाची कल्पना आवडली. ती प्रत्यक्षात आणण्यासाठी आर्थिक आणि अन्य सर्व सहाय्य त्यांनी देऊ केले.

भारतात बालग्राम-चळवळीचा शुभारंभ १९६४ साली, संस्थापक अध्यक्ष या नात्याने माजी पंतप्रधान स्व. श्रीमती इंदिरा गांधी यांनी केला. सध्याचे अध्यक्ष श्री. कौल हे सुरुवातीपासून या चळवळीशी निगडीत असून, त्यावर लिहिण्याचा त्यांचा अधिकार मोठा आहे. ह्या पुस्तकात त्यांचा लेख समाविष्ट केला आहे. महाराष्ट्राच्या

बाबतीत बोलायचे झाले तर राज्याचे माजी समाज-कल्याण संचालक, श्री. डी. जे. ऊर्फ बाबासाहेब जाधव हे ह्या चळवळीचे अध्वर्यू आणि दिपस्तंभ आहेत. गेल्या वीस वर्षात महाराष्ट्रात ह्या चळवळीचे रोपटे लावून, त्याला खतपाणी घालून मोठे करण्यात त्यांचा सिंहाचा वाटा आहे. ह्या चळवळीची वाटचाल करताना, ज्या लहानमोठ्या संस्मरणीय घटना घडल्या, त्यांना ते साक्षी आहेत. त्यामुळे त्यांचा लेख या पुस्तकामध्ये असणे केवळ स्वाभाविक नाही तर औचित्यपूर्ण आहे.

एक गोष्ट आवर्जून सांगावयास हवी. महाराष्ट्रातील शेकडो निराधार मुलांना निराशेच्या खाईतून बाहेर काढून, उज्ज्वल भविष्याच्या संपन्न जीवनाची वाट दाखविणारा बाबासाहेब हा आशादीप आहे. आजही आयुष्याच्या सायंकाळी, मंद तेवत, एकाग्र चित्ताने तो कार्यमग्न आहे. त्यांच्यासारखे समर्पित कार्यकर्ते आणि नेते या चळवळीला लाभावेत आणि ती अशीच उत्तरोत्तर वाढत जावी, ह्या भावनेने हे पुस्तक मी श्री. बाबासाहेबांना आदरपूर्वक अर्पण करीत आहे.

प्रस्तावना संपविण्यापूर्वी पुस्तकाच्या प्रकाशनात ज्यांची मला मोलाची मदत झाली, त्यांच्याविषयी दोन शब्द. माझी मुलगी मृदुला- अमेरिकेतील माझ्या वास्तव्यात मृदुलाने पुस्तकाच्या अनुवादासाठी मला सर्व सोयी-सुविधा उपलब्ध करून दिल्या. विशेषतः एकाग्र चित्ताने लेखनकार्य करण्यासाठी तिच्या घरी मला सतत शांत, प्रसन्न वातावरण लाभले, म्हणूनच अल्पावधीत हे लेखनकार्य मी पूर्ण करू शकले. भारतात परतल्यानंतर पुस्तकाची छपाई, प्रुफ रीडिंग, प्रकाशन इ. कामे पुणे बालग्रामचे त्या वेळचे संचालक श्री. भा. द. तेंडुलकर यांनी बालग्रामच्या सेवेत असताना आणि त्या नंतरही आत्मीयतेने लक्ष घालून पार पाडली. शिवाय, ज्यांचा ज्यांचा ह्या कार्याला प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष हातभार लागला, त्यांचा नामनिर्देश मी केला नाही तरी त्या सर्वांच्या सहाय्यामुळेच हे पुस्तक आज साकार होत आहे.

शोभना रानडे,
अध्यक्ष
बालग्राम, महाराष्ट्र



## महाराष्ट्रातील अनाथ - बालकल्याण चळवळ

अगदी अलीकडच्या काळापर्यंत रस्त्यावर भटकणारी निराधार मुले किंवा बाल-गुन्हेगार मुले थेट तुरुंगामध्ये पाठविली जात. भारतीय कारागृह समिती (इंडियन जेल्स कमिटी) च्या १९१९-२०च्या अहवालात अशा मुलांसाठी कायदा करावा अशी शिफारस करण्यात आली आणि त्यास अनुसरून पहिला चिल्ड्रेन्स ॲक्ट अस्तित्वात आला आणि या कायद्यास अनुसरून मुंबई, मद्रास, बंगाल इत्यादी प्रांतांमध्ये सुधारगृह (रिमांड होम्स) प्रमाणित शाळा (सर्टिफाइड स्कूल्स) सुरू झाल्या. बऱ्याच राज्यांमध्ये हा कायदा लागू करण्यात आला, तरी त्यांची अंमलबजावणी मात्र नाममात्रच झाली. सुधारगृहे, प्रमाणित शाळा यासारख्या संस्था निघाल्यामुळे, यापुढे बालगुन्हेगारांना तुरुंगाची हवा खावी लागणार नाही, नवीन संस्थांमध्ये त्यांचे प्रश्न मार्गी लागतील अशी लोकांना आशा वाटू लागली. परंतु नवीन कायद्याची अंमलबजावणी अपेक्षेप्रमाणे झाली नाही आणि लवकरच लोकांच्या उंचावलेल्या अपेक्षा भंग पावल्या. नवीन कायदे आणि नवीन संस्था यांच्या बरोबरीने नवीन समस्या उभ्या राहिल्या.

१९४७ साली अखिल भारतीय समाजसेवा परिषद (ऑल इंडिया कॉन्फरन्स ऑफ सोशल वर्क)चे पहिले अधिवेशन मुंबईत पार पडले आणि त्यात सहभागी होण्याची संधी मला लाभली. त्याच वेळी प्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ, डॉ. जे. एम. कुमारप्पा यांच्या प्रेरणेने बाल-कल्याण कार्याशी माझा संबंध आला. अनाथाश्रम, सुधारगृहे, प्रमाणित शाळा इत्यादि बालकल्याणाशी निगडित अशा संस्थांच्या कार्यामध्ये माझा सहभाग वाढला. झोपडपट्टीतील मुले, भिकाऱ्यांची मुले, कुष्ठरोग्यांची मुले, बालगुन्हेगार तसेच आर्थिक, सामाजिक व शैक्षणिकदृष्ट्या मागासलेली मुले यांचे प्रश्न अभ्यासण्याची मला आस लागली. मला जाणवले की, या मुलांचे जीवन अतिशय दुर्धर आहे, त्यांचे प्रश्न भीषण आहेत. विशेषतः अमेरिका, इंग्लंड आणि युरोप मधील बालकल्याणाच्या योजना मी जेव्हा पाहिल्या, तेव्हा मला प्रकर्षाने जाणवले की, भारतामध्ये या क्षेत्रात करण्याजोगे कितीतरी काम अद्याप बाकी आहे.

१९७० साली महाराष्ट्र राज्याच्या समाजकल्याण विभागाचा संचालक म्हणून माझी नेमणूक झाली आणि माझ्या मनात घोळणाऱ्या बालकल्याणाच्या कल्पनांना मूर्त स्वरूप देण्याची योगायोगाने मला संधी लाभली. लायसेन्सिंग ॲक्टखाली परवाना मिळालेल्या संस्थांच्या चिल्ड्रेन्स ॲक्टखालील विविध संस्थांच्या कारभाराशी या काळात माझा जवळून आणि प्रत्यक्ष संबंध आला. रिमांड होम्स, प्रमाणित शाळा तसेच बेगर्स ॲक्टखालील भिक्षा गृहे इत्यादि संस्थांचा यात समावेश होता. विशेषतः मुलांसाठी चालणाऱ्या संस्थांचा कारभार पाहून मी अत्यंत व्यथित झालो. चिल्ड्रेन्स ॲक्टखाली चालणाऱ्या संस्थांच्या कार्य-

प्रणालीत मूलगामी बदल आवश्यक असल्याचे मला जाणवले. रिमांड होम्समध्ये दाटी-वाटीने कोंबलेली मुले, स्वयंसेवी संघटनांच्या आर्थिक अडचणी आणि बालकल्याणाच्या भावनेने प्रेरित होऊन काम करणाऱ्या सेवाभावी कर्मचाऱ्यांचा अभाव इत्यादी गोष्टी पाहिल्यानंतर, आपल्या देशात बालकल्याणाचे कार्य कितपत प्रभावीपणे चालेल, अशी शंकेची पाल माझ्या मनात चुकचुकली. या क्षेत्रात काम करणाऱ्या अनेक कार्यकर्त्यांबरोबर आणि समाजकल्याण विभागातील माझ्या सहकाऱ्यांबरोबर ह्या प्रश्नांची मी अनेक वेळा चर्चा केली. रिमांड होम्स व प्रमाणित शाळांचे कामकाज सुधारण्याच्या दिशेने काही निश्चित पाऊले उचलली. समाजकल्याण विभागात "बालकल्याण प्रतिष्ठान" या नावाचा एक उपविभागही सुरू केला. नवीन बदल घडवून आणीत असताना मुलांच्या संस्थांमध्ये आजवर दृढमूल झालेल्या प्रथा, कर्मचाऱ्यांच्या श्रद्धा, अश्रद्धा व दृष्टिकोण, स्वयंसेवी संस्थांच्या मर्यादा अशा एक ना दोन, अनेक गोष्टींना आम्हाला तोंड द्यावे लागले आणि त्यामुळे अपेक्षित यश मिळण्यात अनेक समस्या आहेत याची प्रकर्षाने जाणीव झाली.

मुलांच्या संस्थांमध्ये अनाथ, निराधार मुलांचे प्रश्न हाताळताना त्यांच्याकडे एक समूह म्हणूनच पाहिले जाते. वैयक्तिक लक्ष पुरविले जात नाही. परिणामी मुलांच्या मनात सुरक्षिततेची भावना निर्माण होत नाही. त्यांच्या विकासासाठी अत्यंत आव-श्यक अशी आपुलकी आणि प्रेम तिथे त्यांना मिळत नाही. या आणि यासारख्या इतर अनेक कारणांमुळे या संस्थांचेकडून बालकल्याणाचे भरीव कार्य होऊ शकेल याचा भरवसा मला वाटेनासा झाला. या दुःखद परिस्थितीमुळे मी अत्यंत व्यथित झालो. बालगुन्हेगारांचे प्रश्न मुलांच्या कायद्यानुसार हाताळले जाणे आवश्यक होते. म्हणून अनाथ व निराधार मुलांच्या करिता काही पर्यायी योजना करता येईल का, याचा मी विचार करू लागलो. ह्या उद्देशाने मुलांच्या निरनिराळ्या संस्थांना मी भेटी दिल्या. एकदा मी दिल्लीला गेलो असताना, फरिदाबाद येथील 'एस्.ओ.एस्. चिल्ड्रेन्स व्हिलेज' ची माहिती मला मिळाली. मी व माझे सहकारी श्री. एस्. एस्. जोशी एका रविवारी फरिदाबाद येथील 'ग्रीन फिल्डस् बालग्राम' पाहायला गेलो. श्री. जगन्नाथ कौल, सेक्रेटरी जनरल, एस्.ओ.एस्. चिल्ड्रेन्स व्हिलेजेस ऑफ इंडिया, यांनी आम्हाला बाल-ग्रामची संकल्पना समजावून सांगितली आणि त्यांच्या-बरोबर बालग्राममध्ये फेरफटका मारला. मुलांना आणि मातांना भेटलो. या भेटीने मी अत्यंत प्रभावीत झालो. दिल्लीच्या वास्तव्यात चार-पाच वेळा मी तिथे गेलो. श्री. कौल आणि त्यांचे सहकारी यांच-बरोबर अनेक वेळा चर्चा केली.

बालसदनातील माता आणि आठ-नऊ भावंडे, बालसदनात मुलांना मिळणारे प्रेम व आपुलकी, त्यांच्या मनात जोपासली जाणारी सुरक्षिततेची भावना, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था, माता व इतर कर्मचाऱ्यांच्या श्रद्धा आणि सेवाभाव, बालग्रामच्या परिसरातील सर्व वातावरण इत्यादी आवश्यक गोष्टी एकत्रित आणणारी बालग्रामची संकल्पनाच मुलांचे



कल्याण बव्हंशी साधू शकेल, असे मला वाटले. इतके दिवस मी माझ्या मनात घोळत असलेली बालकल्याणाची पर्यायी व्यवस्था अखेर माझ्या मनात पक्की झाली.

महाराष्ट्रात परतल्यानंतर बालकल्याणाचे कार्य करणाऱ्या येथील अनेक समाज सेवकांशी बालग्रामच्या कल्पनेसंबंधी मी विस्तृत चर्चा केली आणि ह्या संदर्भात बाल-कल्याण प्रतिष्ठानाने पुण्यामध्ये एक सभा आयोजित केली आणि श्री. जगन्नाथ यांना त्यासाठी निमंत्रित केले. पुण्याच्या आदिवासी प्रशिक्षण आणि संशोधन संस्थेत झालेल्या ह्या सभेस अनेक समाजसेवक आणि समाजकल्याण विभागाचे अधिकारी उपस्थित होते. त्यांचेसमोर श्री. कौल यांनी अत्यंत उद्बोधक आणि प्रभावी असे भाषण केले, त्याची स्मृती अद्यापही माझ्या मनात जागृत आहे. ते अत्यंत तळमळीने बोलले आणि बालग्रामची कल्पना त्यांनी सुस्पष्टपणे विशद केली. या सभेला कस्तुरबा ट्रस्टच्या प्रमुख कार्यकर्त्या, सौ. शोभनाताई रानडे उपस्थित होत्या. त्यांनी आचार्य पूज्य विनोबा भावे यांचे जन्मग्राम गागोदे, तालुका पेण येथे महाराष्ट्रातील पहिले बाल सदन सुरू करण्याचा संकल्प सभेमध्ये जाहीर केला आणि अशा प्रकारे ह्या सभेत महाराष्ट्रातील बालग्राम चळवळीची मुहूर्तमेढ रोवली गेली.

त्यानंतर ही चळवळ महाराष्ट्रात दृढमूल करून तिचा विस्तार व्हावा, यासाठी हाल-चाली करण्यास सुरुवात झाली. त्यावेळचे महाराष्ट्राचे मुख्यमंत्री कै. वसंतराव नाईक आणि समाजकल्याण मंत्री, श्रीमती प्रतिभा पाटील यांची मी भेट घेतली. बाल-ग्रामची संकल्पना त्यांना समजावून सांगितली आणि सौ. शोभनाताई रानडे यांच्या गागोदे येथील संकल्पित बालसदनाची माहिती त्यांना दिली. दोघांनाही ही कल्पना आवडली आणि समाजकल्याण विभागाने बालग्राम योजना सुरू करावी असे सांगितले. त्यानंतर महाराष्ट्रातील अनेक समाजसेवकांशी पुन्हा ह्या विषयावर मी सविस्तर चर्चा केली. मुख्यमंत्र्यांबरोबर झालेल्या चर्चेत माझी अशी आग्रही सूचना होती की, बालग्राम योजना शासकीय यंत्रणेतून न राबविता, स्वयंसेवी संस्थांमार्फत राबवावी आणि मुख्यमंत्र्यांनी ही सूचना स्वीकारली. या पार्श्वभूमीवर महाराष्ट्रातील अनेक समाजसेवकांशी विचारविनिमय झाला आणि "बालग्राम एस्.ओ.एस्. चिल्ड्रेन्स व्हिलेजेस महाराष्ट्र" या नावाने सार्वजनिक न्यासाची नोंदणी करावी असे ठरले. बाल-कल्याण क्षेत्रामध्ये काम करणाऱ्या विविध स्वयंसेवी संस्थांनी या सार्वजनिक न्यासाच्या व्यासपीठावर एकत्र यावे आणि काम करावे असे ठरले.

यानंतर लवकरच बालकल्याण क्षेत्रात काम करणाऱ्या समाजसेवकांची एक बैठक पाचगणी येथे बोलावण्यात आली. या बैठकीत "बालग्राम महाराष्ट्र" या संकल्पित न्यासाच्या घटनेचा मसुदा मंजूर करण्यात आला आणि त्यानंतर "बालग्राम महाराष्ट्र" या नावाने न्यासाची नोंदणी करण्यात आली.

पुणे येथे बालकल्याण प्रकल्प सुरू करण्यासाठी शासनाने गोल्फ कोर्स जवळील

सुमारे १३ एकर जमीन 'बालग्राम महाराष्ट्र' या न्यासाला लीजने दिली. 'बालग्राम महा राष्ट्र' संस्थेने या जागेवर एक नमुनेदार बालग्राम उभे करण्याचा संकल्प केला व त्यानुसार प्रकल्प अहवालही तयार केला. एवढी तयारी झाली, तर मुख्य प्रश्न होता तो प्रकल्पासाठी निधी उभारण्याचा. पैशांवाचून प्रकल्पाच्या उभारणीला विलंब होईल, या विवंचनेमध्ये आम्ही असताना, कोणतेही चांगले कार्य पैशासाठी अडून राहात नाही याचा सुखद अनुभव आम्हाला आला.

तसे पाहिले तर पुण्यातील या बालकल्याण प्रकल्पाविषयी बरेच दिवस आम्ही प्रयत्नशील होतो. दोन-तीन वेळा माझ्या दिल्लीच्या भेटीमध्ये मी एस्.ओ.एस्. इंडि-याच्या त्या वेळच्या अध्यक्षा, श्रीमती तारा अली बेग आणि सेक्रेटरी जनरल, श्री. जगन्नाथ कौल यांचेशी चर्चा केली होती. महाराष्ट्रामध्ये समाजसेवेची उज्वल परंपरा पूर्वीपासूनच चालत आली आहे आणि कोणतीही नवीन संकल्पना राबविण्याच्या बाबतीत महाराष्ट्र नेहमीच आघाडीवर राहिला आहे हे लक्षात घेऊन या भूमीमध्ये बालकल्याणाचा एक आदर्श प्रकल्प लवकरात लवकर उभारणे ही काळाचीच गरज आहे, हे त्यांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न आम्ही करीत होतो. या पार्श्वभूमीवर एके रात्री मला श्री. कौल यांचा अचानक तातडीचा फोन आला. त्या वेळी मी कोल्हापूरला गेलो होतो आणि श्री. कौल माझ्या पुण्याच्या घरी उतरले होते आणि तेथूनच त्यांनी कोल्हापूरला माझ्याशी संपर्क साधला होता. दुसरे दिवशी ते पाचगणीला येणार होते आणि मलाही तातडीने तिकडे येण्यास त्यांनी सुचविले. त्याप्रमाणे दुसरे दिवशी माझे सहकारी-स्नेही श्री. शंकरराव खानोलकर आणि माझे बंधू श्री. धनाजीराव जाधव यांचेसमवेत मी पाचगणीला गॉडस् व्हॅली येथे गेलो. तेवढ्यात श्री. कौल सुद्धा तेथे येऊन पोहोचले. त्यांचेबरोबर स्वीडनचे एक सद्गृहस्थ श्री. स्वेन बेझनेर आले होते. श्री. कौल यांनी त्यांचा परिचय करून दिला आणि आमची अनौपचारिक चर्चा सुरू झाली. श्री. बेझनेर यांनी पुण्याच्या प्रकल्पाबद्दल विशेष औत्सुक्य दाखविले. अनेक मुद्देसूद प्रश्न विचारून प्रकल्पाची सविस्तर माहिती त्यांनी करून घेतली.

शेवटी त्यांच्या चेहेऱ्यावर समाधान झळकले आणि त्यांनी विचारले, "मि. जाधव, तुम्ही हा प्रकल्प किती दिवसात पुरा करू शकाल ?"

आणि मी लगेच उत्तरलो, "कमीत कमी दीड वर्ष लागेल. मात्र कोणत्याही परि स्थितीत दोन वर्षाच्या आत आम्ही हा प्रकल्प कार्यान्वीत करू."

दुसऱ्याच क्षणी श्री बेझनेर उठून उभे राहिले आणि माझ्याशी प्रेमभराने हस्तांदोलन करून म्हणाले, "छान ! आजपासूनच प्रकल्पाला प्रारंभ करा. त्यासाठी कॅश-फ्लो (निधी कसकसा लागेल याचा तक्ता बनवा आणि दिल्लीला माझ्याकडे पाठवून द्या !"

आणि अशा प्रकारे आमच्या समोरचा एक यक्षप्रश्न जादूची कांडी फिरवावी



त्याप्रमाणे चुटकीसरसा सुटून गेला. निधी कसा उभारावा या प्रश्नाचे डोक्यावरील ओझे उतरले खरे, पण प्रकल्प जबाबदारीने यशस्वीरित्या पूर्ण करण्याची जाणीव फार प्रकर्षाने झाली. पुण्याला परतल्यानंतर हिरिरीने आम्ही प्रकल्पाच्या कामाला लागलो. गोल्फकोर्सजवळची जागा न्यासाला देण्याविषयी शासकीय आदेश निघाले असले, तरी जागेचा प्रत्यक्ष ताबा अद्याप मिळावयाचा होता आणि अशा परिस्थितीत आम्हाला चिंतेत टाकणारी अशी एक बातमी आमच्या कानावर आली. ज्या जागेसंबंधी शासनाचा आदेश झाला होता, तीच जागा दुसऱ्या एका श्रीमंत, प्रतिष्ठित संस्थेनेही मागितली होती आणि ती मागणी मंजूर होण्याच्या मार्गावर होती. विचार करायलाही वेळ नव्हता. एस्.ओ.एस्. चिल्ड्रेन्स व्हिलेजचे आंतरराष्ट्रीय अध्यक्ष डॉ. हर्मन मायनर यांना आम्ही पुणे बालग्रामच्या पायाभरणी सभारंभासाठी बोलावले होते, तारीख ठरवली होती आणि डॉ.हर्मन मायनरनी आमचे आमंत्रणही स्वीकारले होते. त्यामुळे जागेचा कब्जा मिळविण्यासाठी विद्युतगतीने हालचाली करणे आवश्यक होते. मी ताबडतोब मुंबईला सचिवालयात गेलो. तिथेही दुर्दैव आडवे आले. सर्व सरकारी कर्मचारी संपावर होते. सचिवालयात शुकशुकाट होता. धास्तावलेल्या मनाने त्या वेळचे महसूल सचिव, श्री. आर. जी. साळवी यांची मी भेट घेतली. त्यांचेशी चर्चा करून त्या वेळचे महसूल मंत्री श्री. मधुकरराव चौधरी यांना त्यांच्या कार्यालयात भेटलो. त्या वेळी मी विषण्ण मनःस्थितीत होतो. मंत्रीमहोदयांना सर्व हकीकत सांगितली आणि काहीसे भावनावश होऊन विचारले, "एका तागडीत ही श्रीमंत संस्था आहे आणि दुसऱ्या तागडीत बालग्रामची अनाथ मुले आहेत. आपण कोणाला न्याय देणार हे आता ठरणार आहे."

मंत्रीमहोदयांनी बालग्रामची फाइल तात्काळ मागवून घेतली आणि म्हणाले, "आता मी समजलो, की आपण एवढे त्रस्त का झालात !"

माझ्या समोरच फाइलवर त्यांनी आदेश लिहिले आणि म्हणाले, "तुम्ही उद्या जागेचा ताबा घ्या. मी जिल्हाधिकाऱ्यांना फोन करून कळवितो." त्यांच्या ह्या शब्दांनी माझ्या मनावरचे ओझे एकदम दूर झाले. श्री. मधुकरराव चौधरी व श्री. साळवी यांचे आभार मानून मी तडक पुण्याला परतलो. सुदैवाने जागेचा ताबा ताबडतोब मिळाला आणि बालग्राम प्रकल्पाच्या आरंभालाच उद्‌भवलेले एक मोठे संकट टळले आणि पुढील गोष्टी ठरल्याप्रमाणे पार पडल्या. डॉ. हर्मन मायनर यांच्या हस्ते बालग्रामचा पायाभरणी समारंभ थाटात पार पडला.

डॉ. मायनर पुण्यात असताना बालग्रामच्या मध्यवर्ती कल्पनेसंबंधी विविध दृष्टिकोणातून त्यांचेशी चर्चा करण्याची संधी मला लाभली. मला स्मरते की, "अनाथ कोणाला म्हणावे" ह्या विषयावर चर्चा चालू असताना डॉ. मायनर म्हणाले,

"ए चाइल्ड इन् डिस्ट्रेस निडस् हेल्प, वुइ मस्ट रश टु दॅट चाइल्ड." (संकटात

सापडलेल्या मुलाला मदतीची गरज असते. आपण त्याच्या मदतीला धावून गेले पाहिजे !)

हे बोलत असताना त्यांचे डोळे पाणावले होते. अशीच आणखी एक आठवण. त्या दिवशी पूनम हॉटेलमध्ये डॉ. मायनर यांची पत्रकार-परिषद होणार होती. आम्ही दोघे हॉटेलकडे चाललो होतो. एवढ्यात त्यांच्या दुभाष्याने "बुट पॉलिश करून कुठे मिळ-तील ?" असे विचारले. जवळच फुटपाथवर बुटपॉलिशचे साहित्य घेऊन एक छोटा मुलगा बसला होता. डॉ. मायनरना घेऊन आम्ही तिकडे वळलो. मुलाने पॉलिश करायला सुरुवात केली. डॉ. मायनर त्याच्याकडे निरखून पाहात होते.

ते म्हणाले, "धिस बॉय इज् इन् डिसट्रेस्. आस्क हिज् स्टोरी."

मी त्या मुलाशी बोललो, तेव्हा लक्षात आले की, त्याला आई नव्हती. वडिलांना दारुचे व्यसन होते. घरात सावत्र आई होती, पण तिथे त्याला थारा नव्हता. एक भटके जीवन तो जगत होता.

त्याची कथा ऐकून डॉ.मायनर म्हणाले, "आय सॉ हिज् मिझरी इन हिज आयीज्. आय ऑलवेज लूक इन टू दी आयीज ऑफ चिल्ड्रेन !" (त्यांच्या नजरेत त्यांचे दुःख साठलेले आहे. मी नेहेमी मुलांच्या डोळ्यांत निरखून पाहातो.) हे सांगताना त्यांचे तेजस्वी डोळे वर आकाशाकडे वळले होते. त्यांची नजर कशाचा तरी शोध घेत होती.

आमची पावले पूनमकडे वळली, तेव्हा डॉ. मायनर बोलत होते, "जाधव, जगाच्या पाठीवर अशी लाखो मुले संकटग्रस्त आहेत. ती जिथे असतील तिथे आपण पोहोचले पाहिजे. यासाठी आपणास खूप कष्ट करावे लागतील. ह्या कामाची व्याप्ती फार मोठी आहे." ते जर्मन भाषेत बोलत होते आणि दुभाषी इंग्लिशमधून मला ते सांगत होता.

त्यानंतर लवकरच बालग्रामच्या उभारणीच्या कामाला आम्ही लागलो. प्रथमतः प्रकल्प समिती स्थापन केली. मेसर्स विश्वनाथ विश्वकुमार यांना इमारतीचे आराखडे व योजना करण्याचे काम देण्यात आले. श्री. बडवे, श्री. माईणकर व श्री. बबनराव साठे यांच्या अविरत प्रयत्नाने पुणे येथील बालग्रामचा प्रकल्प वेळेत पुरा झाला व पुणे बाल-ग्रामचे उद्घाटन तारीख ७ नोव्हेंबर १९७९ रोजी मि. स्वेन ब्रेझनेर यांनी केले.

या प्रकल्पाचे कामी अनेक लोकांनी अविश्रांत परिश्रम घेतले. डॉ. अच्युतराव आपटे, सौ. शोभा रानडे, श्री. राम बेलवडी, श्री. आकोलकर, डॉ. दादा गुजर, प्रिन्सिपॉल आठरे, श्री.प्रतापराव पवार, श्री.शंकरराव खानोलकर, सौ.लीला जाधव, सौ.विजयाताई पंडित, श्री. बोरगावकर यांचा उल्लेख या संदर्भात आवर्जून केला पाहिजे.

प्रथमपासून 'बालग्राम महाराष्ट्रा'ने महाराष्ट्रातील ग्रामीण विभागात बालसदने व लहान लहान बालग्रामे उभी करण्याचे प्रयत्न केले. सौ. शोभना रानडे ह्यांच्या प्रयत्नाने कस्तुरबा ट्रस्टने गागोदे येथे पहिले बालसदन सुरू केले. त्याचप्रमाणे या संस्थेचे सासवड आणि धारणी, अमरावती येथेही बालग्रामे सुरू केली. ह्याशिवाय वेगवेगळ्या स्वयंसेवी संस्थांच्या प्रयत्नामुळे महाराष्ट्राच्या अनेक जिल्ह्यांत, विशेषतः ग्रामीण विभागामध्ये जी



बालग्रामे / बालसदने सुरू झाली, त्यांची यादी पुढीलप्रमाणे :

पूज्य विनोबाजी बालसदन, गागोदे, कुलाबा; गॉडस् व्हॅली, पाचगणी, सातारा; आंतरभारती बालग्राम, लोणावळा; साने गुरुजी बालग्राम, हडपसर-पुणे; महावीर बाल सदन, लोणावळा, आनंद बालग्राम, शारदानगर, सगरोळी, नांदेड; श्री गुरुदेव बाल-सदन, मोझरी, अमरावती; संस्कार बालसदन, अंबेजोगाई, बीड; शिरीषकुमार बाल-सदन, नारोडी, पुणे; गजानन महाराज बालसदन, अमरावती; श्री दिलिपसिंहराजे घाटगे बाल-ग्राम, पन्हाळा; लायन्स क्लब बालसदन, औरंगाबाद; ज्ञानेश आणि मुक्ताई बालसदन, पुल-गाव, पुणे; बाल आनंदग्राम, लोणावळा; राहुल बालसदन, नागपूर; करंदीकर गुरुजी बाल-सदन, अहमदनगर; साने गुरुजी बालसदन, धुलिया.

'बालग्राम महाराष्ट्र' ही संस्था म्हणजे बालकल्याणाच्या क्षेत्रात काम करणाऱ्या संस्था व समाजसेवक यांचे एक प्रभाव व्यासपीठ आहे. बालविकासाचे प्रांगणात काम करणाऱ्या चौदा स्वयंसेवी संस्था, 'बालग्राम महाराष्ट्र' या संस्थेस संलग्न आहेत. दर तीन महिन्यांनी बालग्राम महाराष्ट्राच्या संचालक मंडळाची बैठक भरते. ह्या वेळी संलग्न संस्थांचे प्रतिनिधी, संचालक उपस्थित असतात व त्या बैठकीत बालग्रामांच्या कामाचा आढावा घेतला जातो. प्रश्नांची चर्चा होते. परस्पर विचार-विनिमयातून समस्यांची उत्तरे शोधली जातात. वर्षांतून एकदा सर्वसाधारण सभा होते. ह्या वेळी महाराष्ट्रातील बालकल्याण चळवळीचे मूल्यमापन ह्या व्यासपीठावर करण्यात येते.

बालग्रामचे काम महाराष्ट्रात सुरू होऊन १६/१७ वर्षे झाली आहेत. या काला-वधीतील कार्याचे समालोचन व वास्तव मूल्यमापन करणे आवश्यक आहे. लाखो अनाथ व निराश्रित मुलांच्या समस्या अत्यंत गंभीर आहेत.लाखो अनाथ निराश्रित मुलांचे आयुष्य अंधःकारमय व दिशाहीन असते. शासकीय संस्था अशा अनाथ मुलांना मदत करण्यास अपुऱ्या पडतात. शिवाय शासकीय संस्थांमधील कार्यपद्धती अशी आहे की, त्यामुळे अनाथ, निराश्रित मुलांचे शिक्षण व विकास होणे जवळ जवळ दुरापास्त आहे. अशा परि-स्थितीत बालग्राम हा एक आशेचा किरण आहे. बालग्रामच्या कामामध्येदेखील अनेक समस्या आहेत. पण या समस्या दूर करून बालग्रामांची कार्यपद्धती जास्त परिणामकारक व्हावी याबद्दल 'बालग्राम महाराष्ट्र 'नेहेमी प्रयत्नशील असते. अनाथ मुलांच्या समस्या सोड-विणेचा एकच मार्ग असू शकत नाही. अनेक मार्गांनी हा प्रश्न हाताळला गेला पाहिजे. "We have miles and miles go" याची आम्हा सर्वांना पूर्ण जाणीव आहे.

**दौलतराव जि. जाधव,**
आय.ए.एस् (निवृत्त)

# अनुक्रम


पान क्र.

४ डिसेंबर, १९५३ — १

**१. ईस्टमध्ये ...** — ५

हर्मन मायनर — ६
सर्व संस्था मोडून टाका — ७
वार्ताहरांचे नाटक — १२
मायनरला मित्र सापडतो ! — १४
पुन्हा एकदा लिंझमध्ये — १६
मायनर भुतकाळात विसावतो ! — २१
२ डिसेंबर, १९४९ — २१
काळ बदलला ! — २६
त्याचे ध्येय : निदान ५ घरे — २९
वादळी सेनेची स्थापना — ३१
लोखंडाच्या जुन्या शेगडीभोवती — ३६
अधिक चांगल्या मार्गाचा शोध — ४२
हान्सलवरील अनर्थ — ४७
पुनश्च हान्सल रस्त्यावर — ५०
दुर्दैवी लीडीआ — ५७
सुरक्षित जीवन - हाच खरा आधार — ६०
डॉक्टर की बॉयस्काऊट ? — ६२
एक शैक्षणिक संस्था — ६४





चांगली पालक कुटुंबे कमीच असतात — ६८
अभ्यासाला रामराम — ७०
एक खरी शेकोटी — ७४
स्वतःच्या जन्मघरी — ८०
कल्पनेला परिपक्वता आली — ८४
तो मोर्चांना पकडून बसला — ८८
दरमहा एक शिलिंग — ९१
अधिक कल्याणकारी मार्ग — ९४

**२. संग्रामाचा काळ** — ९७

सहानुभूति नको जिव्हाळा हवा ! — ९८
१९५०- इमारतींचे वर्ष — १०१
दुर्दैवी मुलांची भरती — १०३
नवीन घर — १०७
व्हिएन्नाच्या वाटेवर — ११०
स्थानिक वार्ता — १११
माझे पहिले भाषण — ११२
बालग्राम संदेश त्रैमासिक — १२४
अनाथाश्रमातील उलरिश — १२५
आमचं अभियान व्यर्थ ! — १२९
मध्यवर्ती कचेरीत — १३०

काल्डोनाझो (CALDONAZZO) मधील सुट्टी १३६
लिंझमधील देणगी अभियान १४१
ओबरोस्टराइश मधील एक गाव १४९
मायनर हिशोब देतो १५२
ब्राइटनरशी समझोता १५६
पत्रकारितेला रामराम १५७
ओबरोस्टराइश जिंकले ! १६०
ईस्टमधील मातांची सभा १६८
व्यवस्थापन कडक झालं ! १७०
उलरिशचे 'ViaDolorosa' १७३
आणखी प्रगती ! १७४
पहिला शासकीय सन्मान ! १७८

## ३. चांगुलपणाची आगेकूच १८३

कल्पनेचा जर्मनीवर प्रभाव १८४
अधिकाधिक कार्यकर्ते १८७
आलम्युन्स्टरचे बालग्राम १८९
बालमातेच्या रोजनिशीतून १९०
बालग्राम कमिशन १९५
बालग्राम कुटुंब - म्हणजे लाईफ बोट १९८
तृतीय बालग्राम १९९



युवानिवासांचा जन्म २००
भलेपणातील शक्ती २०२
उलरिश आलम्युन्स्टरमधे २०३
मातेची निश्चल मूर्ती २०५
बालग्राम माता - हा उत्तम पेशा २१०
मायनरची भव्य गुप्त योजना २११
युरोपातील विजययात्रा २१८
ईस्ट - १० वर्षांनंतर... २२३
कोरियाचा पाहुणा २२५
तांदुळाच्या दाण्याची कथा २२८
पंडित नेहरु २३१
दलाई लामांची भेट २३५
लॅटिन अमेरिका - एक जागृत खंड २३९
शुभारंभ - ट्रॅम गाडीतले बालग्राम २४१
चिली देशातील उंदरांचे बीळ २४३
वाढती कामे - वाढत्या जबाबदाऱ्या २४७
कुरणातील पाळणा २५०
कौटुंबिक भावना हीच प्रमुख २५२
आफ्रिकेत पण बालग्रामांची गरज आहे ! २५५
सायगावला बोट निघाली ! २५८

# ४ डिसेंबर, १९५३

तो एक कडाक्याच्या थंडीचा दिवस होता! पूर्वेकडून लिंझला जाणाऱ्या मोठ्या रस्त्यावरील पेट्रोल पंपासमोर मी येरझाऱ्या घालीत होतो. सर्व शरीर थंडीने कुडकुडत होते. १० वाजून २० मिनिटे झाली होती आणि मी जवळपास अर्धा तास बसची वाट पाहत उभा होतो. व्हिएन्नाहून काही बातमीदार येणार होते आणि त्यांच्या सोबत मला टिरोलचे (Tirol) बालग्राम बघायला जायचे होते. मी कोटाची कॉलर मानेवर चढ-वली आणि दोन्ही हात कोटाच्या खिशात कोंबले. रस्त्याच्या कडेला माझी बॅग पण वाट पाहत होती. त्या बॅगेला अनेक हॉटेलांची लेबल्स चिकटवलेली दिसत होती. माझ्या मागच्या प्रवासाची मला आठवण झाली आणि मी एक सिगरेट शिलगावली. मी न्यूयॉर्क, शिकागो, सानफ्रान्सिस्को आणि न्यू ऑर्लिन्स ह्या शहरांत गेलो होतो. माझे ते स्मरणीय अनुभव माझ्या पत्रकारी मनाला अजून सुखावत होते, आणि आताचा माझा हा प्रवास– वर्तमानपत्रकारांना घेऊन बालग्राम बघायला जायचे! सुरुवातीपासूनच मला कंटाळा आला होता. त्यात हा रस्ता. त्यावरील धुके आणि बोचणारी थंडी. सर्व नकोसे वाटत होते. मी कशाला हा प्रवास कबूल केला? खरे म्हणजे मला व्यक्तिगत आमंत्रण पण नव्हते, कारण फक्त व्हिएन्नाचे बातमीदार यायचे होते. ह्या सर्व गोष्टींशी माझा काय संबंध? मी एक लिंझमधला वृत्तपत्र संपादक. माझा मित्र कुर्ट (Kurt) एक धडपड्या बातमीदार. प्रत्येक ठिकाणी पोचण्याची त्याला अति हौस होती. आणि त्यानेच मला व्हिएन्नाहून बोलावले होते. २ दिवस टिरोलमधे मजेत घालवायची त्याची कल्पना होती. आणि आम्ही दोघे बऱ्याच वर्षांत भेटलो पण नव्हतो. त्या भेटीच्या ओढीने मी हा प्रवास कबूल केला होता. पण मला मनातून बेचैन वाटत होते. उद्या खरं म्हणजे सेंट निकोलसचा स्मृतिदिन होता आणि माझ्या पत्नीने व मी मिळून त्याच्यासाठी एक खास छानसा कार्यक्रम पण योजिला होता. आमच्या तिघांच्या कुटुंबातील तो पहिला समारंभ होता. मला हे सर्व आठवून जरा रागच आला आणि हातातली सिगरेट मी रस्त्याच्या कडेला फेकून

दिली. अजून मला वाटत होतं की हा बेत बदलावा, बॅग उचलावी आणि सरळ घरी जावं. त्यांच्या लक्षात येईल की मी ठरलेल्या जागी उभा नाही, तेव्हा कुर्ट थोडा वेळ नाराज होईल आणि ते सर्वजण सरळ निघून जातील !

मी माझी बॅग उचचली. पण थांबलो. मला या प्रवासाचे आणखी एक आकर्षण होते. बालग्राम– मुलांची वसाहत ! ह्या विचाराने माझी ट्यूब पेटली पण डोळ्यांसमोर बालग्राम दिसेना ! पण हा विषय माझ्या आवडीचा होता आणि मी या बालग्रामांबद्दल वाचले पण होते ! अमेरिकेत फादर फ्लॅनेगनची एक बालनगरी (Boys Town) आहे. इटलीमधे कॅरॉल ॲबिंग असे प्रयोग करीत आहे. तर स्विटझ्रलंडमधे पेस्टालोझीने एक बालग्राम स्वतःच्या हिंमतीवर उभे केलेले आहे. समाजातील टाकून दिलेल्या मुलांबद्दल मी थोडेफार चिंतन पण केलेले आहे. व्हिएन्नामधे विद्यार्थी म्हणून असताना मी बालगुन्हेगारांच्या कोर्टातील कैफियती ऐकून त्यावर एक लेखमालिका पण लिहिली होती आणि ह्या लेखांतून माझी प्रतिक्रिया पण मी व्यक्त केली होती. माझे मन पुन्हा त्या विषयात रेंगाळले. माझ्या टेबलावर एक मोठा अहवाल मी ठेवला आहे. त्या अहवालात महायुद्धामुळे तरुण मुलांची जी हानी झाली होती त्याचे वर्णन दिले आहे. दुर्लक्षित मुले, बेघर झाल्यामुळे उद्‌ध्वस्त जीवन झालेली मुले, निर्वासित मुले आणि बालगुन्हेगार मुले सर्वांच्याच प्रश्नांचे सांगोपांग वर्णन त्या अहवालात दिले आहे.

आता १०.३० वाजले.अजून ती बस कुठे दिसत नाही. बॅग उचलली पण पुन्हा खाली ठेवली. रस्त्याच्या त्या कडेला एक मुलगा लोळत पडला होता. त्याच्या अंगावर फाटका, तुकडे जोडून केलेला कुडता होता. माझ्या लक्षात आलं की जवळच एक निर्वासितांची वसाहत आहे आणि त्यातूनच हा मुलगा इथे आला असावा. अशा ह्या निर्वासित भग्न वसाहती लिंझच्या जवळ पण आहेत. आणि त्यातली मुलं तुमच्याकडे मोठे डोळे करून भकास नजरेने बघत राहतात. काही जरा भित्री असतात, तर काहीजण चांगली धीट असतात. पण सर्वांची भूक एकच असते. त्यांना मायेची ऊब, जीवनाचे स्थैर्य आणि प्रेमाचा ओलावा हवा असतो. मी त्यातल्या कित्येक मुलांजवळ त्यांच्या आईवडिलांची चौकशी केली होती. पण त्यांना कुणी नव्हतेच. मी त्यांचे घर कुठे आहे म्हणून विचारले होते पण ती सर्व मुले बेघर होती. कुठून आलो व ह्या दुःखद वाटेने कुठे जायचे आहे हे त्या मुलांना माहीतच नव्हते.

खरंच, टिरोल येथील बालग्राम ह्या मुलांचे हे प्रश्न सोडविणार आहे का ? कुर्ट म्हणाला होता की हे उत्तर शोधण्यासाठी प्रेसचे लोक टिरोलला जाणार आहेत आणि



म्हणूनच मी माझ्या प्रश्नाला प्राधान्य देऊन ह्या लोकांबरोबर बालग्रामला जायचे नक्की केले होते. पण ह्या बालग्रामाच्याबद्दल वर्तमानपत्रांतून बरीच चर्चा वाचली होती आणि त्यात बरीच टीका-टिप्पणीच होती. मला एकदा एक चर्च- चॅरिटी संस्थेचे संचालक भेटले होते. त्यांना ह्या बालग्रामची बरीच माहिती होती. आणि त्यांच्या बोलण्यावरून माझे मन पण थोडेफार साशंक बनले होते. ते म्हणाले होते की कुणाला तरी पुन्हा एकदा ह्या दुर्दैवी मुलांची आठवण झाली असावी आणि त्याचा उपयोग त्यांनी स्वार्थासाठी करून हे नवीन बालग्रामचे खूळ स्वतःची तुंबडी भरण्यासाठी वापरले असावे. तेव्हाच मी ठरवले होते की एकदा प्रत्यक्ष जाऊन हे टिरोलचं बालग्राम बघायचं. मी जातीचा पत्रकार होतो आणि त्यामुळे चांगल्या भाषणबाजीने किंवा मुलांच्या नीटनेटक्या दिसण्यामुळे भावनावश होणाऱ्यांपैकी, खासच नव्हतो.

ह्या विचाराने मी घरी परत जाण्याची कल्पना सोडून दिली. मी हे बालग्राम बघायचेच ठरवले. मी बारकाईने पडद्याआडचं सर्व काही निरखायचं ठरवलं आणि आमच्या डोळ्यांना भुरळ पाडायला एखादी कृत्रिम रचना केली की काय याचा पण नक्की शोध घ्यायचा विचार नक्की केला. ही मंडळी खरी मुलांची सेवा करतात की सामाजिक प्रतिष्ठेची हाव त्यांना वाटते ह्याचा प्रत्यक्ष अनुभव घेऊन मग वर्तमानपत्रांतूनच त्यांचे पितळ उघडे करण्याची कल्पना माझ्या मनात रुजली.

माझ्या विचारात मी इतका गर्क होतो की व्हिएन्नाची बस आलेली मी पाहिलीच नाही. कुर्ट उडी मारूनच बाहेर आला आणि आम्ही दोघे बसमधे चढलो. बसचा दरवाजा आपोआप बंद झाला आणि बस टिरोलच्या दिशेने धावू लागली.

आमच्या समोरील इन्न व्हॅलीवरचे (Inn-Valley) आकाश स्वच्छ होते. समोरील ३००० फूट उंचीवरील पर्वतशिखरांवर सूर्यनारायण विसावला होता. इन्नसब्रुक (Innsbrock) आणि ऑर्लबेर्ग (Arlberg) मधले इम्स्ट (Imst) नावाचे एक लहान शहर आम्ही नुकतेच मागे टाकले होते. पर्वतारोहण करणाऱ्या बसचे धक्के बसत होते. तेवढ्यात मला एक पाटी दिसली. "बालग्राम इम्स्टकडे जाणारा रस्ता" अजून थोडे अंतर गेल्यावर काही टिरोलियन घरे दिसू लागली. एक निशाण पण फडफडत होतं आणि एका हिरवळीजवळ आमची बस थांबली. अखेरीस आम्ही पोहोचलो. बसच्या बाहेर पडताना मी शेवटी होतो. एक गृहस्थ हात पुढे करून माझ्याकडे आले आणि म्हणाले, "इम्स्ट बालग्राममधे तुमचे हार्दिक स्वागत."

हे गृहस्थ **हर्मन मायनर** होते. त्यांच्याशी झालेली ही माझी भेट व तो क्षण

माझ्या भविष्यकाळातील घडामोडींचा निर्णायक क्षण ठरणार होता. त्याने माझ्या अंतरंगात प्रवेश केला. त्याची ती धष्टपुष्ट अंगकाठी, त्याचा कृत संकल्प ज्या संकल्पनेने तो भारावून गेलेला होता, माझ्या हृदयाला स्पर्शून गेला. तो बालग्रामचा जनक मुलांसाठी नवीन जग निर्माण करणार होता.

आणि हे पुस्तक म्हणजे त्या जगाच्या निर्मितीची एक गोष्ट आहे. बालग्राम आंदोलनाची ही तारीखवार नोंदवही नाही. मी फक्त ह्या कल्पनेशी कसा बांधलो गेलो, कसा शिकलो, ह्याचे वर्णन ह्या पुस्तकात करणार आहे. हर्मन मायनरच्या विचारांनी मी प्रभावित झालो आणि त्याने निर्माण केलेल्या विश्वात मी रमून गेलो. दुसऱ्या महायुद्धाच्या भीषण संहारातून ह्या बालग्रामच्या कल्पनेचा उदय झाला आणि निव्वळ कर्तव्य म्हणून नव्हे तर उगवत्या नव्या जगाला जोडणारा एक प्रीतीसंगम म्हणून हर्मन मायनरने हा नवीन रस्ता जगाला दाखवला.





## इम्स्टमध्ये...

# हर्मन मायनर (पान ६)

आणि अशा रीतीने मी पत्रकारांच्या समूहासोबत पहिले बालग्राम पहायला इम्स्टला आलो. पण त्या भूमीवर पाय ठेवताक्षणीच माझ्या ध्यानात आले की मला बालग्रामच्या जनकाला, हर्मन मायनरला जाणून घ्यायचे आहे. काही वर्षांनंतर मला खात्री पटली की बालग्राम वसाहती म्हणजे हर्मन मायनरच्या व्यक्तित्वाचे दर्शन आहे, छाप आहे.

मायनरचे व्यक्तित्व म्हणजे ठेंगणी मूर्ती, दणकट प्रकृती आणि शेतकऱ्याची आकृती. डोंगरदऱ्यांत राहणारी ही माणसे सर्व अशीच दिसतात. टिरोल व्होरालबेर्गची (Voralberg) ही जमात शहरात नेऊन वसवली तरी तेव्हाच ओळखू येतात. मायनरचे उंच कपाळ त्याच्या प्रसन्न वृत्तीचे द्योतक तर आहेच पण त्यात त्याचा निश्चयी स्वभाव पण दिसतो. त्याचा भालप्रदेश पाहून कुणाचीही खात्री पटेल की हा मनुष्य भिंतींशी टक्कर मारून पार होईल, ह्या माणसाला काय हवं आहे ते नक्की ठाऊक आहे, एकदा त्याला जे सत्य सापडले ते तो घट्ट धरून ठेवणार आणि त्याच्या रक्षणासाठी सर्व प्रतिकूलतेशी सामना करणार. कपाळाखालची त्याची दृष्टी, नजर जेव्हा तुम्हाला भिडते तेव्हा त्यात कठोरता दिसतच नाही. त्याचे ते डोळे बोलके होतात, त्यात करुणा डोकावते आणि त्याच्या निर्मळ मनाचे प्रतिबिंब त्यात उमटते. त्या नजरेने अनुभवलेले दुःख आणि क्लेश त्यात ओतप्रोत भरलेले दिसतात. नाकाच्या दोन्ही बाजूंनी सरळ जाऊन कपोलाला भिडलेल्या त्या दोन रेषा ह्याची मूर्तिमंत साक्ष देतात. अशा ह्या अलौकिक चेहऱ्यात निराशा मात्र अजिबात दिसत नाही. उलट ते दीर्घ नाक, तो मोठा चेहरा आणि त्या भोवतीच्या दोन रेषा त्याचे व्यक्तित्व प्रसन्न असल्याचे सांगतात. अशा ह्या चेहऱ्यामागे एक आग्रही, स्पष्ट व मोठा जोरदार आवाज आहे ह्याची कुणालादेखील कल्पना येणार नाही. त्याच्या वाणीला धार आहे. त्यात आग्रह आहे पण कंटाळा येत नाही. सुरुवातीस तो आवाज धारदार बनायला थोडा वेळ लागतो. पण नंतर तो ओघवान बनतो आणि सर्वांचे लक्ष केंद्रित झालेले दिसले की तो रोमांचकारी पण बनतो. आणि बोलत असताना ह्या शेतकऱ्याचे





हरमन मायनर यांचे वारस (उजवीकडील) हेलमुट कुटीन हे स्वतःच निराधार म्हणून बालग्राममध्ये वाढले. सध्या आंतरराष्ट्रीय बालग्रामचे अध्यक्ष.



इम्स् परगण्यातील (ऑस्ट्रीया) पहिले बालग्राम



ऑस्ट्रियाचे सर्वोच्च सन्मान पदक



केरळमधील बालकाश्रमात

मजबूत, केसाळ हात पण स्वस्थ बसत नाहीत. ते भाषणाला आकार देतात आणि भाषणात रंग भरतात. मायनरना खूप बोलायला आवडते आणि त्याचे हावभाव निश्चितपणे त्याचे व्यक्तिमत्त्व दाखवत असतात. ते बोलताना लक्षात येते की ह्या माणसाच्या मनात करुणा आहे, तो आग्रहाने स्वतःला पुढे ढकलणारा नाही पण त्याचे लोभस दर्शन श्रोत्यांना आपोआप खिळवून ठेवील असा हा परिसासारखा मनुष्य बालग्राम चळवळीचा मुख्य प्रणेता आहे आणि त्याच्या कर्तृत्वावर ही चळवळ उभी आहे.

## सर्व संस्था मोडून टाका

आम्हा ३० बातमीदारांना ज्या खोलीत बसविले होते ती इतकी लहान होती की अगदी दाटीवाटीनेच आम्ही त्या खोलीत मावू शकलो. पण बालग्रामच्या १० घरांत जी मायेची ऊब आणि सुरक्षिततेची भावना होती, ती इथेही अनुभवता आली. एक साधेसे, तैलचित्र एका समोरच्या भिंतीवर टांगले होते. जुन्या जमान्यातील एक स्त्री काही भिकारी मुलांना स्वतःच्या पदराखाली झाकून घेऊन बसलेली दिसत होती. त्या चित्रांतून बहुतेक मातेची भूमिका दाखवायचा प्रयत्न केला असावा. काही वेळा पूर्वीच आम्ही अशा काही स्त्रियांना, मातांना भेटलो होतो. मातांनी आपल्या प्रेमाची पखरण घालून बेघर, मातृहीन मुलांना घरात घेतले होते. मी त्या सर्व मातांना भेटलो होतो. काही जणी त्यांच्या स्वयंपाकघरात होत्या. काहीजणी बाहेरच्या खोलीत होत्या तर काही जणी त्यांच्या स्वतःच्या खोलीतच मला भेटल्या होत्या. आम्ही त्यांना सकाळी लवकर भेटलो होतो. तेव्हा मुलांना झोपेतून उठविणे, त्यांना दूध देणे, त्यांचा नाश्ता तयार करणे, सकाळच्या प्रार्थना म्हणणे अशी रोजची कामे त्या करीत होत्या. एक माता कपाळावर पसरलेले एका मुलाचे केस विंचरून मागे करत होती. तर दुसरी मुलाच्या चड्डीचे घसरणारे बंद घट्ट करीत होती. एका लहान मुलाने आईला घट्ट पकडून धरले होते आणि तो तिला विचारीत होता, ''मम्मा, आज सेंट निकोलसच्या सोबत 'कँपस' पण येणार आहे का ?'' एका लहान मुलीने घाबरून आपला गुबगुबीत हात आपल्या नवीन मातेच्या हाताने धरून ठेवला होता. तर दुसरा एक मुलगा इतर मुलांबरोबर पळतपळत शाळेला जात असताना पटकन थांबून मागे वळून आईला हात उंच करून दाखवीत होता. जेव्हा सर्व मुले शाळेतून घरी आली तेव्हा पण मी तिथेच होतो. मुलांनी घरात पाऊल टाकले, आपल्या आईला प्रणाम करून नम्रतेने हस्तांदोलन केले आणि मग जेवायला टेबलाभोवती बसली होती. आणि होय,

खरंच ह्याच त्या माता होत्या ज्यांनी आपल्या मायेचे पांघरूण घालून मुलांचे रक्षण केले होते, दरिद्री मुलांना जवळ घेतले होते, त्यांचे लाड-कौतुक करून त्यांना कवेत घेतले होते आणि मुलांना कायमची 'आई' मिळवून दिली होती. नंतर आम्ही सर्वजण नवीन बांधलेल्या बालग्रामच्या समाजमंदिरात हर्मन मायनरशी चर्चा करण्यासाठी एकत्र जमलो. ते आमच्यासमोर उभे होते. विनयशील लाजरी वाटणारी ही व्यक्ती करड्या रंगाचा गबाळा साधारण सूट घालून आमच्याशी बोलत होती. त्यांनी आपली कहाणी सांगायला सुरुवात केली. महायुद्धानंतर त्यांना भेटलेली अनाथ मुले व त्यांच्यासाठी काहीतरी करावे ही प्रेरणा त्यांना कशी झाली आणि तिथून उगम पावलेली ही कल्पना हळूहळू बालग्रामच्या रूपात कशी मूर्त स्वरूपास आली याचे त्यांनी वर्णन केले. होता होता आज या बालग्रामात १० बालसदने, १० माता आणि जवळपास ९० मुले आनंदात राहत आहेत हे पाहून त्यांची खात्री पटली होती की त्यांच्या कल्पनेतील अनाथ मुलांचे पुनर्वसन 'बालग्रामा'तच नीट होऊ शकते.

आता त्यांच्या आवाजाला अधिक धार आली होती. आजच्या या हिंसक आणि गलिच्छ जगात 'एस ओ एस चिल्ड्रेन्स् व्हिलेज' हीच एक उत्तम उपाय-योजना होऊ शकते. आजपर्यंत एकाही माणसाने अशा तऱ्हेचे प्रयत्न या मुलांसाठी केले नाहीत. त्यांना विनाशाच्या अंधारात डोळे बांधून सोडून दिलेले होते.'' क्षणभर ते बोलायचे थांबले आणि त्यांचे मन भूतकाळात डोकावून परत आले.

लढाईवर असताना एका लहान रशियन मुलाने मला वाचवले होते. नंतर मी जेव्हा इन्नसब्रुकला शिकत होतो तेव्हा तरुण युवकांत काम करत असताना त्या लहान मुलाच्या फिकट चेहेऱ्याची मला अनेक वेळा आठवण झाली होती. या युगात सत्कर्माची परतफेड दुसऱ्या सत्कृत्याने करायला नको का ? आम्ही विद्यार्थी आमच्या थंडगार खोल्यांमध्ये बसून चर्चा करीत असू. सामाजिक परिवर्तन आले पाहिजे. नवीन मानवी मूल्यांची स्थापना झाली पाहिजे आणि अशा एका नवीन जगाच्या स्वप्नात आम्ही रमत होतो. पण निव्वळ हात जोडून, मांडीवर मांडी ठेवून चर्चा करायची आणि स्थापित मूल्यांना शरण जायचे ह्या वृत्तीने नवीन जगाची निर्मिती कशी होणार ? मी बसून क्रमिक पुस्तके आणि त्यांची टिपणे वाचीत असे. पण माझे मन मला स्वस्थ बसू देईना. मला वाटायचे की आजच्या काळाची जी गरज व मागणी आहे त्यापासून मी दूर पळतो आहे, मला कानावर हात ठेवून नुसता अभ्यास, घोकंपट्टी, पदार्थ-विज्ञानशास्त्र किंवा रसायनशास्त्र किंवा शरीर-विज्ञानशास्त्र याचे चर्वित-चर्वण करीत बसण्याचा काहीच अधिकार नाही. ही कल्पना मला स्वस्थ बसू देईना.

त्यावेळी मी युवकांच्या चळवळीत काम करीत होतो. मला मिळणारा सगळा रिकामा वेळ मी त्या मुलांकरिता खर्च करीत होतो. तरीदेखील थोड्याच दिवसांत मला



कळून चुकले होते की अभ्यासाव्यतिरिक्त देऊ केलेला माझा वेळ त्या कामास पुरेसा नव्हता.

माझ्या आयुष्यात नवीन बदल होत होता. एक दिवस माझ्या ध्यानात आले की जोपर्यंत मी तरुण, निराधार मुलांचे, ज्या मुलांची काहीच चूक नसताना त्यांना दुःख भोगावे लागत आहे. अशा मुलांचे रक्षण करणार नाही तोपर्यंत माझ्या जिवंत राहण्याला काहीच अर्थ उरणार नाही. जिथे अत्याधिक गरज आहे तिथे स्वतःला झोकून देण्याचे मी ठरविले. माझ्या मित्रांनी मला सल्ला दिला, ''हे बघ, ज्या गोष्टी तू बदलू शकत नाहीस; त्या गोष्टींसाठी डोके फोडून घेऊ नकोस. प्रथम स्वतःच्या आयुष्याचा विचार प्रत्येकाने केला पाहिजे. तू फक्त तुझाच विचार कर. इतर विषय डोक्यातून काढून टाक.'' कित्येक वेळा मला त्यांचा सल्ला स्वीकारावा असे पण वाटले. पण का कोण जाणे, तसे घडले मात्र नाही. युद्धानंतरच्या या दुःखमय वर्षात मी कित्येक तरुण माणसांचे क्लेश पाहिले, त्यांचा स्वतःवरील विश्वासच उडाला होता आणि ते अवनीतीला पोचले होते. ह्या सर्व दुःखितांमध्ये अधिक दुःखी ते लोक होते की ज्यांचे आईबाप त्यांना सोडून परलोकी गेले होते किंवा बेपत्ता झाले होते. अशा तऱ्हेने संरक्षण व कुठलाही आधार नसलेली ही माणसे एका कठोर आणि निर्दय जगात वावरत होती. ह्या जगाशी सामना देताना त्यांच्याजवळ कुठलीही आध्यात्मिक किंवा नैतिक शक्ती नव्हती. पण त्यांना जगणे भाग होते. आणि असे जीवन जगताना केलेली छोटीशी चूकदेखील त्यांच्या नाशास कारणीभूत ठरणार होती. प्रत्येक मनुष्य अशी चूक केव्हातरी करीत असतो. पण ह्यांची चूक अक्षम्य ठरणारी होती.

फ्रान्झल (Franzl) नावाच्या एका तरुण १५ वर्षांच्या होतकरू मुलाला ही गोष्ट फार सोसल्यानंतर समजली. एकदा त्याने आपल्या मालकाच्या टेबलाच्या खणातील १० सिगरेटस् चोरून घेतल्या. त्याचा मालक सुस्वभावी, विचारी वृत्तीचा होता. त्याला प्रामाणिकपणे असे वाटले की ह्या फ्रान्झलला मुले सुधारणाऱ्या शाळेत घातला पाहिजे. म्हणजे तो पुन्हा चोरी करणार नाही.

फ्रान्झलला स्वतःचे आईबाप नव्हते. असते तर कदाचित त्यांनी मालकाची मनधरणी केली असती. आणि फ्राला घरात ठेवून घेतले असते. फ्राला फक्त एक वृद्ध आजी होती. ती बहिरी होती आणि आंधळी पण. काही विचारले तर ती फक्त अगतिकतेने आपली मुंडी हलवायची. दुसरा कुणी असा सद्गृहस्थ पण जवळपास नव्हता की ज्याने वास्तविक फ्राच्या मालकाला जाऊन सांगायला पाहिजे होते की, ''हे पहा, तुम्ही जेव्हा जन्म घेतलात, तेव्हा काही सद्गुणांचा पुतळा बनून आला नव्हतात. तुम्हाला नशिबाने तुमचे आईबाप लाभले होते. आणि त्यांचे शिकवणीनेच तुम्हाला बरे-वाईट, सत्य-असत्य ह्या कल्पना समजू लागल्या. बिचाऱ्या फ्राला असं कुणी

शिकवणारं अजून मिळालंच नाही. ह्याचा तुम्ही सहृदयतेने विचार करायला हवा."

बिचाऱ्या फ्रावर कोसळलेली संकटांची परंपरा कुणी थांबवू शकले नाही. त्याची खात्री पटली की ह्या जगात दोन तऱ्हेची विसंगत मूल्ये नांदतात. त्याच्या कमनशिबाने तो अशा वर्गात जन्मला आहे की जेथे त्याला कुणी समजावून घेणारं नाही, प्रेमाने वागवणारं नाही. किंवा अपराध घडल्यास तो पोटात पण घालणार नाही. मोठ्या माणसांची न्यायबुद्धी आणि कायद्याची उपयुक्तता आणि परमेश्वराचे अस्तित्व यावरील त्याचा विश्वासच उडाला.

बालपणी बालविकास संस्थेत फ्राला जाता आले नाही. त्याऐवजी त्याला मुलांच्या सुधारगृहात जावे लागले. कुठे बालविकास आणि कुठे सुधारगृह ? बाल सुधारगृहात फ्रा जे काही शिकला व जे काही त्याने अनुभवले त्यामुळे तो आणखीनच गोंधळून गेला. २ वर्षांनंतर जेव्हा तो बालसुधारगृहातून बाहेर पडला तेव्हा उनाड मुलांच्या टोळक्यात जाऊन पोहोचला. ही मुले अशीच भरकटलेली आणि वाईट मार्गाला लागलेली होती.

पण आपण, मोठ्या माणसांनी हे चालू द्यावे का ? ह्या मुलांच्या संरक्षणाची, त्यांना उत्तम नागरिक बनविण्याची आपली काही जबाबदारी नाही का? पण आपण त्यासाठी काही प्रयत्न करतो का ? आपण ह्या मुलांना सुधारगृहात किंवा अनाथालयात पोचते करतो. कधीही असा विचार आपल्या मनातदेखील येत नाही की ह्यातील प्रत्येक मुलाची गरज काय आहे ? त्याच्या निरोगी विकासासाठी त्याला काय हवं ? आईचं प्रेम ! रहायला घर ! शाश्वत आधार ! आणि भरपूर प्रेम !"

मायनरचे हे भाषण सुरू असताना माझ्या शेजारी बसलेल्या स्त्री बातमीदाराच्या डोळ्यांनी अश्रूंना वाट करून दिली होती आणि माझे डोळे पण पाणावले होते ! बाहेर बर्फ भुरभुर पडत होतं आणि आमच्या खोलीच्या खिडक्यांच्या तावदानांवरून ते हळूहळू घसरत होतं. एका मुलाने मान उंच केली, तो खिडकीजवळ गेला आणि काचेवर नाक दाबून बाहेर बघू लागला. मायनरने ते पाहून स्मितहास्य केले.

"हं, प्रिय मित्रांनो, तुम्ही या बालग्रामची मुले पाहिलीत. त्यांचे बालपण तळागाळात गेले, ती टाकून दिली होती, अनाथ होती, नकोशी होती. त्यांनी भरपूर मार खाल्ला, त्यांचं शोषण झाले आणि त्यांना अन्यायाची वागणूक मिळाली. अशी ही कमनशिबी मुलं येथे आली. येताना आपल्या शारीरिक व मानसिक वेदना, व्यथा सोबत घेऊन आली. आम्ही त्यांच्यासाठी काय केलं ? त्यांना 'या' म्हटलं आणि त्यांच्यावर प्रेम केलं.



"ही जी सर्व छोटी मुलं तुम्ही पाहिलीत त्यांच्या बाललीला पण तुम्ही पाहिल्यात. त्यांना इथे येण्यापूर्वी काहीच भविष्य नव्हतं. त्यांची रवानगी अनाथालयात किंवा एखाद्या सामाजिक संस्थेत झाली असती. त्यांच्या दुर्दैवाबद्दल त्यांना शिक्षा भोगावी लागली असती आणि समाजापासून त्यांना अलग ठेवले गेले असते. चांगल्या आनंदी सामाजिक वातावरणापासून त्यांना तोडले गेले असते कारण जगाच्या जणू पडछायेत ती जन्मली होती. प्रत्येक मुलाला प्रेमाची गरज असते. आपण जर ह्या मुलांना ते प्रेम दिले, प्रेमळ आई दिली, एक नवीन घर दिले तर हीच मुले इतर मुलांसारखी सशक्त, चांगली व आनंदी बनतील.

"म्हणून मी म्हणतो की तुमच्या जुन्या सर्व संस्था मोडून टाका. युरोप खंडात जे लक्षावधी रुपये तुम्ही संस्था चालविण्यासाठी खर्च करीत आहात ते सर्व पैसे वाचवा आणि ह्या गरिबांहून गरीब मुलांसाठी बालग्राम वसाहती उभ्या करा. ह्या वसाहतीत स्वातंत्र्याचे वारे वाहू द्यात."

मायनरने इतक्या आवेशाने हे शेवटचे वाक्य उच्चारले की जणू त्याचा आवाज जगातल्या सर्व बालकल्याण कार्यकर्त्यांना ऐकू जात होता. हा मनुष्य, ज्याने आपले सर्वस्व या चळवळीला अर्पण करून टाकले होते तो लहान मुलांच्या ह्या भग्न विश्वात क्रान्ती घडवून आणून अनाथ मुलांना पूर्ण सुसंस्कृत भव्य जीवनाचे दर्शन घडविणार होता ! नंतर हलक्या आवाजाने तो आणखी एका मुलाची गोष्ट सांगू लागला.

'पॉल, एक उपेक्षित मुलगा होता. त्याला एका वाईट कुटुंबात (Foster Home मध्ये) राहायला पाठविले. तो रोज मार खायचा आणि घरातील सर्व कष्टाची आणि कंटाळवाणी कामं करायचा. घरातल्या कुणाला तो आवडत नसे. आणि त्या घरातल्या, कुठल्याही बाईच्या वागण्यात त्याला 'आई' किंवा तिचं प्रेम दिसत नसे. जेव्हा तो ११ वर्षांचा होत आला तेव्हा तो जवळपास गुन्हेगार बनण्याच्या अवस्थेत होता. तो आमच्याकडे आला. इथं काही चांगलं असेल अशी त्याची अपेक्षाच नव्हती. मोठ्या माणसांवर त्याचा अजिबात विश्वास नव्हता पण इथं आल्यावर त्याला कौटुंबिक जीवन मिळालं. एका बाईने त्याला मायेने जवळ घेतले, रात्री त्याला चांगल्या बिछान्यात झोपवून त्याला पांघरूण घातलं आणि त्याला झोपण्यापूर्वी एक गोष्ट पण सांगितली. अनपेक्षितपणे त्याला नवीन भाऊ व बहिणी असलेले घर मिळाले. त्यात १२ वर्षांचा टोनी होता, १० वर्षांची झेपल होती, ९ वर्षांचा गुंथर होता, ७ वर्षांची रोझी होती, ६ वर्षांचा बाल्टाऊड होता, ४ वर्षांची एर्ना तर २ वर्षांचा मिर्ल होता ! त्याला एक घर सापडलं होतं. सुंदर टिरोलियन छोटंसं घर. त्यातली बसण्याची खोली, टाईल्स लावलेला स्वयंपाकघराचा ओटा व गॅसची शेगडी, स्वच्छ छोटे पलंग आणि

त्यावरील चौकटीची नक्षी असलेली पांघरुणं. सर्व पाहून पॉलचं मन हरखून गेलं. हे सगळं माझंच आहे ह्यावर त्याचा विश्वास बसेना. तो एकदम भेदरला, मागे सरकला आणि लपून बसला. स्वतःची आई, भाऊ, बहीण यांना तो टाळू लागला. पण नंतर एक चमत्कार घडला. असे चमत्कार आम्हाला वारंवार अनुभवायला मिळत असतात. कुटंबातल्या चिमुकल्या मिर्लवर त्याचे प्रेम बसले. मिर्लला पण तो आवडला आणि मिर्ल-पॉलची चांगलीच गट्टी जमली.

पॉलला वरवर जाणवले नाही तरी अंतर्मनात नक्की वाटले असावे की ह्या छोट्या-मुलीला आपले पूर्वायुष्य, त्यातल्या वाईट गोष्टी आणि दुःखी जीवन याची मुळीच माहिती नाही आणि म्हणूनच तो मिर्लकडे ओढला गेला. तिला फिरायला नेऊ लागला, तिच्याबरोबर खेळू लागला आणि सतत तिला नजरेसमोर ठेवू लागला. एकदाचा त्याच्या मनातील गोठलेल्या भावनांचा हिमदगड विरघळू लागला होता. प्रथमच मानवतेचा सुंदर स्पर्श त्याला झाला होता आणि नकळत त्याचे मन या नवीन परिवारात रमू लागले होते आणि एक दिवस पॉलने त्याच्या आईच्या कमरेला विळखा घातला आणि काही दिवसांनी तिला तो 'आई' पण म्हणू लागला.''

हे सांगत असताना मायनरने मुलांच्या शिक्षणाचा विषय सुरू केला. त्याने मातेच्या जबाबदारीचे व कामाचे वर्णन केले. तान्ह्या मुलांच्या आनुवंशिक परिणामां बद्दल तो बोलला, तसेच बालग्राममधे राहिल्यामुळे मुलांच्या मनावर जे परिणाम होतात त्याचीपण उदाहरणे त्याने दिली. आणि जेव्हा ही मुले शाळेत जाऊ लागतात तेव्हा त्यांच्या विकासाबद्दल पण काय काळजी घ्यावी हे त्याने सांगितले.

खोलीत पूर्ण अंधार झाला होता. पण आमच्या कुणाच्याच तो लक्षात आला नाही. मायनरची गोष्ट सांगून संपल्यावर वातावरणात आणखीच स्तब्धता आली. आम्हाला काहीच प्रश्न विचारायचे नव्हते. नंतर बरेच उशिरा माझ्या लक्षात आले की अशा तऱ्हेची वार्ताहर परिषद आमच्यापैकी कुणीच कधी अनुभवली नव्हती. कारण ह्या वेळी आमच्यापैकी कुणी आवंढादेखील गिळला नव्हता, इतके आम्ही सर्वजण स्तंभित झालो होतो !

## वार्ताहरांचे नाटक

आम्ही ठरविले की ह्या मुलांची उद्याच्या समारंभाच्या निमित्ताने आज संध्या काळी छानपैकी करमणूक करायची. व्हिएन्नाच्या एका बातमीदाराने सेंट निकचा वेश केला. आम्ही घाईगर्दीने शहरात गेलो. खूप मिठाई, चॉकलेटस् सफरचंद, संत्री,



केकस्. ज्या ज्या चांगल्या वस्तू त्या सर्व खरेदी केल्या व एका पोत्यात भरून घेतल्या. रेडी !!! बर्फाच्छादित बालग्राममधून सेंट निक हळूहळू फिरू लागला. आम्ही वेगवेगळ्या बालसदनांत प्रवेश केला आणि त्या त्या कुटुंबाबरोबर ही आनंदाची संध्याकाळ घालवली. आम्ही पुन्हा आमच्या बाल्यावस्थेत प्रवेश केला. मुलेच बनलो. आणि सर्वांची अंतःकरणे आनंदाने गद्‌गद् झाली. आणि आमची मने आश्चर्य व आदराने ओतप्रोत भरली. एक सुंदर स्वप्न आकार घेत होतं. ते शांत विसावलेले छोटे बालग्राम, त्याच्या सभोवती असलेली गर्द वनराई, आकाशातून हलके हलके पड-णारे ते बर्फाचे तुषार, प्रत्येक घराच्या ओटीवरून दिसणारे, चमकणारे दिवे, दूरवर कुठेतरी ऐकू येणारा चर्चचा तो गंभीर घंटानाद. सर्व वातावरण एखाद्या परीकथे प्रमाणे सुंदर वाटत होते आणि आम्ही सर्वजण मंत्रमुग्ध होऊन तो आनंद भरभरून पीत होतो.

हान्स फ्रीडेन बालसदनाच्या ओटीवरच्या खोलीतील कोपऱ्यात मी एका बातमी दारासोबत मायनरजवळ बसलो होतो. भक्कमशा जेवणाच्या टेबलाभोवती ९ तरुण मुले येऊन बसली. आई जवळच होती. सर्वांत लहान मूल आईच्या मांडीवर चढून बसलं आणि ५ वर्षांचा पीटर पडदे दूर सारून अंधारातून बाहेर डोकावला आणि पुटपुटला, ''खोडकर मुलांना शिक्षा करायला इथेतरी कुणी राक्षस येणार नाही !'' आणि नकळत भीतीने तो त्याच्या मोठ्या बहिणीला बिलगला. मायनर हळूच सांगू लागला, यात एकाच कुटुंबातली ५ मुले एकत्र आहेत. २ वर्षांपूर्वी ती आली. त्यांचे आईबाप मृत्युमुखी पडलेले होते आणि त्यांची ताटातूट होणार होती. सर्वांत मोठ्या मुलीला एका बालिकासदनात पाठविणार होते, धाकटी मुलगी एका घरात वाढवायला दिली जाणार होती, दोन्ही मुलगे बालसदनमधे आणि सर्वांत लहान मूल नर्सरीत वाढेल असे ठरले होते. आता ही सर्व इथे एकत्र एका कुटुंबाची बनून राहत आहेत. त्यांना आई पण मिळाली आहे. आत्तापर्यंत हे असे कधीच घडले नव्हते.

बाहेर काहीतरी गोंगाट ऐकू येत होता आणि दारावर थाप पडली. बाहेरून दरवाज्यात दणकट पावलांचा आवाज आला. तो ऐकून मुले दाराकडे टक लावून पाहू लागली. बेबी आईला बिलगली आणि रडू लागली. पीटर हुंदके देऊ लागला. ११ वर्षांचा मार्टिन अवसान आणून म्हणाला, ''या, आत या.'' दरवाजा उघडला आणि बर्फाच्छादित शरीर घेऊन सेंट निक घरात शिरला. त्याने आपली खांद्यावरची पोतडी सावरली आणि टेबलाजवळ जाऊन तो मुलांना म्हणाला, ''माझ्या बाळांनो, तुम्हांला अभिवादन !'' प्रत्येक मूल त्याच्याकडे डोळे फाडून पाहू लागले. तितक्यात मुलांची आई उठून उभी राहिली व म्हणाली, ''बाळांनो उठा, आपण सर्वजण सेंट निकचे स्वागत करूया. आणि तो आपल्याकडे आला म्हणून त्याचे आभार मानू या.''

एकेकजण उठू लागला व सर्वांनी आळीपाळीने सेंट निकशी हस्तांदोलन केले. त्याने पण त्यांची नावे विचारून घेतली आणि म्हणाला, "तुम्ही चांगली मुलं आहात ना ?" मुलांनी चोरून आईकडे पाहिलं पण आईने गोड हसून फक्त मान हलविली. सर्व मुलांनी हात जोडले व ज्यांना प्रार्थना तोंडपाठ येत होती, ती मुले म्हणाली, "हे परम प्रिय आकाशातल्या बापा, तू आम्हाला हे बालग्रामातील छान घर मिळवून दिलंस. तू आता आमच्यासोबत रहा. आमच्या बालग्रामचं आणि आमच्या कुटुंबाचं रक्षण कर." शेवटी एकादाची ती जादूची पोतडी उघडली आणि त्यातून मुलांच्या आवडीच्या छानछान भेटवस्तूंचा ढिगारा टेबलावर ओतला गेला. पुन्हा एकदा सेंट निकोलसने सर्वांशी हस्तांदोलन केले, पोतडी परत आपल्या खांद्यावर टाकली आणि दारात जाऊन त्याने मुलांचा निरोप घेतला. बर्फाच्या रात्रीत लवकरच त्याची पावले ऐकू येईनाशी झाली.

हे साधे नाट्य आम्ही शांतपणे पाहिले. टेबलाभोवती मात्र गोंगाट सुरू झाला आणि मिठाईची पाकिटे भराभर उडू लागली. "बघा" मायनर म्हणाला, "ह्याला म्हणतात कौटुंबिक जीवन. लहानमोठे सर्व सुखाचे क्षण मुलांनी एकत्र बसून वेचले- मग ते क्षण सेंट निकचे असोत, नाताळचे असोत. दिवाळी असो किंवा गणपति-उत्सव असो, मातृदिन असो किंवा वाढदिवस असो. प्रत्येक सण करतात आणि अशा प्रकारे वर्षभर काही ना काही सण, उत्सव सुरूच असतात. रूढी आणि ह्या परंपराच आपल्याला आपण जे आहोत ते बनवीत असतात. त्यामुळे आपण विक-सित होत असतो आणि घराशी बांधले जातो. घरात जर असे लहानसहान आनंदी सांस्कृतिक कार्यक्रम नसतील तर आपली सांस्कृतिक वाढ होणारच नाही. मित्रांनो, विचार करा, एखाद्या संस्थेत किंवा अनाथालयात हे वातावरण दिसेल का ? लहान मुलाच्या मनाची त्यामुळे किती उपासमार होत असेल ? इथे त्याचे मन मुक्त राहील आणि फुलेल, फळेल आणि म्हणूनच मला वाटते की ही माझी बालग्रामची कल्पनाच अधिक लाभदायी आहे. माझा विश्वास आहे की माझा हा प्रयोग यशस्वी झाल्या-शिवाय राहणार नाही."

## मायनरला मित्र सापडतो !

मध्यरात्र उलटून गेली होती. बालग्रामचे विचार डोक्यात घर करून बसले होते. मायनर मला जवळच्या निवासापर्यंत पोचवायला माझ्यासोबत चालत येत होता. सर्व बालसदनांतील दिवे मालवले होते. सर्वदूर अंधार होता. फक्त बाल-



ग्रामच्या चौकातील खांबावर असलेला एक दिवा मंद प्रकाश देत होता. लहान लहान टिरोलियन धर्तीच्या ह्या झोपड्यांवर बर्फाने आपले पांघरूण घातले होते. जणूं काय त्या रूपाने परमेश्वराने आपल्या मायेचे विशाल हात मुलांचे रक्षण करण्यासाठी दीर्घ पसरले होते. "मायनर तुमचं हे काम फार चांगलं आहे. परमेश्वर तुमचा पाठीराखा आहे." मी बोलत होतो, तेवढ्यात मायनर म्हणाला, "त्यासाठीच तर सर्व धडपड सुरू आहे. मी व माझ्या मित्रांनी सतत परिश्रम करून ही १० घरे घडविली आहेत; कारण आमचा चांगल्या कामावर पूर्ण विश्वास आहे."

माझ्यातला पत्रकार अचानक जागा झाला आणि मी त्याला विचारलं, "पण तू या कामासाठी पैसा कुठून आणणार ? ह्या इमारतींसाठी झालेला खर्च तू कसा उभा करणार ? मुलांचा रोजचा निर्वाह अव्याहत चालू राहील, यासाठी तू पैशांची काय व्यवस्था करणार ? पुष्कळ माणसं अशी आहेत की ज्यांना तुझं हे काम पहावत नाही आणि ते तुझा द्वेष करतात. आता या सर्व गोष्टींना प्रसिद्धी मिळणार. समाजातील दानाचा ओघ तुझ्याकडे पाठ फिरवील. हे कसं घडत असतं ते मला पक्कं ठाऊक आहे. थोडे दयाळू लोक कदाचित तुला देणगी देतील देखील ! पण तेवढ्याने तुझे भागेल का ? बहुतेक सर्वसामान्य लोक स्वार्थी असतात आणि फक्त स्वतःपुरताच विचार करतात. ते फक्त तोंडदेखली स्तुती करतील व म्हणतील, 'वा, हे छान आहे !' बस् एवढेच. खरंच मायनर, तुझ्या धैर्याचे मला कौतुक वाटते."

आम्ही आमच्या निवासस्थानी पोचलो. त्या तेवढ्या अंधारात देखील मायनरने त्याचे ते तीक्ष्ण डोळे माझ्यावर रोखलेले मला दिसले. तो म्हणाला, "माणसे चांगलीच असतात. त्यांना चांगलं वागण्याची संधी मिळायला हवी. माझी भिस्त त्यांच्या चांगुल-पणावर आहे. आर्थिक अडचणींची भीती मला वाटत नाही. मी बऱ्याच देणग्या मिळ-विल्या आहेत. कदाचित त्या जरुरीपेक्षा जास्ती पण असतील. पण त्याला माझा इलाज नाही. असंख्य मुलांच्या गरजांकडे मी कानाडोळा करू शकत नाही. आता प्रथमच ही १० घरं वसली, त्या घरांतून मुलांचे हसणे-खिदळणे ऐकू येऊ लागले आणि ते सर्व पाहून मला समाधान झाले आहे आणि माझा विश्वास पण वाढला आहे. ह्या गोड मुलांना ह्या करुणेची अत्यंत गरज होती. जोपर्यंत आमचे हात स्वच्छ आहेत तोवर आमच्या कामाला मदत मिळत राहील. लक्षात ठेव माझे शब्द, चांगलं काम मदतीवाचून अडणार नाही. लोक निश्चित मदत करतील. आज शेकडो लोकांनी मदत केली, उद्या हजारो करतील आणि कदाचित असा दिवस उजाडेल की जेव्हा लाखो लोक मदतीचा हात पुढे करतील. आता मला यातून माघारी जाता येणार नाही. मी खर्चाचा अंदाज घेतला आहे. त्याची तजवीज मला केलीच पाहिजे. मला मोजावी लागलेली किंमत वैयक्तिक स्वरूपाची आहे. मी माझ्यापुरते, माझे सर्वस्व या

मुलांना देऊन टाकले आहे आणि ह्या कामात पैशाची कमतरता भासणार नाही याची काळजी मी घेईन.''

मायनरने त्याचा हात पुढे केला. जणू काय तो स्वतःशीच बोलत होता. ''माझ्या खासगी आयुष्यात मात्र जी उणीव राहिली तिची भरपाई कधी करता येणार नाही. कित्येक वर्षांत मी माझ्या आयुष्याचा कधी विचारच केला नाही. पण आता मात्र मला असे दिसते की सर्व असूनदेखील मी मात्र एक दिवस एकाकी राहणार आहे !''

मी उभा राहून त्याची गडद आकृती अंधारात गडप झालेली पाहत होतो आणि मला एकदम वाटलं की आपण ह्या माणसाचे मित्र बनणार आहोत !

## पुन्हा एकदा लिंझमधे

मी माझ्या कचेरीत बसलो होतो. तेवढ्यात माझ्या टेबलावर एक टेलिप्रिंटरचा संदेश आला. ''ऑस्ट्रियाने आपली नवी योजना मॉस्कोत सादर केली.'' जगाच्या राजकीय वातावरणाचा विचार माझ्या मनात आला. महायुद्ध संपून ८ वर्षं पूर्ण होत आली पण अजून शांतता प्रस्थापित होण्याची चिन्हे दिसत नव्हती. सतत न संपणाऱ्या गाठीभेटी आणि निर्णय होत नसलेल्या चर्चा याशिवाय दुसरे काही घडतच नव्हते. युद्धामुळे झालेला संहार अतिशय भयानक होता आणि अत्यंत परिश्रमाने पुन्हा नवीन घडी घातली जात होती. आर्थिक अवस्था हळूहळू सुधारत होती. पण अजून पैशांची किंमत स्थिर होत नव्हती. ऑस्ट्रियाने आपली पुनर्रचना केली होती आणि आपले शांततेचे व समानतेचे धोरण सतत चालू ठेवले होते. इतके असूनदेखील आमचा देश शक्तिमान राष्ट्रांच्या हातांतील एक खेळणेच बनलेला होता. बर्लिनमधे होणारी पूर्व-पश्चिम परिषद काय निर्णय घेणार होती ? चार बडी राष्ट्रे या खेपेला तरी एक मेकांच्या सन्निध येतील का ? जगात बऱ्याच ठिकाणी अजून युद्धाचे वारे खेळत होते. इंडोचायनात द्वेषाचा अग्नी प्रज्वलित होत होता तर थंडीचा फायदा घेऊन व्हिएटनाम देशात आक्रमण सुरू झाले होते. फ्रान्स देशातील सरकार, राज्यव्यवस्था एकामागून एक कोलमडून पडत होती. युरोपातील राष्ट्रीय बचाव संस्था एका अंधाऱ्या गर्दीत चाचपडत होती. इंग्लंडमधे मृत्युंजय ठरलेला 'वयस्क नेता' विन्स्टन चर्चिल स्वतःच्या देशाची प्रतिमा सर्व विश्वात उजळावी म्हणून प्रयत्न करत होता. पण ब्रिटिशांच्या सर्व वसाहतींनी त्यांना त्रास देण्यास सुरुवात केली होती. आफ्रिका खंड पण घुसळून निघत होते. अलीकडे झालेल्या मोठ्या बलाढ्य राष्ट्राच्या भांडणाची



मोठी दुःखद शोकांतिका म्हणजे जर्मनीचे विभाजन. सर्वत्र गोंधळ दिसत होता, कुठेच शांती नव्हती.

कंपोझिंगच्या खात्यातून फोन आला. त्यांना संपादकीय लिहून हवे होते. माझा टाईपरायटर खटखटू लागला आणि संध्याकाळच्या वर्तमानपत्राच्या उत्कंठेशी तो एकजीव झाला. पुन्हा एकदा मी माझ्या विश्वात गुरफुटलो आणि राजकीय परिस्थितीची मीमांसा करू लागलो.

आणि अचानक माझ्या टेबलासमोर हर्मन मायनर उभा असलेला मला दिसला. विनयशील मायनर हसतमुखाने उभा होता.

वर्तमानपत्राच्या कचेरीसमोरील एका छोट्याशा कॉफी हाऊसमधे आम्ही दोघे जाऊन बसलो तेव्हा रात्रीचे ११ वाजले होते. ६ आठवड्यांपूर्वी इम्स्टला आम्ही एकत्र राहिलो होतो. त्या आठवणी पुन्हा एकदा उजळून निघाल्या. मायनर लगेच बोलू लागला. त्याला बालग्रामबद्दल बरेच काही सांगायचे होते. ज्यांचे आईबाप एका अपघातात मृत्युमुखी पडले होते, अशांची ६ मुले एकदम बालग्रामात दाखल झाली होती. आणखी एक ३ आठवड्यांचे अर्भक; हान्स फ्रीडेन बालसदनात घेतलं होतं आणि मातेच्या कामासाठी एका नवीन महिलेने अर्ज केलेला होता. मी लक्षपूर्वक सर्व गोष्टी ऐकत होतो. खरं म्हणजे जगातल्या महत्त्वाच्या राष्ट्रीय घडामोडींशी एकाग्रतेने गुरफटलेल्या माझ्या पत्रकारी मनाला ह्या बालग्रामच्या बातम्या म्हणजे अगदी छोटे छोटे मानवी जीवनांतले अनुभव होते. पण ह्या अनुभवांना आणखी एक महत्त्वपूर्ण अर्थ होता कारण त्या अनुभवाभोवती एक नव्या विश्वाची निर्मिती झाली होती. आणि हे नवीन विश्व ह्या माणसाने आपल्या हाताने टिरोलच्या डोंगरात निर्माण केलेले होते. मग तो मनुष्य नवीन बालसदनांच्या उभारणीविषयी बोलू लागला. नाताळ सणाची जी शुभकामना कार्डे पाठवली होती, त्यातून अपेक्षेपेक्षा अधिक देणगी जमा झाली होती. ते जवळपास २ लाख होते आणि त्या रकमेतून एक नवीन बालसदनाच्या इमारतीचे बांधकाम करणे सहज शक्य होते. नंतरच्या वसंत ऋतूच्या आगमनाच्या निमित्ताने मायनर सभासद नोंदणी मोठ्या प्रमाणावर सुरू करणार होता. ''जर आपल्याला २ लाख सभासद मिळाले तर आपल्याला विनासायास २ लाख रुपये दरवर्षी मिळतील. आणि मग या ठिकाणी आपल्याला आणखी घरे बांधता येतील. व १५ ते २० घरांचे इम्स्टचे बालग्राम बनेल. कदाचित् मी एखादे स्वतंत्र घर नवीन उमेदवारांसाठी १४ वर्षांच्या वरील मुलांसाठी पण बांधू शकेन. म्हणजे १४ वर्षांनंतर त्यांना दुसऱ्या होमस् मधे किंवा कुटुंबांत पाठविण्याची गरज भासणार नाही. आपल्याला या मुलांना घर दिलेच पाहिजे. एक कायमचे घर त्यांना हवे आणि म्हणून हे मोठ्या मुलांचे घर व्हायलाच पाहिजे आणि मी ते बांधून घेईन

नक्की !"

मायनरने आपल्या उजव्या हाताचा पंजा टेबलावर आपटला. त्याच्या डोक्यात भरपूर योजना, नवनवे विचार आणि नवीन उत्साह संचारलेला मला दिसत होता.

वर्तमानपत्रांतून जी टीका चालू होती त्यामुळे तो त्रस्त झाला नव्हता. कारण लहानसहान गोष्टीने परावृत्त होणाऱ्यांपैकी तो नव्हता. ह्या आपल्या जगाच्या उंचीची आणि खोलीची कल्पना त्याला नीट समजली होती. आत्ताची त्याची व माझी ही दुसरी भेट होती. आजकालच्या माणसांना वाटणाऱ्या भीतीच्या कल्पनांचे लवलेश मनाला ज्याच्या स्पर्शत नाहीत अशा एखाद्या महान तत्त्ववेत्त्यासारखा तो मला वाटला. मायनरला कशाचीच भीती किंवा कुठलीच अनिश्चितता वाटत नव्हती. जगातल्या चांगुलपणावर त्याची आत्यंतिक निष्ठा होती. आणि म्हणूनच तो म्हणत होता, माणूस फार चांगला असतो.

पण जेव्हा प्रत्युत्तराच्या अपेक्षेने तो माझ्याकडे पाहू लागला तेव्हा मला काय म्हणावे ते सुचेना. मला त्याला खरं काय आहे ते सांगितलंच पाहिजे. मी मनातल्या मनात ठरविले. तो सहन करील. कदाचित त्याच्याजवळ काही उत्तर पण सापडेल. आणि म्हणून मी माझ्या खिशातून माझ्या लिखाणाचे कागद काढले आणि आमच्या मधल्या टेबलावर ते मांडले. "हे बघ हर्मन" (आता आम्ही दोघांनी एकमेकांना पहिल्या एकेरी नावाने हाक मारण्याचे ठरले होते) "गेल्या ६ आठवड्यांत इम्स्टहून आल्यापासून मी फक्त एवढेच लिखाण तुझ्यासाठी करू शकलो. हा इतका लहान लेख आहे की मला त्याची लाज वाटते. मला खूप प्रेरणा झाली होती आणि रिकामा मिळणारा प्रत्येक क्षण मी या लिखाणासाठी द्यायचं ठरविलं पण होतं. पण मला आता अपराधी वाटतं. मी फक्त हा छोटासा एक लेख लिहिला आहे आणि तोदेखील प्रसिद्ध झाला नाही.

मायनर हसला. "मी आता तुला या संपादकाच्या टेबलामागे पाहिले आणि मला सर्व काही समजलं. हेंझ, वाईट वाटून घेऊ नकोस. चांगल्या गोष्टी घडायला नेहमीच अवधी लागतो. ते तू बदलू शकत नाहीस. माझ्याइतकीच तुझी पण तीव्र भावना आहे हे मला ठाऊक आहे. आपण सर्वजण या बालग्रामच्या नवीन कल्पनेने पेटून गेलो आहोत आणि ही पेटलेली ज्योत केव्हाच विझणार नाही ही माझी खात्री आहे."

"होय, ते खरे आहे." मी उत्तर दिले. "इम्स्टहून परत आल्यापासून माझ्या मनात सारखं निराशेचे थैमान सुरू आहे. इतकी घोर निराशा बहुधा मी माझ्या व्यावसायिक जीवनात पहिल्यांदाच अनुभवली असावी." मायनरचे कान माझ्या दिशेने टवकारले. पण मी त्याला सांगू शकलो नाही. "इम्स्टहून परत आल्यापासून माझ्यात



खूप बदल झालेला आहे." मी बोलू लागलो, "आणि हा बदल तू म्हटल्याप्रमाणे माझ्या अंतर्मनातील धगधग आहे. तिथून आल्यावर मी लगेच टाईप रायटरसनोर बसलो आणि इम्स्टच्या बालग्रामची माझ्या मनावर पडलेली छाप मी या माझ्या लेखात उतरवून टाकली. हा तो लेख आहे, २ दिवसांनी तो खिळ्यावर कंपोझ झाला. पृष्ठांना आकडे दिले गेले आणि आता येत्या रविवारी तो छापून येणार होता. मी तुला आधीच कबूल केलं आहे की इम्स्टला भेट देण्यापूर्वी मला तुझ्याविषयी किंवा तुझ्या कामाविषयी काहीच माहिती नव्हती आणि म्हटलं तर इम्स्टला जाऊन काय ते प्रत्यक्ष बघावं, ह्या हर्मन मायनरची समाजसेवा काय प्रकारची आहे ते पडताळावं नाहीतर त्याचे वाभाडे काढावेत, असं माझ्या मनाने घेतलं होतं. माझ्या सबंध वृत्तपत्राच्या कारकीर्दीत मी कधी सेन्सॉरला जुमानलं नाही. पण विरोधकांच्या कारवाया नेहमीच माणसाला मागे ओढून घेत असतात. त्यामुळे तो लेख अजून प्रसिद्ध झाला नाही आणि आता माझे हात बांधले गेले आहेत. तुझ्या या स्फूर्तिदायक कामाबद्दल लिहिण्याची मला परवानगी नाही. चांगले काम करीत असताना माझा अशा तऱ्हेने कोंडमारा होईल ही मला स्वप्नातदेखील कल्पना आली नाही. काही लोकांना असे वाटते की चांगल्या गोष्टी करण्याचा मक्ता फक्त त्यांनाच दिला आहे."

मायनर मधेच बोलला "तू घाबरट आहेस. मला आणखी काही सांगू नकोस. मला सर्व समजलं आहे. तुझा लेख वर्तमानपत्रात छापून आला नाही याचं मला मुळीच आश्चर्य वाटत नाही. जोपर्यंत ह्या जगात माणसं राहतात तोपर्यंत चांगल्या गोष्टींना विरोध होतच राहणार. माझ्यावर काम कमी आरोप केले ? आता कदाचित् तुझ्या लक्षात येईल की मला डॉक्टरीची परीक्षा द्यायची इच्छा असूनदेखील मला अभ्यास मधेच सोडून द्यावा लागला. अजूनदेखील मला डॉक्टर बनावं असं वाटतं. एक दिवस मला असं ठरवावं लागलं की या माझ्या कल्पनेसाठीच जगेन आणि टाकून दिलेल्या मुलांसाठीच माझे आयुष्य वेचीन. मी असे का ठरविले ? विचार कर कारण मी जर असं ठरवलं नसतं तर माझ्या मार्गात येणाऱ्या अडचणींवर मी मात करूच शकलो नसतो. मला काही साध्य होण्यापूर्वीच या अडचणींनी मला संपवून टाकलं असतं. मी पण असाच भयंकर निराशेच्या अंधारात सापडलो होतो. पण शेवटी मला सर्व काही समजू लागलं. चांगुलपणाला सत्यापर्यंत पोचायला स्वतः भोवतीचं एक टणक कवच फोडावं लागतं ही त्याची सत्त्वपरीक्षाच असते. चांगुलपणा देखील मुशीतून जाऊन तावून, सुलाखून निघावाच लागतो. नाहीतर तो कायम टिकू शकत नाही. म्हणून मला जो काही प्रतिकार झाला तो करणाऱ्यांचे मी आभारच मानतो. त्यामुळे मी दिवसेंदिवस अधिकाधिक निर्भय बनलो. ह्या अडचणी पार करू शकलो आणि त्याचा आज मला विलक्षण आनंद वाटतो. माझ्या लिहिण्याच्या टेबलाला टाळं लावलं गेलं.

आमच्या सोसायटीचे बँकेतले खाते गोठवले गेले आणि आमची क्रूर चेष्टा होऊ लागली. हरे राम ! त्यांनी आम्हाला काय काय त्रास दिला ? पण हे बघ, असं घडतच असतं. म्हणूनच खरं तर मला समाधान वाटतं की आम्हाला मदत करण्याच्या तुझ्या या पहिल्या प्रयत्नालाच विरोध झाला. तू हे का नाही समजून घेत की चांगुलपणाचा मार्ग हा सरळ सोपा नसतो आणि त्यावर चालणं अवघड असतं. हा प्रयत्न म्हणजे प्रवाहाच्या विरुद्ध पोहण्याइतका त्रासदायक आहे ?

गोंधळून न जाता ठरवलेल्या मार्गाने वाटचाल करणे हीच खरी महत्त्वाची गोष्ट आहे. माझ्यावर जे हल्ले होतात त्यांना मी कधीच उत्तर देत नाही. मी माझं काम सर्वस्व पणाला लावून करीत असतो. कारण माझी खात्री आहे की मी करीत असलेले हे काम चांगले आहे. अनेक वंचित मुलांना माझ्या या कामाची गरज आहे. त्या-पुढे बाकी सर्व गोष्टी लहान आहेत, क्षुल्लक आहेत. त्यामुळे असल्या टीकेचा आता माझ्यावर काहीच परिणाम होत नाही. जाऊ दे. आपण ते सर्व विसरून जाऊ या. त्याचा पुन्हा विचारदेखील करू नकोस. ही निराशा काढून टाक. जर तू माझ्यासोबत काम करणार असशील तर अशी कैक संकटे आपल्यावर ओढवणार आहेत. कधी-तरी वर्तमानपत्रातून आपल्यावर टीका करणारे याहीपेक्षा खूप मोठे लेख छापून आण- तील. ज्याच्याशी आपला काही संबंध पण नसेल. पण सत्कर्मावरील आपला विश्वास मात्र तुटता कामा नये. बरं बघू या तरी, तू या लेखात काय लिहिलं आहेस ?''

बारकाईने त्याने सर्व प्रूफे वाचून पाहिली. आणि मग तो हसून म्हणाला, ''शाळकरी विद्यार्थ्यांचा हा लेख वाटतो.'' मला खूप राग आला, पण मायनरने माझा हात पकडला आणि तो म्हणाला, 'हे बघ तू लिहिले आहेस त्यापेक्षा आपली कल्पना अधिक उदात्त आहे, खूप अधिक अर्थपूर्ण आहे. वर्तमानपत्राच्या एका पानावर आपली योजना कधीच पूर्ण उतरवता येणार नाही असं मला वाटतं. पण तू योग्य मार्गावर आहेस. ती कल्पना तुला समजू लागली आहे. तुला ठाऊक आहे का की जो जो मी या बालग्रामच्या कामाविषयी विचार करतो, मनन-चिंतन करतो तो तो मला स्पष्टपणे ध्यानात येतं की हे काम सखोल आहे. आणि कदाचित कधी न संपणारं आहे ? वरवर पाहता हे काम अगदी सोपं व साधं वाटतं. प्रत्येकाला कुटुंब हवं ही नैसर्गिक गरज व त्या गरजेची पूर्ती करणारं हे सामाजिक सेवेचं काम एवढीच ह्याची व्याप्ती होऊ शकत नाही. ही योजना परमेश्वराचीच आहे आणि ह्या प्रत्येक लहान मुलाचा विकास होत राहावा हा जर ईश्वरी संकेत असला तरी तो नैसर्गिकपणावर होईल असे आपण गृहीत धरले तर ती मोठी चूक होणार आहे. त्यात अनेक मूलभूत अडचणी आहेत. त्याचा विचार सातत्याने व्हायला हवा. आपण ह्या विषयावर पुन्हा



पुन्हा बोलू या. मला ह्या योजनेला वाहून घेणारी माणसे हवी आहेत. त्यांची मदत हवी आहे. ही एक तऱ्हेची लढाईच आहे. प्रत्येक मुलाचे चांगले व्हावे म्हणून पुकारलेले हे युद्ध आणि आपली ही प्रेमाची आघाडी आपण त्या युद्धभूमीवर उभी करावयाची ना ?''

## मायनर भूतकाळात विसावतो !

अशा तऱ्हेने माझी व हर्मन मायनरची ओळख झाली आणि मायनरची बालग्रामची नवीन कल्पना जी आज सबंध जगात पसरली आहे ती मला समजली. मी स्वतःला फार भाग्यवान मानतो की या अभिनव रचनेत मी संकल्पनेपासून सामील होतो. त्या रचनेचा विस्तार मी माझ्या डोळ्यांनी छोट्याशा इम्स्टच्या वसाहतीत पाहिला आणि तेथूनच हर्मन मायनरच्या कामाला प्रचंड वेग आला. सकस बीज पेरलं गेलं होतं आणि त्यामुळे त्याला फुलं-फळं लागली. तरुण मुलामुलींच्या सामाजिक कल्याणाच्या कार्यक्रमात एकतऱ्हेच्या नवीन क्रांतीचे बीज ह्या टिरोलाच्या छोट्या वसाहतीतून पेरले गेले आणि थोड्याच काळात ते सर्वदूर पसरले.

लिंझमधल्या ह्या दुसऱ्या भेटीत हर्मन मायनरने मला त्याच्या जीवनाबद्दल सांगितले. एक रात्रभर आम्ही एकत्र बसून बोलत होतो. तो बोलत होता आणि स्वतःच्या समृद्ध अनुभवात मला सामावून घेत होता. नंतर तो स्वतःच्या बालपणात गेला. आल्बरश्वेड (Alberschweade) च्या सुंदर परिसरात व्होरालबर्ग (Vorarlberg) ह्या त्याच्या जन्मस्थानी त्याचे बालपण खूप आनंदात गेलं होतं.

येथे तो नंतर प्रौढ झाल्यावर परत गेला होता आणि आपल्या कल्पनेला मूर्त स्वरूप त्यानं दिलं होतं.

बालग्रामच्या ह्या कल्पनेचा विकास कसा झाला हे सांगणं फार कठीण आहे. कारण ही कल्पना ज्याला प्रथम सुचली त्याला पण त्याचे नीट आकलन व्हायला बराच वेळ लागला. जेव्हा इम्स्ट गावात पहिली बालसदने सुरू झाली, नंतर त्याचा विस्तार बालग्राममधे झाला, तेव्हाच त्याच्या विकासाची अनेक दालने उघडली गेली. म्हणून त्यापूर्वी ह्या हर्मन मायनरची आपण आणखी ओळख करून घेऊ या.

## २ डिसेंबर, १९४९

२ डिसेंबरची ती संध्याकाळ होती ! त्या दिवशी त्याला समाधान वाटत होतं

मागच्या खिडकीजवळच्या आसनावर रेलून बसला होता. अंतर्यामी मानसिक ताण जाणवत होता. विचारांना सूत्र सापडत नव्हतं. महिनाभरात घडलेल्या घटनांचा मना-तल्या मनात तो मागोवा घेत होता. आपण केलं ते बरोबर केलं का ? मनाच्या एका कोपऱ्यात वैफल्याची भावना होती. आपण आपला वैद्यकीय अभ्यास सोडून दिला हे योग्य केलं का ? चांगला उन्नतीला नेणारा मार्ग सोडून आपण एका अशाश्वत भवि-ष्याच्या मागे पळत आहोत ! कित्येक वेळा हा विचार मनात येऊन गेला. पण तो विचार पुनःपुन्हा उफाळून वर येत होता. त्या विचाराने तो बेचैन होत होता. वास्त-विक आजचा दिवस खूप आनंदाचा होता. आज यशाचा उंबरठा नजरेसमोर अस-ताना त्याला आनंद आणि अभिमान वाटायला हवा होता. पण ते खरे यश होते का ? कदाचित् ही वाट इथेच तर संपत नसेल ? त्याला पुढे भवितव्य काय ? तो आता ३३ वर्षांचा होऊन गेला होता आणि अजून त्याला निर्वाहाचे साधन उपलब्ध झाले नव्हते.

"हर्मन" अचानक त्याच्या मित्राने विचारले, "तुला झोप लागलीय का ?" मायनरच्या भाषणाची प्रत तुझ्याकडे आहे का ? मायनरने आपल्या खिशातून एक कागद काढला. कुणीतरी लघुलिपीमध्ये टिपण करून त्याला दिले होते पण मायनरला त्याचा काहीच बोध होत नव्हता.

त्याच्या मित्राने तो कागद घेतला, उजेडात धरला आणि मोठ्याने वाचायला सुरुवात केली, "तरुणांच्या उत्साहाचे मी स्वागत करतो. आपल्या सर्वांच्या फायद्या साठी तरुणांनी जे प्रश्न आपल्या कर्तृत्वाने सोडवले आहेत. तेच प्रश्न त्यांची संयमी वडिलधारी माणसे अद्यापही तात्त्विक पातळीवर हाताळीत आहेत. आज आपणा सर्वांना हे मोठे समाधान आहे की आपले तरुण इतके मजबूत व कृतनिश्चयी आहेत. जन्माची मोडतोड करण्याऐवजी नवीन मानवी मूल्यांची स्थापना त्यांनी केली आहे. त्यांची सर्व कामे निर्मल अंतःकरणाची द्योतक आहेत. याच कारणास्तव मला असे वाटते की मी या बालग्रामच्या चळवळीतच सर्वस्वी काम करावे. कारण याच भूमीतून उद्याची तरुण मुले तयार होतील आणि आपल्याला त्यांच्या कर्तृत्त्वशक्तीचा सार्थ अभिमान वाटेल. ह्या भिंतींच्या आत आपल्या गरीब मुलांवर सूर्याची किरणे पडतील आणि त्या उबेत आपली ही मुले सर्व जाती वंशाची एकत्र वाढतील आणि आपल्या राष्ट्राचे आणि ह्या आपल्या पितृभूमीचे नाव उज्ज्वल करतील."

तो कागद पुन्हा आपल्या खिशात ठेवून मायनर व त्याचा मित्र स्तब्ध झाले, मग हळूच मायनर बोलला,"फ्रिटझ, हे निव्वळ शब्द आहेत. आणखी काही नाही. छान छान शब्दांची ही पखरण आहे. आज ह्या समारंभात ते बोलले गेले. नुसते गोड गोड शब्द. उद्या आणखी एखाद्या प्रदर्शनाच्या उद्घाटनात बोलले जातील, परवा आणखी एखाद्या उत्सवात ! मग काही तरुण माणसे एकत्र येऊन आणखी एखादे



बालग्राम मधले घर बांधून द्यायचे ठरवतील. आणि त्यावेळी या मोठ्या लोकांना निमंत्रण-पत्रिका पाठवतील. त्यावेळी पुन्हा हेच शब्द कानांवर पडतील. ह्या मुलांचा उज्ज्वल भविष्यकाळ, ह्या तरुण पिढ्यांवर पडणारा सूर्यप्रकाश, तरुणांचे गोडवे समाजाचे कल्याण आणि उत्कर्ष..... आणि मानवीय मूल्यांचे जतन..."

दुसऱ्याला राहवले नाही. तो म्हणाला, "हर्मन, हे बरोबर नाही. आपण ज्यांना आमंत्रणे पाठविली होती त्यापैकी कुणीच आले नव्हते, फक्त मायरसाहेब आले आणि त्यांना बिलकूल निराश वाटले नाही. नाही हर्मन, मला तर वाटतं की मायरना आपलं म्हणणं पटलं. तुझ्या पण ते लक्षात आलं असेल, ते कळकळीने बोलत होते आणि ते नक्की आपल्याला मदत करतील."

मायनर गप्प राहिला. बोलणे तिथेच थांबले, मायनरच्या मनात विचार आला की हा म्हणतो ते खरे आहे. मायर आमच्या वतीने बोलले. ते गंभीरतेने बोलत होत पण ते जेव्हा माझ्यासमोर येऊन उभे राहिले, तेव्हा मला जरा संकोचल्यासारखे वाटले. ते तो सबंध डोंगर चढून वर आले होते आणि त्यानंतर त्यांना काय दिसेल अशी अपेक्षा होती देव जाणे ! तिथे आम्ही फक्त थोडे तरूण लोक उभे होतो. आणि आमच्याइतक्या निमंत्रितांपैकी निदान कुणीतरी एक येईल ह्या अपेक्षेने जंगलात वाट बघत होतो. हे धरतीमाते, आता मला तुझ्या पोटात गडप होऊन जाण्याची इच्छा होत आहे. देवा, यातून मला वाचव. आम्ही गव्हर्नरला का आमंत्रित केले ? कारण आम्हाला तो येणार नाही याची खात्री होती म्हणून. पण त्याने आपल्या प्रतिनिधीला पाठवून दिले होते आणि तो अधिकारी पण बिलकुल चिडला नाही. प्रथम त्याने सर्वांशी हस्तांदोलन केले आणि मग त्याने बालसदनाला भेट दिली. हे साधारण घर. त्याचा नुसता सांगाडाच उभा आहे. त्याचे छप्पर तर अजून शाकारून व्हायचे आहे. पण त्याला ते घर आवडलं. हे लहानसं टिरोलियन घर. पूर्ण बांधून झाल्यावर आकर्षक दिसेल नक्की. त्याचे स्वागत करताना मी नीट भाषण केले का ? मी काय बरं बोललो ? मायनर आठवू लागला.

आणि त्याच्या डोळ्यांपुढे त्या घराचा सांगाडा आणि तो सभेचा चौक दिसू लागला. त्या सुंदर दरी पायथ्याशी इम्स्ट शहर पसरलेलं होतं. मागच्या बाजूस आल्प्स पर्वताचा विस्तार होता. फक्त त्या पर्वताची बर्फाच्छादित शिखरे त्या काळ्या मोठ्या ढगांमागून दिसत होती. त्या इम्स्ट गावात तो उभा होता. वैद्यकीय शास्त्राचा विद्यार्थी सर्व शिक्षण सोडून देऊन जग जिंकायला निघाला होता, जगाने अव्हेरलेल्या मुलां-साठी प्रेमाचे नवे विश्व निर्माण करायला !

मायनरने कबूल केले की मी त्यावेळी काय बोललो ते मला आता आठवत नाही. त्याचे भाषण प्रभावी होते. एका मुद्द्यावर तो विसावला होता आणि समजावून

सांगत होता ते त्याला आठवलं. "आपण आपल्या मुलांना नामोहरम करून टाकीत असतो. त्या वेळी आपण विसरतो की असा एक दिवस उजाडेल की ज्या दिवशी आपल्याला त्यांची गरज भासेल. पण आपण आपल्या ऐटीत असतो. त्यांचा विचार करीत नाही. किंवा त्यांच्याकडे लक्ष पण देत नाही. पुष्कळशी मुले, ज्यांना आईबाप नाहीत, स्वतःचा देश नाही, स्वतःचे घर नाही अशांना आपण सरळ संस्थांमधे किंवा अनाथालयात पाठवून देत असतो. म्हणजे आपण सरळ त्यांना विनाशाच्या मार्गावर सोडून देतो. आपण या मुलांसाठी आणखी काहीतरी करायला नको का ? त्यांना फक्त संस्थेत किंवा एखाद्या पालकघरात पाठवून दिलं की आपली जबाबदारी संपली का ? हे त्यांच्या समस्येला उत्तर आहे का ? आज १००हून अधिक वर्षे आपण मुलांसाठी हे करीत आलो आहोत. एवढ्या वर्षांत आपण सुधारलो आहोत. सुसंस्कृत झालो आहोत. आपली सांपत्तिक स्थिती पण २ऱ्या महायुद्धानंतरच्या ह्या ४ वर्षांत सुधारली आहे. विसाव्या शतकांतील हा विकास ठिकठिकाणी आपल्याला दिसून येतो आहे. फक्त आपण या अनाथ आणि वंचित मुलांसाठी मात्र काहीही केलेले नाही. असे का ? आणि नंतर त्याने आपले आव्हान उंच गरजल्या सुरातच सभेपुढे मांडले होते. ह्या माझ्या प्रश्नाचं मला उत्तर हवं आहे. आत्ता पण मनातल्या मनात मायनरला स्वतःचे हसू येत होतं. कारण त्याचं भाषण ऐकायला बाहेरचा एकच मनुष्य आला होता. बाकी सर्वजण त्याचे सवंगडीच होते. हे त्याचे मित्र त्याच्यासोबत काम करीत होते, राबत होते, आणि बालग्रामचं स्वप्न मूर्त स्वरूपात आणण्यासाठी सर्वस्वाचा त्याग करीत होते.

"मला याचं उत्तर ठाऊक आहे." तो पुढे बोलतच राहिला. मूल लहान असतं आणि अगदी अगतिक असतं. त्याला स्वतःच्या हक्कांच्या रक्षणासाठी लढा देऊन एखादी युनियन उभारता येत नाही. कारण आईबाप नसलेलं, घर नसलेलं मूल काही करूच शकत नाही, आणि समाज त्याला विसरून जातो. आपल्या अंतःकरणातील करुणेचा झरा आटून गेला आहे. आपल्याला शांतीपूर्ण वातावरणात सुखात रहायचे आहे म्हणून हजारो मुलांची ही करुण कहाणी आपल्या अंतर्मनापर्यंत पोचतच नाही आणि आपण त्यांना नकळत समाजाचे शत्रू बनवीत असतो. पण एक दिवस असा येईल की आपल्याला ह्या मुलांची दखल घ्यावीच लागेल आणि तेव्हा वेळ निघून गेलेली असेल !

मग त्याने त्या अवस्थेचे भेसूर शब्दचित्र रंगविले. तरुण मुले व त्यांच्या गुन्हेगारीस आपण कसे जबाबदार आहोत हे त्याने सांगितले. नक्की तो काय म्हणाला ते शब्द आत्ता त्याला आठवत नव्हते. पण तो खूप कडक भाषेत बोलला होता; ह्याचे त्याला स्मरण होत होते. त्याच्या शब्दात कडवेपणा होता. सत्याचा, चांगुलपणाचा



आग्रह होता, कारण त्याच्या मनःचक्षूसमोर थकलेल्या उदासीन लोकांचे जणू सैन्यच उभे होते.

भाषण संपवीत असताना त्याने गर्जना केली होती, "मित्रांनो, मला मदत करा. ह्या वंचित मुलांसाठी माणसाच्या मनातील निर्दयतेचा पडदा फाडून टाकायला मला मदत करा. हे बालग्राम बांधायला मदत करा. हे बालग्राम म्हणजे ह्या मुलांसाठी बांधलेली घरे. नवीन घरांच्या निर्मितीसाठी ह्या दुर्दैवी मुलांसाठी मला तुमची मदत हवी आहे. ही मदत देण्यासाठी तुम्हाला त्याग करावा लागेल. कारण सुंदर शब्दांनी घरे उभी राहत नसतात. मी आता फक्त ह्या मुलांसाठीच जगणार आहे. आणि ह्या वंचित, अनाथ मुलांच्या पुनर्वसनासाठी मी माझे आयुष्य वेचणार आहे. मी माझ्या उपजीविकेची चिंता सोडून देत आहे. माझा आवडता डॉक्टरीचा अभ्यास पण सोडून देत आहे. हे बालग्राम उभे राहीपर्यंत मी या दोन्ही गोष्टींचा विचार पण करणार नाही. हा छोटासा दीपस्तंभ, आपल्या ह्या काळोख्या जगात, त्या अंधारात मोठ्या होत असलेल्या मुलांना प्रकाश देण्याचे काम करील.

त्यागाशिवाय चांगुलपणा हा केवळ एक भास आहे, दांभिकता आहे. आम्ही हा त्याग करायला तयार आहोत. ह्या समोर उभ्या असलेल्या भिंती म्हणजे ह्या त्यागाचे नाममात्र प्रतीक आहे. आम्हाला अजून मोठा त्याग करावयाचा आहे. पण आम्ही तो करून दाखवू कारण चांगुलपणावर आमची श्रद्धा आहे. जरी आम्हाला गेल्या काही वर्षात विपरीत अनुभव आले असले तरी माणसाच्या चांगुलपणावरील आमचा विश्वास ढळलेला नाही. फक्त त्या माणसाच्या मनात चांगुलपणाची भावना जागृत व्हायला हवी. ही जागृती आणण्यासाठी परमेश्वराने आम्हाला ताकद द्यावी. आम्ही ईश्वराला प्रिय असलेल्या ह्या बालकांच्या संरक्षणासाठीच हे काम करीत आहोत."

मग मायनरला आठवलं की इम्स्ट शहराचा मेयर श्री कोरव पण त्यानंतर बोलला होता. त्याची या कामाला संपूर्ण सहानुभूती होती आणि तो नक्की मदत करणाऱ्यांपैकी दिसत होता.

इन्सब्रुकच्या मुख्य स्टेशनावर जेव्हा गाडी पोचली तेव्हा मायनरच्या चेहेऱ्यावर पुन्हा एकदा आत्मविश्वासाचे तेज फाकू लागलं. ह्या तेजानेच त्याचे मित्र त्याच्याकडे ओढले गेले होते !

"आता पुन्हा कामाला जुंपलं पाहिजे." तो म्हणाला, "आजच्या दिवसाचा फायदा करून घेतला पाहिजे. दिवस यशस्वी ठरला. फार मोठं यश पदरी पडलं होतं. आता मला समजलं की आपण ह्या बातमीची हजारो पत्रके काढून वाटली पाहिजेत. नवीन पोस्टर्स बनविली पाहिजेत. उद्याच मला वर्तमानपत्राकडे गेलं पाहिजे. महिती-

पत्रके काढून वेगवेगळ्या उद्योगपतींना पाठविली पाहिजेत. नक्की हे इम्स्ट बालग्राम यशस्वी ठरलंच पाहिजे.''

हे शेवटचे शब्द स्टेशनवरील त्या गर्दीत आणि हजारो माणसांच्या आवाजात विरून गेले. लोकांच्या झुंडी आत-बाहेर करीत होत्या आणि त्या सर्वांच्या चेहेऱ्यावर युद्धाचे कारुण्य दिसून येत होते. त्यांचे कपडे, ते चुरगाळलेले गणवेष युद्धाची आठवण करून देत होते. अनेक वेळा मायनरच्या मनात येत असे की सर्व माणसे आपले आयुष्य पुन्हा सजवीत आहेत. स्वतःला पुन्हा सुखसोयी कशा मिळतील, जे सुखी जीवन उद्ध्वस्त झाले होते ते पुन्हा कसं परत मिळवता येईल हा एकच स्वार्थी विचार त्यांच्या या सर्व धडपडीमागे उभा आहे. त्यांच्या मनात ह्या वंचित मुलांचा प्रश्न उभा करता येईल ह्या एकाच आशेने मायनर कैक वेळा चित्रपटगृहासमोर किंवा स्टेशनवर उभा राहून आपली माहितीपत्रके ह्या प्रचंड जनसमूहात वाटीत असे. ते त्याच्याभोवती गराडा घालीत, कधी त्याला धक्के देऊन त्याची उपेक्षा करीत. नंतर ते मोठे रस्ते गर्दी ओसरल्यावर निर्जन होत असत. आणि तरी मायनर आपली पत्रके घेऊन उभा रहायचा. काही माणसे ही पत्रके हातात धरीत व वाचल्यासारखं करून रस्त्यावर फेकून देत असत. मग मायनर ही पत्रके पुन्हा गोळा करत असे, त्यावरील धूळ झटकत असे आणि पुन्हा आपल्या गठ्ठ्यात ठेवीत असे.

२ डिसेंबर १९४९ च्या संध्याकाळी त्याला हा जनसमुदाय दिसला नाही. त्यांनी केलेले दुर्लक्ष व अपमान त्याला जाणवला नाही. कारण तो क्षितिजाच्या पलीकडे पोचला होता. त्याच्या डोळ्यांपुढे एक मोठे, मुलांचे बालग्राम दिसत होते. त्या बालग्रामातील मुलांचा हास्यविनोद, आरडा-ओरडा, धावपळ त्याला सुखवीत होती. त्या दिवशी त्याला त्याच्या ध्येयाचे शिखर स्वच्छ व स्पष्ट दिसले. त्यानेच ते शोधून काढले होते. त्यासाठी तो खूप मेहनत करणार होता. इतरांप्रमाणे नुसतं बोलत राहणार नव्हता. कारण रस्त्याच्या कडेला असणाऱ्या निराश, हतभागी, भिकारी मुलानं मदतीसाठी पुढे केलेला हात हातात धरूनच त्याला चालायचे होते. मागे जाण्याची वाट आता बंद झाली होती.

## काळ बदलला !

हर्मन मायनरने २ डिसेंबर १९४९पर्यंत हा प्रवास केला खरा पण तो रस्ता काटेरी होता. फार थोडी माणसे– ज्यांना काहीतरी सामाजिक परिवर्तन घडविण्याची जबर आकांक्षा असते, नवीन निर्मिती करावयाची असते, जी माणसे ध्येयवादी असतात, तीच माणसे अशा तऱ्हेचे परिश्रम करू शकतात. आणि या प्रयत्नांतूनच



मानवतेचा विकास होत असतो. पाश्चिमात्य माणसाच्या डोक्यात बालग्रामची ही नवीन कल्पना बरेच दिवसांपासून घोळत होती. यामागची मूळ धारणा ही होती की अनाथ मुलालादेखील कुटुंबातील सर्वसामान्य मुलाइतके हक्क असलेच पाहिजेत. कुटुंबाच्या घरट्याबाहेर पडलेल्या ह्या निष्पाप मुलांवर शेकडो वर्षांपासून वाळीत टाकल्याप्रमाणे अन्याय होत आला आहे. अनेक वर्षांपासून समाजाने त्यांना बाहेर फेकून दिलेले आहे. त्यांच्यावर आरोप केले आहेत. त्यांना भयभीत केले आहे, त्यांना वंचित ठेवले आहे आणि त्यांचे अपरिमित नुकसान केले आहे. इतकेच नव्हे तर समाजाने त्यांना संस्थांत व अनाथालयात कायमचे डांबून ठेवले आहे. समाजातील इतर नागरिकांच्या दृष्टीआड ठेवले आहे. उडी मारावयास कठीण बनवलेल्या भिंतींच्या आड त्यांना कायमचे बंद केले आहे.

ह्या संस्थांतून पण पुष्कळ वेळा त्याग, प्रेम, समर्पण दिसून आले आहे. ह्या भिंतींच्या आड बरेच शिक्षक, संतपुरुष झाले आहेत. आणि सेवाभावी दाया-मेट्रेन यांच्या मार्गदर्शनाने पुष्कळ मुले कर्तृत्ववान बनली आहेत. परंतु हा बदल समाजाने पाहिलेला नाही. समाजाला तो पाहाण्याची इच्छा पण नाही. वाया जाणारे अन्न किंवा जुने कपडे ह्या अनाथालयात मदत म्हणून पाठविण्यात येतात. एखादी उच्चभ्रू महिला क्वचित अनाथालयाला भेट पण देते. पण ती मुलांना भेटण्यासाठी जात नसते. तर तिच्या सामाजिक प्रतिष्ठेसाठी हे जाणे लाभदायक असते. त्यामुळे माणसाला आपण काहीतरी पुण्यकर्म केल्यासारखे वाटते. अवतीभोवती राहणारी माणसे त्याच्या ह्या सत्कर्माचे कौतुक करतात. आणि माणसाला आपण काहीतरी चांगलं काम करीत आहोत हे इतरांच्या डोळ्यांत भरवता येते. आणि हे दाखविण्यासाठी मुद्दाम ह्या मुलांना एखादे दिवशी घरी जेवायला बोलावणे, रविवारी गाडीत घालून बाहेर फिरायला नेणे, बागेत नेणे असे कार्यक्रम केले जातात. एखाद्या पांढरपेशा उच्चकुलीन दंपतीच्या मध्ये बसलेले हे फिकट चेहेऱ्याचे, सेलर सूट घातलेले मूल बघून मग इतर लोक म्हणतात, ''बघा, बघा, तो आमचा कार्पोरेटर आहे, किती दयाळू आहे पहा तरी.'' पण ह्या बघ्या माणसांच्या कधीतरी मनात येतं का की त्या दोघांच्या मधे अवघडून बसलेल्या त्या छोट्या मुलाच्या मनात काय चालले आहे ? तो काय विचार करीत असेल ? त्याला कसं वाटत असेल ? एकाने तरी चौकशी केली का की जेव्हा तो मुलगा परत संस्थेत पोचविला जातो तेव्हा दारात उभा राहून तो टपटप का रडतो ?

पुष्कळ वेळा ह्या अनाथालयांतून घरकाम करावयास नोकर मिळतात. कारण त्यांना काम येत असते. यापेक्षा त्यांना आणखी काय हवे असते ? नाहीतर काय, त्या मुलात काय आहे ? बाप कोण आहे त्याचा पत्ताच नाही आणि आईने गुपचुप

चर्चच्या दारात आणून सोडलेला तो मुलगा. यातून काय निघणार ? एक व्यर्थ जीवन, ज्याला निदान श्रीमंताच्या घरी खायला प्यायला तरी भरपूर मिळेल. माणसं मुलां विषयीचे आपले हे मत तडकाफडकी बनवीत असतात. लवकरच त्यांचे स्वतःचे प्रेमप्रकरण सुरू होते आणि त्याचा शेवट म्हणजे नको असलेल्या आणखी मुलांचा या जगात येण्यासाठी जन्म. नाही, ह्या मुलांना कायमच दुय्यम दर्जाचे नागरिक म्हणूनच जगायला हवं. त्यांच्या शाळा वेगळ्या, त्यांचे खेळाचे मैदान वेगळे. माणसाने स्वतःशी विचार करावा की जर माझे स्वतःचे लाडकं मूल ह्या पापातून जन्मलेल्या मुलांबरोबर खेळू लागलं तर ?

पण आज-कालच्या जगात माणसांच्या मनात हे विचार येतच नाहीत. ही मुले पण इतर मुलांप्रमाणेच ईश्वराला प्रिय आहेत. अनाथ असली तरी ती पण मुलेच आहेत ही कल्पना आपल्याला पटतच नाही. आपण कधी हा प्रश्न विचारीत नाही की हे गटारातले घाणेरडे आयुष्य ह्या मुलाच्या वाट्याला का यावं ? यात त्याचा काय गुन्हा आहे ? आणि बिचारी त्याची आई, खूप प्रेमळ पण असेल ती. तिचं काय ? नि असं कोणतं कारण घडलं असावं किंवा कोणती भीती तिला वाटली असावी की ज्यामुळे तिने स्वतःचे मूल अशा तऱ्हेने फेकून दिलं असावं ? फक्त गळ्याभोवती एक चिठ्ठी बांधून ती माता निघून गेली. आणि त्या चिठ्ठीत लिहिलं होतं, "देवा, मला क्षमा कर. पण याव्यतिरिक्त मी काही करू शकत नाही. नाईलाज आहे."

पण माणूस जसा सुधारला तसतसे त्याचे वर्णभेद मिटत गेले. सामाजिक असमानता पुष्कळ प्रमाणात कमी होत गेली. त्यामुळे ही पारंपारिक अनाथालये आणखी अस्थिर झाली. काही काही ठिकाणी तर ती बंदच पडली. लोक आपली मते मांडू लागले. प्रत्येक मुलाला घर असावे हा त्याचा जन्मसिद्ध हक्क आहे. देवाच्या दर बारात सर्व मुले सारखीच आहेत. जगाचे दरवाजे सर्व मुलांच्यासाठी खुले असले पाहिजेत. ज्यांच्यापासून समाजाला भय आहे किंवा संरक्षण हवे आहे अशाच मुलांना संस्थेत पाठवावे. पण ह्या असहाय्य मुलांची भीती वाटण्याचे काहीच कारण नाही. आणि शेवटी अनाथालयात वाढलेली आणि उच्च स्थानावर पोचलेली माणसे आढळतातच. अनेक विद्वान अशाच अनाथाश्रमातून घडले, अनेक संशोधक, डॉक्टर, शास्त्रज्ञ, साहित्यिक याच कठीण परिस्थितीतून वर आले. त्यांनी आलेले अनुभव, झालेल्या मानसिक यातना यांचे वर्णन केलेले आहे.

आणि असा हळूहळू काळ बदलू लागला. मुलांकडे बघण्याचा नवीन दृष्टिकोण हळूहळू का होईना अंगीकारला गेला. पुष्कळ पुण्यात्म्यांनी याकरिता प्रचंड परिश्रम केले. ऑगस्ट हर्मन फ्रँकची नाचक्की झाली तर पेस्टोलोंझीचे म्हणणे तरी निदान समजून घेतले. पण हर्मन मायनरच्या वेळी मात्र समाज त्यांचे विचार ऐकण्यास सिद्ध



होता आणि म्हणूनच त्याची ही क्रान्तिकारी कल्पना यशस्वी होऊ शकली. हे एक त्रिकालाबाधित सत्य समाजाने मानले की कुटुंबात व्यवस्थित जन्मलेल्या भाग्यवान मुलांत आणि परिस्थितीने अनाथत्व भोगणाऱ्या मुलांत वास्तविक काहीच फरक असता कामा नये आणि ह्याचा चांगला परिणाम हा झाला की अनेक शतकांपासून चाललेला अनाथ मुलांचा सामाजिक स्थानाचा लढा मिटला आणि त्याला इतर भाग्यवान मुलांचे बरोबरीने स्थान लाभले. त्या मुलाचे अनाथत्वच संपून गेले. जगाचे प्रेम त्याला मिळाले. आईच्या मातृत्त्वाच्या ऊबेपासून तो वंचित होता ती ऊब पण त्याला मिळाली आणि अखेरीस तो ज्याला मुकला होता ते सर्वच त्याला परत जिंकून घेता आलं.

बालग्रामची मूलभूत कल्पना हीच आहे. पण त्यातील गर्भित विचार यापेक्षा अधिक व्यापक आणि अधिक खोलवर आहे. अनाथ मुलांच्या कल्याणाच्या कल्पनेतून एका चांगल्या गोष्टीचा साक्षात्कार झाला. आजकालच्या ह्या अनैतिक, भौतिक लालसेच्या जीवनातदेखील अजून माणसाच्या मनातील प्रेमाचा व कारुण्याचा झरा आटलेला नाही. हे त्यांना कळून आले. माणसाच्या माणुसकीवरील त्यांचा विश्वास वाढला. लाखो माणसे ह्या मुलांचा जाहीर स्वीकार करतात, लाखो लोक ह्या मुलांसाठी त्याग करायला प्रवृत्त होतात. तो त्याग लहान किंवा मोठा कितीही असो. लाखो लोक जेव्हा या मुलांचा विचार करू लागतात आणि तिरस्काराची भावना त्यांच्या मनातून लोप पावते तेव्हाच तिथे खऱ्या प्रेमाचा झरा उगम पावतो. अशा ह्या प्रेमाच्या निर्मितीतच हर्मन मायनरचे काम वाढीला लागले.

## त्याचे ध्येय : निदान ५ घरे

डिसेंबरच्या त्या संध्याकाळी मायनरला ह्या गोष्टीची नीटशी कल्पना आली नाही. त्याने फक्त आपल्या आतल्या आवाजाला साद दिली व त्याचे म्हणणे ऐकून, महत्त्वाचा निर्णय घेतला. जर इम्स्टसारख्या छोट्या गावात आम्हाला ५ बालसदने बांधण्याचे काम पूर्ण करता आले तरच आमच्या ह्या त्यागाला काही अर्थ आहे. जर मला त्यात यश मिळाले तर मी मानेन की मला जीवनात काही साध्य करता आलं आणि तरच वैद्यकीय पेशा सोडून दिल्याची हळहळ मला कधी वाटणार नाही."

ते जेव्हा त्याच्या खोलीत आले तेव्हा हर्मन वरील वाक्ये बोलत होता.

हे शब्द त्याने जोरात टेबलावर मुठी आपटून उच्चारले असावे कारण फ्रिटझ् एकदम चमकला आणि ओरडला, "इतक्या जोरात नको हर्मन, नाही तर पुन्हा त्रास

सुरू होईल !"

आणि ते खरंच होतं. कारण घरमालकिणीशी वारंवार खटके उडत असत. ती खरं म्हणजे चांगली बाई होती. विधवा होती (आणि तिला मिळणारे पेन्शन अपुरे असल्यामुळे) तिने स्वतःच्या लहान घरातली एक खोली मायनर ह्या विद्यार्थ्याला आणि दुसरी खोली एका प्रौढ महिलेला भाड्याने दिलेली होती. पण हा डॉक्टर विद्यार्थी तिला त्रास द्यायचा. मायेच्या नात्याने ती म्हणायची, 'हे बघ मायनर, तू आता तीस वर्षांचा झालास; पण तुला काही समजत नाही. जर तुला कुणी आईच्या मायेनं वाढवलं नाही तर तू एकटा ह्या जगात राहू शकणार नाहीस. तू एखाद्या लहान मुलासारखा वागतोस ! मी जर तुला आईप्रमाणे वागवले नसते तर आत्तापर्यंत तू तुरुंगात पोचला असतास. पण मी हे तुझं वागणं आता फार दिवस चालवून घेणार नाही. समजलं ? तू हट्टी आहेस. तुझ्या सर्व प्रोफेसर्सना हे ठाऊक आहे की मनात आणलंस तर तू चांगला डॉक्टर बनू शकशील. प्रो. ब्राइटनरला तू आवडतोस आणि लवकरच तू त्याचा मदतनीस झाला असतास. पण तुझ्या ते नशिबात नाही. तू सर्व काही सोडून दिलंस. तू एखाद्या खेडूतासारखा हट्टाग्रही आहेस ! आणि गेले कित्येक महिने तू माझ्या घरात इथून, तिथून, सर्व ठिकाणांहून ती घाणेरडी मुले आणीत आहेस. तुम्ही सर्वजण पागल झाला आहात. ह्यातून तुला काय मिळणार आहे ? तुझ्या त्या बालग्रामातून तरी काय निष्पन्न होणार आहे ? हे करावयाची गरज तरी काय आहे ? आयुष्यात काहीतरी करून दाखवावं, पैसे मिळवावे आणि मग हे धंदे करावेत. तू स्वप्नच पाहत बस, ज्या स्वप्नांना कधी मूर्त स्वरूप येणारच नाही. तुझं काय करावं तेच मला समजत नाही. माझ्या दोन मुलांनी मिळून जेवढा मला त्रास दिला नसेल तेवढा तू एकटा मला सतावतोस ! आणि त्या मुलांनी जर ते जगलेवाचले असते, ह्या युद्धात ते मारले गेले नसते तर खास काहीतरी करून दाखवलं असतं. पण तू... तू... आणि तिचा कंठ दाटून येई. डोळ्यांत अश्रू येत आणि ती स्वयंपाकघराकडे धाव घेई.

खरंच मायनरने विचार केला. फ्रिटझचं म्हणणं खरं आहे. खूप रात्र झाली आहे आणि आपण शांत राहिलं पाहिजे. नाहीतर बिचारी आपली चांगली घर- मालकीण जागी होईल आणि शेजारच्या खोलीतील त्या ब्रह्मचारिणीला पण जाग येईल.

दरवाज्यावर एक थाप पडली आणि करड्या रंगाची शाल पांघरून मालकीण बाई फ्रॉ स्टेगविटझ खोलीत आल्या. तिचा चेहेरा उतरला होता. मान डोलावीत ती म्हणाली, "मायनर, तू माझं टेबल मोडून टाकणार आहेस. आणि हाय रे दैवा. तुम्ही दोघे असे काय दिसता आहात ? तुमच्या बुटांना सगळा चिखल लागला आहे आणि माझ्या चांगल्या गालीच्याचा तुम्ही सत्यानाश करीत आहात."



मायनरने अपराधी मनाने पटकन् आपले बूट काढले आणि हसून मालकिणीला म्हणाला, "मावशी, एक कप चहा देणार का ? ह्या कुडकुडत्या थंडीत आम्ही गारठून गेलोत. चहाचा पेला म्हणजे आम्हाला स्वर्ग वाटेल."

तिने त्रासिक चेहेरा केला. मग म्हणाली, 'हां, ठीक आहे. तुला चहा देईन. पण तुझ्या या मित्राला मात्र देणार नाही. थोड्याच वेळापूर्वी त्याचे वडील इथे येऊन त्याची चौकशी करून गेले. आणि तेच सांगायला मी आले होते.' एवढे बोलून ती निघून गेली. मायनरने फ्रिटझ्ला डोळ्यांनी खुणावले. खरं म्हणजे आता त्यानं घरी जायला हवं होतं. उद्या शाळा होती. त्याचे मॅट्रिकचे वर्ष होते आणि अभ्यास करायला हवा होता. मायनरने स्वतःला समजावलं, आधीच तो वर्गात मागे आहे आणि मी पण त्याचा खूप वेळ घेतो आहे पण तो माझ्या तरुण मित्रांचा पुढारी आहे. जेव्हा २ वर्षांपूर्वी मी हे तरुण मित्रमंडळ सुरू केलं तेव्हा तो माझ्याकडे सर्वांच्या आधी आला. दुसऱ्या मित्रांपेक्षा खरं म्हणजे हा खूप वेगळा आहे. त्यांच्यात तो सामावत नाही. इतर तरुणांच्या संघटनांतून काय चाललं आहे याची त्याला पूर्ण कल्पना आहे. त्याचे घर चांगलं आहे. संस्कार उत्तम आहेत. इतर मुलांना हे संस्कार अजिबात नाहीत. काही का असेना, आता आमचे मित्रमंडळ मोठे झाले आहे. आत्ता त्याची लाज वाटण्याचे काहीच कारण नाही. त्याचे नाव पण (S.T= Storm Troop) वादळी सेना दिलं आहे. ह्या विचाराने मायनरला हसू आलं. 'होय, फ्रिटझ् तुला घरी गेलं पाहिजे. तेच ठीक होईल. मी आता माझी टिपणे बनवतो आणि तू उद्या दुपारी मला भेट !"

फ्रिटझ् उठण्यापूर्वी मालकीण खोलीत परत आली आणि तिच्या हातात १ ट्रे, १ किटली व २ पेले तिने आणले होते. फ्रिटझ् व मायनर एकमेकांकडे पाहू लागले. ही खरंच आमची चांगली आई आहे. तिचं आमच्यावर खरोखरच प्रेम आहे. ह्या विचारासरसा मायनर तिला म्हणाला, 'खूपच लवकर चहा बनवलास.'

'चुलीवर उकळीचं पाणी तयारच होतं.' ती घरमालकीण म्हणाली आणि आपल्या एप्रनच्या खिशातून तिने दोन बनपाव पण काढले.

## वादळी सेनेची स्थापना

१९४७ मध्ये जेव्हा 'वादळी सेने'ची स्थापना झाली तेव्हा खरी कामाला सुरुवात झाली. थंडीत एका संध्याकाळी मायनर व्याख्यान देऊन आपल्या खोलीत परत आला होता. त्या दिवशी जवळपास तो पूर्ण वेळ विद्यापीठातच होता. सकाळचे

४ तास त्याने शरीरशास्त्राच्या प्रयोगशाळेत घालविले होते आणि दुपारी क्लिनिक-मधल्या एका अभ्यास सत्रात गेला होता. मधल्या वेळात त्याने विद्यार्थ्यांच्या टेबला-वर बसून फक्त एक कप पातळ सूप घेतलं होते. त्यामुळे त्याच्या पोटात कावळे ओरडत होते. वास्तविक "शरीरशास्त्राचा इतिहास" ह्या व्याख्यानाला त्याला जायचे होते. पण अजून त्याच्या ३ शिकवण्या शिल्लक होत्या. तिकडे जायलाच हवं होतं. घरून फारशी मदत मिळत नसल्यामुळे त्याला ह्या शिकवण्या कराव्या लागत असत.

त्या संध्याकाळी मायनरला वैद्यकीय अभ्यासाचे किंवा शिकवण्याचे कसलेच भान नव्हते. तो स्वतःची भूक पण विसरून गेला होता. रस्त्यावरील बर्फ बुटांनी तुड-वीत तो चालत होता व चालताना त्याच्या मनात देशातील भयानक गरिबीचे विचार येत होते. लढाईमुळे सगळीकडे जीवन विस्कळीत झाले होते. शहरावर बाँबसूचा वर्षाव झाल्यामुळे नीटनेटकी घरे जवळपास शिल्लकच उरली नव्हती. अन्न धान्याची टंचाई होती. बरेच लोक निर्वासित झाले होते आणि विजयी फौजी ठाण मांडून बसले होते. जिकडे पाहावे तिकडे हालच हाल दिसत होते. पण एवढी वाईट परि-स्थिती असूनदेखील पुनर्निर्माणाचे चिन्ह कुठेच दिसत नव्हते. जणूं काही महायुद्धा नंतर काळ विसावला होता. पुढे सरकतच नव्हता. आणि काही बदल घडून येत नव्हता. इमारती उभ्या नव्हत्या पण त्या भग्नावशेषांना कुणी स्पर्शदेखील करीत नव्हते. आणि ती माणसे, त्यांचे ते फाटके तुटके कपडे, फिकट चेहरे, ओढलेले गाल, खाली लोंबलेली मान. ही माणसे पण मख्ख बसून होती. सगळीकडे त्याला एक तऱ्हेचे रितेपण दिसून आले. पोकळी जाणवली.

अचानक त्याला कुणीतरी प्रश्न विचारला, '(सॅकरीन ?) साखर हवी का ?' मायनर थांबला. त्याच्यासमोर एक मुलगा आपल्या करड्या रंगाच्या ओव्हरकोटाच्या खिशात हात घालून उभा होता. त्याच्या डोक्यावर एक जाड लोकरी टोपी होती. त्याच्या अशक्त फिकट चेहेऱ्यावर त्याचे दोन डोळे लुकलुकले. "मी तुझ्याकडून साखर विकत घेऊ शकत नाही. राजा, कारण माझ्याजवळ पैसे नाहीत." मायनरने त्या मुलाला उत्तर दिले. तो मुलगा परत वळल्याबरोबर मायनरने पटकन त्याच्या कोटाची बाही घट्ट पकडली आणि त्याला विचारले "तुझे वय किती ?" तो मुलगा थंडीने कुडकुडत होता, "तू बर्फासारखा थंड पडला आहेस." मायनर म्हणाला, "तू आता घरी जा बरं."

"मी घरी जाऊ शकत नाही." मुलगा ओरडला. "मग माझ्या बरोबर चल" मायनरने उत्तर दिले. "माझे घर जवळच आहे. तिकडे आपण जाऊ या. म्हणजे मी तुला गरम चहा देतो."

मग संध्याकाळी शिकवणीसाठी आलेल्या तिन्ही विद्यार्थ्यांना मायनरने घरी



परत पाठवून दिले, कारण त्याच्याकडे हा छोटा मुलगा पाहुणा होता आणि त्या मुलाची हकीगत ऐकण्यात त्याला अधिक रस वाटत होता. यापूर्वी त्याच्याकडे अशी कम नशिबी मुले येत जात होती. आसपास वावरताना दिसत होती. अनुभवास येत होती. पण दुर्दैवाचा इतका निकट झालेला हा परिचय पहिलाच होता. रस्त्यात चालणाऱ्या माणसांच्या नजरेत ही विफलता त्याने अनेकदा पाहिली होती, पण आत्ता या क्षणाला दुर्दैव त्याच्या समोर प्रत्यक्ष उभं होतं. आणि दुर्दैवाचा दुर्विलास त्याच्या अंगाला स्पर्शून गेला आणि हे कमनशीब आपलेच आहे असा भास होऊन त्याच्या अंगावर शहारे आले.

तो मुलगा १२ वर्षांचा होता. त्याने जुन्या मिलिटरीचा गरम कोट आपल्या अंगाभोवती घट्ट गुंडाळून घेतला होता. गरम चहाचे घुटके हळूहळू घेत तो मुलगा आपली कहाणी सांगू लागला. हान्सल ४ वर्षांचा होता. त्यावेळी त्याच्या वडिलांना जर्मन सैन्यात भरती होण्याचा हुकूम आला होता. हान्सलला आपले वडील अजून आठवत होते. कारण त्याचे वडील ३ वेळा सुट्टी घेऊन घरी आले होते. वडील जेव्हा घरी येत तेव्हा छोट्या हान्सलच्या आनंदाला उधाण येई. मग तो गंमतीने आपल्या वडिलांचा गणवेश स्वतःच्या अंगावर चढवीत असे, बायोनेट म्यानातून काढायचा, आणि एकदा तर त्याने गॅस मास्क पण चेहऱ्यावर चढवून बघितला होता. पण नंतर त्याचे वडील खूप दिवसांत घरी आले नाहीत. आणि नंतर कधीच आले नाहीत. "ते हरवले होते !' प्रथम हान्सलला काहीच समजलं नाही, पण नंतर त्याला अचानकपणे त्याची जाणीव झाली. तो शेजारच्या चांभाराकडे (बूट बनविणाऱ्याकडे) एकदा गेला होता आणि त्याने त्याला विचारले होते, 'तुमचे ते खेळकर कुत्रे कुठे दिसत नाही हल्ली ?' आणि त्याने सांगितले होते की 'ते बहुतेक पळून गेलं असावं. मला वाटतं काही भुकेल्या माणसांनी त्याला पकडून नेले. 'हान्सल, ते कुत्रं हरवलं !'

नंतर ती बाँबफेक सुरू झाली. कित्येक रात्री तो आपल्या आईला बिलगून हवाई हल्ल्यापासून बचाव करण्याच्या निवासात (air raid shelter) आश्रयाला गेला होता. एकदा तर इतक्या जोराचा मारा झाला होता की जणू काही सर्व पृथ्वी कोस-ळून पडली होती, त्याची गर्जना पण भयंकर होती. सर्व माणसे त्या आवाजाने किंचाळू लागली. त्या शेल्टरमध्ये जोरात बाँबचा धुरळा फेकला गेला. वीज गेली. सगळीकडे अंधारच अंधार झाला. हान्सलला वाटलं, 'नरक म्हणजे असाच असेल. सर्व माणसे जमिनीवर कोसळून पडली होती. तो आईच्या नावाने आक्रोश करू लागला, पण दुसऱ्या भयानक आवाजात त्याचा आक्रोश तिला ऐकूच गेला नाही. हे सर्व एका रात्री घडले आणि त्याचे घर त्या बाँबच्या माऱ्याने भुईसपाट झाले. पण सुदैवाने त्याची आई बचावली होती आणि तो पण वाचला होता. मातीच्या ढिगाऱ्या

तून त्यांना ओढून बाहेर काढलं होतं. कित्येक लोक जखमी झाले होते. अनेक लोक मृत्युमुखी पडले होते. तेव्हापासून तो व त्याची आई शेजारच्या घरात रहात होती.

त्याची आई दिवसेंदिवस वैतागत होती. ती चिडायची आणि हान्सलला मारायची. त्याला हे समजत होतं की त्याच्या आईला खूप कष्ट पडतात. रोजी रोटी कमवावी लागते. ती दुःखी आहे, ती निराश आहे. पण त्याला एक गोष्ट कधी समजली नाही. एकदा त्याची आई रात्रभर बाहेर राहिली होती. सकाळी उठल्यावर रडकुंडीस येऊन त्याने आईला विचारले होते की, रात्रभर ती कुठे गेली होती. त्यावर ती त्याच्या अंगावर धावून गेली होती आणि ओरडली होती, "असले प्रश्न मला विचारीत जाऊ नकोस, समजलं ? तुला काय करायचे आहे ? मी कुठेही जाईन." त्यानंतर कित्येक रात्री आई बाहेर गेलेली असायची व तो एकटा ओसरीवर पडून राहायचा. हान्सल खूप खूप रडायचा. पुढे पुढे तर आणखीच रडायचा. कारण त्याची आई कुणातरी पुरुषाला घेऊन रात्री-बेरात्री घरी यायची. पहिल्यांदा त्याला वाटलं त्याचे वडीलच सुट्टीवर आले आहेत ! मग रागवून त्याने आईला विचारले होते. "तू त्या माणसाबरोबर माझे वडील नसताना का झोपतेस ?" त्यावेळी मात्र त्याच्या आईनं त्याची कानशिलं उपटून हातात दिली होती. "मूर्खा, तुला काहीच कसं समजत नाही." एवढंच त्याच्या आईने त्याला उत्तर दिलं होतं.

आता त्याची आई रोज रात्रीच घरी येऊ लागली, पण तिच्याबरोबर कुणीतरी पुरुष असायचा आणि त्याला घेऊन ती त्या खुराड्यात झोपायची. तो पुरुष एकदा त्याला म्हणाला होता, 'मी तुझा बाबा आहे.' पण हान्सलच्या मनाला ते पटले नाही. तो एकदम ओरडला, " तू नाहीस माझा बाबा. आणि तू कधीच माझा बाबा होणार नाहीस." तेव्हापासून तो तिऱ्हाईत मनुष्य हान्सलला झोडपू लागला. तो त्याचा तिरस्कार करायचा, त्याला सतवायचा आणि त्यामुळे त्याची आई, पण पार बदलून गेली होती.

"आणि मग तू रस्त्यावर साखर विकायला केव्हापासून सुरुवात केलीस ?" मायनरने प्रश्न विचारला. पण हान्सलने उत्तर द्यायचे टाळले. मायनरने त्याला आणखी एक कप चहा दिला, मालकिणीकडून पावाचा तुकडा मागून आणून दिला. तेव्हा कुठे हन्सल बोलू लागला.

"आम्ही ज्या बाईच्या घरात राहत होतो ती बाई साखरेचा काळा बाजार करते. तिच्याजवळ साखरेचा खूप साठा आहे. तो नेहमी ती मोजून बघते आणि मग छोट्या छोट्या पिशव्यांत त्यांतली साखर घालून ती साखर ती विकते. कुणाला विकते कुणास ठाऊक ? काल जेव्हा मी घरी आलो तेव्हा स्वयंपाकघरातल्या टेबलावर ही साखर पाहिली आणि कुणी पाहील या भीतीने मी पटकन् त्या पिशव्या माझ्या



खिशात कोंबल्या." हान्सलने एक आवंढा गिळला आणि तो रडू लागला." पण मी अजून कुणाला साखर विकली नाही. खरंच विकली नाही हो ! कारण मला धीरच झाला नाही. मला वाटलं होतं की मी साखर विकीन आणि त्या पैशातून काहीतरी घेईन. त्या समोरच्या दुकानात रेशनकार्ड नसलं तरी पोळीभाजी देतात."

त्या संध्याकाळपासून हान्सल व मायनर एकमेकांचे मित्र बनले. त्याच्यासाठी काहीतरी करायची मायनरची खूप इच्छा होती पण त्यासाठी पैसा कुठून आणणार ? कदाचित् मायरकडे गेलं तर तो मदत करील !

काल्पन मायरने मायनरचे सर्व म्हणणे ऐकून घेतले, पण त्या बोलण्याचा त्याच्या मनावर काहीच परिणाम झाला नाही. तो म्हणाला, "मायनर, तू अगदीच भोळा आहेस. अशा तऱ्हेच्या गोष्टी सगळीकडेच घडत असतात. माझ्याकडे रोजच अशी मुलं येत असतात. आता हान्सलला रोज पोळी-भाजी देण्याची व्यवस्था करता येईल. पण त्याने त्याचा प्रश्न सुटणार नाही. आपल्याला गरज आहे ती माणसाच्या मदतीची. हर्मन तू आणखी एखादी तरुणांची संघटना का नाही बनवीत ? नाहीतरी ह्या तरुण मुलांना काहीतरी उद्योग हवाच आहे. निदान आठवड्यातून काही तास तरी त्यांना परिस्थितीचा विसर पडायला हवा आहे. त्यांनी त्यांचे जग घडवलंच पाहिजे आता."

त्या दोघांनी नंतर चर्चा केली. काल्पन सज्जन गृहस्थ होता आणि मायनर, एका शेतकऱ्याचा मुलगा, डॉक्टरीचा अभ्यास करत होता. अशा विद्यार्थ्याला हा निर्णय घेणे सोपे काम नव्हते. त्याला त्याचा अभ्यास शक्य तितक्या लवकर पूर्ण करावयाचा होता. घरून निघताना त्याने वडिलांना आश्वासन दिले होते की आता मुळीच वेळ वाया घालवणार नाही व मनापासून अभ्यास करीन आणि त्याची खरोखरच डॉक्टर होण्याची मनापासूनची तीव्र इच्छा होती. ती इच्छा लवकर पुरी व्हावी म्हणून तो एका बाजूला शिकवण्या करत होता, दवाखान्यात मदत करीत होता आणि खूप वाचन पण करत होता. त्याच्या उशागतच्या टेबलावर पुस्तकांचे ढीग आणून ठेवलेले होते. अशा वेळी ही तरुणांची संघटना तो कशी उभारणार ? त्यासाठी सर्व वेळ द्यावा लागला असता. खूप काम होते ते. कारण मायनरला कामाची वेळ कशीतरी मारून न्यायची सवय नव्हती. जे काम तो हातात घ्यायचा तो ते व्यवस्थित पूर्ण करायचा. त्याच्या प्रोफेसर्सना त्याचा हा गुण माहीत होता, म्हणून ते त्याचे कौतुक करीत असत. पण मायनरने 'हो' म्हटले !

आणि त्या क्षणी मरियाहिल्फची (Mariahilf) नवीन तरुण संघटना स्थापन झाली आणि तिथूनच मायनरला अनेक अडचणी येत होत्या. त्या अडचणींना तोंड देताना मायनरला बिलकूल मानसिक विश्रांती मिळालीच नाही.

## लोखंडाच्या जुन्या शेगडीभोवती.

ज्या दिवशी ही तरुण मंडळी प्रथम मायनरकडे गोळा झाली तेव्हा त्याला उदास वाटत होतं. त्याने मनातल्या मनात हे पण कबूल केलं की वैद्यकीय परीक्षेला बसण्यापूर्वी पण इतकी उदासीनता वाटत नव्हती. त्याच्या मनाला एक कोडं अजून उलगडत नव्हतं की एवढी सगळी तरुण मंडळी आपण कशी जमविली ?

काल्पन मायरने त्याला पुष्कळ नाव-पत्त्यांची यादी दिली होती. तो पुष्कळ घरांतून गेला होता, अनेक लोकांच्या गाठीभेटी घेतल्या होत्या, भूक आणि दुःख जवळून पाहिलं होतं. अनेक कुटुंबे लहान लहान खोल्यांत राहत होती. त्यांतच त्यांची पुष्कळ मुल वाढत होती. एका बिछान्यात दोनदोन किंवा तीनतीन मुले एकत्र झोपलेली पण त्याने पाहिली होती. आणि त्या मुलांना तोंडात तो पावाचा तुकडा चघळताना पाहून त्याला स्वतःची लाज पण वाटली होती.

होय, ह्या सर्व गोष्टी त्याने अलीकडे बघितल्या होत्या आणि त्याबद्दल तो पुष्कळ तरुणांशी बोलला होता आणि त्यांना आपल्या संघटनेत सामील होण्याकरता बोलवीत होता. हे करीत असताना त्याला पुष्कळ विरोध व्हायचा, निराशा पदरात पडायची आणि कधी कधी शिव्याशाप पण खावे लागायचे.

एका माणसाचा पाय तोडलेला होता आणि जेव्हा मायनर त्याच्याकडे पोचला तेव्हा त्याने दार बंद करीत म्हटले होते, "माझा मुलगा कुठल्याही तरुणांच्या संघटनेत सामील होणार नाही. मला या संस्थांचा फार वाईट अनुभव आहे. हजारो वर्षे हे चालूच आहे. आता माझ्या मुलाचे दोन्ही पाय शाबूत राहू देत आणि तू आता येथून निघून जा."

अशाच एका रागावलेल्या आईवर पण मायनर चिडला नाही, "काय, कॅथॉलिक पंथाचे तरुण ? हे बघा, चर्चवरचा माझा विश्वास पार उडाला आहे. माझा नवरा चागला कॅथॉलिकच होता, खूप प्रार्थना करायचा, पण आम्हाला त्यापासून काय फायदा झाला ? बघ, आम्ही कसे या छोट्याशा तळघरात रहातोय. त्यांनी माझ्या नवऱ्याला युद्धात मारून टाकलं. माझा १७ वर्षाचा मुलगा युद्धाच्या शेवटच्या वर्षात मारला गेला. आता माझ्या गळ्यापर्यंत हे सर्व दुःख येऊन पोचलं आहे."

एका ठिकाणी जेव्हा तो छावणीत गेला आणि एका १३ वर्षाच्या मुलाला समजावू लागला तेव्हा त्याचीच छी-थू त्या मुलाने केली आणि तो मनात कष्टी झाला. त्याला या मुलाला संघटनेत सामील करून घ्यायचं होतं. मायनरला ठाऊक होतं की त्या मुलाचे आईबाप मेले होते आणि शेजाऱ्यांच्या प्रयत्नाने त्याला त्या निर्वासितांच्या छावणीत घेतलं गेलं होतं. पण तो तरुण मुलगा चांगलाच गुंड झालेला दिसत होता.



त्याने मायनरला सांगितलं, "तुम्ही खरंच मूर्ख आहांत अगदी. तुम्हाला काय वाटतं की मी तुमच्याकडे येईन आणि माझं दुःख तुमच्यापुढं मांडीन ? मी काळा धंदा-व्यापार करतो. मी तुम्हाला बेधडकपणे सांगू शकतो की हा माझा व्यवसाय आहे आणि तुमच्या ह्या निरर्थक कामासाठी माझ्याकडे वेळ नाही." त्या मुलाने एक अमेरिकन सिगरेट उघड्या पाकिटातून बाहेर काढली. "तुम्हाला माहीत आहे का, ह्या धंद्यात किती पैसा मिळतो ते ? मी आता ह्या धंद्यात स्वतःला सर्वस्वी झोकून देणार आहे. तुम्ही मसणात गेला तरी मला त्याची पर्वा नाही. तुम्ही आपली उदात्त भाषणं देत रहा." असं म्हणून त्या मुलाने सिगरेट शिलगावली आणि त्याचा धूर मायनरच्या चेहेऱ्यावर सोडला. त्या क्षणी मायनरला वाटलं की ह्याच्या श्रीमुखात एक सणसणीत ठेवून द्यावी.

"तू जरा माझे म्हणणे समजून तरी घे." मायनरने बोलणे चालू ठेवायचा प्रयत्न केला, पण तो मुलगा काहीच ऐकायला तयार नव्हता.

"मला तुमचं बोलणं नीट समजलं आहे. आणखी काही ऐकायची जरुरी नाही. वाटलं तर पैज़ घेतो. आता मला गेलं पाहिजे. बाय्".

पण वोरलबर्गच्या शेतकऱ्याचा मुलगा अशा प्रसंगांनी डरणारा नव्हता. जमीन फार सुपीक नसेल, ठिकठिकाणी दगडधोंडे असतील पण अशा माळरानावर देखील बीज अंकुरण्याचं मन लावून अधिक परिश्रम घेऊन काम करावं लागतं.

मायनरने तो अनुभव पचवला. मग त्याला पीटर भेटला. पीटरला पण आई-बाप नव्हते आणि तो आपल्या बहिऱ्या, म्हाताऱ्या आजीजवळ राहत होता. मायनरने पीटरला आपलेसे केले. नंतर त्याने क्लाउसला पण वळविले. क्लाउस ११ वर्षांचा होता व त्याच्यावर चोरीचा आरोप होता. तो पोलिसांच्या ताब्यात होता. टोनी चांगला फुटबॉल खेळायचा. त्याची आई दुखणेकरी होती. टोनी पण संघटनेत सामील झाला. नंतर ह्यूबर्ट व एरिक हे दोघेजण आले. ते दोघेही घरातून पळून गेले होते. घरात काळजी घेणारं कुणी नव्हतं. वडील दारूच्या नशेत असत आणि सतत ह्या मुलांना मारीत. त्या दोघांनी कित्येक रात्री रस्त्यावरच्या बाकांवर झोपून काढल्या होत्या. आणि जवळच्या शेतांतून रताळी चोरून आणून खाल्ली होती. आणखी पण अशीच भरकटलेली, द्वाड मुलं होती, ज्यांच्या आयुष्याचा नाश झाला होता आणि ते नैराश्यपूर्ण जीवन जगत होते. ही सर्व मुलं मायनरला त्यांच्या घरात सापडली नव्हती. काही मुलांना तो सिनेमा हॉल समोर भेटला होता तर काही मुलं त्याला काळ्या बाजाराच्या गलिच्छ वस्तीत सापडली होती. आता त्याला ह्या मुलांचा एक स्वतंत्र संघ सुरू करायचा होता. मारियाहिल्फ संघटनेपेक्षा हा संघ वेगळा होता. फक्त त्या संघटनेतून त्याने हान्सलला इकडे आणले होते. फिकट चेहेऱ्याचा हान्सल चष्मा वापरीत असे

आणि ह्या बंडखोर मुलांना शोधून काढण्यासाठी मायनरला मदत करीत असे.

आणि त्या सर्व मुलांना मायनरने आता रात्री घरी बोलावले होते. प्रथम त्याला वाटलं की ह्यांच्यापुढे एक व्याख्यान द्यावं. पण कशावर ? तो खरंच त्यांना काही सांगू शकणार होता का ? ही मुलं अशी का होतात ? ह्यांना एकत्र बांधणारा कुठे आहे का ? ह्या मुलांना काय आवडतं ? त्यांना प्रार्थना म्हणायला शिकवावी की त्यांच्यापासून धर्म बाजूलाच ठेवावा ?

हे सर्व विचार मायनरच्या मनात विजेच्या गतीने चमकू लागले. "नाही, मी स्वतःला भावनावश होऊ देणार नाही. मला जास्तीच खात्री वाटते का ? मी हे काम कशासाठी अंगावर घेतले ? मी माझा स्वतःचा विचार कधीतरी करायला नको का ? माझा अभ्यास मला पुरेसा नाही का ? मला पैसे पण मिळवायला नकोत का ? ६ वर्षे लढाईत माझी वाया गेली आहेत. ते पण मला विसरता कामा नये. आता मी २८ वर्षांचा झालो. आणि मी आता हे नवीन काम अंगावर घेत आहे ! ह्यात यश मिळेल का नाही याची पण मला खात्री नाही. ठीक आहे, ह्या सर्व गोष्टींचा मी पूर्ण विचार केला आहे. कुणीतरी ह्या कामाला सुरुवात केलीच पाहिजे. आहे ही परिस्थिती सुधारणे कठीणच आहे. पण हे झालंच पाहिजे. हे परमेश्वरा; आता तू मला सोडू नकोस. मला मदत कर.

विचाराचे चक्र थांबले तेव्हा मायनर ओटीवर बसला होता. तो झटकन् उठला. स्वतःशीच हसला आणि आपल्या डाव्या हातावर उजव्या हाताची मूठ दाबून स्वतःलाच म्हणाला, बारास (Barras) प्रमाणे हे पण होऊन जाईल.

अद्याप तिथे कुणी आलं नव्हतं. तो एकटाच होता. बाँबमुळे उद्ध्वस्त झालेल्या तरुण मुलांच्या वसतिगृहात तो वरचेवर येत असे. त्या वसतिगृहाच्या तळघराचा उपयोग तो करीत असे. काल्पन मायरने हे तळघर तात्पुरते दुरुस्त करून घेतले होते आणि थोडे फर्निचर पण आणून टाकले होते. अर्थात् ते पुरेसे नव्हतेच. तळघराच्या उघड्या-बोडक्या भिंतींवर जुनी पोस्टर्स लावलेली दिसत होती. (Firemen's ball) काही नृत्याची चित्रे होती तर काही पहिल्या प्रार्थना सभेत वाजवल्या जाणाऱ्या मोठ्या घंटेची पण चित्रे होती. १० वर्षांपूर्वी झालेल्या एका तीर्थयात्रेची आमंत्रण पत्रे चिकटवलेली होती. काही जाहिराती पण होत्या. वर्तमानपत्रांतील आणि मासिकांतील कात्रणे कापून त्या भिंतींवर चिकटवून लावली होती. अर्थात भिंतींचा घाणेरडा झालेला रंग झाकून टाकण्याचा तो प्रयत्न होता. फर्निचर म्हणजे काही मोडकी बाके, उलटी करून ठेवलेली जुनी खोकी, काही जुनी टेबले आणि एक पुस्तके ठेवायचे शेल्फ होते. कोट टांगायचा एक खांब होता. बहुतेक बाँबमधे उद्ध्वस्त झालेल्या एखाद्या कॉफीहाऊस मधून तो उचलला असावा. आणि सर्वांत आश्चर्याची आणि मिळविलेली



वस्तू म्हणजे त्या तळघरात विजेचे दिवे होते. त्यावेळी केरोसिनची खूपच टंचाई होती. कुणी प्रेमाने तर राहू देच पण विकतदेखील केरोसिन देत नसे आणि सुरुवातीस हे केरोसिन आणण्याचे कठीण काम करून मगच तळघराचा उपयोग करता येई. पण आता वरच्या तुळईच्या खांबातून एक वायर लावून एक स्वयंपाकघरातील विजेचा दिवा तळघरात मधोमध टांगून ठेवला होता. दिवा दिसावयास चांगला नव्हता. पण फार उपयोगी होता.

पण मायनर जो हसून उठला त्याचे कारण दुसरेच होते. खोलीच्या मध्यभागी त्याला एक जुनी लोखंडाची शेगडी दिसली आणि त्याला पूर्वीच्या खूप गोष्टी आठवल्या. अशाच शेगड्यांभोवती ते रशियात असताना बसत होते. आणि ह्याच शेगड्यांवर त्यांनी हात चोळून ऊब आणली होती आणि पायांवरची लक्तरे बदलली होती.

शेगडीतून थोडा धूर निघाला. त्यामुळे थोडी उष्णता वाढली. काल्पन मायर प्रत्येक गोष्टीचा किती बारकाईने विचार करतो हा विचार मायनरच्या मनात आल्याशिवाय राहिला नाही. तरी पण आजच्या सभेला त्याने काल्पन मायरला मुद्दाम बोलावलं नव्हतं. कदाचित् एका धर्मगुरूला तिथे बघून काही लोकांच्या मनात शंका येण्याचा संभव होता, म्हणून त्याने आजच्या मीटिंगमधे त्याला टाळलं होते. त्याने विचार केला, सुरुवातीस सर्व तरुण मुलांना तर एकत्र जमू देत. नीट सर्व होऊ दे. मग पुढचे ठरवू.

पण ठरल्याप्रमाणे सर्व व्यवस्थित पार पडले. फक्त २ मुलगे आले नाहीत. सर्व मिळून १६ तरुण आले. बहुतेक सर्वजण एकमेकांच्या ओळखीचे होते. एक दुसऱ्याच्या जवळपास राहत होते. त्यामुळे कधी रेशन दुकानाच्या रांगेत किंवा दुधाच्या रांगेत भेटत असत. शाळेत पण भेट व्हायची. कधी कधी इन् नदीवर वाहून येणारे लाकडाचे ओंडके आणताना ते एकत्र जायचे. त्यामुळे लवकरच ते एकमेकांत रमून गेले आणि गप्पागोष्टी सुरू झाल्या. सर्वजण उत्साहात होते, पोस्टर्सकडे बघून हास्यविनोद करीत होते आणि शेगडीच्या भोवती बसून हात चोळून गरम करीत होते. एकूण प्रयत्न चांगला यशस्वी झालेला दिसत होता.

पण एक गोष्ट मात्र ठरवल्याप्रमाणे घडली नाही. मायनरचे भाषण झाले नाही. त्याने त्या सर्व तरुण मुलांशी बोलायचे ठरवले होते. तो त्यांना समजावून सांगणार होता की आत्ताच्या ह्या पुनर्रचनेच्या काळात तरुणांनी पुढे यायला पाहिजे आणि एकत्र येऊन काळाचे आव्हान स्वीकारले पाहिजे. भविष्यकाळ त्यांच्यावर अवलंबून आहे. त्यांचे काम अतिशय कठीण असले तरी ते अतिशय महत्त्वाचे आहे. नंतर तो त्यांना त्याचे स्वतःचे लढाईचे अनुभव सांगणार होता. परस्पर विश्वास, बंधुत्वाची

भावना, सहन करण्याची शक्ती आणि प्रामाणिकपणा या विषयांवर तो त्यांच्याशी बोलणार होता.

पण मायनरला ते जमलेच नाही. दरवेळेला तो सुरुवात करणार एवढ्यात कुणीतरी काहीतरी विनोद करायचा आणि मग सर्वजण खळखळून हसायचे. खास करून पीटर स्वतःच्या गंमतीजंमती हातवारे करून सांगायचा. ज्या म्हाताऱ्या, बहिऱ्या बाईबरोबर तो रहात होता, तिला समजावून सांगताना कशी मजा व्हायची याचे तो रसभरीत वर्णन करून सांगत होता. मायनरला त्यांच्या हास्यकल्लोळात सामील व्हावं लागलं. आणि त्यामुळे ते मुलगे आणखीच चेकाळले. हळूहळू प्रत्येकाच्या भोवती असलेलं कवच गळून पडलं, त्याच्या वागण्यात नैसर्गिकता आली. ते स्वतःच्या गोष्टी सांगू लागले आणि विनोद करू लागले. दोघांनी हे युवक-केंद्र अधिक आकर्षक कसं होईल याविषयीच्या आपल्या कल्पना मांडल्या आणि मग प्रत्येकालाच काहीतरी सुचू लागलं. आणि अशा रीतीने ती संध्याकाळ संपली.

काही दिवसांनी मायनर फ्रिट्झशी बोलत होता. बोलताना त्याचे डोळे चमकत होते. तो म्हणाला, "फ्रिट्झ्, काय करायचं ते आता मला समजलंय. आता मला फार बरं वाटतं की ते व्याख्यान देण्याची संधीच मला त्या दिवशी मिळाली नाही. आपण ह्या मुलांनाच बोलू दिलं पाहिजे. त्यामुळे त्यांच्या अंतरंगातील सर्व वाफ निघून जाईल आणि ते मोकळे वागतील. लक्षात आलं तुझ्या फ्रिट्झ् ? त्यांना व्याख्यानाचे डोस पाजण्यास ते अजून वयाने लहान आहेत. तसे करणे शहाणपणाचे होणार नाही. आपण फक्त त्यांना ह्या केंद्रात वारंवार आणलं पाहिजे, म्हणजे ते येतील, हसतील, गप्पा करतील आणि स्वतःच्या गोष्टी सांगतील. माझे काम फक्त लगाम हाती धरण्याचे आहे, की ज्यामुळे ह्या गोष्टी नीट होतील, काही अनुचित प्रसंग घडणार नाहीत आणि सर्व व्यवहार सुरळीत होतील. प्रथम त्या मुलांना हे केंद्र आपलं केंद्र आहे असं वाटलं पाहिजे. त्यासाठी त्यांना एकत्र खेळण्याची संधी दिली पाहिजे. फ्रिट्झ्, आपल्याला एखादा टेबल-टेनिसचा सेट आणखी इतर काही खेळ जमविले पाहिजेत. त्यांना इथे मोकळं वाटलं पाहिजे. बाहेरच्या ह्या घाणेरड्या, टाकावू वातावरणात त्यांना कधीच मोकळेपणाने वावरता येणार नाही. त्यांच्या भोवतालच्या परिस्थितीत ते गुरफटले जातील. आधीच त्यांचं जीवन म्हणजे नकळत करीत असलेलं एक बंड आहे. हे बंड दारूड्या बापाच्या विरोधात किंवा भूक मिटविण्याच्या प्रयत्नात, कधी कडाक्याच्या थंडीच्या गारठ्यात, तर कधी एकटेपणाच्या आगीत सतत सुरूच असते. त्यांचं जग म्हणजे दुःख आणि उपासमार. मुलं म्हणून जगण्यासाठी त्यांना कुठे जागाच नसते. पण इथे ते मुक्त मनाने येतील आणि सर्व दुःख विसरतील. आता मला पुढचा मार्ग स्वच्छ दिसू लागला आहे. मी या तरुणांचा



संघ नीट वाढविणार आहे आणि त्यांना नक्की कार्यक्रमाशी बांधून घेणार आहे. आणि या कामात मला तुझी मदत हवी फ्रिट्झ् !"

मायनरला खरोखरीचा चांगला रस्ता सापडला होता. आठवड्यातून एकदा मुलं जमू लागली होती. काही गळले होते पण काही नवीनं मिळाले होते.

आणि शेवटी २१ मुलगे पटावर होते. त्यांना ते युवक केंद्र आपलं केंद्र वाटू लागलं होतं आणि त्यांनी त्या तळघराचं स्वरूप इतकं बदलून टाकलं की काल्पन मायरला ते पाहून खूपच आश्चर्य वाटलं. तिथे आता २ टेबल टेनिसची टेबलं होती. आणखी एक बिलियर्डचं टेबल पण होतं. हे सर्व कुठून आलं हे एक मोठं गुपितच होतं.

मग हे मुलगे एकत्र प्रवासास जाऊ लागले. बर्फावरून घसरण्याचा खेळ पण खेळू लागले. स्वतःजवळचे खाद्यपदार्थ वाटून खाऊ लागले. स्वतःची एक बचत बँक सुरू केली आणि पुस्तकं देण्याची एक छोटी लायब्ररी पण त्यांनी सुरू केली.

मायनरला खूपच समाधान वाटले. त्यांच्याविषयी असलेला संकोच दूर झाला आणि तो त्यांच्याशी अधिक मोकळेपणाने बोलू लागला आणि त्यांच्यात असलेला चांगुलपणा त्याला जाणवू लागला.

अर्थात सर्वच अनुभव चांगले नसतात. कधी कधी संध्याकाळच्या मीटिंगनंतर भांडणे व मारामारी होत असे. एकदा तर कमालच झाली. क्लाऊस आणि एरिकचे जोराचे भांडण झाले. ते संध्याकाळभर एकमेकांवर गुरगुरत होतेच. बाहेर पडल्यावर त्यांची चांगलीच जुंपली. आणि एकदम सर्वांनाच शिक्षा देणारा एक प्रसंग घडला. त्यांच्या तळघराबाहेरच एक लहान पेट्रोलपंप होता आणि त्या पंपाच्या अवतीभोवती सर्व पडक्या भग्न इमारतींचे अवशेष होते. त्यामुळे त्या पंपाची बैठक पण थोडी खिळखिळीच झालेली होती. हे दोघे मुलगे मारामारी करीत त्या पंपावर पोहोचले आणि काय झाले हे समजण्याच्या आतच तो पंप निखळला आणि एक आवाज होऊन तो पाईप त्यातून निसटला. मायनर तिथे पोचण्यापूर्वी जे नुकसान व्हायचे होते ते होऊन गेले होते. लोकांची गर्दी जमली, पोलिस येऊन पोचले पण सर्व मुलगे तेथून पळून गेले होते. फक्त मायनर तिथे उभा होता आणि त्याला पोलिसांनी ठाण्यावर नेले. दुसऱ्या दिवशी संध्याकाळच्या मीटिंगमधे सर्व मुले वरमली होती. पण त्यांना समजले की मायनरने कालच्या दुर्घटनेची सर्व जबाबदारी स्वतःच्या अंगावर घेतली होती ! तेव्हापासून सर्व मुलांना तो खरोखरीच आवडू लागला.

त्यानंतर त्या युवक संघटनेने आपले स्वतःचे नाव (Storm Trooper) बदलून त्याऐवजी एक छोटे नाव (St) अेस्टी असे घेतले. मायनरला ते नाव विशेष पसंत पडले नाही. पण मुलांची तशी इच्छा दिसली म्हणून ते छोटे नावच रूढ झाले आणि

थोड्याच काळात टिरोलियन कॅथॉलिक मुलांची ही संघटना नावारूपास आली.

## अधिक चांगल्या मार्गाचा शोध

मायनरला आता खूप कठीण जात होतं. वैद्यकशास्त्राचा अभ्यास सोपा नसतो. विद्यापीठाच्या शिक्षणात त्याला पूर्ण लक्ष व वेळ द्यायला हवा होता. त्याला दिलेले शैक्षणिक पाठ पुरे करायचे होते. आत्तापर्यंत तो एक उत्तम नावाजलेला विद्यार्थी होता. पण आता त्याने काही वर्ग बुडवले होते. आणि त्याच्या परीक्षेच्या २ तारखा पण पुढे ढकलून घेतल्या होत्या. मी अभ्यास भरून काढीन असे तो स्वतःच्या मनाला बजावीत होता, पण मला पहिल्यांदा ह्या युवकांना नीट मार्गाला लावले पाहिजे.

आणि हे सर्व करीत असताना त्याच्या शिकवण्या सुरूच होत्या. त्याला पैसे हवे होते आणि आता तर त्या पैशांची अधिकच जरुरी होती. कारण त्या पैशांतून त्याला मुलांसाठी टेबलटेनिसचे चेंडू विकत घ्यायचे होते, संध्याकाळच्या सभेकरता चहा, साखर आणायची होती आणि सतत कुणातरी गरजू मुलाला मदत पोचवायची होती.

त्याने खूप वेळ विचार केला आणि त्या विचारांना एकत्र गुंफण्याचा दीर्घ प्रयत्न केला. कित्येकवेळा तो पहाटे २ वाजेपर्यंत जागून विचार करायचा. त्याच्या त्या थंड खोलीत शेकोटी पण नसायची. मग तो एखादे तत्त्वज्ञानावरील पुस्तक उघडून वाचायचा. त्याचे मन आजकाल त्यात रमत होते. आणि त्या पुस्तकात तो गढून जायचा. भविष्यकाळाशी सामना देणारा कणखर मायनर अंतर्बाह्य बदलत होता. त्याच्या अंतरंगात मजबूत परिवर्तन घडत होते. युद्धावर असताना त्याच्यात असाच बदल झाला होता. शत्रूचा पहिला हल्ला झाला की क्षणार्धात काही मिनिटात मनुष्य आपलं बाल्य विसरतो आणि एकदम पुरुषार्थाची भावना त्याच्या रोमारोमांत संचारते. बाँबपासून रक्षणासाठी केलेल्या भुयारातून बाहेर पडत असताना त्याचे ते रम्य बालपण केव्हाच पळून गेलेले असते.

लक्षावधी लोकांच्या जीवनात हे परिवर्तन घडत असते. पण मायनरच्या हृदयातले हे नवीन स्पंदन अजून त्याला उमगले नव्हते. बाल्यावस्था संपत असताना तारुण्य त्याला हजारो प्रश्न विचारत असते. लहानपणची उरलेली स्वप्ने विरत असतात आणि तरुण मनात खळबळ उडलेली असते. ह्या परिस्थितीत आपल्या भोवतालचे जगातले वातावरण समजून घेऊन वागणे फारच कठीण असते.

पण जसजसे कोडे उलगडू लागले तसतशी मायनरची विचारशक्ती प्रखर होऊ



लागली. त्या तरुण समूहाचा नेता म्हणून त्याच्यापुढे दोन मार्ग स्वच्छ दिसू लागले. त्याने त्याबाबत काल्पन मायरशी अगदी मोकळेपणाने चर्चा केली. तो म्हणाला, मला आता २ गोष्टींचे निश्चित आकलन झाले आहे. यात मला काहीच शंका नाही: मला माझी मुले आणि त्यांच्या घरची परिस्थिती याचे पूर्ण ज्ञान झाले आहे. त्याचबरोबर मला इतर कौटुंबिक वातावरणाचे पण भान झाले आहे. ही मुले मूळची वाईट नाहीत. त्यांना नेहमी समाजविरोधी वृत्तीचे म्हटले जाते. पण तेही खरं नाही आणि माझे हे जे अवलोकन आहे ते फक्त या माझ्या मुलांपुरतेच मर्यादित नाही. त्यात समाजातील इतर सर्व मुले आणि मुली जी रस्त्यावर भटकत आहेत, चोऱ्या करीत आहेत, काळा बाजार करीत आहेत त्या सर्व मुलांसाठी मी हे बोलत आहे. मुळांत ती मुलं माझ्यासारखी किंवा तुझ्यासारखी आहेत. प्रत्येक मुलात चांगल्या प्रवृत्ती असतात. पण ह्या मुलांकडे कुणी लक्ष न दिल्यामुळे आणि त्यांच्या परिस्थितीमुळे त्यांचे जीवन विसकटले आहे. आपणदेखील जर तसल्या परिस्थितीत वाढलो असतो तर कदाचित अट्टल गुन्हेगार बनलो असतो.

"पण हे बघ मायनर," हसऱ्या चेहऱ्याने काल्पन मायर उत्तरला, "तुझ्या विचारात आता मला भलतीच क्रांती झालेली दिसते. आतापर्यंत तू आनुवंशिक गुण-दोषांवर खूप विश्वास ठेवत होतास ना ?"

"होय," मायनर म्हणाला. "आनुवंशिक आणि अधिक काहीतरी. अर्थात आनुवंशिकतेच्या प्रवृत्ती माणसाच्या अंगी येतातच, आपलं नाक कशा आकाराचे असेल, किंवा आपल्या केसांचा रंग कसा असेल किंवा आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या काही खाणाखुणा नक्कीच आपल्या पूर्वजांनी ठरविलेल्या असतात. पण वातावरणाचा परिणामदेखील माणसावर होत असतो. त्यातून आपल्या नैतिक व आध्यात्मिक, विकासाचे पोषण आपल्याला मिळत असते. चांगल्या अनुकूल वातावरणात चांगल्या प्रवृत्तीच विकसित होतात आणि वाईट प्रवृत्ती आपोआप नाहीशा होतात. पण तेच जर वातावरण दूषित असले तर वाईट प्रवृत्तींना उफाळून वर येण्याची संधी मिळते आणि सत्प्रवृत्ती मागे रेंगाळतात." काल्पन जोरात हसून म्हणाला, "वा वा ! वैद्यकीय शास्त्राच्या विद्यार्थ्याने भाषण तर छान दिले मायनर ! पण तुझं म्हणणं बरोबर आहे. शेवटी सर्व सांगोपांग विचार केला की तुझंच म्हणणं बरोबर आहे हे पटतं."

"जर माझं म्हणणं बरोबर नसतं तर मित्रा, मी आतापर्यंत पळूनच गेलो असतो." मायनर म्हणाला, "मी कुठेतरी निघून गेलो असतो एखाद्या संन्याशाप्रमाणे, कदाचित पर्वतावर एकांतात ध्यान लावून बसलो असतो. म्हणजे मला ह्या जगातील विषमता दिसलीच नसती आणि वेदना ऐकू आली नसती. मी डॉक्टर झालो नसतो कारण मी निराशावादी बनलो असतो. प्रत्येक मानवी प्रयत्न विफल वाटला असता.

आणि मग तू देखील तुझ्या चर्चचे दरवाजे बंद करून टाकले असतेस. जर आपण फक्त आपल्या आनुवंशिकतेवरच अवलंबून राहिलो असतो तर आपल्या आध्यात्मिक विकासाचा प्रत्येक प्रयत्न हा विफल ठरला असता. लोक मन मानेल तसे वागले असते. कुणी बदमाश बनले असते, तर कुणी दारूडे आणि काहींनी सत्यानाशच केला असता.

"हे बघ हटवादी माणसा, एकदम काहीतरी विधान करू नकोस. जनावरांपेक्षा आपण खास काही बाबतीत तरी निराळे आहोत. आणि म्हणूनच आपल्या अंतरंगात वसत असलेल्या प्रवृत्तींना चांगले वळण लावून त्यांना आध्यात्मिकतेच्या मार्गावर नेणे हे माणसाचे लक्ष्य असते. आपण साधू बनावे की सैतान बनावे हे केवळ आपल्याच हातात असते असे मला कठोरपणाने मांडावेसे वाटते."

"हे पहा काल्पन, माझा पण हाच अनुभव आहे." हे बोलत असताना धर्मगुरूच्या खोलीत इतका वेळ उभा असलेला मायनर खुर्चीत विसावला. "स्वतःला बदलायची शक्ती आपल्या अंगात असते आणि मुलांना तर आपण नक्कीच बदलवू शकतो. कारण अजून ती घडलेली नसतात."

"बरोबर." मायर मधेच बोलला. "तुझ्या त्या वादळी सेनेच्या युवकांकडे पहा. तू त्यांच्यापर्यंत पोचला आहेस आणि त्यांच्या आचरणात हळूहळू थोडा बदल होत आहे. तुला या गोष्टीचा अभिमान वाटायला हवा."

"नाही, त्या गोष्टीचा मला अभिमान नाही वाटत. या उलट जे मला वाटतं तोच माझा दुसरा मुद्दा आहे, आणि त्याविषयीच मला तुझ्याशी बोलायचं आहे" मायनर म्हणाला.

मायनर थोडा वेळ चूप बसला... जणू काय त्याला जे वाटत होतं ते बोलणं त्याला कठीण वाटत असावं. "त्या झिझ्यूफूसप्रमाणे माझे ह्या मुलांचे काम हे पर्वतारोहणाइतके अवघड आहे आणि मी अगदी एकटा आहे. ते मुलगे बदलत आहेत, हे खरे आहे आणि मला ते जाणवते पण आहे. ते जेव्हा युवक केंद्रात असतात तेव्हा वेगळे वागतात. पण जेव्हा युवक केंद्रातून बाहेरच्या त्या प्रतिकूल वातावरणात परत जातात तेव्हा त्यांची पुन्हा अधोगती सुरू होते. ह्याबद्दल माझी आता खात्री पटली आहे. आणि म्हणूनच मला वाटते की जोपर्यंत मी भोवतालचे वातावरण बदलणार नाही तोपर्यंत माझे सगळे प्रयत्न निष्फळ ठरणार आहेत. अगदी वाया जाणार आहेत!" त्याचे डोळे भरून आले.

"प्रत्येक मूल जर निरोगी व प्रसन्न असावे असे वाटत असेल तर त्याला भरपूर प्रेम आणि संरक्षण दिले पाहिजे." प्रत्येक शब्दावर जोर देऊन तो हे वाक्य बोलला. जणू काय त्याच्या पुढील जीवनाच्या कार्याची रूपरेषाच त्याच्या मुखातून



बाहेर पडत होती.

काल्पन मायर शांत होता.

"जसं एखादं फूल त्याला जर सूर्यांचे किरण व ऊब मिळाली नाही तर कोमेजून जातं तसंच मुलांचं पण आहे. त्याला जर आईचं किंवा प्रेमळ स्त्रीचं प्रेम मिळालं नाही तर ते पण खुरटून जातं आणि ह्या मुलांना ही आईच मिळत नाही हे खरं दुःख आहे. त्यांची आई बाँबच्या माऱ्यात ढिगाखाली तरी गाडली गेली आहे किंवा त्यांना आई असून नसल्यासारखीच आहे कारण ती आई त्यांचा अव्हेर करणारी आहे, निराशेने ग्रस्त तरी आहे किंवा मृत्यूशी झगडणारी आजारी आहे!

खूप वेळ स्तब्धता होती.

काल्पन मायरने प्रथम त्या शांततेचा भंग केला. तो खूप गंभीर झाला होता. "पण यावर उपाय तरी काय आहे? काय करता येईल? तुला पण हे पटेल की जरी ह्या मुलांचे आईबाप हयात असले तरी त्यांचेशी जाऊन बोलण्यात काहीच अर्थ नाही. कारण आपण काही त्यांची परिस्थिती बदलू शकत नाही. आपले हात बांधलेले आहेत. आपण फक्त त्या परमेश्वराची प्रार्थना करू शकतो की देवा, ह्या मुलांचे रक्षण कर. त्यांच्या हालअपेष्टा कमी कर. त्यांचे शरीर व आत्मा शक्य तितका शाबूत ठेव."

"तू मला खूप पेचात पकडत आहेस." मायनर म्हणाला, "माझ्याजवळ पण ह्या प्रश्नाला उत्तर नाही. पण काहीतरी उपाय हा असलाच पाहिजे. मला असं नक्की वाटतं, की निराशेतून काहीतरी मार्ग सापडलाच पाहिजे. तो कोणता असेल हे मी सांगू शकत नाही. पण मार्ग नक्कीच आहे. आणि तो मला सापडून मी त्याचा अवलंब नक्की करीन मग त्यासाठी मला कितीही प्रयत्न करावे लागले तरी चालेल. किंवा मग मला नाहीच सापडला तर मी काय करीन? घोर निराशेच्या गर्तेत सापडून माझे मी काय करीन हे मी सांगू शकत नाही."

"नाही, हर्मन," मित्र त्याला समजावू लागला. कारण मित्राच्या मनाला अपराधी वाटले. की आपल्या ह्या कठोर वाणीने आपण या विद्यार्थ्याला निराश केलं आहे. वास्तविक असं करायला नको होतं आपण! कारण हर्मन किती आग्रही स्वभावाचा आहे हे आपल्याला माहिती आहे. तो आपलं हाती घेतलेलं काम पूर्ण केल्याशिवाय सोडणारच नाही, तो व्होरालबर्गचा कणखर, कठोर व हट्टी मुलगा आहे. आणि मी कदाचित् त्याच्या अभ्यासातून त्याचं लक्ष काढून घेतलं आहे. ह्या विचारानिशी तो जोरात म्हणाला, "नाही हर्मन्, तू निराश होता कामा नये. तू तुझा मार्ग पण सोडता कामा नये. हे असं का होत आहे ते एक त्या परमेश्वरालाच ठाऊक. पण आपण देवाच्या रचनेवर विश्वास ठेवला पाहिजे. आपण या जन्मात सर्व सहन

केलं पाहिजे. त्यासाठी आपण हा क्रॉस हाती धरऊ आहे. तू समजूतदारपणाने घे, आणि या सर्व प्रश्नांत बुडून जाऊ नकोस. बघ, तुझा तरुणसंघ किती उत्तम आहे. त्याच्याबद्दल सगळीकडे चर्चा सुरू आहे. ह्या सर्व तालुक्यात तुझ्या एस्टी बद्दल सर्वांना आदर आहे. आणि ही फार मोठी गोष्ट आहे. त्या मुलांच्यात तू जे बीज पेरले आहेस त्याला नक्की फळ धरल्याशिवाय राहणार नाही. जरी जमीन हलकी असली तरी बीज हे अंकुरेलच. इतक्या थोड्या महिन्यांत एखाद्या जादूच्या चुटकीसारखं तर जग बदलणार नाही- तुझ्या कामाचं असं भेसूर चित्र उभं करणं तुला शोभत नाही; कारण ती तुझी वृत्ती नाही, तू तुझ्या अभ्यासाचा विचार कर. सध्यातरी तुझं ते सर्वांत मोठं काम आहे आणि कर्तव्य पण आहे. तू डॉक्टर झालास तर जगाला तुझा अधिक लाभ होईल."

पण काल्पन मायरच्या बोलण्याकडे हर्मनचे लक्ष नव्हते. तो जागेवरून उठला होता आणि धर्मगुरूच्या त्या शंकेला उत्तर देत होता. "मला नक्की रस्ता सापडेल. त्याची तू खात्री बाळग." त्याने झटकन् आपल्या मित्राचे हात दाबले आणि तो निघाला.

## हान्सलवरील अनर्थ

युवक संघटनेचा हान्सल हा एक एकनिष्ठ सभासद बनला होता. त्याची त्या दिवशीची त्रेधा पाहून मायनरचे अंतःकरण कळवळले.

त्याच्या घरचे वातावरण भयानक होते. त्याची आई तिच्या मित्राच्या पूर्ण स्वाधीन झाली होती. ती दिवसेंदिवस हान्सलला दूर ढकलू पहात होती. ती गरोदर राहिल्यापासून तर तो तिला नजरेसमोर नकोसा झाला होता. तिला स्वतःचे पूर्वायुष्य विसरून जायचे होते. नवीन आयुष्य सुरू करून ते आनंदाने जगायचे होते. त्यात तिला हान्सलची अडचण वाटू लागली होती. कारण त्याला पाहिले की पूर्वायुष्याची आठवण उभी रहायची. शिवाय हान्सलचा तोंडवळा त्याच्या वडिलांसारखा होता. त्यामुळे जो जो ती पहिल्या पतीला विसरून जाण्याचा प्रयत्न करीत होती, तो तो नेमका हान्सलच्या रूपात तो तिच्यापुढे उभा राहात होता. त्यामुळे ती हान्सलचा खरो-खरी तिरस्कार करू लागली होती आणि तिचा मित्र तिच्या ह्या वागण्याला दुजोरा देत होता.

हान्सलचा ह्यात फार कोंडमारा होत होता. त्याचे आपल्या आईवर प्रेम होते आणि तिच्या प्रेमाची त्याला भूक होती. तो पुन्हा पुन्हा तिच्याकडे चिकाटीने जात होता. स्वतःला तिच्यावर लादत होता आणि मायेची भीक मागत होता. त्याला तिची



जरूर भासत होती. पण त्याची ही चिकाटी पाहून त्याची आई त्याच्यावर आणखीच रागवत होती. तिला त्याचा तिटकारा वाटत होता. ती त्याला भीती दाखवत होती. ती आळशी बनली होती. सारखी बाहेर जात होती, खूप दारू पीत होती आणि अधिकच तऱ्हेवाईकपणाने वागत होती. तिला समजत नव्हतं आणि ती अधिकाधिक निराश व चिडकी बनत होती.

तिच्या ह्या दुर्दशेबद्दल ती हान्सललाच दोष देत होती." तू माझ्याकडे असा रोखून का पाहतोस ? तुला तुझ्या आईने ओठाला रंग– लीपस्टीक लावली तर आवडत नाही ना ? मी तुझ्या वडिलांबरोबर नृत्याच्या कार्यक्रमाला जात आहे आणि आम्हाला घरी परत यायला उशीर होईल. काय रे, तुला हे आवडत नसेल ना ? पण तरीदेखील मी जाणार आहे. कारण तुझ्या आईला जगायची इच्छा आहे.' अशा रीतीने त्याची आई त्याच्याशी बोलायची. स्वतःच्या मुलाशी बोलावं असं ते बोलणं नसायचं. पण अपराधी मन काहीतरी बचाव शोधून काढतं त्याप्रमाणं ती बोलायची. वास्तविक हान्सल काहीच बोलला नव्हता. तिच्या ओठाला लावलेला रंगपण त्याच्या लक्षात आला नव्हता. आणि तिचं ते नेहमी बाहेर जाणं, उशिरा घरी येणं, मोठमोठ्याने गाणं म्हणणं, हसणं ह्या सर्व गोष्टींचा विचारच त्याने सोडून दिला होता. ती सतत त्याचा बाप म्हणविणाऱ्या त्या मित्राच्या खांद्यावर रेललेली असायची.

नाही, हान्सल स्वतःच्या आईबद्दल काही तक्रार करीत नव्हता. फक्त तो आर्त नजरेने त्या बाईमधली आपली आई शोधीत होता. त्याची नजर दुःखी दिसायची पण त्याच्या आईला वाटायचं, की तो तिच्यावर आरोप करीत होता. ती नजर सहन न होऊन तिने खूप वेळा क्रोधाने त्याच्या श्रीमुखात थपडा दिल्या होत्या.

ह्या माराने त्याचा आत्मा कळवळला होता. त्याच्या अंतःकरणाला पीळ पडायचा आणि त्याचा कंठ दाटून यायचा. "ढोंग पुरे कर." तिचा मित्र पण हान्सलवर ओरडायचा. "नाहीतर मी पण तुला ह्या पट्ट्याने चांगला झोडपून काढीन." त्याला त्या माराची पूर्ण कल्पना होती. पुष्कळ वेळा त्याला पाठीवर कमरेच्या त्या पट्ट्याने किंवा छत्रीच्या मुठीने मार बसलेला होता. पण तो रडत नसे. मार बसला की तो निमूटपणे सहन करायचा. कारण त्या माणसाशी त्याचे काय नाते होते ? त्याला त्याची मार खाण्याव्यतिरिक्त ओळखपण नव्हती. कारण त्याच्याकडून त्याने कधी प्रेमाचा शब्द ऐकलेला नव्हता किंवा त्याने त्याला कधी स्वतःच्या मुलाप्रमाणे पण वागविले नव्हते.

त्या दिवशी पण हान्सलला असाच दाबून मार मिळाला होता. कारण जेवण सुरू करण्यापूर्वी त्याने देवाची प्रार्थना केली होती. "हा मुद्दाम आपल्याला चिडवीत आहे. आणि हे शुद्ध ढोंग करतो आहे. स्वतःला फार पुण्यवान समजतो आणि खरं

तर छोटा सैतान आहे अगदी !" तो मनुष्य गुरगुरला. पण हान्सलचा विश्वास त्याच्या मित्रावर, मायनरच्या शिकवणीवर होता. मायनरने त्याला एकदा सांगितले होते की, हान्सल, आपल्याला रोज जेवायला मिळतं ना! ती पण एक देवाची कृपा समज. त्यामुळे आपण त्याचे नेहमी आभार मानावेत आणि निदान ते अन्न ग्रहण करण्यापूर्वी देवाला हात जोडावे." आणि त्याने ही प्रार्थना केली म्हणून त्याला आणखी फटके बसले.

आता तो निमूटपणे टेबलापाशी बसून गृहपाठाचा अभ्यास करीत होता. समोरच्या बाजूला आईचा मित्र बसला होता आणि एका रिकाम्या कोकोच्या डब्याचा आधार घेऊन त्याला एक आरसा टेकून ठेवून त्यात पाहून स्वतःची दाढी करीत होता. आई खाटेवर बसली होती. तिच्या अंगावर फक्त आत घालायचे कपडे होते आणि लांब पायमोजे घालता घालता त्याच्याकडे बघून शिव्याशाप देत होती. "आता संपैले, हे माझे शेवटचे पायमोजे आहेत आणि खरंच जर मला लॉटरी लागली तर मी दुकानात जाऊन नायलॉनच्या १० पायमोज्यांच्या जोड्या एकदम खरेदी करणार आहे."

"त्यापेक्षा तू जरा बऱ्यापैकी काहीतरी खायच्या वस्तू घरात आण." टेबलावरून त्याचा रागावलेला आवाज ऐकू आला.

हान्सलचा गृहपाठ चालूच होता. दिव्याचा प्रकाश मंद असल्यामुळे त्याने पुस्तक वर उचलून धरले होते.

बाहेर दाराची घंटा वाजली. घरमालकीण स्वयंपाकघरातून लगबगीने किल्ल्यांचा जुडगा घेऊन आली आणि दरवाजा कुरकुरत उघडला. प्रथम हान्सलने हे सर्व आवाज नीट ऐकलेच नव्हते आणि त्याकडे लक्ष पण दिले नव्हते. पण जेव्हा एक मोठा आवाज ऐकू आला तेव्हा तो उठला. त्यामुळे शाईची दौत उपडी झाली. 'अजागळ महामूर्ख आहेस' एक शिवी हान्सलच्या कानावर आदळली. मग तो दरवाजा आत ढकलून उघडला गेला. दारात एक मनुष्य उभा होता. त्याच्या युनिफॉर्मचा रंग विटलेला होता. त्याला पाहून हान्सलच्या अंगातले रक्त गोठून गेले. त्याचे तोंड विस्फारले आणि त्याच्या डोळ्यांतून टिपे गळू लागली. तो थरथर कापू लागला. आणि दाटलेल्या गळ्यातून एक करुण हाक बाहेर पडली "बाबा."

त्या माणसाने दरवाजा धाडकन् लोटून बंद केला आणि तो खोलीत आत येऊन मधोमध उभा राहिला. त्याचा चेहरा लहान व फिकट होता आणि त्याची दाढी भरदार होती. त्याचे डोळे खोलीच्या ह्या टोकापासून त्या टोकापर्यंत गरगर फिरले. त्याने टोपी मानेवर खाली टाकली आणि त्यामुळे त्याचे कापलेले केस दिसू लागले. प्रथम त्याने हान्सलला पाहिले. 'माझा हान्सल' तो स्फुंदू लागला. पुढचे शब्द ऐकू येईनात. पण तोपर्यंत त्याची नजर त्या स्त्रीवर खिळली होती. ती पण घाबरून आपल्या आतल्या कपड्यांनिशी पलंगावरच बसून होती. ती गरोदर असल्याचे स्पष्ट लक्षात येत होतं. तिने एक शब्ददेखील उच्चारला नाही आणि आता ती उठून काहीतरी बोलणार इतक्यात मघाचा तो जोरदार आवाज गरजून बोलला, "आणि तू कोण तिथे बसलेला ? त्याचे लक्ष बायकोच्या मित्राकडे गेले. मित्र अजून टेबलावरच बसून होता आणि आरशातून ह्या आगंतुकाकडे पहात होता.



आईने खाटेवरून उडी मारली आणि ती भेदरून म्हणाली, "मला वाटलं तुम्ही-तुमचं काहीतरी... लोक काहीतरी तसं म्हणत होते..."

तो सैनिक काही पावले पुढे सरकला. त्याने पत्नीला आपादमस्तक न्याहाळले आणि तो खेकसला, "तू गर्भारशी आहेस ! तुला मूल होणार आहे." त्याने त्याची पाठीवरील पडशी (पिशवी) भिरकावून तिच्या अंगावर फेकली, "ते त्याचं मूल असेल ना ? तू गलिच्छ, बाजार बसवी."

हे शब्द ऐकून तिचा मित्र पटकन् उठला आणि त्याची खुर्ची करकरली. ते ओरडून म्हणाला, "तुला माहीत नसलं तर सांगतो ऐक. ती माझी बायको आहे."

"बायको ?" हळूहळू तो बोलत होता. तो थोडासा वाकला आणि त्याने हाताच्या मुठी आवळल्या. "बायको" ? तो पुन्हा खेकसला "हलकट, तुम्ही दोघे डुक्कर आहात. इथे तुम्ही बेशरमपणे उपभोग घेत आहात आणि तिकडे तिचा नवरा सैबेरियात लाकडे तोडीत बसलाय्. रात्रंदिवस आपल्या बायकोची आणि मुलाची काळजी करतोय् आणि तुम्ही इथं बसून मजा मारताय् निर्लज्ज !" त्याने पोटातील मळमळ ओकून टाकली.

मग डोके फिरल्यागत तो तिच्या अंगावर धावून गेला आणि तिच्या तोंडात फाडफाड हाताने बुक्क्या मारल्या.

हा सर्व प्रसंग इतका अनपेक्षित होता आणि इतक्या थोड्या क्षणात घडला की घटना घडत असताना हान्सल एक शब्ददेखील बोलला नाही. जमिनीला खिळल्या सारखा तो उभा होता.

नंतर जेव्हा वडिलांना परत नेऊं लागले तेव्हा वडील पुन्हा त्याच्याकडे वळून म्हणाले, "हान्सल मला माफ कर. माझा नाईलाज झाला. कधीतरी तुला तुझ्या वडिलांच्या वागण्याचा अर्थ समजेल. मी तुला नंतर सर्व समजावून सांगेन. मी नेहमी तुझ्यासोबत असेन हे लक्षात ठेव बाळा." ते ऐकून तो वडिलांकडे धावून गेला आणि तो त्यांना घट्ट बिलगला. एका युनिफॉर्मवाल्याने त्याला दूर सारले आणि त्याचे डोके ढकलले. हान्सलने त्याच्या दंडाचा चावा घेतला. आणि त्याला परिचित असलेला तो लोकर व चामड्याच्या कोटाचा वास, पोलिसाच्या कपड्यांचा ओळखीचा वास त्याला

येऊ लागला. त्याला एक बुक्का पण बसला. पण त्याने वडिलांना सोडले नाही. तो त्या दोघांना लोंबकळून रस्त्यापर्यंत फरपटला गेला मग दुसऱ्या पोलिसाने त्याला बाजूला ढकलले आणि त्याच्या वडिलांना पोलिसाच्या गाडीत बसविले. "हे बघ शहाणा असशील तर सांगतो तुला." त्यापैकी एक पोलिस म्हणाला, "तुझे वडील परत येतील."

जेव्हा पोलिसांची गाडी निघाली तेव्हा हान्सल पण तिच्या पाठोपाठ धावला. तेवढ्या वेळात त्याच्या आईला दवाखान्यात नेण्यासाठी आलेल्या अँब्युलन्स गाडीचे त्याला भानदेखील झाले नाही.

हान्सल धावतच राहिला, पोलिसची गाडी दिसेनाशी झाली. थंडी खूप पडली होती. रस्त्यावर कोणीही माणसे दिसत नव्हती. थकून जाऊन शेवटी तो धावायचा थांबला. आत्ता त्याच्या लक्षात आलं की त्याच्या अंगावर वडिलांनी आईवर फेकून मारलेली पडशी होती. ती त्याने केव्हा उचलून घेतली ते त्याचे त्याला समजले पण नाही. त्याने त्या पडशीत स्वतःचे तोंड झाकून घेतले आणि भिंतीला टेकून तो ओक्साबोक्शी रडू लागला.

ह्या रडण्यामुळे त्याचे मन थोडे हलके झाले आणि त्याच्या लक्षात आले की तो खूप दमला आहे. ती पडशी खांद्यावर टाकून तो चालू लागला आणि मायनरच्या खोलीशी पोचला. घंटा वाजवावी की नाही या विचाराने तो बराच वेळ दारात उभा राहिला. शेवटी एकदाची त्याने दारावरची घंटा दाबली.

"हरमायनर घरी आहेत का ?"

"नाही, अजून ते घरी परत आले नाहीत."

"मी त्यांच्या खोलीत थांबलो तर चालेल का ?"

"ठीक आहे. पण खरं म्हणजे, अनोळखी मुलांनी माझ्या घरात ये-जा करणं मला आवडत नाही. पण ये, तू आत ये. मायनरला लवकरच दुसरी खोली शोधावी लागेल. माझं घर म्हणजे काही रेल्वे स्टेशनवरची वेटिंग रूम नाही."

असं म्हणत त्या बाईने हान्सलला मायनरच्या छोट्या भाड्याच्या खोलीत बसविले आणि त्याने आपल्या खांद्यावरील पडशी टेबलावर काढून ठेवली.

## पुनश्च हान्सल रस्त्यावर !

काल्पन मायरशी गोष्टी केल्यावर मायनर एका मित्राकडे गेला. ह्या मित्राबरोबर तो गेले कित्येक दिवस एकत्र अभ्यास करून घाम गाळीत होता. कारण परीक्षा जवळ येत होती. त्याची पावले घराकडे वळली तेव्हा चांगलीच रात्र झाली



होती. पण जेव्हा तो घरी पोचला तेव्हा त्याला पुन्हा एक चक्कर मारायची इच्छा झाली.

चौकातल्या घड्याळात १ चा टोला पडला, तेव्हा मायनर आपल्या भाड्याच्या खोलीत गेला. कसलातरी गंभीर विचार करीतच तो स्वतःच्या खोलीत शिरला. मग त्याने दिव्याचे बटण दाबले, कोट काढून हातावर घेतला आणि तेवढ्यात त्याचे लक्ष बिछान्याकडे गेले. त्याच्या अंथरुणावर नक्कीच हान्सल झोपलेला दिसत होता. आपला कोट फरशीवर फेकून देऊन मायनर त्या झोपलेल्या मुलाकडे धावला. "अरे देवा, पुन्हा हा मुलगा माझ्याकडे कशासाठी आला ? काय झालं असेल ? तो त्याच्या घरी का नाही गेला ?" मायनरचा जणू श्वासोच्छ्वासच बंद झाला. त्याने हान्सलला हलवून उठवले आणि तो मोठ्याने म्हणाला, "हान्सल ऊठ, जागा हो ! हान्सल उठ ना प्लीज." पण तो मुलगा प्रेतासारखा पडला होता. त्याने त्याचे डोळे पण उघडले नाहीत. मायनरने त्याला उठून बसविले होते, पण त्याचे धड पुन्हा उशीवर कोसळले. जवळच फरशीवर औषधांच्या पुड्यांची पाकिटे पडली होती. मायनरने उचलून पाहिले त्या झोपेच्या गोळ्या होत्या ! "हाय रे परमेश्वरा, याने नक्की २० तरी गोळ्या खाल्ल्या आहेत." मायनर म्हणाला. नंतर मायनरने त्याच्या उशागती लहानशा टेबलावर ठेवलेली ती पडशी पाहिली. त्याने ती उचलली व उलटी-सुलटी करून पाहिली. त्यात एक लढाईच्या भूमीवर नेतात, तसा थर्मास होता, काही पत्रे होती. थोडी सुट्टी नाणी होती, जवानांचे पायमोजे होते, एक तुटकी पेन्सिल होती, काही जखमेला बांधण्यासाठी बँडेजच्या गुंडाळ्या होत्या. एक फणी होती. आणखी अशाच काही सटरफटर गोष्टी टेबलावर आणि फरशीवर पडलेल्या दिसत होत्या.

या सर्वाचा अर्थ तरी काय ? पण मायनरला ती चिंता करण्यास फुरसद नव्हती. तो खोलीच्या बाहेर धावला, घरमालकिणीला हाक दिली आणि थरथरत्या हाताने त्याने पुन्हा समोरचा दरवाजा उघडला. अतिशय वेगाने तो पायऱ्या उतरून जवळच्या पोलिस स्टेशनला फोन करायला गेला आणि त्याने (emergency) ला ही बातमी दिली.

हॉस्पिटलमधे नेल्यावर हान्सलचे पोट सर्व धुवून रिकामे केले. ड्यूटीवरचा तरुण डॉक्टर चिंतेने म्हणाला, "आजकालच्या या तरुण मुलांना काय झालंय कुणास ठाऊक ? एवढासा तरुण मुलगा आत्महत्या करायला निघाला आहे. खरंच जगाची तऱ्हा सर्व उरफाटीच झाली आहे."

ह्या पाल्य मुलाच्याजवळ बसून मायनरने पुरी रात्र काढली. तो मुलगा झोपला होता. मधून मधून तो चळवळत होता, उठत होता, उलटी करीत होता आणि मग गलितगात्र होऊन पडून राहायचा. आपल्या जवळ मायनर बसून आहे हे त्या मुलाला

समजत नव्हते. पण नकळत त्याने त्याचा हात घट्ट पकडून ठेवला होता.

हळूहळू दिशा फाकू लागल्या आणि खिडकीतून सूर्योदय दिसू लागला. हान्सलने डोळे उघडले. त्याचा चेहरा काळवंडला होता आणि नेहमीपेक्षा अधिक ओढलेला दिसत होता.

"काय, हान्सल आता तुला थोडं बरं वाटतंय ना ?" मायनरने आस्थापूर्वक विचारले आणि काय करावे ते न सुचल्याने आणि ती गंभीर दुःखद शांतता असह्य झाल्याने मायनरने आपल्या खिशातला छोटा कंगवा काढला आणि तो हलके हलके हान्सलचे केस प्रेमाने विंचरू लागला.

"तू अगदी उंडारल्यासारखा, बावरल्यासारखा दिसतो आहेस हान्सल ! थांब, मी तुला जरा नीटनेटका बनवतो."

"धन्यवाद, हर्मन" त्या मुलाच्या डोळ्यांत अश्रू दाटून आले. "प्लीज मला माफ कर !"

"ठीक आहे रे हान्सल ! तू कशाला माफी मागतोस ? तू असं काय केलं आहेस ? तू आता झोपी जा. मला आता व्याख्यानाला जायचंय. तिथून मी थोड्या वेळाने परत येईन." असे म्हणत त्याने त्या अशक्त मुलाचे गाल थोपटले.

मायनर जेव्हा जायला उठला तेव्हा हान्सलने त्याचा हात पकडून ठेवला. "हर्मन, तुला ठाऊक आहे का, मी काय करत होतो ते माझं मलाच कळत नव्हतं. मी तुझ्या खोलीत येऊन तुझी वाट पाहात बसलो आणि मग ती पडशी मी शोधून पाहिली, ती माझ्या वडिलांची पडशी होती. आणि त्यात मला त्या गोळ्या सापडल्या. मी इतका वैतागलो होतो हर्मन, की मी लगेच त्या सगळ्या गोळ्या गिळून टाकल्या. त्यामुळे असा त्रास होईल ही कल्पनाच मला तेव्हा आली नाही..."

"काय म्हणतोस ? तुझ्या वडिलांची पडशी ? हान्सल ? मायनरने लक्षपूर्वक विचारले.

"होय हर्मन," त्या मुलाने बोलायला सुरुवात केली. पण त्याचा आवाज बाहेर पडेना आणि तो रडू लागला. "बाबा घरी आले होते. ते युद्धकैदी झाले होते. आणि नंतर ते..."

मायनरने उठून बसलेल्या त्या मुलाला हळूच पुन्हा कुशीवर झोपविले. "बस पुरे झालं हान्सल, आत्ता काही बोलू नको ! तू आता फक्त झोपून जा. तुला बरं वाटल्यावर मग मला सर्व घटना सांग. पण आत्ता तुला विश्रांतीची गरज आहे. सर्व काही ठीक होईल हान्सल ! मी तुझ्या सोबत आहे ना ? मी तुला सर्व तऱ्हेने मदत करीन. माझ्यावर तू पूर्ण विश्वास ठेव."



पुन्हा हान्सल बोलायचा प्रयत्न करू लागला तेव्हा मात्र मायनरने त्याला ठासून पुन्हा सांगितले, "चूप रहा आता. तू आता झोपून जा. तुला ऐकू येतंय ना मी काय सांगतोय ते. डोळे मिटून घे बरं. "

त्या मुलाने आज्ञाधारकपणाने डोळे मिटले. मायनर थोडा वेळ त्याच्याजवळ बसून राहिला. मुलाची छाती नियमित वरखाली होऊ लागली आणि थोड्याच वेळात तो झोपून गेला.

"गरीब बिचारा मुलगा ! त्याला किती भोगावे लागत आहे ? पुन्हा त्याला एकटा सोडता उपयोगी नाही. त्याला माझी गरज आहे. मला कसंही करून त्याला मदत केलीच पाहिजे. काहीतरी विचार करायला हवा." मायनर स्वतःशीच ठरवीत होता.

तो चटकन उठला, व्याख्यान सुरू व्हायला अजून १ तास अवधी होता. घरी जाऊन, अंघोळ करून एखादा कॉफीचा कप घेऊन व धुतलेला शर्ट घालून परत येणे त्याला जमण्यासारखे होते. घरी त्याची घरमालकीण त्याची वाटच पाहात बसली होती.

"आता पुरे झालं बाबा तुझं हर्मन." ह्या तिच्या वाक्यानेच त्याचे स्वागत झाले. "मी आता यापुढे तुला इथे राहून देणार नाही. माझा अगदी नाईलाज आहे. झालं एवढं जास्तच झालं. ती उनाड मुले तू माझ्या घरात घेऊन येतोस. गेल्या कित्येक आठवड्यांपासून हे चालू आहे. अर्धी रात्र संपेपर्यंत दिवे जाळत ठेवतोस आणि सर्वदूर गोंधळ करून ठेवतोस. आणि आज तर सर्वांवर ताण म्हणजे आत्म-हत्येचा प्रयत्न ! नाही, तुला पण ठाऊक आहे, की मी वाजवीपेक्षा जास्तीच सहन केले आहे. आणि हे बघ, मी काही आता वयाने लहान नाही आणि हा त्रास करून घेण्याची मला काही गरज नाही." तिने स्वतःचे डोळे एप्रनने पुसले. माझा नाईलाज आहे हर्मन मायनर, पण तुला आता दुसरी जागा पाहावीच लागेल."

मायनर स्वतःचा बचाव करण्यासाठी काहीच बोलू शकला नाही. वास्तविक त्याने अजून एकदा मालकिणीची समजूत काढली असती कारण अशी अखेरची ताकीद ती काही आज प्रथमच देत नव्हती. यापूर्वी अनेक वेळा त्याने ती ऐकली होती. पण आत्ता तो विलक्षण दमला होता आणि त्याला तिची दया पण येत होती. "ठीक आहे" तो म्हणाला, "मी दुसरी जागा शोधतो. कुठेतरी मला नक्कीच मिळेल."

दाढी करीत असताना मायनरच्या डोळ्यांपुढे गेल्या २४ तासांत घडलेल्या गोष्टी दिसत होत्या. तोंड धुण्याच्या भांड्यावरील आरशात त्याने निरखून पाहिले आणि तो स्वतःशीच बोलला, "हर्मन, तुझ्यावर काहीतरी अरिष्ट कोसळणार आहे." आणि ह्या विचारासरशीच त्या प्रसंगाला सामना करण्याचा आवेश आणि ताकद

त्याच्या अंगात आलेली त्याला भासू लागली. तो स्वतःशी पुटपुटला, "ते निळे पक्षी आकाशात भरारी मारू लागले आहेत." (विरोधकांची आघाडी समोर येत आहे.)

प्रसन्न मनाने, ताजातवाना झालेला मायनर विद्यापीठात आला आणि सरळ सभागृहात गेला. तो मुद्दाम मागच्या दरवाज्याने आत शिरला होता आणि आता त्याच्या नजरेसमोर तो अर्धवर्तुळाकार हॉल दिसू लागला. तो हॉल स्टेजच्या दिशेने रुंद होत गेला होता. सर्व बाके गच्च भरली होती. विद्यार्थी खिडक्या-दारांच्या चौकटीवर पण बसलेले दिसत होते. मायनर थोडा वेळ उभा राहून बसायला जागा शोधू लागला.

अकस्मात बाकावर बसलेले विद्यार्थी जोराने पाय वाजवून स्टँपिंग करू लागले. मायनरला स्वागताची ही तऱ्हेवाईक पद्धत आवडली आणि तो प्रो. ब्राइटनर आले का ते पाहू लागला. कारण आजचे व्याख्यान प्रो. ब्राइटनर यांचे होते पण ते कुठे दिसले नाहीत. मायनरने पुन्हा मान वळवून विद्यार्थ्यांकडे पाहिले. ते आता हाताने जोरजोरात टाळ्या वाजवीत होते आणि जोरजोरात पायाने स्टँपिंग करत होते.

त्याचेच स्वागत होत होते यात काही शंका नव्हती. मायनरने ठरविले की ही मुले नेहमीच काहीतरी नवीन थट्टा करीत असतात. त्याला ते स्वागत चटकन स्वीकारायचे नव्हते किंवा त्याला त्याची लाज वाटते आहे असे दाखवायचे पण नव्हते. त्याने एक क्षण विचार केला आणि तो व्यासपीठाजवळ व्याख्यात्यांच्या मधे स्थित असलेल्या एका डेस्कजवळ गेला. पांढऱ्या टेबलाच्या मागे उभा राहिला. प्रो. ब्राइटनर सारखी आपल्या हातांची घडी करून आपल्या पाठीवर धरली आणि त्याने बोलायला सुरुवात केली. "सावधान, बंधुभगिनींनो !" याबरोबर स्टँपिंग मंद झाले. आवाज विरून गेला आणि श्रोते शांत झाले.

"आता मला हे नाटक पूर्ण वठवलंच पाहिजे." मायनरने स्वतःला बजावले. ब्राइटनरची नक्कल करून व्याख्यान सुरू करावे का ? तो व्याख्यान सुरू करणार इतक्यात त्याला आणखी एक नवीन कल्पना सुचली.

"मित्रांनो, माझ्या ह्या उत्स्फूर्त अनौपचारिक स्वागताबद्दल मी तुमचा फार आभारी आहे. मला त्याची आत्यंतिक गरज होती. कारण अर्ध्या तासापूर्वीच मला घरातून बाहेर काढले गेले आहे. त्यामुळे आज रात्री कुठे झोपावे हेच मला ठाऊक नाही."

"अरे, कुणीतरी सुंदर मुलगी तुला तिच्या घरी बोलवील." कुणीतरी चेष्टा केली. सर्वजण आरडाओरडा करू लागले, पण लवकरच सर्व शांत झाले. कारण प्रो. ब्राइटनर खुद्द त्या नकली प्रोफेसरच्या मागे येऊन उभे राहिले.



"माझा सहकारी कृपा करून स्वतःच्या जागेवर जाऊन बसेल का ?" ब्राइटनरने अतिशय आदबीने विचारले. "मी तुमची क्षमा मागतो सर." मायनर म्हणाला. आणि जवळच असलेल्या एका बाकावर त्याच्यासाठी करून दिलेल्या जागेवर जाऊन बसला.

ब्राइटनर व्याख्यान देत होता व एका रोग्याचे दुखणे समजावून सांगत होता. त्याच्या पोटात अन्न ठरत नव्हते. कारण त्याच्या आतड्यात बिघाड झाला होता.

शेवटी शेवटी त्या रोग्याला काहीच खाणे जाईना. द्रवपदार्थ पण पचेनात. अशा रीतीने अतिशय व्यवहारी भाषेतून ब्राइटनरने रोगाचे व ऑपरेशनचे वर्णन केले. त्याच्या भाषणात कुठलीही अतिशयोक्ती किंवा नाटकी भाव नव्हता.

मायनरने ह्या व्याख्यानाची सविस्तर टिपणे घेतली. त्याला नेहमीच अशा तऱ्हेची ऑपरेशन्सची वर्णने खूप आवडत असत. खरं म्हणजे हेच त्याचं जग होतं आणि त्यात त्याला नवजीवन मिळत होतं. बाकी सर्व गोष्टींचा त्याला विसर पडत असे.

व्याख्यानानंतर ब्राइटनरने मायनरला स्वतःच्या अभ्यासिकेत बोलावले. "सभागृहात एवढे काय चालले होते ?" त्याने त्याला विचारले.

"काही नाही सर, कधीकधी आम्ही विनाकारण जास्त चेकाळत असतो."

"नाही मित्रा, ते चेकाळणं उगाच नव्हतं. मी तुझे बोलणे ऐकले आहे. तुझ्या खोलीबद्दल तू बोललास आणि आज रात्री तुला झोपायला कुठे जागा नाही हे पण तू सांगितलेस." मायनरला स्वतःच्या अडचणीविषयी प्रोफेसरजवळ बोलायला अवघड वाटलं. त्यांच्याशी आतड्याच्या ऑपरेशनविषयी बोलणं त्याला अधिक आवडलं असतं. पण ब्राइटनरनेदेखील तोच विषय ताणून धरला आणि मग मायनरला त्याला सर्व काही सांगावे लागले. त्याने अलिकडे अनुभवलेल्या मुलांच्या दुःखद वंचना पण प्रोफेसरांच्या कानांवर घातल्या.

"मला अगदी हेच वाटलं होतं. त्यात घरमालकिणीचा काहीच दोष नाही." ब्राइटनर म्हणाला.

मायनरने आश्चर्याने आपल्या प्रोफेसरांकडे पाहिले. "तुम्हाला काय म्हणायचं आहे प्रो. ब्राइटनर ?"

"तुझी अधोगती मायनर. तू आता पूर्वी जसा विद्यार्थी होतास तसा राहिला नाहीस. मी तुम्हा सर्वांना चांगला ओळखून आहे. समजले ? म्हाताऱ्या ब्राइटनरला तुम्ही फसवू शकणार नाही. मला माझ्या विद्यार्थ्यांत खूप रस आहे. निदान तुमच्यापैकी काही मुलगे तरी उत्तम डॉक्टर व्हावेत ही माझी अपेक्षा आहे. डॉक्टर होणं ही

काही सोपी गोष्ट नाही. मायनर, तुला वाटतं त्यापेक्षा ते फारच कठीण आहे. जगात अनेक डॉक्टर आहेत पण डॉक्टर डॉक्टरमधे फार फरक आहे. आणि तुझ्यामधे मला वाटतं की खरा डॉक्टर होण्याची उमेद आहे. तू जे सध्या करतो आहेस, त्यातून काही निष्पन्न होणार नाही. त्यासाठी तुला खूप मेहनत करावी लागेल. अभ्यासाव्यतिरिक्त दुसऱ्या कशातही लक्ष देऊ नकोस. सर्व तऱ्हेच्या प्रलोभनांपासून दूर राहा. ही जी तुझी तरुणांची संघटना तू सांगतो आहेस ती तुझ्या अभ्यासात विष कालवील. थोडा तरी शहाणपणाने वाग मायनर."

"होय सर, मी तुमचा खूप आभारी आहे. पण....."

"पण परंतु काही नाही." ब्राइटनरने मधेच त्याला थांबविले, "तुझा अभ्यास म्हणजे काही खेळ नव्हे. आज जर तुला एखादी गोष्ट नीट समजली नाही तर ती बाब उद्या एखाद्या रोग्याच्या मृत्यूला कारणीभूत ठरू शकेल. ह्याची जबाबदारी स्वीकारायला तू तयार आहेस का ?"

"सर मी तुम्हाला पटवून देऊ शकलो तर !" मायनर मधेच बोलला, "मी हे सर्व सोडू शकत नाही. मी हान्सलला टाकून देऊ शकत नाही. ह्या अफाट जगात त्याला माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाचाच आधार नाही." प्रो. ब्राइटनरला राग आला. "मी तुला सर्व गोष्टी नीट समजावून दिल्या आहेत. मायनर, वास्तविक मला हे सर्व करण्याची काहीच गरज नव्हती. पण माझा तुझ्यावर भरवसा आहे. आणि म्हणून मी तुला हा मित्रत्वाचा सल्ला दिला आहे. जर तुला उत्तम डॉक्टर व्हायचं असेल तर तुला सर्व सोडून देऊन, एकाग्रतेने अभ्यास केला पाहिजे. तुला जर बॉय स्काऊटच बनायचं असेल तर ही डॉक्टरची लाईन तू सोडून दे. मला स्वतःला वैद्यकशास्त्राचा अभ्यास ही एक पवित्र गोष्ट वाटते. आणि कुणीही ती गोष्ट अर्धवट लक्ष घालून करू शकणार नाही."

एवढे बोलून त्याने मायनरची पाठवणी केली. पुन्हा मायनर एकटा झाला. त्याला हे कळत होते की त्याचा अभ्यास मागे पडत होता. पण ब्राइटनरला हे माहीत असावं याचं त्याला नवल वाटलं. विद्यापीठातून बाहेर पडत असताना दरवाज्याजवळच्या शिपायाने त्याच्या हातात एक पत्र दिले.

"हर मायनर हे पत्र तुमच्यासाठी आहे." तो म्हणाला. मायनरने पाकिट फोडले. त्यात एक चिठ्ठी होती. त्या चिठ्ठीवर एक पत्ता लिहिलेला होता. आणि त्याच्या पाठीमागे "तुझ्यासाठी ही खोली आहे." हा मजकूर पण होता.

त्याचा अर्थ त्याच्या 'व्याख्यानाची' त्याला मदत झाली होती. 'अजून ह्या जगात सज्जन माणसे आहेत तर !' हे वाक्य तो मनाशीच पण जोरात बोलला. कारण त्या शिपायाने त्याच्याकडे वळून पाहिले आणि त्याला विचारले, "काय म्हणता



तुम्ही ?"

मी म्हणतो की "माणसं फार चांगली असतात." मायनर हसून म्हणाला आणि त्याने त्या शिपायाशी हस्तांदोलन केले. त्या शिपायाने पण आपली टोपी उतरवून त्याला प्रणाम केला. फक्त विशेष प्रसंगीच असे अभिवादन करायची त्याला सवय होती.

## दुर्दैवी लीडीआ

फ्राऊ स्टेगवीज (Frau Stegwitz) मधली ती खोली मायनरने त्याच दिवशी घेऊन टाकली. ती खोली भरपूर उजेड असलेली व स्वच्छ होती. फार मोठी नव्हती. पण आटोपशीर होती. त्याला ती पसंत पडली. बाकी सर्व फर्निचर देवदार लाकडाचे होते. फक्त त्यातला पलंग मात्र पितळी फ्रेमचा होता. त्यामुळे तो जरा विसंगत वाटत होता. त्या खोलीचा वापर नानाप्रकारे पूर्वी झालेला असावा असे सहज दिसून येत होते. पण इन्सब्रुकच्या अनेक विद्यार्थ्यांना जागा हव्या होत्या आणि युद्धामुळे विधवा झालेल्या स्त्रियांना पण अधिक उत्पन्न मिळाले तर हवे होते.

त्याच्या खिडकीतून समोरच इन्सब्रुक गाव दिसत होते आणि त्यामुळे मायनर खूप सुखावला. हिवाळ्याच्या सुरुवातीची ती थंड हवेची संध्याकाळ होती आणि खिडकीतून बाहेरचे रमणीय दृश्य तो पहात होता. ते समोरचे इन्सब्रुक गाव; ज्या गावाशी त्याचे लवकर नाते जुळले होते. उंच कौलारू घरांची ती छपरे जणूकाही भयभीत होऊन एकमेकांना चिकटून बसली होती. जणू काही त्यांना पुन्हा बॉंब हल्ल्याची भीती वाटत होती. मागच्या बॉंबहल्ल्याने ह्या शहराचे ते सुंदर शिल्प विसकटून टाकले होते. कुठेतरी एक पक्षी गात होता. शिशिर ऋतूचा आनंद दर्शविणारा तो पहिला सूर होता. मायनरने दीर्घ श्वास घेऊन निसर्गाचे ते रूप अंतर्यामी टिपून घेतले.

आणि तिकडे तो हान्सल पडला होता ! त्या मोठ्या जनरल हॉस्पिटलकडे पाहता पाहता मायनरला हान्सलची आठवण आली. आज हान्सलकडे जायला त्याच्याकडे फारसा वेळ नव्हता. फक्त दुपारी तो अर्धा तास गेला होता पण तेवढ्या वेळात त्याचा चेहेरा उजळून गेला होता. तो पुन्हा हसू लागला होता. तेच त्याचे ते पूर्वीचे हास्य. थोडेसे दुःखद, थोडेसे घट्ट बांधून ठेवलेले. त्याला त्याची जाणीव असलेले, संकोचलेले असे ते हसणे पुन्हा परतून आले होते. पण ह्या मुलाने खळखळून हसावे अशी अपेक्षा तरी कशी करणार ? त्या समूहातील काही मुलगे तर हसणे अजिबात विसरूनच गेले होते.

ते का बरं हसत नाहीत ? त्याने विचार केला. त्यांना सर्वांत अधिक कशाची गरज असेल ? त्याच्या हे अनुभवास आले होते की भुकेने ही मुले व्याकूळ होत नाहीत, किंवा बाप दारू पिऊन घरी आला त्याची पण त्यांना भीती वाटत नाही, किंवा झोपायला स्वतःचा स्वतंत्र बिछाना नसला तरी त्याची पण त्यांना खंत वाटत नाही त्याच्या हे लक्षात आले होते की जीवन हे असेच असणार, असे ती मुले धरूनच चालली होती. ही दुःखमय परिस्थिती हेच त्यांचं जग होतं. त्यांनी आपल्या जीवनाचा किंवा त्यातल्या दुःखांचा कधी शांतपणाने विचारच केलेला नव्हता. त्यांनी फक्त शिवीगाळ आणि मारहाण निमूटपणे स्वीकारली होती. घरात बसून शाळेचा गृहपाठ करीत असताना एकीकडे कौटुंबिक प्रसंग घडतच असायचे. पण असे जरी असले तरी अप्रत्यक्षपणे त्या मुलांना त्याची जाणीव होत असलीच पाहिजे, आतून ते रडत असले पाहिजेत. मात्र त्यांना त्यांच्या दुःखाचे नेमके कारण उमगत नसावे आणि त्याचे स्वरूपही समजत नसावे. हा निष्कर्ष मायनरने स्वतःपुरता काढला.

पण मग त्यांची सगळ्यात मोठी वंचना कोणती ?

"हां, त्याचे उत्तर फार सोपे आहे." त्याने स्वतःच्या प्रश्नाला स्वतःच उघडपणे उत्तर दिले. त्यांची वंचना म्हणजे आईपासून झालेली ताटातूट. त्यांना मातेची अत्यंत मोठी गरज आहे. जर ह्या मुलांना पुन्हा एक आई मिळाली तर सर्व गोष्टी लवकर सुधारतील. निदान एक चांगली बाई त्यांना मातेप्रमाणे वागवू शकेल. पण मातेची जागा दुसरी कोणी बाई घेऊ शकेल का ? एखादी परकी बाई आई बनू शकेल का ? नक्की बनू शकेल." त्यानेच त्याच्या प्रश्नाला उत्तर देऊन टाकले. आणि हे खरोखरीच शक्य आहे असं मला वाटतं." त्याने ही वाक्ये मनातल्या मनात अनेकदा घोकली आणि विचारून घट्ट बसवून टाकली. नंतर आपल्याच विचारांचे त्याने मंथन सुरू केले. जर ह्या मुलांची आई निवर्तली असेल तर त्यांना दुसरी आई मिळवून देणं हे पहिलं काम आहे. ती त्या मुलाची आई बनून राहील, त्यांच्याशी खेळेल, त्यांच्यावर प्रेम करील, त्यांना शिकवील, त्यांच्या दुःखात वाटेकरी होईल, त्यांचे अपराध पोटात घालील, त्यांचे कौतुक करील, त्यांना रागे पण भरेल आणि अदृश्य हातांनी त्यांना त्यांच्या निरागस बालपणाच्या जादूच्या जगात घेऊन जाईल.

ह्या मुलांची अडचण यामुळेच दूर होईल. असं झालं असतं तर ती लीडीआ अशी उनाड आणि चोरटी बनली नसती. त्याच्या डोळ्यांपुढे लीडीआ दिसू लागली. १६ वर्षांच्या लीडीआच्या चेहेऱ्यावर मुरुमाच्या पुटकुळ्या होत्या. आणि तिची गालफडे वरती उभारून आली होती. तिला मुलांच्या क्लिनिकमधे आणली होती आणि तिच्या आजारीपणाची सविस्तर चर्चा झाली होती. तिने एक चमचा गिळला होता आणि तो ऑपरेशन करून काढावा लागला होता. तिची अन्ननलिका त्यामुळे फाटली होती पण ती वाचली होती. जेव्हा ती मुलगी बरी होऊन बाहेर पडली तेव्हा प्रोफेसरांनी तिची कहाणी विद्यार्थ्यांना सांगितली होती. विद्यार्थ्यांना लीडीआची कहाणी ऐकायची तीव्र इच्छा होती. ती ऐकल्यावर एका विद्यार्थ्याने विचारले, "पण सर तिने तो चमचा का गिळला ?"



सुरुवातीस प्रोफेसर काही सांगावयास तयार नव्हते. कारण ही कहाणी सांगणे हा काही त्यांच्या व्याख्यानाचा विषय नव्हता. पण मधून मधून विषयांतर करून विद्यार्थ्यांचे लक्ष वेधून घेणे त्यांना आवडत असे. म्हणून त्यांनी शास्त्रीय विवेचन बाजूला ठेवले आणि लीडीआची गोष्ट सांगायला सुरुवात केली.

"तेव्हा ती ३ महिन्यांची होती. पूर्णपणे उपेक्षित होती. वडील कोण होते त्याचा पत्ता नव्हता. आईकडून तिला सोडवून घेतली आणि एका आधुनिक पाळणाघरात ३ वर्षांची होईपर्यंत ती वाढली. नंतर तिची आणखी एका संस्थेत रवानगी झाली. शाळेला जाण्याचे तिचे वय जेव्हा झाले तेव्हा असे लक्षात आले की ती शारीरिक व मानसिक दृष्ट्या मागासलेली आहे. तिची वाढच खुंटली होती. तिचे शरीर कमजोर होते आणि तिची पूर्ण वाढ झालीच नव्हती. तिला नीट बोलता पण येत नव्हते. ती बोबडे बोल बोलायची. सगळ्यांत वाईट गोष्ट म्हणजे तिला सर्वच गोष्टींचा कंटाळा होता- तिला खेळ नको वाटायचा. कशातच उत्साह नव्हता. म्हणून तिला मुलांच्या इस्पितळात दाखल केले आणि नंतर एका कुटुंबात तिचा सांभाळ करण्यासाठी पाठविले. तिथे तिने लवकर छान, प्रगती केली. तिची प्रकृती टणक झाली आणि ती शाळेत जाऊ लागली. पण नंतर तिची मानलेली आई कॅन्सरने मृत्युमुखी पडली. म्हणून तिला त्या घरातून काढून आणखी एका कुटुंबात राहायला पाठवली. हे शेतकऱ्याचे कुटुंब होते आणि त्यांना स्वतःची चार मुले पण होती. लीडीआ व त्या मुलांचे सूत जमेना. शेतावर काम करण्यासाठी लहानशी मोलकरीण त्यांना मिळाली होती. शाळेला जाण्यापूर्वी सकाळच्या वेळात ती गोठ्यात काम करायची. तिला खेळणी दिलीच नाहीत. बहुतेक ती मार खायची किंवा रागवून घ्यायची. "वा रे, तू उनाड मैना" शाळकरी मुलं १० वर्षांच्या लीडीआला चिडवीत असत. एक दिवस ती चोरी करत असताना पकडली गेली आणि तेव्हापासून तिच्या दुर्दैवाला खरी सुरुवात झाली. नंतरच्या ४ वर्षांत तिला वेगवेगळ्या ५ संस्थांतून पाठविले गेले. आणि शेवटी ती एका कुटुंबात राहात असताना जो बॉंब हल्ला झाला, त्यात तिचा मानलेला परिवार पण संपूर्ण धुळीला मिळाला. पुन्हा तिला हलवावी लागली. आता लीडीआ चमत्कारिक वागू लागली होती. लढाई संपत आली होती आणि त्या दिवसांत लीडीआला एका सुधारगृहात पाठवणार होते, पण ती पळून गेली आणि एका निर्वासितांच्या तांड्यात सामील झाली. ह्या तांड्याबरोबर ती २ वर्षं भटकत राहिली.

भीक मागायची, चोऱ्या करायची. असं उनाड भटकं आयुष्य ती जगत होती. मग तिला पकडून आणलं आणि तुरुंगात पाठविलं आणि तुरुंगात गेल्यावर घोर निराशेत तिने तो चमचा गिळून टाकला.

"पण आता, बंधुभगिनींनो, आपण आपल्या दुसऱ्या केसचा विचार करूया." असे म्हणून त्यांनी लीडीआची कहाणी संपवली. मायनरने ही गोष्ट जेव्हा ऐकली होती तेव्हा त्यावर विचार करायला त्याला फुरसत नव्हती. पण आता पुन्हा एकदा त्या दुर्दैवी मुलीचा चेहेरा त्याला दिसू लागला. त्याने पुन्हा त्या गोष्टीची उजळणी केली. पाळणाघर, बालकमंदिरे. पण त्यातून हे स्पष्ट नजरेस आले होते की त्यातून ह्या मुलीचा विकास झाला नव्हता. कारण त्या मुलीला मातेचे सुख मिळाले नव्हते. त्याचा हा निष्कर्ष बरोबर होता. कारण लीडीआचा नंतरचा इतिहास ह्याची साक्ष पटवीत होता. ती जेव्हा एका प्रेमळ बाईबरोबर राहिली होती, तेव्हा तिच्यात अकस्मात चांगली सुधारणा झालेली होती. आणि जेव्हा ती बाई गेली तेव्हापासून लीडीआची घसरगुंडी सुरू झाली होती.

बाहेर अंधार पडू लागला होता. मायनर अजून खिडकीशीच उभा होता. त्याचे अंग थंडीने कुडकुडत होते. त्याने खिडकी बंद केली आणि त्याच्या त्या नवीन खोलीत तो चाचपडत दिव्याचे बटण शोधू लागला. मग त्याने सोबत आणलेली २ मोठी खोकी उघडली. ह्या दोन खोक्यांत त्याची मौल्यवान संपत्ती त्याने आणली होती. त्याची पुस्तके आणि टिपणे.

## सुरक्षित जीवन - हाच खरा आधार

मायनरच्या जिव्हाळ्याचा जो विषय होता त्याबद्दल अधिक माहिती देणारी पुस्तके त्याच्याजवळ नव्हती. म्हणून गेले कित्येक दिवसांपासून तो विद्यापीठाच्या लायब्ररीतून युवकांचे मानसशास्त्र या विषयावरील पुस्तके आणून वाचीत होता. अकस्मात त्याला एक दिवस हवे असलेले पुस्तक सापडले. त्याचे नाव होते सुरक्षितता (security). तो मोठ्याने ओरडला. आणि त्या ओरडण्याबद्दल त्याला जरादेखील संकोच वाटला नाही. एखाद्या विषयाच्या चिंतनात तो गढून गेला की नेहमी असेच करीत असे. "होय, बरोबर आहे. यात असे स्पष्टपणे म्हटले आहे की प्रत्येक मुलाला सुरक्षितता हवी असते आणि तो अनुभव त्याला फक्त आईच्या मांडीवर किंवा कुशीतच मिळू शकतो. त्याने खालील परिच्छेद मोठ्याने वाचला. "आई व मुलाच्या ह्या नात्यातून मुलाचा आत्मविश्वास वाढीस लागतो. मानसिकदृष्ट्या निरोगी माणसाचे प्रथम लक्षण म्हणजे हा आत्मविश्वास होय. हा आत्मविश्वास ज्या व्यक्तीत नसतो, ती व्यक्ती नेहमी गोंधळून गेलेली असते आणि कुठल्याही कामाची त्याला खात्री वाटत नाही. ह्या अवस्थेलाच चिंता असे म्हणतात आणि बहुतांशी ह्या चिंतेचा दृश्य परिणाम म्हणजे असामाजिक वर्तणूक. ज्यामुळे ही माणसे सतत भांडणे करीत असतात किंवा दुसऱ्यावर कुरघोडी करण्याचा प्रयत्न करतात. "मायनरने अगदी अधाशीपणाने सर्व वाचून टाकले आणि खालील मजकूर वाचताना, त्याचा आवाज मोठा व धीमा झाला. "प्रत्येक मानवी प्राण्याला अंतःकरणात सुरक्षिततेची भावना जोपासण्यासाठी, त्या मूलभूत पायांवर आयुष्याची उभारणी करण्यासाठी आईची जरुरी असते. प्रत्येक व्यक्तीला आई असणं हा एक जन्मसिद्ध हक्क आहे कारण ती आई निदान आयुष्याच्या सुरुवातीचे काही महिने व काही वर्षे हा आधार देत असते.

त्याने ह्या परिच्छेदाचा आणखी थोडा विचार केला आणि तो पुढे वाचू लागला. "मातेच्या प्रेमामुळे मिळालेली ही निश्चितता भावी जीवनाच्या सुरक्षिततेला पायाभूत होत असते. ही शिकवण ज्याला लहानपणी मिळत नाही किंवा ज्या मुलाच्या कमनशिबामुळे त्याला हा आधार मिळतच नाही ते मूल मोठे झाल्यावरदेखील कायम नैराश्यमय वृत्तीने आयुष्य जगताना दिसते. बालपणी आईच्या मायेला जो मुकतो त्याला पुढील आयुष्यात भावंडांचे प्रेम लाभले तर ही सुरक्षितता अनुभवता येते.

दरवाज्यावरील टकटकीने त्याचा अभ्यास थांबला. तो सहजतेने म्हणाला, "आत या." नवीन घरमालकीण आत आली. तिची उंच, दीन मूर्ती, तिच्या पिकलेल्या केसांचा अंबाडा आणि तिचे लांब फिकट हात सर्व मिळून तिच्यात एक विशेषता होती. मायनरला प्रथमदर्शनीच ही मालकीण आवडली होती. त्याला माणसांची पारख होती. आणि त्यातून त्याला चांगली माणसं लवकर ओळखून यायची. ही बाई नक्की गुणी, प्रेमळ आणि समजूतदार असली पाहिजे असे मायनरचे मत बनले. तिच्या निर्धारी स्वभावाची कल्पना मात्र त्याला पुरेशी आली नव्हती कारण पुढे तिच्या ह्या निर्धारी वृत्तीचा त्याला फायदा झाला होता आणि त्याने कित्येक वेळा मायनरला त्यामुळे शांत बनवले होते. मायनरला पण ह्याची आवश्यकता होती. कारण एकदा त्याने काही निर्णय घेतला की तो शेवटपर्यंत तडीला नेण्याचा त्याचा स्वभाव होता आणि हे करताना कधीकधी अति विश्वासाने तो नको ते पण करून बसत असे.

फ्राऊ स्टेगविझ (Frau Stegwits) आश्चर्यचकित झालेल्या दिसल्या. "माफ कर हर मायनर, मला वाटलं होतं की अजून तुमच्याकडे कुणीतरी माणसे भेटायला आलेली आहेत आणि मला तुम्हाला हे सांगायचं होतं की रात्री ९च्या नंतर मी कुणालाही घरात येऊ देत नाही. पण इथे तर तुम्ही एकटेच दिसता आणि मला नक्की

वाटतं की मी आणखी कुणाचा तरी आवाज ऐकला होता."

मायनरने प्रसन्नतेने हसून उत्तर दिले. "बरोबर आहे. मायनरच मायनरशी बोलत होता. तुम्ही कशी चूक करणार? जेव्हा माझ्या डोक्यात विचार भरून ते वाहू लागतात तेव्हा त्यातले काही शब्द माझ्या तोंडावाटे बाहेर पडू लागतात."

"तुझ्यासारख्या तरुण मुलांना खूप कठीण अभ्यास करावयाचा असतो आणि त्यासाठी गाढ झोपेची गरज असते. हर्मन मायनर, खास करून जेव्हा त्यांचा आहार इतका कमी असतो तेव्हा झोप हवीच."

"पण मी इतका झोपत नाही आणि खरं म्हणजे झोपायला मला वेळच मिळत नाही."

यावर त्या घरमालकिणीला संवाद वाढविण्याची इच्छा होती. पण मग तिने शहाणपणाचा विचार केला आणि ठरवलं की ह्या नव्या भाडेकरूला पहिल्याच दिवशी सतावणं बरोबर होणार नाही. मी उगीचच त्याला झोपून जा म्हणून सांगितले असा पण विचार तिच्या मनात आला; म्हणून जरा अपराधी मनाने तिने त्याला चहा विचारला. मायनरला चहा हवाच होता.

"पण माझेजवळ फक्त गवती चहाच आहे." ती म्हणाली.

"फारच चांगले!" मायनरने उत्तर दिलं. माझा ह्या गवती चहावर अधिक विश्वास आहे."

"मग मला वाटतं की कदाचित तुम्ही एखादे वेळी चांगले, शहाणे डॉक्टर व्हाल." ती म्हणाली. "आजकाल डॉक्टर लोक ज्या सर्व भरमसाट गोळ्या देतात, ते औषध नसून विष असतं."

चहा चांगला होता. त्याने त्याच्या शरीरात ऊब आली आणि नवीन उत्साह पण वाटला. पण मध्यरात्र संपल्यानंतर मात्र त्याचे डोळे मिटू लागले. कारण आदल्या रात्री तो एक क्षणभरदेखील झोपला नव्हता.

## डॉक्टर की बॉयस्काऊट ?

यानंतरच्या काही दिवसांत आणि काही आठवड्यांत मायनरमधे बदल होत होता. त्याला डॉक्टरी शिक्षणाची सर्वस्वी आवड होती पण आजकाल तो वर्गात जाताना आवडीने जात नसे. त्याला अभ्यास नकोसा वाटू लागला. त्याच्या डोक्यात जे विचार चालू होते त्यांच्याआड हा अभ्यास येऊ लागला. नवनवीन येणाऱ्या प्रश्नांचा विचार तो रात्रीच्या रात्री जागून करीत असे, पण त्या प्रश्नांचा खल होऊन निर्णय



घेण्याची वेळ आली की त्याची व्याख्यानाची तरी वेळ झालेली असायची किंवा दवाखान्यात काम असायचे किंवा एखादे प्रात्यक्षिक करायची वेळ असायची. यातच त्याची परीक्षा जवळ आली होती. आणि संपूर्ण लक्ष घालून अभ्यास करावयास हवा होता. पण त्याचे मन दुसरीकडे भटकत होते. अशा वेळी प्रो. ब्राइटनरने केलेला उपदेश त्याला आठवायचा आणि एखाद्या भुतासारखा कानांत घुमत रहायचा.

"जर तुला डॉक्टर व्हायचं असेल तर तुला इतर सर्व सोडून देऊन मनापासून अभ्यास केला पाहिजे. पण जर तुला बॉयस्काऊट व्हायचे असेल तर...."

मायनरने बंड पुकारून विचारले, "त्याने मला बॉयस्काऊट का म्हटले? त्याचा अर्थ काय?" मी माझ्या मुलांचा गंभीरपणे विचार करीत आहे. आता मी त्यांना सोडू शकत नाही. त्यांच्या दुर्दैवाचे भूत माझ्यासमोर नाचते. त्यांच्या गरीब घरांतली ती दुर्गंधी माझ्या नाकपुड्यांत चिकटून बसते. त्यासाठी काहीतरी करावेच लागेल. मी सभागृहात शांतपणे कसा बसू शकेन? किंवा मित्राबरोबर बसून गप्पा कशा मारू शकेन? किंवा एखाद्या बारमधे बसून बायकांविषयी गोष्टी कशा करू शकेन?"

त्या प्रश्नांचे उत्तर त्यालाच शोधून काढणे भाग होते. त्याने स्वतःच्या दिनचर्येचे एक वेळापत्रक बनविले. हान्सलकडच्या खेपा कमी केल्या. स्वतःच्या बचावासाठी तो स्वतःची समजूत काढू लागला. इतर मुलं त्यांचा वेळ इतका वाया घालवतात आणि तरीदेखील डॉक्टरी परीक्षा पास होतात. मग मला पास व्हायला काय हरकत आहे? पण त्याच्या मनावर आतल्या बाजूस प्रो. ब्राइटनरचे शब्द कोरले गेले होते. 'डॉक्टर काय, खूप असतात पण...'

हान्सलला हॉस्पिटलमधून परत पाठविल्यावर त्याची रवानगी एका शैक्षणिक संस्थेत झाली होती. मायनरने त्याला संस्थेत पाठवू नये म्हणून खूप प्रयत्न केले. स्वतःजवळ त्याला ठेवून घेईन म्हणून पण आश्वासन दिले पण तरुणांचे कल्याण बघणाऱ्या त्या सरकारी अधिकाऱ्याला ते पटले नाही. जी कुटुंबे अशा मुलांना ठेवून घेतील ती कुटुंबे आम्हाला हवीच आहेत. पण तुझे घर म्हणजे त्याची आणखी आबाळ होण्याची शक्यताच जास्त वाटते. दिवसभर हा गरीब बिचारा मुलगा तुझ्या घरी काय करील? कदाचित् तू त्याला स्वतःबरोबर फरफटत विद्यापीठात पण घेऊन जाशील. पण त्याने काय होणार? मायनरने हान्सलला ठेवून घेण्याबाबत फ्राऊ स्टेगविझचा पण सल्ला विचारला होता. त्यावर त्यांनी तो विचार हसण्यावारी उडवून लावला होता. मग मायनरला पण वाटले की आपण तिच्या कडून ही अपेक्षा करायला नको होती.

अशा प्रकारे हान्सलची पाठवणी शाळेत झाली. पण मायनरला वाटले तितका हान्सल काही निराश झाला नव्हता. तो म्हणाला, मी आपल्या ह्या संघटनेचे काम करू शकणार नाही याचेच मला जास्ती वाईट वाटते."

"तू आमच्यातलाच एक म्हणून राहशील हान्सल" मायनरने त्याची समजूत घातली. तू त्या केंद्रात खूप काम केले आहेस आणि आम्ही तुला कधी विसरणार नाही." आम्ही तुला भेटायला येत जाऊ. सुट्टीत नेत जाऊ. मग आपण तंबू ठोकून कँप करू आणि तुझ्या मुख्याध्यापकांची परवानगी काढून मी तुला नक्की घेऊन जात जाईन."

## एक शैक्षणिक संस्था

मायनर हान्सलच्या शाळेत अनेक वेळा गेला. तिथल्या मुख्याध्यापकांना भेटला आणि त्यांच्याशी दीर्घ चर्चा पण केल्या - मुख्याध्यापक अगदीच विरोधी स्वभावाचे नव्हते. मायनरला जरी त्यांचे विचार पटत नव्हते, तरी त्याने त्यांच्या अनुभवी मतांचा योग्य तो आदर केला होता. कारण ते जुन्या वळणाचे शिक्षक होते आणि त्यांच्या हाता खालून अनेक मुले शिकून गेली होती. मायनरचे विचार परंपरागत नव्हते. नवीन क्षितिजे शोधणारे होते आणि त्या विचारांच्या उदारतेमुळे खूप दूर दिसणारा किनारा सापडणे शक्य होते.

संस्थेच्या संचालकांचा तो आग्रही स्वभाव आणि 'मी म्हणतो ते खरं' ही वृत्ती मायनरला मुळीच आवडली नाही- पण त्याने त्यांचे म्हणणे नम्रतेने ऐकून घेतले. कारण त्याला पुष्कळ नवीन गोष्टी शिकायला मिळाल्या. ते संचालक सांगत होते आणि मायनरला पटवून देण्याचा प्रयत्न करीत होते. "संस्थातून हे जे शिक्षण दिले जाते ना त्यासाठी मुलांचे वर्गीकरण करतात. उदा. (अ) पूर्ण अनाथ मुले (ब) शारीरिक दृष्ट्या अपंग मुले. (क) मानसिक दृष्ट्या मागासलेली मुले. (ड) तऱ्हेवाईक स्वभावाची मुले (इ) व्यवसायास अभिमुख होत नसलेली तरुण मुले. (फ) ठराविक वयाची बिघडलेली मुले आणि (ज) शेवटी म्हणजे असामाजिक वृत्तीची मुले."

संचालकाने सिगरेट पेटवून आपल्या ह्या पांडित्याचा प्रभाव समोरच्या पाहुण्या वर किती झाला आहे ते अजमावले. मायनर लक्ष देऊन ऐकत होता व शिकत होता. आणि त्यामुळे उत्तेजित होऊन संचालक पुढे बोलू लागले, "आता एक गोष्ट मात्र निश्चित लक्षात ठेवली पाहिजे की, मी आत्ता सांगितलेले हे विभाग नेहमीच इतके काटेकोरपणाने अनुभवायला मिळत नाहीत, आणि ती वस्तुस्थिती आहे." हे शेवटचे वाक्य संचालक पुनःपुन्हा उच्चारत होते आणि ते ऐकून मायनर आपले हसू दाबून धरीत होता. "उदा. आमच्या या संस्थेत तुम्हाला बंडखोर मुलं आणि तारुण्यात पदार्पण करीत असताना बिघडलेली मुलं आणि असामाजिक किंवा



आळशी मुलंच अधिक संख्येने दिसतील."

त्याने सिगरेटचा एक झुरका मारला - त्याकडे पाहून तो म्हणाला, "खरं म्हणजे मुळात आमच्याकडे दोनच तऱ्हेची मुले आहेत. ज्यांना शिकवणं सहज शक्य असतं ती आणि ज्यांना शिकवणे अवघड असते ती. बाकीची मुलं म्हणजे त्यांना काहीच शिकणं शक्य नसतं ती. आमच्या नशिबानं अशी मुलं आमच्याकडे फार कमी आहेत - आणि त्यांना आम्ही इतरांपासून वेगळेच ठेवतो - आणि ते साहजिकच आहे."

व्याख्यान देत देत संचालकाने मायनरला सर्व संस्था हिंडून दाखवली. एकेकाळी ती एक सुंदर, मोठी, ऐतिहासिक इमारत असली पाहिजे. त्याचे उंच उंच जिने, त्याची ती नक्षीदार छते आणि जुन्या ऐतिहासिक शिल्पाच्या खिडक्या व त्यांची तावदाने डोळ्यांत भरत होती. आणि त्यामुळे इमारतीच्या अवतीभोवती छान मोकळी मैदाने होती. आणि त्यामुळेच इमारतीच्या त्या उंच भिंती इतर जगापासून ह्या वास्तूला अलग ठेवीत होत्या.

ह्या नवीन जगात आता हान्सलचा प्रवेश झाला होता. एका मोठ्या दालनात ४० लोखंडाच्या कॉट्स होत्या त्यातील एक कॉट त्याला मिळाली होती. त्या खाटेवर अंथरुणे होती व पायगती एक चरचरीत गरम ब्लँकेट घडी करून ठेवलेले होते. त्यामध्ये लष्करी शिस्त दिसून येत होती. वाटेत मोठमोठी कपाटे होती. आणि त्यातले कप्पे मुलांना दिलेले होते. असे काही कप्पे किल्लीने उघडून संचालकांनी ते मायनरला दाखवले. त्यामधे पण लष्करी शिस्त उठून दिसत होती.

"इथे शिस्तीचे पालन हा आमचा पहिला नियम आहे." त्याने सुनावले. तरुण मुलांना मुळीच शिस्त पाळायची सवय नसते आणि इथे येऊन ती सुरुवातीस शिकावी लागते. ह्या परिवाराचा एक घटक म्हणून हे आवश्यक आहे आणि त्यामुळे त्याचे व्यक्तित्व घडत असते. नीटनेटकेपणा आणि स्वच्छता ही वातावरणात असली की आपोआप अंगात भिनते ही खरी वस्तुस्थिती आहे."

खरं आहे, सर्व काही स्वच्छ दिसत होते. ती दगडी फरशी चकचकीत दिसत होती. "मुलं रोज ही फरशी धुतात. नंतर त्याला पॉलिश लावून घासतात." संचालकांनी अधिकारवाणीने सांगितले व ते थोडे अर्थपूर्ण हसले.

"आणि तुमच्याकडे पुरेसे शिक्षक आहेत का ?" मायनरने विचारले.

"तुम्ही आमच्या दुःखावर नेमके बोट ठेवले आहे. तरुण मित्रा," संचालक म्हणाले. "आमच्याकडे फारच थोडे चांगले आणि प्रशिक्षित असलेले शिक्षक आहेत. पण ती जबाबदारी शासनाची आहे. आणि असं पण आहे. युद्धानंतरच्या ह्या २

वर्षांत सर्व गोष्टी एकदम कशा मिळणार ? पण ही परिस्थिती सुधारेल अशी मला आशा आहे. आपल्याला प्रशिक्षण देणाऱ्या नवीन संस्था काढाव्या लागतील आणि मुख्य म्हणजे शिक्षकांची वेतन श्रेणी वाढवावी लागेल. मगच आपल्याला पुन्हा एकदा उच्चशिक्षित पुढारी मिळू शकतील ही खरी वस्तुस्थिती आहे.''

मायनरला संस्थेची ही पहाणी मनापासून आवडली होती, पण तिथल्या काही गोष्टी पाहून त्याला वाईट वाटले. त्याला कळून चुकले की इथल्या वातावरणात तरुण मुलांविषयी आस्था नाही. व्यक्तिगत नाते, मित्रत्वाचे बंधन, तो आनंद, ते सौंदर्य - आणि मुख्य म्हणजे ती सुरक्षिततेची भावना ज्या बद्दल त्याने अलीकडेच खूप वाचले होते ती इथे पण वाटत नव्हती. ''अशा ह्या मोठ्या संस्थेत या तरुण मुलांनी कुणा-कडे जावं ?'' त्याने स्वतःलाच प्रश्न केला. स्वतःच्या अडचणी, लहानमोठी दुःखं कुणाशी मोकळी करावी ? त्यांना आईचे ते मायेचे शब्द आणि तो दिलासा कोण देणार ? विस्कटलेले डोक्यावरचे केस प्रेमाने कोण विंचरून देणार ? हे शिक्षक ? आणि जरी ते शिक्षक चांगले असले तरी त्यांच्या २४ तासांच्या कार्यक्रमात ह्या गोष्टीला वेळ कुठून आणणार ? मायनरने संभाषणाचा ओघ सुरक्षिततेकडे वळविला. शाळा कितीही चांगली असली तरी ते प्रेमाचे घर किंवा कुटुंब बनू शकत नाही आणि तरुण मुलांच्या वाढीला ही सुरक्षिततेची, स्थैर्याची भावना किती आवश्यक आहे हे पटविण्याचा प्रयत्न त्याने केला.

आणि विशेष आश्चर्य म्हणजे संस्थेच्या त्या संचालकांना हे त्याचे म्हणणे तंतो-तंत पटले. ''तुमचे म्हणणे अगदी बरोबर आहे.'' ते म्हणाले, ''बहुतेक सर्व तरुण मुलांना हे घरगुती वातावरण मिळत नसल्यामुळे त्यांचे शिक्षण नीट होत नाही व चांगले परिणाम पण दिसून येत नाहीत. मला यात काहीच शंका वाटत नाही. आणि माझा पण हाच अनुभव आहे की ज्या मुलांना पोषक वातावरण मिळत नाही त्यांचे शिक्षकाशी पण फारसे सूत जमत नाही. कारण त्यांना कशाचीच शाश्वती वाटत नाही. जर लहान वयात मुलांना हा आपलेपणाचा ओलावा कुठे मिळाला नाही, आप-ल्याला कोण सांभाळणार हे कळलं नाही, कुणाचं प्रेम मिळालं नाही तर त्यांच्यात सामाजिक भावना वाढीस लागत नाहीत. आम्हाला पुनःपुन्हा मुलांचे प्रश्न सोडवीत असताना वाटू लागतं की ज्या वातावरणात त्यांचे बालपण गेले आहे त्या वाता-वरणाचे परिणाम कायम झालेले असतात आणि आम्ही त्यांचे प्रश्न सोडवूच शकत नाही. जे मनावर आघात झालेले असतात ते पुसून काढण्याची जादू कुठलीच शिक्षणपद्धती करू शकणार नाही. माझ्या मित्रा, ही खरी वस्तुस्थिती आहे.''

''पण हे फार भयानक आहे.'' मायनर म्हणाला.

''तुम्ही वाटलं तर त्याला त्यांचं दुर्भाग्य म्हणा- पण ते नेहमी घडत आलेले



आहे. अशी मुलं तरुण समाजात नेहमीच वावरत असतात. फक्त काही काळापूर्वी त्यांची याहून अधिक उपेक्षा होत असावी. तुम्हाला ठाऊकच आहे की त्यावेळी अशा मुलांना खाणीत काम करायला पाठवत असत किंवा मोठी माणसं जे कष्टाचं काम करू शकणार नाहीत ते काम करायला ह्या मुलांचा वापर करीत असत. आज परिस्थिती बदलली आहे. अशा तऱ्हेच्या संस्था निर्माण झाल्या आहेत व शिक्षण देत आहेत ही एक वस्तुस्थिती आहे आणि त्यांना सतत स्वच्छता, टापटीप, शिस्त वगैरे शिकवून आम्ही चांगले नागरिक निर्माण करण्याचा प्रयत्न करीत आहोत.''

शेवटचे वाक्य मायनरच्या कानांत घुमत राहिले. कारण त्यात दांभिकपणा होता, सत्तेचा गर्व होता आणि संकुचित मनोवृत्तीचे दर्शन होते. त्याला निदान तसे वाटले. जर आजच्या ह्या युगात मुलांना अशा तऱ्हेची वागणूक मिळत असेल आणि न पेलणाऱ्या कष्टांच्या कामात त्यांना ढकलले जात असेल तर त्यासारखी वाईट गोष्ट दुसरी कोणतीच नाही. हा मानव्याचा अपमान आहे आणि बऱ्याच गोष्टी करायला हव्या आहेत. अजून पुष्कळ साध्य व्हायचं आहे. हा काही शेवट खास नाही.''

हान्सल तिथल्या वातावरणात रुळत होता. त्याने कधी तक्रार केली नाही, तिथल्या नियमांचे काटेकोरपणाने पालन केले, सर्वांना मदत केली, मन लावून चांगला अभ्यास केला आणि त्यामुळे त्याच्या वाट्याला कुणी गेलं नाही. तो अदबीने वागत होता. त्याने शिक्षकांना नाही ते प्रश्न विचारून अडचणीत टाकले नाही. फक्त तो स्वतःच्या वडिलांविषयी नेहमी विचारीत असायचा. मायनरने त्याला सांगितले की त्याच्या वडिलांना हिंसात्मक कृत्यामुळे १ वर्षाची सजा झाली आहे आणि ते तुरुंगात आहेत. त्या भयानक प्रसंगानंतर त्याच्या आईला एक मूल झालं आणि ते मेलेलंच होतं आणि त्याच्या आईवडिलांनी घटस्फोट घेतला होता. मायनरला कळत होतं की ही बातमी ऐकून हान्सलला वाईट वाटेल, पण त्याच्यापासून सत्य परिस्थिती लपवून ठेवण्यात पण काही अर्थ नव्हता आणि मायनरने त्याला हे पण सांगितले की मायनर त्याच्या वडिलांना तुरुंगात भेटून आला होता आणि त्यांनी त्याची प्रेमाने विचारपूस केली होती. तो मायनरला म्हणाला होता की हान्सलला निरोप द्या, की मी त्या दिवशी जे वाईट वागलो त्याबद्दल तू मला क्षमा कर. कारण त्या दिवशी मी द्वेषाने पेटलेलो होतो. मी शिक्षा भोगून संपल्यावर जर्मनीला जाणार आहे आणि तिथे नोकरी-धंदा सुरू करून मग तुला माझ्याकडे बोलवून घेईन.'' ह्या बातमीने त्याला समाधान वाटले आणि एक दिवस मी परत वडिलांकडे जाईन ह्या आशेवर तो जगू लागला. असं होण्याला फारशी अडचण पण नव्हती कारण त्याच्या वकिलांनी कोर्टाला अर्ज करून शिक्षेची मुदत कमी करण्याची विनंती केली होती. कारण त्याने सैबेरियात आधीच शिक्षा भोगली होती, लढाईने त्याला जखमी केले होते आणि आत्ताची

परिस्थिती फार चमत्कारिक होती !

अशा तऱ्हेने मायनरने प्रथमच जवळून एक सुधारशाळा पाहिली. ह्यामुळे त्याने त्या क्षेत्रात काम करणाऱ्या अनेक संस्थांचे व शाळांचे निरीक्षण पण केले. तरुणांच्या कल्याणासाठी ज्या ज्या क्षेत्रांत काम चालू होते त्या सर्व संस्था त्याने पाहिल्या आणि त्यामुळे त्याच्या ज्ञानात फार मोलाची भर पडली. आत्तापर्यंत त्याच्या तालुक्यातील-इलाख्यातील या संस्थांची त्याला नीटशी कल्पना आलेली नव्हती. आपल्या ह्या अनुभवाला भरपूर विचारांची पण जोड मिळावी म्हणून त्याने या विषयाशी संबंधित असे जवळपास सर्व वाङ्मय वाचून काढले.

## चांगली पालक-कुटुंबे कमीच असतात

मायनरने आत्तापावेतो जे काही पाहिले व अनुभवले त्यावरून त्याला हे पटले होते की प्रतिकूल परिस्थितीत सापडलेल्या मुलाला एखाद्या पालक-कुटुंबात ठेवणे हाच खरा त्याच्या संरक्षणाचा उत्तम उपाय आहे.

हे जर खरं असेल तर मग पालक कुटुंबातील मुले वाईट का निघतात ? लीडीआच्या जीवनात जे घडले तेच सर्व मुलांच्या बाबतीत का घडावे ? कॅथॅलिक तरुण संघटनेत काम करणाऱ्या एका तत्पर समाजसेविकेला मायनरने हा प्रश्न विचारला. त्याला वाटले कदाचित् बाईच्या ध्यानात ही गोष्ट अधिक येईल. तिच्या-बरोबर झालेल्या संभाषणानंतर त्याला कळले की त्याचा हा विचार बरोबर होता.

"हे समजणं अगदी सोपं आहे" तिने सरळ, प्रश्नाच्या मूळ गाभ्यालाच हात लावला. "चांगली पालक-कुटुंबे फारच कमी असतात. पुष्कळ वेळा ते अशा मुलांचा स्वीकार करताना हाच विचार करीत असतात की एखादे मूल कुटुंबात जास्ती आले तर जेवणखाण्याचा खर्च त्या मानाने तितका वाढत नाही. पण त्या मुलासाठी सरकारी अनुदानाची जी रक्कम मिळते ती त्यांच्या तुटपुंज्या घरखर्चाला चांगली भर घालते. आणि असे पालकत्व पत्करलेले मूल वयाने मोठे असले तर घरकामास किंवा शेतीत त्याची चांगली मदत होते."

या सर्वांचा अर्थ एकच निघतो की ह्या मुलांना खरा लाभ पालक-कुटुंबात पण मिळत नाही. मायनरने विचार केला, "अगदी बरोबर आहे. पुष्कळ वेळा ह्या मुलांना अतिशय कष्टाची कामे करावी लागतात. माझ्या स्वतःच्या जिल्ह्यात मला अशी कित्येक मुले ठाऊक आहेत की त्यांना शाळेत जाण्यापूर्वी दररोज घोड्यांच्या तबेल्यात काम करावं लागतं."



"पण माझी खात्री आहे की बाल-न्यायालयाचे लोक ही तपासणी करत असतील" मायनर मधेच म्हणाले.

"ते बरोबर आहे." समाजसेविकाबाई पुढे बोलू लागल्या. पण एखाद्या समाज सेवकाला जर ८०० मुलं तपासणीसाठी दिली तर ती तपासणी कशी असेल याची तुम्ही कल्पना करू शकता. आणि म्हणूनच अशा परिस्थितीत मुलांना कित्येक वर्षे डांबून ठेवल्यानंतर अधिकाऱ्यांना त्याबद्दल माहिती मिळते."

मायनर खूप दुःखी झाला. हा उपाय पण ठीक नाही ह्या विचाराने तो कष्टी झाला. मग हा प्रश्न कसा सुटणार ?

"आणि हे पहा," बाई पुन्हा बोलू लागल्या. "पालक कुटुंबातील मुलांची दुर्दशा एवढ्याने थांबत नाही. तुम्ही हे लक्षात घ्या की आम्ही जेव्हा हे मूल पालक-कुटुंबात ठेवतो, तेव्हा त्या कुटुंबात ते मूल सावत्र मूल म्हणून जगत असतं. कारण त्या कुटुंबात आधीची त्यांची मुले असतातच. आणि मग त्या आईने कितीही स्वार्थत्याग करून प्रयत्न केले तरी त्या सर्व मुलांना हे मूल नेहमी तिऱ्हाईतच वाटत असते. मुलं क्रूर असतात. त्यांना दुसऱ्याचं दुःख समजत नाही. त्यांना जे वाटतं ते ती बोलून दाखवतात. आईचे प्रेम मिळावं म्हणून ते भांडणं करतात. ते हाती साधन येईल त्याचा उपयोग ह्या भांडणात करतात आणि हा परका मुलगा आपल्या आईच्या प्रेमाचा वाटेकरी बनला म्हणून त्या मुलाचा रागराग करीत असतात."

समाजसेविकेबरोबरचा हा संवाद खूप निराशाजनक जरी होता तरी मायनर पुनःपुन्हा तोच विषय बोलत होता. त्याला हे कळून चुकले होते की जर ह्या मुलांचे कमनशीब सुधारायचे असेल तर त्याची सुरुवात त्या पालक कुटुंबापासूनच व्हायला हवी.

"मला दोनच गोष्टींची शक्यता वाटते." त्याने सारांश काढला. "एकतर मुलाला त्या प्रेमविहीन संस्थेत इतर मुलांसोबत आणि सैनिकी शिस्तीत तरी वाढवलं पाहिजे किंवा सुरक्षितता, आपलेपणा, प्रेम आणि कौटुंबिक ओलाव्यात त्यांची वाढ झाली पाहिजे." आणि त्याच्या मते ही दुसरी उपाय योजनाच अधिक स्वीकार्य आहे.

आता त्याला गूढ उकललं ! मायनरच्या डोक्यात जो विचार सतत घोळत होता तोच पुन्हा पक्का होऊ पाहत होता. त्याच्या मताने आईचे प्रेम हा एकच उपाय होता की ज्यामुळे मुलाची वाढ समाधानकारक होऊ शकते !

# अभ्यासाला रामराम

जसजशी मायनरची परीक्षा जवळ येत होती तसतसे त्याला कळून चुकले की परीक्षेच्या दृष्टीने त्याचा अभ्यास मुळीच झाला नव्हता. त्याने आपले सर्व कार्यक्रम बाजूला ठेवले व आपले सर्व लक्ष अभ्यासावर केंद्रित केले. जसजसा अभ्यास करण्यात त्याचा अधिकाधिक वेळ जात होता तसतशी डॉक्टर बनण्याची त्याची जुनी आकांक्षा उफाळून वर येत होती.

"आत्ता तू त्या जुन्या मायनरसारखा वागू लागलास" फ्राऊ स्टेगविझ कौतुकाने म्हणाल्या. "तुझं ते भटकं जीवन मला मुळीच पसंत नव्हतं. तुझ्या वडिलांना पत्र लिहून हे सर्व कळवावं असं मला खरंच वाटत होतं. होय, मी खरंच बेचैन झाले होते. तुझ्यासारखा भाडेकरी कुणालाही पागल बनवील. सारखी ये-जा, सारखा तो दरवाज्याच्या घंटेचा आवाज. ती विचित्र मुलं घरात यायची आणि तुझ्या खोलीत विसावा घ्यायची आणि ते देखील तू खोलीत नसताना. खरंच विलक्षण आहे हे !" त्याही आता बोलण्याच्या रंगात आल्या होत्या.

"आणि मला समजतं की तू खरा अभ्यास करतो आहेस की अभ्यासाचं सोंग घेतो आहेस. मला सांगू नकोस. तुझी ती युवकांची संघटना आहे ना, ती मुले पण कुचकामी आहेत. उगीच नावाला अभ्यास करतात. माझा मोठा मुलगा यापेक्षा खूप मन लावून अभ्यास करीत असे. जर ही दुष्ट लढाई झाली नसती तर आता तो जनावरांचा प्रसिद्ध डॉक्टर झाला असता. पहा, मी पुन्हा तुला स्वतःबद्दल सांगून कंटाळवाण्या गोष्टी करू लागले. तू आता आपलं काम कर, मी जाते, पण फक्त मला सांग की तुझी परीक्षा केव्हा आहे, म्हणजे मी मनोमन धावा करते."

मायनरला घरमालकीण फ्राऊ स्टेगविझ खूपच आवडायच्या. तिच्यातला मातृभाव त्याला स्पर्शून जायचा. आणि त्या जरी कठोर शब्दांत त्याची कान-उघाडणी करायच्या तरी त्याच्या पाठीमागे लपलेले त्यांचे उदार मन आणि कनवाळूपणा याची प्रचीती त्याला आलेली होती. तिच्या दुर्दैवामुळे ती अशी बनली होती. पहिल्या जागतिक महायुद्धात तिचा पती मृत्युमुखी पडला होता आणि स्वतःच्या चरितार्थाची आणि २ मुलांना वाढविण्याची जबाबदारी तिच्यावर येऊन पडली होती. आणि दुसऱ्या जागतिक महायुद्धाने त्या दोन्ही मुलांचा पण बळी घेतला होता. ज्याला जनावरांचा डॉक्टर व्हायचे होते, तो स्टॅलिनग्राडला मेला होता आणि लढाई संपण्याचे थोडे दिवस आधी दुसरा पण आघाडीवर मारला गेला होता. तिने केलेली एक तपाची तपश्चर्या धुळीला मिळाली होती आणि त्या संकटांनी ती आणखीनच वृद्ध बनली होती. फक्त स्वतःच्या मुलांसाठी ती आयुष्य जगत होती. ती मुलं म्हणजे तिचा आनंद, गौरव, जीवनाचा



हेतू सर्व काही होते. आता ती एकटी पडली होती, कडवट झाली होती. पण इतके क्लेश व कडवटपणा जरी तिच्या स्वभावात आलेला होता, तरी दुसऱ्याशी वागताना तिचे दयाळू अंतःकरण करुणेचा झरा लपवू शकत नसे. तिचा नवीन भाडेकरी तिला प्रिय होता.

मायनरने पहिली प्रवेश परीक्षा दिली व तो चांगला उत्तीर्ण झाला. त्यामुळे पुढच्या डॉक्टरीच्या अभ्यासातली एक मोठी अडचण दूर झाली. त्याच्या मित्रांनी व त्याच्या घरमालकिणीने त्याचे खूप अभिनंदन केले पण त्यात त्याला समाधान वाटले नाही. आपले इप्सित साध्य होत असताना यशाची पायरी ओलांडली तर यापूर्वी मायनरला कितीतरी आनंद वाटत असे पण आता ते समाधान त्याला वाटेना. नेहमीच्या व्यवहारातले काहीतरी घडावे इतक्या थंड वृत्तीने त्याने त्या यशाकडे पाहिले. त्याने अभ्यास केला होता. आणि त्याच्या ज्ञानाची कसोटी लागली होती. बस् इतकंच त्याला वाटलं होतं. जाणवलं की त्याच्या मनात पूर्वीसारखा उत्साह वाटत नाही. त्याने त्याच्या ह्या यशाबद्दल घरी पण कळविले नाही. सर्व काही वेगळं घडत होतं.

मायनरला त्याचं कारण माहीत होतं पण त्याच्या अंतःकरणात चाललेली खळबळ त्याला दडपता येत नव्हती. त्याला त्याच्या मुलांची काळजी वाटत होती. त्यामुळे तो बेचैन होत होता. त्या मुलांच्या नशिबाची त्याला जाणीव झाली होती. आणि त्यामुळे परीक्षेतल्या यशाचा आनंद त्याला मित्रांसोबत पण उपभोगता येत नव्हता.

त्याने त्याच्या युवक-संघाची आबाळ केली होती. त्याच्या अभ्यासामुळे त्याला हे करणे प्राप्त झाले होते. तो फक्त संध्याकाळी केंद्रात जात असे आणि आता त्याची सद्सद्विवेक बुद्धी त्याला बोचू लागली होती. "हे दुर्लक्ष मी भरून काढीन." त्याने स्वतःला बजावले. कारण आता सुट्टी जवळ आली होती. त्यामुळे त्याला मुलांसाठी वेळ मिळणार होता. आणि त्याच्या डोक्यात जे थैमान सुरू होते, त्यावर पण तो जास्त चिंतन करणार होता. ह्या उपेक्षित मुलांना सुधारण्याची जी जुनी शिक्षणपद्धती आहे ती बदलून नवीन कोणती सुधार-पद्धती अंमलात आणता येईल ? हाच तो प्रश्न होता.

एक गोष्ट त्याला नक्की समजून चुकली होती. अनाथ मुलांना– ज्यांचे आधीच नुकसान झालेले आहे त्यांना वाढविण्याची जी जुनी पद्धत व सोयी आहेत त्या फारच अपुऱ्या आहेत. इतकेच नव्हे तर आजकालच्या पुढारलेल्या जगात त्या विसंगत आहेत. आधुनिक विचारांशी त्यांचे तारतम्य नाही. त्या निराधार मुलांना ह्या नवीन सुधारणांचा काही स्पर्शच झाला नाही. सर्व त्यांच्या डोक्यावरूनच गेल्या आहेत. ज्या लोकांनी त्यांना मदतीचा हात पुढे केला आहे, ते हात फारच थोडे व थोटके आहेत. त्या मुलांशी संबंधच तुटलेला आहे. कुणालाच ह्या प्रश्नाचं उत्तर सापडलं नाही. की

ह्या मुलांनी कुठे जावं आणि कसं जावं ? आत्तापर्यंत एकच उत्तर मिळालं होतं की परिस्थिती बदलणे हे सर्वांच्याच आटोक्याबाहेरचे काम होते. त्यामुळे नवीन इमारत, आधुनिक पाळणाघर आणि अधिक पुनर्वसन केंद्र उघडली की बाह्यतः तरी हा प्रश्न सुटल्यासारखा वाटणार होता. आणि त्यामुळे नवीन जगातल्या सुधारणा ह्या क्षेत्रात आपोआप घडणार होत्या.

बाकीच्या सर्व गोष्टी शासनाने करावयास पाहिजेत असे सर्वांना वाटत होते. तरुणांच्या संघटना ही सर्व कामे होतील अशी खात्री करून घेत होत्या. प्रत्येक गोष्ट अगदी स्वच्छ व बारकाईने नमूद केलेली होती. "पण हे सर्व नुसते नियम आहेत; नियमांशिवाय दुसरे काहीही नाही" असे मायनरचे स्पष्ट मत होते आणि ते त्याने आपल्या मित्रांना अनेक वेळा सांगितले होते.

"ही सत्य गोष्ट आहे की शासन खूप गोष्टी ह्या मुलांसाठी करीत आहे. शासनाचे अनेक अधिकारी ह्या मुलांची काळजी घेण्यासाठी नेमलेले आहेत. प्रत्येक मुलाचा इतिहास ते माहिती करून घेतात, त्यांच्या आईबापांची चौकशी करतात. आजोबा-आजीबद्दल पण माहिती घेतात. त्यांचे स्वभाव कसे होते वगैरे सर्व माहिती ते लिहून काढतात. मुलांची वजने व उंची यांचे रेकॉर्ड ठेवतात. त्यांची संपूर्ण वैद्यकीय तपासणी करून काही शारीरिक व्याधी असली तर शोधून काढतात. ते लोक हे पण शोधून काढतात की मुलाचा जन्म नैसर्गिकरीत्या व्यवस्थित झाला होता का ? त्याला आईचे दूध मिळाले होते का ? त्याच्या इतर सवयी ठीक होत्या का ? ही सर्व माहिती लिहून त्यांच्या फायली खूप जाडजूड पण बनत असतात. रेकॉर्ड खूप व्यवस्थित ठेवलेले दिसते. तसेच सुंदर रेकॉर्ड नंतर मूल शाळेत गेल्यावर त्याचे शिक्षक पण ठेवीत असतात. त्यात मुलाच्या शैक्षणिक प्रगतीची नोंद ठेवलेली असते. त्यात हे पण नमूद केलेले असते की ह्या मुलाने शेजारच्या मुलाचं रबर केव्हा चोरलं किंवा दुसऱ्या मुलाला घाणेरडी गाणी केव्हा शिकवली ? छान, प्रत्येक गोष्ट व्यवस्थित लिहिलेली असते की ज्यामुळे त्या मुलांबद्दल सर्व माहिती मिळते. काही लपवून ठेवलेले नसते. मग त्यांवर विचार करतात. ह्या मुलाला संस्थेत पाठवावे की पालक कुटुंबात ठेवावे ? मानसशास्त्रज्ञांची नेमणूक करतात आणि पालक कुटुंबातील पालकांची मुलाखत घेतली जाते. सर्व काही केले जाते. फक्त एक गोष्ट करीत नाहीत ती म्हणजे ते मूल एक माणूस आहे ह्या दृष्टीने त्याचा विचार केला जात नाही. तर फक्त समाजसेविकेच्या फाईलमधील एका नंबरचे मूल एवढीच दृष्टी ठेवून त्याबाबत निर्णय घेतला जातो."

त्याच्या मित्रांना त्याचे हे म्हणणे पटले नाही, मायनर आणखी खोलवर जाऊन विचार करीत होता. "आणि जरा थांबून नीट विचार करा. शासनाने केलेली ही



मुलांची उत्तम व्यवस्था शेवटी मुलाला कुठे नेते ? त्याला हवी असलेली वैयक्तिक स्वतंत्रता त्याच्यापासून हिरावून घेतली जाते. ते मूल एका नंबराने ओळखले जाते. त्याच्या एक्सरे फोटोवर त्याचा नंबर लिहिलेला असतो. हॉस्पिटलमधे पाठवताना पण त्या नंबराच्या खुणेने तो पाठविला जातो. या नंबरावरच त्याचे ऑपरेशन होते आणि त्या नंबरावरूनच त्याची रवानगी वृद्धाश्रमात पण होत असते. आणि आयुष्याच्या अतानंतर त्याच्या शवपेटीवर पण त्याचा नंबर लिहिला जातो, शवपेटीचा खर्च शासनामार्फत होतो. त्याच्या मृत्यूची नोंद पण नंबराने होते आणि त्यासाठी वापरलेला दगड शासनाच्या मालकीच्या खाणीतून पुरविला जातो !"

मायनरच्या मुखातून पुन्हा एकदा ज्वालामुखीचा, आगीचा डोंब फुटत होता. अशावेळी त्याचे बोलणे खूप प्रभावी वाटायचे. तो जाणूनबुजून त्याचे शब्दचित्र अतिरंजित करायचा, विचित्र तुलनात्मक वर्णन करायचा आणि भेसूर कल्पनाचित्र उभं करायचा. पण प्रत्येकाला एक गोष्ट कबूलच करावी लागायची की ह्या अशा प्रभावी उद्‌गारांनी तो विषयाच्या खोल गाभ्यापर्यंत जात असे, त्यातला महत्त्वाचा भाग टिपून श्रोत्यांना तो पटवून देत असे. त्याचे म्हणणे बरोबर आहे अशी ग्वाही प्रत्येक जण देत असे. यावेळी पण त्याच्या भाषणाचा परिणाम इष्ट असाच झाला. "तरुणांच्या काळजीची पण बरोबर हीच अनास्था आहे." मायनरने प्रतिपादन केले. "नंबर असलेले लंगोट" एक जण म्हणाला, पण मायनरने त्यावरील हसण्याच्या अपेक्षित प्रतिक्रियेला उत्तेजन दिले नाही. "नाहीतर लहान बालकांच्या उपयोगासाठी दिलेल्या त्या पिशवीत काय असते ? मला अशा कित्येक माता माहिती आहेत की ह्या पिशव्या त्या विकून टाकतात आणि आपल्या अर्भकाला वर्तमानपत्रांच्या कागदांतून गुंडाळतात. मग तुम्ही तरी दुसरी काय अपेक्षा करणार ? असं या पूर्वी कधी घडले असेल का ? पण शासनाचा तुमच्या जीवनात अशा रीतीने प्रवेश सुरू झाला की, माणूस स्वतःची जबाबदारी विसरू लागतो. जाऊ दे; शासनाची ही जबाबदारी आहे. त्यांना करू दे असे मानीत राहतो. ती समाजसेविका माझं मूल सांभाळील. ही वाढती बेफिकिरीची वृत्ती तुमच्या लक्षात नाही येत ?" मायनरने समाजीकरणाचा अतिरेक होण्याचा धोका पण मित्रांना समजावून दिला. त्याने पुन्हाँ तो विषय पुढे सुरू केला. "ते पालक-कुटुंबात पाठविलेले मूल पण नंबरावर ओळखलं जाण्याची दाट शक्यता मला वाटते. याचा अर्थ त्या समाजसेविकेला त्या मुलाची काळजी वाटत नाही असा नाही किंवा तरुणांचे पुढारी लक्ष देत नाहीत असा पण नाही. ही दोन्ही मंडळी खूप चांगली असतात. पण शासकीय व्यवस्थेत पुष्कळदा मानवतेचा चुराडा होत असतो. त्यांचे नियम आणि त्या नियमांचे काटेकोर पालन यात त्यांचा इतका वेळ जात असतो की मुलाकडे बघायला त्यांना फुरसतच नसते. पण त्या मुलाला मात्र या

मानवी स्पर्शाची गरज असते. ते मूल गर्भावस्थेत असताना त्याची झालेली आबाळ आपल्याला ठाऊक असते पण आपल्या ह्या ज्ञानाचा मुलावर काही परिणाम होत नाही. आपण खूप वेळ खर्चून हे शोधून काढतो की त्या मुलाचा बाप वाया गेलेला दारूड्या होता पण त्याचा मुलाला काय लाभ झाला ? आपल्या अभ्यासातून हे निष्पन्न होते की त्याची चोरी करण्याची जी सवय आहे त्याचे एक अप्रत्यक्ष कारण हे असू शकते. कारण तो लहान असताना त्याचा बाप त्याला बदडून काढायचा आणि म्हणून सूड घेण्याच्या प्रवृत्तीतून ही सवय लागली असण्याचा संभव आहे. पण आपल्या ह्या संशोधनाचा त्या मुलाला काय उपयोग होणार ? त्या मुलाला मदत हवी आहे, जीवनाचे स्थैर्य हवे आहे, प्रेम पाहिजे आहे. पण आपल्या बालविकासाच्या आधुनिक योजनांत प्रेमाला अजिबात वाव नाही असं म्हटलं तरी चालेल.''

## एक खरी शेकोटी

आत्ता शाळेच्या सुट्ट्या सुरू होत होत्या. मायनरने ठरविले की सुट्टीच्या सुरुवातीलाच आपल्या संघटनेच्या तरुणांना घेऊन एक आठवडाभर कुठेतरी कँपला जायचे. त्याच्या अपेक्षेपेक्षा लवकर त्याला तंबू पण मिळाले. तिथे तळ ठोकून बसलेल्या एका फ्रेंच अधिकाऱ्याला तो भेटला तेव्हा त्याने तंबू तर दिलेच पण कँपसाठी लागणारी स्वयंपाकाची भांडी आणि मुलांसाठी ब्लँकेटे पण दिली.

त्याचे सर्व सभासद एकूण २६ जण कँपसाठी आले होते. मायनरला हा शुभशकून वाटला. काही मुलांना घरून निघताना अडचणी आल्या होत्या, याची पण त्याला कल्पना होती. पण बहुतेक आता मुलांना घर सोडून आल्याचा पस्तावा होत असावा. कारण त्यांना खूप लांब पायी चालावे लागले होते. चालताना पाठीवर जड बोजा होता आणि डोक्यावर तळपता सूर्य होता. ते ५ वाजता सकाळी निघाले होते आता मध्यान्ह झाली होती आणि अजून १३ कि.मी.चे अंतर चालून जायचे होते. तो रस्ता अरूंद आणि धुळीचा होता. सुरुवातीचा रस्ता शेतातून जात होता व जंगलाकडे जात असल्यामुळे थंड होता. पण आता उन चांगलंच तापलं होतं. चेहेरे सर्व धुळीने माखले होते. केस पण मलीन झाले होते आणि काही मुलांची मने पण करपून गेली होती.

मायनरला पायी चालायला खूप आवडायचं. आणि त्याचं त्याला खूप शैक्षणिक महत्त्व वाटायचं. ''त्यामुळे मैत्रीची भावना वाढते.'' तो फ्रीटझ्ला म्हणाला होता. ''त्यामुळे अंगात असलेला सर्व आळस आणि वाईट भावना यांचा नाश होतो आणि



सद्भावना उफाळून विकसित होण्यास मदत होते. जो थकवा येतो तो पोषक ठरतो. मनुष्य निसर्गाशी सोबत करतो. त्याच्याशी एकरूप होतो आणि नकळत त्यात त्याला विश्रांतीपण मिळत असते. हे परिणाम उशिरा घडतात. मला असे पायी भ्रमण फार आवडते पण त्यामुळे थोडातरी थकवा आला पाहिजे. नाहीतर ते नुसते ढोंग असते.''

पण हे त्यांचे भ्रमण खरोखरीच दमणूक करणारे होते हे मान्य करायलाच हवे. परंतु जसजसा मुक्काम जवळ येऊ लागला तसतसं मुलांना मोकळे वाटू लागले. त्यांना इतका वेळ वाटणारी मरगळ निघून गेली होती. थकवा किंवा तहान वाटत नव्हती. ते खरेखुरे तुफानी सैनिक बनले होते. असे वादळी सैनिक असलेल्या आघाडीचे नेतृत्व मायनरने लढाईच्या काळात केले होते. पण आत्ताच्या ह्या वादळी सेनेचे ध्येय हे अधिक सुखमय होते.

शेवटी ते कँपच्या मैदानावर पोचले. हे मैदान हान्सलच्या शाळेच्या जवळच होते. मुलांनी आपले बोझे उतरवून जमिनीवर फेकले आणि ते हसू-गाऊ लागले. त्यांनी आपले थर्मास उघडून पेय घेतले आणि ते अतिशय आनंदी दिसू लागले.

''वा, ह्या कँपमध्ये खूपच मजा आहे.'' कुर्त म्हणाला. कारण त्याने ह्या संघटनेत नव्यानेच नाव दाखल केले होते. त्याला हा सर्व अनुभव अगदी नवीन होता. पायी चालताना तो गप्पच होता. क्वचित् एखादा शब्द बोलला असेल. तो खूप दमला पण होता. पण आता मात्र तो अगदी रंगात आला होता. त्यानं मायनरला विचारले, ''हे तंबू कुठे ठोकायचे ?'' मायनरने काही सूचना दिल्या. जागा नक्की केल्या, मुलांकडून तंबू सोडवून घेतले आणि फ्रिटझ्ला त्यांचा नेता म्हणून नेमले. हान्सलला घेऊन यायला आपल्याला थोडा उशीरच झाला आहे हे त्याच्या ध्यानात आले आणि तो शाळेच्या रोखाने चालू लागला. त्याला अर्धा तास चालावे लागणार होते आणि सूर्य मावळलेला होता.

शाळेचे संचालक मित्रत्वाच्या भावनेने बोलत होते. ''आणि तुम्ही पण आता हान्सलला घेऊन जायला आलात तर. खरं म्हणजे ही गोष्ट माझ्या शाळेच्या नियमांचा भंग करणारी आहे आणि त्याला पाठविण्यात त्यामुळे मी एक मोठी जबाबदारी घेत आहे. पण त्याचे वर्तन चांगले आहे आणि तो माझ्या मुलांपैकी एक उत्तम मुलगा आहे. म्हणून मी त्याच्यावर आणि तुमच्या शब्दांवर पण विश्वास ठेवून त्याला पाठवतो. तुम्ही त्याच्यावर नीट लक्ष ठेवालच आणि ते साहजिकच आहे.'' असे बोलून त्यांनी हान्सलला बोलावणे पाठवले. हान्सल आतूर होऊन वाटच पहात होता.

ते दोघे जेव्हा कँपच्या मैदानावर पोचले तेव्हा एका अर्धवर्तुळाकार रचनेत सर्व तंबू ठोकून झाले होते. त्यात मधोमध मोकळ्या जागेवर लाकडं रचून ठेवली होती

आणि संध्याकाळच्या शेकोटीची पूर्वतयारी करून झाली होती. फ्रीटझ्ने चांगले काम केले होते. तो नेहमीच नेमून दिलेले काम नीट व्यवस्थित करीत असे. ते सर्वजण आपल्या नेत्याला आश्चर्याचा धक्का देण्यासाठी लगेच एकत्र जमले. शिस्तीत ओळीने उभे राहिले आणि फ्रिटझ् पुढे सरसावून म्हणाला, "वादळी सेनेने कँपचे मैदान उभारून तयार केले आहे आणि त्यामुळे त्यांच्यावर सोपविलेले काम पूर्ण झाले आहे." पण त्यानंतर लगेच सर्व शिस्तबद्धता संपली. त्यांनी हान्सलला पाहिले. त्याच्याकडे धावून गेले. त्याला उचलून खांद्यावर घेतले आणि अक्षरशः आनंदाने आरडाओरडा करू लागले.

अशा रीतीने वादळी सेनेच्या ह्या कँपला सुरुवात झाली. मायनरला वारंवार ह्या कँपची आठवण येत राहिली. कारण ह्या कँपमधेच त्याची व मुलांची खरी मैत्री जडली होती. तो मुलांच्या जवळ पोचला आणि त्यामुळेच अखेरीस त्याच्या कल्पनेला जगभर यश मिळालं.

हे सर्व त्याचे स्वतःचे विचार होते. कँपच्या शेवटच्या दिवशी त्याने पुन्हा त्या विचारांची उजळणी केली. रात्रीच्या आकाशाखाली शेकोटीतील लाकडे फुटत होती. आणि त्याच्या त्या प्रकाशात मुलांचे करमणुकीचे कार्यक्रम उठून दिसत होते. मुले आनंदाने गाणी म्हणत होती. कवितेचे वाचन करीत होती. भाषणे देत होती. खेळ खेळत होती. हे सर्व होत असताना मायनर मात्र गंभीर झाला होता. कारण तो आठवडा आता लवकरच संपणार होता. त्याचे यश सोपे नव्हते. कष्टसाध्य होते, त्याच्या मुलांना ह्या शिस्तीच्या आचरणाची सवय नव्हती आणि नंतर हळूहळू त्यांना कळायला लागले होते की कँपच्या जीवनात पण शिस्त हवी, स्वच्छता हवी आणि मोकळेपणाने राहण्याची सवय असायला हवी. एका मुलाने शेजारच्या शेतातून ८ अंडी चोरून आणली होती आणि त्यामुळे वादळी सेनेच्या दुपारच्या जेवणाला अधिक चव आली होती. दोन मुलगे लपंडाव खेळताना जंगलातून निघून गेले होते आणि तिथूनच घरी पळून जावे असे त्यांना वाटत होते. कारण कँपचा कंटाळा आला होता. पण त्यांच्या बुद्धीला ते न पटून ते परत आले होते. एका मुलाची सतत काळजी मायनरला वाटत होती. कारण तो कधी कधी वाह्यात वागत होता आणि शेजारच्या शेतातल्या लहान मुलीला त्रास देत होता. "पण ह्या किती क्षुल्लक गोष्टी आहेत" मायनरने स्वतःला बजावले. ह्या मुलांना सरळ करण्यासाठी, त्यांच्यात शिस्त आणण्यासाठी, त्यांचा मानसिक उत्साह वाढविण्यासाठी, अशा सर्व बाजूंनी उपेक्षित असलेल्या मुलांना पुन्हा एकवार आनंदित बनविण्यासाठी जे कष्ट झाले आहेत त्या मानाने त्यांचे हे अपराध अगदी नगण्य आहेत. या आठवड्यात त्यांच्यात चांगला बदल झालेला दिसतो आहे. ती पुन्हा प्रसन्नपणे वावरत आहेत आणि त्यांची ही प्रसन्न वृत्ती त्यांच्या प्रत्येक



कृतीत दिसून येत आहे. अशीच सर्वसाधारण मुले वावरत असली पाहिजेत. आणि ह्यांनी तसंच वावरायला पाहिजे. ती काही वाईट मुले नव्हती. मायनरचे हे म्हणणे अगदी बरोबर होते आणि म्हणूनच काल्पन मायरला त्याने ठासून सांगितले होते, "वातावरण मुलांना घडवीत असतं."

खरोखरीच त्याला हे पटत होते की जर ही मुलं पुन्हा त्याच जुन्या दुःखी वातावरणात परत जाणार असतील तर आपण केलेले सर्व प्रयत्न फुकट जाणार आहेत. आणि ह्या चिंतेतूनच त्याचे इतके दिवस चाललेले अयशस्वी प्रयत्न त्याला यशाकडे नेण्याचा रस्ता स्वच्छपणाने दाखवू लागले.

शेकोटीच्या भोवती बसून सर्व मुले हास्यविनोद करीत होती. त्यावेळी मायनरने आपल्या स्वतःच्या विचारांची पुन्हा एकदा सांगड ह्या कँपमध्ये आलेल्या नवीन अनुभवांशी घातली. कँपमध्ये त्याला पुष्कळ मुलांशी मोकळेपणाने बोलता आलं होतं. त्याचा पण फायदा विचारात सुसूत्रता आणण्यासाठी झाला.

ही मुले– आणि तो स्वतःशीच हसला. कारण काही मोठे मुलगे पण त्यात बसले होते. पण त्यांच्या वागण्यात लहान मुलांचाच साधेपणा होता. त्यामुळे त्यांची पण बाल्यावस्था संपलेली वाटत नव्हती. ह्या मुलांच्या जीवनात काही गोष्टींची नक्की कमतरता आहे आणि त्या गोष्टी मूलभूत आहेत.

सर्वप्रथम, त्यांना एक आई हवी. आयुष्यात त्यांना कधी आईच्या प्रेमाचा अनुभव आलेला नाही आणि हा अनुभव येणे हे विकासाच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे असे मायनरचे मत होते. कारण त्यामुळे मुलांच्या मनात सुरक्षितता आणि हिंमत येत असते.

नंतर त्याला हवे असलेले कुटुंब. मुलांनी त्याला सांगितले होते की घराशी त्यांचा काही संबंध नव्हता. त्यांना भाऊ-बहिणी असून देखील भावा-बहिणीच्या प्रेमाचा अनुभव आलेला नव्हता. कारण सर्व भावंडे मन मानेल तशी वागत होती. आईबापांचे सुकाणू त्यांना लाभले नव्हते. घरात असे कुठलेच स्थान नव्हते की तिथून त्यांना कुटुंबाची माया, शाश्वती, विश्वास किंवा एकत्र राहाण्याचं सुख अनुभवायला मिळावं. लहान मुलांजवळ असंख्य अशा खाजगी गोष्टी असतात की त्या गोष्टी कुणाला तरी सांगाव्यात असं त्यांना सतत वाटत असतं! ही मुले त्या गोष्टी कुणाजवळ सांगणार? आणि अशा गोष्टी सांगणं ही क्रिया मुलांच्या आंतरिक विकासाला अतिशय आवश्यक असते. त्यांच्यापाशी जीवनातले काही गूढ असतच नाही. त्यांच्या समोर जीवनाचे चित्र त्यातील दुःखद गोष्टी दर्शवीत नागडे उभे असते.

"मला घरच नाही." १६ वर्षांचा गोटफ्रीड सांगत होता. वास्तविक तो आईबापांजवळच राहात होता आणि त्याला एक मोठी बहीण पण होती. ते ऐकून

मायनरला धक्काच बसला. कारण ते त्याचे वाक्य अगदी अनपेक्षित असे होते. पण गोटफ्रीड खरं तेच सांगत होता. त्याचे आईबाप त्याच्याशी आईबापांसारखे वागतच नसत. त्यांनी त्यांच्या २ मुलांची काळजीच घेतली नव्हती. बाप दारूड्या होता आणि आईचा एक प्रियकर होता. त्यामुळे गोटफ्रीडला घर असून नसल्यासारखेच होते. त्याला जेवायला मिळत असे आणि झोपायला अंथरूण पण होते. त्यामुळे तो जिवंत राहत होता. पण त्याच्या आंतरिक विकासाला लागणारे खाद्य त्याला मिळत नसे.

मायनरने जेव्हा ह्या परिस्थितीचा पूर्ण-अभ्यास केला तेव्हा ह्या परिस्थितीतून मार्ग काढण्यासाठी म्हणून त्याला एक कल्पना सुचली. एक बाई अशी शोधली पाहिजे की जी ह्या मुलांची आई बनून राहील. ह्यांना भाऊ आणि बहिणी मिळवून दिल्या पाहिजेत. म्हणजे नैसर्गिक कुटुंबाचे वातावरण तयार होईल. आणि त्यांच्या सुप्त भावनांना मोकळीक मिळेल आणि ही मुले पुन्हा एकदा स्वतंत्र वृत्तीची बनतील. आणि ह्या सर्व गोष्टींची अनुकूलता लाभल्यामुळे त्यांचा स्वाभाविक विकास होत राहील. ह्या मुलांना एक चांगली राहायची जागा, एक घर, आईबाप हे वातावरण मिळायला हवे.

मायनरने फ्रिटझ्ला बोलवून घेतले. मुलांची गाणी सुरू होती. पण त्यांचे सर्व लक्ष शेकोटीकडे लागले होते.

"हे बघ फ्रिटझ्" मायनरने विचारले, "आपण जर पुरेसे पैसे गोळा केले तर ह्या मुलांकरता आपल्याला एक घर बांधता येईल. आणि त्या घरात आपण एखादी चांगली बाई ठेवू या. म्हणजे ह्या मुलांना आई मिळेल. आपण अशी एखादी बाई शोधूया आणि आपल्याला तशी नक्की मिळेल. जी ह्या मुलांसाठी स्वयंपाक करील, त्यांचे कपडे दुरुस्त करून देईल, धुवून देईल आणि त्यांच्याशी सख्ख्या आईप्रमाणे वागेल."

"त्या शेकोटीत तुझं डोकं चांगलंच भाजून निघालं आहे." फ्रिटझ् हसून म्हणाला. "जिथे तुला स्वतःचे जेवण मेसमधून घ्यायला तुझ्याजवळ पुरेसे पैसे नसतात तिथे तू एक घर बांधायच्या गोष्टी कशा काय करू शकतोस ? आणि त्या घरात ही सर्व मुले तू कशी ठेवणार ? तू काही त्यांना सहज भेटून उचलून आणू शकत नाहीस. तुझ्या या करण्याला नक्कीच कुणीतरी विरोध केल्याशिवाय राहाणार नाही. आणि त्या बालन्यायालयाचे काय ? ते तुला २/४ गोष्टी सुनविल्याशिवाय राहाणार नाहीत."

तो पुन्हा हसला. आणि मायनरच्या बोलण्याकडे त्याने दुर्लक्षच केले. मायनर मात्र त्या क्षणी त्या सर्व कल्पनेचा गांभीर्याने विचार करीत होता. "स्वाभाविकच सर्व



मुलांना जरी नाही तरी काही असामाजिक वृत्तीच्या मुलांना नक्कीच ठेवता येईल. कोर्टाचा त्याला विरोध असण्याचे काहीच कारण नाही. त्यांना एखादं पालक-कुटुंब सापडलं तरी केवढा आनंद होत असतो ! माझ्या डोळ्यांपुढे ८ मुलांचे कुटुंब आकार घेत आहे. आम्ही पण ८ भावंडे होतो. घरात फार तर १० जणांना ठेवू. यापेक्षा अधिक झाली तर त्या मातेला सांभाळणं कठीण जाईल."

फ्रिटझ् आता पुन्हा त्या मुलांकडे लक्ष देत होता. पण त्यामुळे मायनरच्या विचारात खंड पडला नाही. त्याचे चिंतन चालूच होते. अशा तऱ्हेने त्या घरात राहिल्यावर त्या मुलांना विश्रांती मिळेल. ती शांत होतील. बघ, कल्पना करून पाहा ! मोठ्यांची भांडणे अजिबात होणार नाहीत. घरात घाण राहाणार नाही. दारू पिऊन त्यानंतरचे प्रकार घडणार नाहीत. हे सर्व करणं शक्य आहे अगदी. त्यामुळे निदान माझ्या वादळी सेनेत ज्या मुलांची घरची वाईट दुर्दशा आहे त्यांना तरी मला मदत करता येईल. आई नसल्यामुळे जी आपत्ती त्यांच्यावर कोसळली आहे त्यातून त्यांचे संरक्षण करता येईल."

"तू सारखा फक्त आई पाहिजे असं का म्हणतोस ? मुलांना बाप असणं पण तितकंच जरुरीचं आहे."

"मला तशी मात्र खात्री वाटत नाही फ्रिट्झ." मायनरने उत्तर दिले. त्याचे ओठ आवळलेले होते. त्याने बापाविषयी पण भरपूर विचार केला होता. पण त्याला मनातून वाटत होते की, खरी गरज आईचीच आहे. त्यासाठी त्याच्या मनाने जी उत्तरे तयार केली होती ती मात्र जरा कमकुवत होती." मलाच हे कळत नाही की मी फक्त आईचाच विचार का करतोय. कदाचित् ह्या मुलांना आई मिळाली नाही म्हणून असेल किंवा त्यांना आईची फारच गरज आहे म्हणून असेल. ह्या मुलांनी मला अशा पालक कुटुंबाच्या कितीतरी गोष्टी सांगितल्या आहेत की त्यांना स्वतःची मुले असल्यामुळे त्यांनी या मुलांना कधी नीट वागवलंच नाही. आणि प्रत्येक निरोगी, नैसर्गिक दंपतीला स्वतःची मुलं असणं ही स्वाभाविक गोष्ट आहे आणि ह्या सर्व हकिगतीमुळे मला असं वाटतं की ह्या सर्व रोगांना एकच रामबाण उपाय आहे आणि तो म्हणजे त्यांना एक चांगली आई मिळवून देणं. मला माहीत नाही, कदाचित् माझे हे विधान चुकीचे असेल. कदाचित् आईबाप दोघे असणं हे अधिक हितावह ठरेल. मला त्याचा खरं म्हणजे नीट विचार करायला पाहिजे. मी तो निर्णय अद्याप घेऊ शकलो नाही, पण माझ्या डोळ्यांपुढे ते घर, त्यातले ते आईचे स्वयंपाकघर, सर्वांनी एकत्र बसण्याची ती मोठी खोली स्पष्ट दिसते आहे.

"तुझी ही दिवास्वप्ने आहेत." फ्रिटझ् पुटपुटला. त्याला उरलेली संध्याकाळ ह्या चर्चेत घालवायची नव्हती. मायनर पण त्या शेकोटीभोवतालच्या मुलांच्यात जाऊन

पोचला. काहीतरी एक योजना बनली ह्या आनंदात तो होता.

मायनरच्या बाबतीत आता एक विचित्र परिस्थिती निर्माण झाली होती. त्याला त्याच्या प्रश्नाचे उत्तर अशा एखाद्या घरातून मिळेल याची खात्री वाटत होती आणि त्यामुळे त्याने स्वतःच्या मनःचक्षूंपुढे त्याची एक हुबेहुब आकृती तयार करून ठेवली होती. सध्या अस्तित्त्वात असलेल्या घरांचा उपयोग करून घेणे त्यामुळे त्याला जमण्यासारखं नव्हतं. तसं झालं असतं तर कदाचित् काम सोपं आणि सोयिस्कर झालं असतं. पण सोपं काम मायनरच्या नशिबात नव्हतं.

दुसऱ्या दिवशी सकाळी मायनरने हान्सलला शाळेत परत नेऊन सोडले. ती त्यांची शेवटची भेट होती. कारण त्या सुट्टीत त्याचे वडील अचानक आले होते व हान्सलला शाळेतून काढून घेऊन गेले होते. त्याच्या शिक्षेत त्याला सूट मिळाली होती. आणि तुरुंगातून सुटून आल्यावर त्याला जर्मनीत चांगली नोकरी पण मिळाली होती. हान्सलचा आनंद गगनात मावत नव्हता. नंतर त्याने एकदा मायनरना लिहिले होते, "मी खुशाल आहे आणि अगदी मजेत आहे. त्या वादळी सैनिकांना माझा सलाम सांगा. सर्व गोष्टींबद्दल मी तुमचा आभारी आहे. हर्मन, तुम्ही मला इतकी मदत केली आहे पण मी त्या मोबदल्यात तुम्हाला काहीही परत देऊ शकत नाही."

"वेड्या मुला," मायनरने उद्गार काढले, "तुला कल्पना नाही की तू मला आयुष्यभराचे काम दिले आहेस."

## स्वतःच्या जन्मघरी...

ऱ्हाईन नदी स्वीसपर्वत राशीत जिथे लुप्त होऊन जाते, तिथूनच जरा पुढे गेल्यावर एक हिरवेगार विस्तृत पठार दिसू लागते. त्यावरच एक शांत व रम्य असे गाव वसलेले दिसते. आजूबाजूला पर्वतराशी असल्यामुळे आल्बरश्वेंड (Alberschwende) नावाचे हे गाव फारच सुंदर दिसते.

मायनरला त्याचे हे गाव फार प्रिय होते. येथे त्याचा जन्म झाला होता. तिथे त्याच्या आईवडिलांचे घर होते. आणि याच ठिकाणी त्याचे बालपण आनंदात गेले होते. इथेच तो अनवाणी पायाने पळत पळत शाळेत जात असे आणि इथूनच पुढे तो फेल्डकिर्शच्या हायस्कूलमध्ये पण गेला होता. इथेच त्याच्या आवडत्या आईची समाधी होती. जेव्हा तो तारुण्याच्या उत्साहात लष्करात भरती झाला तेव्हा इथूनच त्याने आपल्या वडिलांचा, भावांचा, बहिणींचा, मित्रांचा, धर्मगुरूंचा सर्वांचा निरोप घेतला होता. युद्ध संपल्यावर चिंध्या झालेल्या गणवेशात अंगावर जखमा घेऊन



इथेच तो परत आला होता. इथलं सर्व काही त्याला आवडत असे. ती दमट हवा, ते उतरलेले ढग जणू काय फक्त इथेच उतरत असत आणि आपल्याबरोबर स्वर्गातून शुभेच्छा आणून त्या देऊन परत जात असत. हे घर होतं. त्याचं घर होतं. आणि तिथूनच समोर त्याचं जुनं आवडतं घर पण दिसायचं.

ह्या घरात आईच्या प्रेमळ हातांनी त्याचे लालन-पालन झाले होते. त्याची आठवण जी आता पुसत होत असली तरी आईची मूर्ती त्याच्या हृदयात ठसलेली होती. तो ५ वर्षांचा असतानाच आई स्वर्गवासी झाली होती. पण तिचा चेहेरा त्याला नक्की आठवत होता. ती अंथरुणावर झोपलेली होती. गुलाबी उशीवर तिचे डोके टेकलेले होते, ती फिकट आणि थकलेली दिसत होती, पण तिची ती अविस्मरणीय नजर त्याच्याकडे पहात असलेली त्याला स्पष्ट दिसत होती आणि तेव्हाच तिने या जगाचा निरोप घेतला होता. हर्मनला आणि त्याच्या ७ भावंडांना तिच्या बिछान्या-जवळ बोलवून घेतलं होतं. ते सर्वजण तिच्याभोवती उभे होते आणि सर्व काही शांत झालं होतं. त्याच्या मोठ्या बहिणींनी पण स्वतःचे अश्रू आवरले होते. ते जुने कुकु पक्ष्याचे घड्याळ फक्त टिक्‌टिक् करीत होते. त्यावेळेला बारीक पावसाची रिमझिम छोट्या खिडक्यांवर ऐकू येत होती. निसर्गाला पण वाटले असावे की ह्या गंभीर प्रसंगी आपण पण स्तब्ध राहावे व शांतीभंग करू नये. नंतर त्याच्या आईने आपल्या प्रत्येक मुलाकडे ओळीने पाहिले आणि म्हणाली, "तुम्ही चांगले वागा. नेहमी माझ्या मुलांनो, चांगले रहा!" त्यांचे वडील खोलीच्या बाहेर निघून गेले होते. आणि त्याची मोठी बहीण पण सर्व भावंडांना घेऊन बाहेर पडली होती.

होय, ही सर्व घटना त्या जुन्या घरात घडली होती. तिथेच त्याच्या आईचा मृत्यू झाला होता. आणि लगेच मोठ्या बहिणीने आईची जागा घेतली होती. स्वाभा-विकरीत्या आई गेल्याने तिच्या सर्व कामांची जबाबदारी मोठ्या बहिणीवर पडली होती आणि त्यामुळे त्याचे जीवन पूर्वीसारखे सुरळीत जात होते. पण तो जेव्हा स्मशानात जात असे, स्वच्छता करीत असे, आईच्या समाधीवर फुले वाहून तिथे दिवा लावत असे जेव्हा त्याच्या चित्तात कालवाकालव होत असे. आईचे ते शेवटचे शब्द त्याला आठवत असत. "चांगले वागा. नेहमी माझ्या मुलांनो चांगले रहा." आणि त्याला वाटत असे की आपल्या आईसाठी काहीतरी चांगलं काम आयुष्यभर करीत राहाणं हे आपलं कर्तव्य आहे.

ह्या सर्व विचारांनिशी तो एकदा मोठ्या वडाच्या झाडाच्या छायेत गावात उभा होता. ते झाड ८०० वर्षांचे जुने आहे असे लोक सांगत असत. पण मायनरना वाटायचे की जगाच्या सुरुवातीपासूनच ते तिथे असले पाहिजे!

घरी सर्वजण त्याची वाट पाहात होते. त्याच्या वडिलांनी अतिशय प्रेमाने त्याचा हात हातात घेतला. त्याला वडिलांविषयी प्रेम होते. त्याचे वडील एक मजबूत बांध्याचे शेतकरी होते. त्या दोघांना एकमेकांचे विचार न बोलता समजत असत. जेव्हा मायनरला 'विद्यार्थी' बनून शिकावेसे वाटले तेव्हा त्याच्या वडिलांनी त्याला मुळीच विरोध केला नाही. उलट आपल्या विद्यार्थी मुलाला शहरात खर्चायला जास्ती पैसे लागतील म्हणून शेतात जास्ती काम करून उत्पादन वाढवायचा ते प्रयत्न करीत होते. लढाईतून परत आल्यावर मायनर जेव्हा इन्सब्रुकला पुन्हा शिकायला गेला तेव्हा पण त्यांनी मुळीच तक्रार केली नाही. खरं म्हणजे मायनर घरी राहिला असता तर शेतीत त्याची मदत झाली असती. कदाचित् त्यांचा मुलगा डॉक्टर होणार म्हणून त्यांना अभिमान वाटत असावा.

त्याचे वडील स्वतःच्या भावना लपविण्याचा प्रयत्न करीत असत, पण सर्वांच्या ते लक्षात येई की इन्सब्रुकहून तो घरी आल्यानंतर ते बदलून जायचे, जास्ती बोलायचे, विचारपूस करायचे आणि आनंदी दिसायचे.

आणि मग ती बाकी सर्वजण-त्याच्या बहिणी आणि त्याचे भाऊ आणि सर्वांना जोडून ठेवणारं ते कुटुंब आत्मीयतेने त्याच्याभोवती गोळा होत असे. हर्मन वास्तविक आता मोठा झाला होता, तरी पण मोठी बहीण त्याला आईच्या मायेने वागवीत होती आणि मायनरला पण ती आईच्या ठिकाणी वाटत होती.

आता मायनर घरी परत आला होता. इथे त्याला आपलेपणा वाटत असे. आणि इथे बसून त्याला विचार करायला आणि योजना आखायला स्फूर्ती मिळत असे.

काही तासांनंतर मायनर त्याच्या घरात पूर्ण रुळून गेला. घराचा घरपणा त्याला इतका सुखावह वाटला की जणू काय हे घर सोडून आपण कधीच बाहेर पडलो नव्हतो असे त्याला वाटले. कपाटात त्याने आपले कपडे ठेवले. घरात वापरावयाचे जुने कपडे त्याने अंगावर चढवले आणि त्या कुटुंबात तो एकजीव होऊन गेला. घरात त्याचे स्थान व त्याचे काम यात तो पुन्हा रमून गेला. त्याला शेती खूप आवडायची. आणि त्यात तो रममाण व्हायचा. विशेषकरून आत्ताच्या परिस्थितीत तर त्याला काहीतरी काम करण्याची गरज होती. त्याने आपल्या जन्मस्थानाची हवा भरभरून श्वासात घेतली. गेले कित्येक महिने त्याला खूप त्रास झाला होता. त्याला अधिक समज आली होती आणि ह्या घरच्या आरामाची त्याला आवश्यकता होती. वडिलांशी व इतर लोकांशी पण खूप गोष्टी करायच्या होत्या.

त्याच्या इतर भावंडांपेक्षा तो बराच काळ घराबाहेर राहिला होता. १४ व्या



वर्षी तो हायस्कूलमध्ये गेला होता. कारण तो हुशार, महत्त्वाकांक्षी व अभ्यासू वृत्तीचा होता आणि त्याची एकमेव इच्छा होती की खूप शिकायचं आणि डॉक्टर व्हायचं !

त्याचे हायस्कूलमध्ये जाण्याचे स्वप्न मूर्त स्वरूपाला आले होते. पण त्याची आठवण येऊन त्याला आता हसू येत होते. त्या स्वप्नपूर्तीनंतर त्याच्या वाट्याला बऱ्याच निराशा पण आल्या होत्या. घर सोडून बाहेर राहणं वाटलं तितकं सोपं नव्हतं. त्याला सतत घर आठवायचं. शहरात राहाणारे सर्व लोक त्याला परके होते. सर्वच वातावरण वेगळे होते. अगदी शुष्क आणि नकारात्मक. शाळेतली कोरडी पोळी चघळताना त्याला नको वाटायचे. पण त्याने मनाशी निश्चय केला होता की कितीही त्रास झाला तरी शाळा सोडून घरी जायचे नाही. त्याला अभ्यास करावयाचा होता. शहरातल्या त्या छोट्याशा, साध्या खोलीत त्याला कधी कधी खूप एकटं वाटायचं. पण त्याने आपली ही एकटेपणाची व्यथा कधी कुणाला सांगितली नाही. आणि लवकरच त्याला मित्र मिळाले. तो हायस्कूलचा विद्यार्थी आणि इतरांप्रमाणे त्याला ?

आणि त्यानंतर मात्र तो घरापासून खूप खूप दूर गेला होता. कारण त्याला लढाईवर जावे लागले होते. सर्व कुटुंबियांचा निरोप घेताना तो खूप अवघडला, कारण तो घराशी, त्या वातावरणाशी तो फार निगडित होता.

हर्मनला आता त्याचं हसू येत होतं. घरी परत आल्याचा आनंद त्याला झाला होता. आणि युद्धाबद्दल विचार करताना नेहमीच त्याला या भावनेनं सुखावले होते की तो फार नशिबवान असला पाहिजे कारण आघाडीवरून तो परत आला होता. अनेक वेळा तो जखमी झाला होता पण त्याच्या गावाची बरीच मंडळी युद्ध आघाडीवरून परत आलीच नव्हती. घरी आल्यावर हर्मनला शेती सांभाळावी लागली होती. कारण त्याचे भाऊ अद्याप युद्धकैदी होते. काही दिवसांनी एक भाऊ परत आला आणि शेवटी हर्मनने इन्सब्रुकला जाऊन आपला डॉक्टरीचा अभ्यास सुरू केला.

घरातले दिवस भुर्रकन निघून गेले. सुरुवातीस त्याला वाटत होते की एकदा घरी गेल्यावर आपल्या मनातील सर्व विचार आपण सुसूत्र करून त्याची नीट जुळवणी करू. पण दरवेळी तो विचार करू लागला की त्याला त्याचे तरुण, गरीब, लहान, मित्रच आठवायचे. त्यांच्या विकासाची समस्या डोळ्यांपुढे उभी राहायची आणि मग काही सुचेनासं व्हायचं. शेवटी त्याला कबूल करावं लागलं की घरी राहून देखील ह्या प्रश्नाचं समाधानकारक उत्तर मिळणार नव्हतं.

मायनर नुकताच इन्सब्रुकला परत येऊन विद्यापीठात अभ्यास करायला लागला होता. तोच त्याच्या विचारांनी त्याच्या डोक्यात पुन्हा थैमान सुरू केलं.

लागला होता. तोच त्याच्या विचारांनी त्याच्या डोक्यात पुन्हा थैमान सुरू केलं. उपेक्षित मुलांचा विचार पुनःपुन्हा डोक्यात येत होता. काही तरी मंथन सुरू झालं आणि हळूहळू चित्र स्पष्ट होऊ लागलं.

"मला एक नक्की योजना बनवली पाहिजे आणि ती शेवटपर्यंत राबवली पाहिजे." त्याने स्वतःला बजावले. "मला तिथे स्वस्थ बसून इतरांप्रमाणे हात चोळायचे नाहीत. किंवा नुसत्या तरुणांच्या कल्याणाच्या थापा पण मारायच्या नाहीत. मला काही बोलायचंच नाही. मला करून दाखवायचं आहे. आम्ही एका महायुद्धाचा अनुभव घेतला आहे आणि त्याने आम्हाला खूप शहाणपण शिकवलं आहे. ज्या एका सुंदर जगावर आम्ही आसक्त होतो त्या जगाचा विध्वंस आम्ही आपल्या डोळ्यांनी पाहिला आहे. पण मला निराशेने जगायचे नाही, काम करावयाचे आहे व काहीतरी यश मिळवायचं आहे.

मायनर नित्याच्या कार्यक्रमात आणखीनच व्यग्र होऊन गेला. विद्यापीठ, शिकवण्या, तरुण-संघटना, व्याख्याने, अभ्यास आणि वाचन यांनी त्याची दिनचर्या आणखीच धांदलीची बनली.

## कल्पनेला परिपक्वता आली

काल्पन मायर आपल्या खोलीत गुडघ्यात डोके घालून बसला होता. त्यामुळे हर्मन मायनर केव्हा आला ते त्याला समजले नाही.

"शुभ संध्या, प्रिय मित्रा" काल्पन मायरने वर मान करून बघितले. "ओ, हर्मन." ते एकमेकांना अतिशय प्रेमाने भेटले. पण नंतर त्या धर्मवेत्त्याने त्याच्याकडे पाहून म्हटले, "अरे, तू असा काय दिसतोस ? बहुतेक तू परीक्षा बुडवून येथे आलेला दिसतोस ? तुला काय झालं आहे ?"

मायनर खाली बसला आणि म्हणाला, "हे पहा, माझ्या डोक्यात सारखा एकच प्रश्न घोळतो आहे. ज्या मुलांना आईबाप नाहीत, त्यांचे पुढे काय व्हायचे ? त्यांचे भविष्य घडविण्यासाठी संस्था किंवा होम्स ही काही योग्य स्थाने नाहीत. असा विचार केला पाहिजे की आपण आता विसाव्या शतकात राहातो आहोत. सर्व क्षेत्रांत तंत्रज्ञान इतके प्रगतिशील बनत आहे मग फक्त सामाजिक क्षेत्रात असे मागास राहून कसे चालेल ? मला याचे उत्तर शोधायचे आहे. एक रचनात्मक कार्यक्रम मला ठरवायचा आहे. तुला माझी संघटना आणि त्यातली ती तरुण मुले ठाऊक आहेत. मी फक्त संध्याकाळी त्यांना भेटून त्यांचे सोबत रहातो हे पुरेसे नाही. उरलेला सर्व



वेळ ते उनाडतच असतात. मला त्यांना मदत करावीशी वाटते आणि ती कशी करायची ते पण मला माहीत आहे. माझ्या कल्पनेप्रमाणे त्यांच्याप्रमाणे त्यांच्याकरता एक घर बांधायचे आहे आणि ते घर त्यांना स्वतःचे घर वाटले पाहिजे. अनाथालय नाही तर एक पारिवारिक घर– जिथे त्यांना एक आई पण मिळेल. प्रत्येक मुलाला आई हवी असते. जर मुलाला आईचे प्रेम कधी मिळालेच नाही तर तो मोठा होऊन त्याचा विकास होणार कसा आणि तो सज्जन बनणार कसा ? म्हणून आता मला ही योजना प्रत्यक्ष अंमलात आणावयाची आहे. अर्थात असे घर बांधा-यला पैसे लागतील पण मी ते जमवीन. ते पैसे गोळा करण्यासाठी मी निरनिराळे मार्ग शोधून काढीन. कदाचित् पुढे जे काही नवीन आणि भव्य होणार आहे, त्याची सुरु-वात या घरापासून होईल. या क्षेत्रात काम करणारी पुष्कळ व्यावसायिक आणि तज्ज्ञ माणसे आहेत. मी माझी ही योजना त्यांना सादर केली तर ते खासच उपकृत होतील. मला त्यातून काही नको आहे. पण ह्या जगात चांगले घडावे म्हणून जो लढा सुरू आहे, त्यात ही माझी सेवा रुजू होईल. इथे महायुद्धानंतरच्या दारुण परि-स्थितीशी आपण सामना करीत आहोत. आणि त्याबाबत व्यक्तिगत निर्णय घेणे आवश्यक आहे. हे निर्णय दोनच होऊ शकतात. एकतर उज्वल जगाच्या निर्मितीची खटपट करणे, नाही तर हा विचार सोडून देणे. हा विचार सोडून देणे म्हणजे स्वतः-पुरता स्वार्थी विचार करणे. युद्धामुळे आपले जे नुकसान झाले आहे ते भरून काढण्यासाठी पैसे मिळविणे आणि स्वतःचे आयुष्य अधिक संपन्न बनविणे. माझे स्वतःचे फार नुकसान युद्धामुळे झाले आहे असे मला वाटत नाही. त्या वर्षांत मी लहानाचा मोठा झालो आणि मनुष्य बनण्याची संधी मला मिळाली आणि आता मला माझं मनुष्यत्व सिद्ध करायचे आहे. हे खरं आहे की मी एक तरुणांचा संघ बनवला आहे पण त्यांच्यासाठी मी पुरेसे काम केलेले नाही. ही तरुण मुले पुन्हा आनंदी नागरिक बनतील असा रस्ता मला त्यांना दाखवायचा आहे. बस् मला एवढेच पाहिजे आहे, आणि त्यामुळे माझ्या अभ्यासाचे नुकसान होईल असे जे लोकांना वाटते ते खरे नाही. मला डॉक्टर बनायची इच्छा आहे आणि मी डॉक्टर बनेन ! दुसरी काही मंडळी अभ्यास संपल्यावर चैनीच्या मार्गाने जातात. किंवा स्वतःच्या जमातीचे काम करतात. मला मनुष्यमात्रासाठी काम करावयाचे आहे. आणि आता कृपा करून ऐक, मी हे कसे करणार त्याची योजना."

मायनर पुन्हा दृढ निश्चयी बनत होता. अशा मनोवृत्तीत गेलेल्या माणसाला पायबंद घालणे कुणालाच शक्य नसते हे सत्य काल्पन मायरला पूर्णपणे ठाऊक होते. त्याने त्याचा ग्रंथ बंद करून ठेवला व एका उत्सुक श्रोत्याची भूमिका घेतली.

"उद्या मी ही सर्व योजना एक कागदावर लिहून काढीन." मायनर सांगत होता, "आणि त्यातून ह्या मुलांच्या घराची चित्रे उभी राहतील. अशा मुलांच्या वसाहतीबद्दल तुला कल्पना आहेच. उदाहरणार्थ फादर फ्लॅनगनने अशी एक बालनगरी वसविली आहे. पण माझी कल्पना मात्र त्यापेक्षा फार वेगळी आहे. ह्या वसाहतीत मी प्रत्येक अनाथ मुलाला, वंचित मुलाला कुटुंबाचं नैसर्गिक वातावरण मिळवून देईन. म्हणून ती निव्वळ मुलांची वसाहत नसेल, तर खरंखुरं मुलांचे बालग्राम असेल, त्यात मुलगे व मुली असतील. ती लहान-मोठ्या वयाची असतील. जशी एखाद्या कुटुंबात वेगवेगळ्या वयाची मुलं राहातात त्याप्रमाणे एका कुटुंबाचे एक घर राहील. त्यात ९ मुले एकत्र राहातील. त्यांच्यासाठी ३ खोल्या असतील व प्रत्येक खोलीत ३।३ मुले राहातील. अशा ह्या घरात ह्या ९ मुलांची एक माता असेल. ती शिक्षिका असणार नाही किंवा समाजसेविका पण नाही. ती फक्त एक प्रेमळ स्त्री असेल आणि ती फक्त या मुलांसाठीच असेल. ती तिच्या स्वयंपाकघरात ह्या ९ जणांचा स्वयंपाक करील आणि इतर घरातल्या स्त्रियांप्रमाणे घरांची काळजी घेईल आणि कुटुंबातल्या मातेप्रमाणे मुलांना वागवेल. ती मुले तिला आई म्हणून हाक मारतील. त्यांना ती आपले रक्षण करील ही खात्री वाटेल. त्या ९ मुलांचे ते खरेखुरे घर असेल आणि कुटुंबात असते त्याप्रमाणे एखादे मानसिकदृष्ट्या आजारी मूल देखील मोकळेपणाने वाढू शकेल आणि अशा बालग्राममधे संस्थेची अशी शाळा राहाणार नाही, पण शहरातल्या शाळेत सर्व मुले शिकायला जातील व अशा रीतीने इतर मुलांशी पण या मुलांचा संबंध येईल. ह्या बालग्रामच्या मुलांचा एक फायदा असा होईल की संस्थांमधून मुलांना जी वगळून टाकण्याची प्रथा आहे ती जाऊन त्याच्याऐवजी त्या वंचित मुलांना प्रत्येक ठिकाणी प्रवेश मिळेल व त्याचा स्वीकार होईल. अशा प्रकारे परमेश्वराच्या इच्छेनुसार प्रत्येक मुलाच्या वाढीसाठी लागणारे अनुकूल वातावरण त्याला मिळेल. हे पहा, अशाप्रकारचे बालग्राम हा नमुना बनेल आणि ह्या नमुन्यातून नवीन तऱ्हेने आवश्यक असणारी मुलांची काळजी कशी घ्यावी याचे शिक्षण मिळेल. ते बालग्राम प्रकाशले पाहिजे आणि त्याची प्रकाश-किरणे जगभर पसरली पाहिजेत. त्यामुळे लोकांना प्रेरणा मिळाली पाहिजे. आणि ही महत्त्वाची जाणीव झाली पाहिजे की, प्रत्येक मूल जर चांगल्या तऱ्हेने वाढवायचे असेल आणि या जगात त्याला टिकवायचे असेल तर त्याला प्रेम आणि संरक्षण ह्याची अतिशय गरज आहे. अशा तऱ्हेचे एक आदर्श बालग्राम खरंच बनेल. मग आपण टाकलेल्या मुलांचे संगोपन यांत्रिक पद्धतीने उत्पादन करावे तसे होणार नाही. आणि पुन्हा एकदा त्याला एक स्वतंत्र व्यक्ती म्हणून मान्यता मिळेल जशी आईला आपल्या प्रत्येक मुलाविषयी



वेगळी आत्मीयता वाटते तशी !

मायनर जरा थांबला. काल्पन मायरने त्या संधीचा फायदा घेऊन त्याला एक प्रश्न विचारला. त्याने फक्त मातेच्या भूमिकेचाच विचार का केला ? पित्याच्या भूमिकेचा का केला नाही ? मायनरचे उत्तर तयारच होते. "मला कोणताही निराशाजनक प्रयोग करावयाची इच्छा नाही." खरं म्हणजे, तात्त्विकदृष्ट्या आईवडिलांचे कुटुंब असणे हे केव्हाही चांगलं. परंतु प्रत्यक्षात मात्र ही व्यवस्था तितकी योग्य वाटत नाही. कारण यातून आपल्याला मुलांच्या दुर्वर्तनाला आळा घालण्याचे काम साधायचे आहे. त्यांच्यातली गुन्हेगारी वृत्ती घालवायची आहे. मी यावर खूप विचार केला आहे. मी अशा प्रयत्नांचा नीट अभ्यास केला आहे आणि पालक-कुटुंबातल्या वातावरणाची मी बरीच माहिती घेतली आहे. आणि त्यावरून माझी खात्री झाली आहे की समाजात असे चांगले पतिपत्नी मिळणं ही फार कठीण गोष्ट आहे. कारण आपण त्यांना ही परकी अव्हेरलेली मुलं देऊन त्यांना स्वतःच्या मुलांप्रमाणे वाढवायला सांगणार आहोत. नाही, मित्रा हे होणार नाही. त्या प्रयोगातच त्याचे अपयश सामावलेले आहे. ज्या मुलाचा मानसिक समतोल बिघडला आहे त्याला आईची जरूर असते. त्याला औषधोपचार करायची जरुरी आहे आणि हे औषधोपचार म्हणजे प्रेम, समजूतदारपणा, मातेची माया हेच असू शकतात. म्हणून मी जो मार्ग शोधून काढला आहे तो योग्य आहे असं मला वाटतं. ९ मुलांना घेऊन एका आईने राहाणे हाच तो मार्ग आहे. वडिलांची जी भूमिका आहे ती बालग्राम संचालक निभावू शकेल. कारण त्याला मुलांसाठी भरपूर वेळ देता येईल आणि तो मातांशी पण बोलू शकेल आणि त्यांच्या कामात मदत करू शकेल. आजकालच्या बालविकासाच्या क्षेत्रात आपल्याला मोठ्या प्रमाणावर विचार करावा लागेल.

"अशा तऱ्हेचा प्रकल्प उभा करण्यास, लाखो रुपये लागतील." काल्पन मायर एकदम अति उत्साहित होऊन बोलला. मायनर तयारच होता.

"मुलांचे तुरुंग बांधण्यास यापेक्षा अधिक खर्च होईल. शासनाच्या संबंधित अधिकाऱ्यांच्या हे लक्षात यावे एवढीच माझी प्रार्थना आहे. जर उपेक्षित मुलांसाठी एवढी रक्कम जमविता येत नसेल तर ती एक हास्यास्पद गोष्ट ठरेल."

मायनर स्वतःच्या प्रकल्पाविषयी बोलत राहिला. त्याने केलेला गंभीर, सविस्तर विचार नक्कीच आकार घेऊ लागला होता. सुरुवातीस ती एक निव्वळ कल्पनाच होती आणि तीदेखील स्पष्ट नव्हती. कारण त्यात कित्येक प्रश्नांची व समस्यांची उत्तरे सापडली नव्हती. पण ध्येय मात्र नक्की ठरले होते आणि एकदा ती खूणगाठ पक्की ठरली की प्रत्येक गोष्ट त्या दिशेने धाव घेत होती.

मायनरला परत फिरायला खूप रात्र झाली होती. स्वतःचे डोके हलवीत काल्पन मायर मागे थांबला. त्याला प्रश्न पडला की मायनरचे अभिनंदन करावे की त्याची कीव करावी ?

## तो मोर्चांना पकडून बसला.

पुन्हा ते २ आठवड्यांनी भेटले. जेव्हा काल्पन मायर मायनरच्या विचारात खोल जाऊ लागला तेव्हा त्याला कळून चुकले की मायनरने काहीतरी निर्णय घेतला आहे !

"होय" मायनर म्हणाला. "असे काहीतरी घडले आहे की जे घडेल असे मला वाटले नव्हते. जिथे जिथे मी माझी योजना घेऊन गेलो तिथे तिथे लोकांनी दरवाजे बंद करून टाकले. मी सर्व संस्थांच्या मार्गदर्शन केंद्रांत गेलो. मला वाटत होते की माझी योजना त्यांना पसंत पडेल. कारण त्यामुळे गुन्हेगार मुलांचा प्रश्न सोडविण्यास चांगली मदत मिळेल. पण त्यांना माझी योजना आवडली नाही. मी मूर्ख आहे असे मानून त्यांनी माझी चेष्टा केली. मला त्यांनी नम्रतेने पण खात्रीने त्यांच्या ऑफिसच्या बाहेरचा दरवाजा दाखवून दिला. कुणीच माझ्या प्रकल्पाचा गांभीर्याने विचार केला नाही."

काल्पन मायर खोलीत येरझाऱ्या घालू लागला. "यामुळे तुला एक धडा मिळाला आहे, हर्मन. हे बघ तुझा अजून अभ्यास सुरू आहे. कदाचित् अजून तुला परिस्थितीचे पूर्ण आकलन झालेले नाही. तू बहुतेक तुझ्या त्या युवकसंघाच्या अनुभवांवरून काही निर्णय घेतले आहेस. ते मुलगे थोडे होते आणि त्यांना तू आपलेसे केले होतेस. जर तिऱ्हाईताच्या भूमिकेतून बघितले तर तुझ्या कल्पना वरवरच्या वाटतात आणि विशेषकरून ह्या क्षेत्रात ज्यांनी वर्षानुवर्षे काम केले आहे त्यांच्या तुलनेत तुझा अनुभव उथळ वाटतो. तुझी योजना वाईट आहे, असे मी म्हणत नाही. प्रामाणिकपणाने मी कबूल करतो की तुझ्या योजनेवर माझा विश्वास पण आहे. परंतु हे बघ, पेस्टॉलोझीसारखा विद्वान गृहस्थ, पण कौटुंबिक शिक्षणाची योजना यशस्वी करू शकला नाही. आणि म्हणून म्हणतो की वैद्यकीय शास्त्राचा अभ्यास करणारा एक विद्यार्थी एका क्षणात सर्व बालविकासाचे तंत्र आमूलाग्र बदलू शकेल का ? त्या क्षेत्रात शेकडो वर्षांच्या अनुभवावर आधारीत नियमांचे पालन केले जात आहे. तुला थोडे थांबावे लागेल हर्मन. विनाकारण भिंतीवर डोके फोडून घेण्यात अर्थ नाही. थोडे दिवस थांब. ती योजना थोडे दिवस बाजूला ठेव. निदान काही वर्षे तरी आणि एकदा तू



डॉक्टर झालास व तुझ्या जीवनाला स्थैर्य आले की नंतर पुन्हा ही योजना हाती घे. पुन्हा त्यावर नव्याने विचार कर, तिचा प्रयोग करून पहा आणि तुला जर तेव्हा खात्री वाटली तर पुन्हा एकदा राबवून बघ. मग तू तेव्हा मोठा झालेला असशील आणि आज जी वागणूक तुला एक सामान्य विद्यार्थी म्हणून मिळते ती तेव्हा मिळणार नाही आणि तज्ज्ञांचे दरवाजे ठोठवावे लागणार नाहीत. मग तुझी बोलण्याची योग्यता उंचावलेली असेल, तू अधिकारवाणीने समजावू शकशील. आत्ता मात्र तू निराश होऊ नकोस. ज्यांनी आज तुला बघून दरवाजे बंद करून घेतले त्यांच्या विचाराने तू धीर सोडू नकोस. वाईटातून चांगले निवडून काढणे हे काम सोपे नाही. तुझे डोके शांत ठेव !"

मायनरने रागावून उत्तर दिले. "माझे डोके खांद्यावर घट्ट स्क्रू पिळून बसविलेले आहे. त्याची तू काळजी करू नकोस. निराश होऊन मी हे प्रयत्न कधीही सोडून देणार नाही याची तू खात्री बाळग. मी निराश झालो आहे पण धीर सोडलेला नाही. जीवनाला सामोरे जाताना मला एक पहिली धडक बसली आहे हे जरी खरे असले तरी माझे डोके अजून शाबूत आहे.

खरं म्हणजे ह्या थंड वर्षावाने माझे डोके थोडे शांत पण झाले आहे आणि माझ्यापुढे काय वाढून ठेवले आहे याची मला नीट कल्पना आली आहे. मी त्या जुन्या म्हणीवर विश्वास ठेवून काम करणार आहे. "जो स्वतः मेहनत करतो, परमेश्वर त्याला मदत करतो. माझा माझ्या योजनेवर पक्का विश्वास आहे आणि म्हणून मी कोणत्याही मदतीची अपेक्षा न करता स्वतःच ती राबविणार आहे. म्हणून मला हे काम केलेच पाहिजे. नाहीतर मी एक वाईट मनुष्य व वाईट ख्रिश्चन ठरेन."

काल्पन मायर हसला. "हर्मन, तू अजिबात बदलला नाहीस. जरा शहाणपणाचा विचार कर. शिवाय तुला दुसरं काम करायचं आहे. तोपर्यंत तुझी ही योजना बाजूला ठेव. आणि म्हणूनच आज मी तुझ्याकडे आलो आहे. आपल्या या सबंध परगण्याचा युवक-नेता म्हणून तुझी निवड होण्याची दाट शक्यता आहे."

"परगण्याचा युवक-नेता !" मायनर ओरडला. "मी त्यांचा युवक नेता बनून काय करू ? माझ्यापेक्षा अधिक लायक असलेले पुढारी त्यांना केव्हाही मिळतील."

"मिळतीलही कदाचित्. पण ते तुझ्याइतके एकनिष्ठ असणार नाहीत. जर तुझी निवड झाली तर तू नाही म्हणू नकोस."

आणि त्याप्रमाणे हर्मन मायनर निवडला गेला. त्यामुळे त्या परगण्यातील सर्व ख्रिश्चन युवकांचा तो नेता बनला.

त्या युवक संघटनेतील मायनरचे काम अतिशय उत्तम झाले व सर्वांनी त्याचे कौतुक केले. सुरुवातीस बऱ्याच लोकांना वाटायचे की ही उनाड मुलं काय सुधार-

णार ? आपले खांदे उडवून ते स्वतःची शंका व्यक्त करीत असत. आणखी काही लोक मायनरच्या विरोधातच होते कारण त्यांना तो मुळीच आवडायचा नाही. पण बहुसंख्य तरुण मुलांना मायनरचे काम पसंत होते. आणि त्याच्या कामावरील विश्वास पण त्यांनी व्यक्त केला होता. मायनरने पण हे तरुणांचे काम विशेष उत्साहाने स्वीकारले होते. आणि त्यांचा तो उत्साह त्याच्या प्रत्येक कामात दिसून येत असे.

काल्पन मायर पण ह्या व्यवस्थेवर अतिशय खूष होता. पण एक गोष्ट त्याच्या लक्षात आली नाही. तो असे धरून चालला होता की मायनरला बालग्रामच्या योजनेत मिळालेल्या अपयशामुळे तो ती कल्पना आता विसरून जाईल. पण मायनरचा निश्चय दृढ होता की केव्हा ना केव्हा तरी या बालग्रामच्या योजनेला मूर्त स्वरूप मिळेलच. फक्त ते काम आता दिवसानुदिवस कठीण होत चाललं होतं. त्याला अभ्यास भरपूर होता आणि त्याच्या खर्चासाठी शिकवण्या करून पैसे मिळविणे पण आवश्यक होते. त्यात आता त्याच्यावर ही नवीन जबाब्दारी येऊन पडली होती. परगण्यातील युवकांच्या विकासाची अनेक कामं करावयाची होती. त्याच्या बालग्रामच्या योजनेला पराभव पत्करावा लागला होता. त्याची सतत बोच त्याच्या मनात होती. वाटेल ती किंमत पडली तरी तो स्वतःची योजना सोडायला तयार नव्हता. "मला स्वतःच्या योजनेबद्दल अहंकार वाटतोय् का ?" त्याने स्वतःला विचारून पाहिले. मी हा पराजय बिलकूल स्वीकारू शकत नाही, व्यक्तिगत महत्वाकांक्षेचा तो प्रश्नच नव्हता. त्याच्या मनात फक्त एकच प्रमुख विचार होता की शेकडो टाकून दिलेल्या मुलांचे भवितव्य कसे सुधारायचे ? त्यांच्यासाठी त्यांनी ही योजना बनवली होती आणि जर जबाबदार शासकीय खात्यांना किंवा संस्थांना त्याची किंमत वाटत असेल तर त्याला स्वतः हे काम स्वतःच्या अंगावर घेऊन करणे क्रमप्राप्त होते.

मायनरच्या ध्यानात आले की जर ही योजना राबवायची असेल तर त्यासाठी एक संस्था स्थापन करायला हवी. त्या संस्थेचे नाव काय ठेवावे ? त्या संस्थेचे ध्येय-धोरण काय असावे ? त्या संस्थेने फक्त बालग्रामे सुरू करावीत किंवा आणखी काही सामाजिक जबाबदारीची कामे पण अंगावर घ्यावी ? असे हजारो प्रश्न त्याच्या मनात सारखे घोळत असायचे आणि एक दिवस त्याला ह्या प्रश्नांचे उत्तर निश्चित सापडले आणि त्यानुसार त्या संस्थेचा आराखडा पण तयार झाला. त्या संस्थेत सर्व तऱ्हेची मंडळी असावीत. डॉक्टर्स असावेत, नर्सेस असाव्यात, सामाजिक कार्यकर्ते आणि इतर मंडळी असावीत. ही सर्व मंडळी एकत्र येतील, विचारविनिमय करतील आणि तरुण मुलांच्या सामाजिक विकासाचा कार्यक्रम अत्यंत आधुनिक पद्धतीने हाताळतील. ह्या सोसायटीचे नाव लॅटिन भाषेमधील Societas Socialis असे असेल आणि त्याचे छोटे सुटसुटीत नाव SOS (एस.ओ.एस) असे राहील. लगेच मायनरच्या



लक्षात आले की मोठ्या समुद्रावर जहाज बुडू लागलं की मदतीचे संदेश जे पाठवतात त्यांना पण SOS हेच नाव असतं. हे संस्थेला दिलेले नवीन नाव त्याला अतिशय पसंत पडले आणि त्याने त्या नावाला आणखी एक पुस्ती जोडली. "अनाथांची संकटांतून मुक्ती" (सुटका).

ह्या स्थापन होणाऱ्या संस्थेची घटना बनविण्याचे काम त्याच्या एका वकील मित्राने केले. ती एक खासगी संस्था होती आणि सामाजिक सुधारणांचे काम करणारी होती आणि तिचे मुख्य कार्यालय इन्सब्रुकला राहाणार होते. सुरुवातीस ह्या संस्थेचे कार्यक्षेत्र टिरोल गावापुरते मर्यादित राहाणार होते. अनाथ मुलांसाठी ही बाल ग्रामे वसविली जातील आणि नंतर त्याबरोबर त्याने एक माता-बालक संगोपन केंद्राची योजना आखली. ह्या केंद्रात कुमारी मातांचे संरक्षण होणार होते. नंतर मातांसाठी एक स्वतंत्र निवास बनणार होता आणि त्यातूनच SOS च्या मातांचे प्रशिक्षण होणार होते आणि त्या बालग्रामच्या प्रशिक्षित माता बनणार होत्या.

२५ एप्रिल १९४९ला संस्थेची इथपर्यंत प्रगती झाली होती. ह्या नवीन संस्थेची पहिली सभा त्याने आपल्या काही खास मित्रांच्या मदतीने बोलावली. १३ जून १९४९ ह्या दिवशी ही नवीन Societas Socialis नावाची संस्था कायदेशीर रित्या रजिस्टर झाली. तिचा रजिस्ट्रेशन नंबर होता, V/३७४/४९-१६७/४९ (V) ह्या रजिस्ट्रेशनबरोबरच मायनरच्या भावी प्रकल्पाची मुहूर्तमेढ रोवली गेली.

## दरमहा एक शिलिंग

संस्थेची एकदा स्थापना झाल्यानंतर त्यांनी आपल्या काही मित्रांना त्या संस्थेचे सभासद बनवले. आता मायनरच्या मनातील योजनेला मूर्त स्वरूप देण्यासाठी त्याला पैसे मिळवणे अतिशय आवश्यक होते. ते कसे जमवावेत ? थोड्या विचारांती त्याने असे ठरवले की हा प्रकल्प कार्यान्वित करण्यास अनेक लोकांची मदत घ्यावी लागेल. पुष्कळ लोकांना मित्र आणि विश्वस्त बनवून घ्यावे लागेल. आणि ह्या सर्वांना निदान व्यक्तिशः दरमहा १ शिलिंग तरी ह्या कामासाठी देणगी म्हणून द्यावी लागेल. काही स्त्रिया पण मायनरच्या मदतीला आल्या. मायनरने बनविलेल्या सर्व याद्या त्यांनी मागून घेतल्या आणि त्या घरोघरी हिंडू लागल्या. अशा प्रकारे त्यांनी पुष्कळ मित्र आणि हितचिंतक मायनरच्या ह्या कामासाठी नोंदवून घेतले.

इन्सब्रूकच्या एका रस्त्यावर, युनिव्हर्सिटीच्या समोरच्या एका घरात मायनरने एक छोटीशी खोली मिळवली. व तिथे एक Storeroom कोठीघर सुरू केले. जेव्हा

त्या खोलीत त्याने जुनी टेबले व खुर्च्या आणून ठेवल्या तेव्हा मायनरला त्याच्या त्या कोठीघराचा अतिशय अभिमान वाटला. युद्धाच्या आघाडीवरील फिल्ड ऑफिसर प्रमाणे त्याने स्वतःला मानले. तो यशस्वी होणार नाही असे त्याला क्षणभरही वाटले नाही.

सुरुवातीस फक्त बालग्रामच्या वसाहतीतच लक्ष केंद्रित करण्याचे ठरले होते. म्हणून काही दिवसांनंतर संस्थेच्या घटनेत जे ध्येय-धोरण ठरलेले होते त्याबाबतचे कार्यक्रम पण मायनरने बाजूला ठेवले. कारण त्याला सर्व गोष्टींचा पसारा घालून ठेवणे शक्य नव्हते. एकदा बालग्रामची कल्पना सत्य सृष्टीत उतरली की त्यातून इतर सर्व कामे सुचू लागतील आणि नवनवीन प्रकल्प उभारले जातील. म्हणून आता Societas Socialis चे नाव बदलून पुन्हा नवीन नाव देण्यात आले. S.O.S. childrens' Villages ह्या नवीन संस्थेचा विस्तार ऑस्ट्रिया या देशभरात होणार होता. आणि अनाथ व निराधार मुलांच्या संरक्षणासाठी बालग्रामे सुरू करणे एवढाच मर्यादित हेतू संस्थेचे ध्येय बनला होता.

त्याच्या ह्या पहिल्या कचेरीत त्याचे काम खूप वाढत गेले आणि दुसरे काहीही करायला त्याला फुरसत मिळाली नाही. ह्या नवीन संस्थेला चैतन्यमय करून तिचा नावलौकिक वाढविणे जरुरीचे आहे हे मायनरला माहीत होते. आणखी पुन्हा एकदा अपयश सोसणे त्याला शक्य नव्हते. कारण ही बालग्रामची चळवळ संपुष्टातच आली असती. यश मिळविणे ही सहज सोपी गोष्ट नव्हती. एका वैद्यकीय शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्याने एक संस्था स्थापन केली होती. त्याला एक नाव दिले होते, ज्याचा अर्थ पण पुष्कळ लोकांना माहीत नव्हता. अशी ही सामान्य घटना कुणाचे चित्त आकर्षित करणार ?

पण मायनरने ह्या अडचणींचा फारसा विचारच केला नाही. त्याला फक्त त्याच्या डोळ्यांसमोर एकच दिसत होते- आणि म्हणूनच सुरुवातीस आपल्याजवळ असलेले सर्व ६०० शिलिंग त्याने या फंडात दान म्हणून दिले. त्यामुळे अपेक्षित देणगीदारांच्या याद्या, प्रचार प्रचारपत्रके वगैरे छापण्यास सुरुवात झाली. आणि ती वाटली जाऊन प्रकल्पाला आरंभ झाला. त्याच वेळी त्यांनी टिरोलमधल्या अनेक पंचायतींना वैयक्तिक पत्रे लिहून त्यांच्या जवळ असलेल्या जमिनीचा काही हिस्सा ह्या नवीन बालग्रामच्या इमारतीच्या बांधकामास देणगी म्हणून त्यांनी द्यावा, अशी विनंती केली. फ्रिटझ्–जो मित्र ह्या नवीन कचेरीच्या कामात खूप उत्साहाने मदत करीत होता, तो पुन्हा एकदा साशंक बनला. "माझी खात्री आहे की कोणतीही पंचायत तुझ्या ह्या स्वप्नजाळ्यात सापडणार नाही. सभापती ही फार चतुर मंडळी असतात."

"जर तुला असे वाटत असेल की मी स्वप्नसृष्टीत जगतो आहे." मायनर



चिडून बोलला. "तर मला तुझे हे म्हणणे निश्चितच खोडून काढले पाहिजे. तू फार मोठी चूक करतो आहेस. मी पण वास्तववादी आहे आणि मी वास्तववादी आहे म्हणूनच सर्व पंचायतींना विनंती पत्रे पाठवीत आहे. त्यात तुला अर्थ वाटत नसला तरी मला नक्की वाटतो."

आणि खरंच अनपेक्षित असं घडलं. २७ जुलै रोजी म्हणजे संस्थेची स्थापना झाल्यापासून फक्त ६ आठवड्यांच्या नंतर मायनरला एक महत्त्वाचं पत्र आलं. त्या पत्रात पहिल्या बालग्रामविषयक ऐतिहासिक निर्णय होता. टिरोलमधील इम्स्ट पंचायतीने खालीलप्रमाणे पत्र पाठवले होते.

"तुमचे २२ जुलैचे पत्र आम्हाला मिळाले. बालग्रामची वसाहत निर्माण करण्याची तुमची जी नवीन कल्पना आहे, त्यात आम्हाला रस वाटतो आहे. पंचायतीच्या ह्यानंतर होणाऱ्या सभेत आम्ही तुमच्या विनंतीबद्दल चर्चा करणार आहोत. आम्हाला तुमच्याकडून अधिक माहिती खालीलप्रमाणे हवी आहे.

१. ही विनंती कोणत्या संस्थेच्या मार्फत पाठवली आहे ?
२. ही वसाहत कोण बांधणार आहे आणि त्यासाठी पैसा कोण देणार आहे ?
३. कोणत्या मुलांसाठी ही वसाहत आहे ?
४. ह्या मुलांची काळजी कोण घेणार ? सेवाभावी भगिनी की मानदमहिला ?"
"शाळेपासून फार दूर असलेली जागा नको" म्हणजे तुम्हाला नेमके काय म्हणायचे आहे ?
५. कोणत्या रस्त्यावरील जागा तुम्हास हवी आहे ?

आम्ही नुकतेच स्विझर्लंडला गेलो होतो आणि तिथल्या एका गावी आम्ही अशा प्रकारची एक मुलांची वसाहत बघितली आणि तेव्हापासून आम्हाला ह्या व्यवस्थेबद्दल उत्सुकता वाटत आहे."

मायनरला हे पत्र जेव्हा मिळाले तेव्हा त्याचा आनंद गगनात मावेना. त्याला एक नवीन आशेचा किरण दिसला. नंतर थोड्याच दिवसांनी तो इम्स्टला गेला. आणि सभापतींना भेटून त्यांच्याशी बोलणे केले आणि सर्व गोष्टी ठरल्या. इम्स्टमध्ये बालग्राम बांधायचे ठरले. सभापतीने मायनरला एक पठाराची जमीन स्वतः नेऊन दाखवली आणि सांगितले की मुलांची विनामूल्य वसाहत तिथे निर्माण करण्यास इम्स्टचे नागरिक नक्की अनुकूल राहतील. मायनरने आनंदाने ह्या दानाचा स्वीकार केला. पण नंतर काही दिवसांनी त्याच्या लक्षात आले की ह्या पठारावरच्या जागेवर पोचण्यास रस्तापण नाही आणि वीज-पाण्याचा पण पुरवठा नाही. पण कुठल्याही अडचणींवर मात करणे त्याच्या स्वभावात होते. ह्या व्यवस्थेसाठी लागणारा पैसा

उभा करणे ही पण अडचण त्याला वाटली नाही. सुदैवाने त्याला इम्स्टमधे एक बांधकामाचा कंत्राटदार भेटला. तो निवृत्त सैनिक होता आणि त्याने इम्स्टमधील ह्या बालग्रामचे पहिले घर उधारीवर बांधून देण्याचे मान्य केले. मायनर आता विद्यापीठात क्वचितच जाऊ लागला. बालग्रामच्या कामात त्याचा पूर्ण वेळ जाऊ लागला. त्याने एक जुनी वखार फार थोड्या पैशात खरेदी केली आणि तिथे तो काम करू लागला. तिथे सर्व स्वयंसेवक जमू लागले. प्रचारपत्रके ढीग लावून ठेवू लागले आणि संभाव्य देणगीदार आणि मित्रांच्या याद्या तयार करू लागले.

अशाप्रकारे २ डिसेंबर १९४९ ह्या दिवशी पहिल्या बालग्रामच्या पहिल्या घरावर छप्पर चढविण्याचा समारंभ झाला.

## अधिक कल्याणकारी मार्ग

ह्यानंतर जी गोष्ट घडली ती एखाद्या चित्रपटाप्रमाणे वाटते. युद्धामुळे बेचिराख झालेल्या जगातून ही बालग्राम वसाहतीची कल्पना जन्माला आली. आणि पुढे फोफावली. हा हळूहळू होत असलेला या चळवळीचा जन्म म्हणजे एक इतिहास घडत होता याची कुणालाच जाणीव नव्हती. घटनाबद्ध इतिहास व त्याची अनुक्रमणिका ही सुसूत्र पणे आकार घेत आहे हे कुणाच्या लक्षातदेखील आले नाही. अनेक छोट्या छोट्या घटना आणि त्याभोवती गुंफलेले हजारो अनुभव यामुळेच मायनरचा हा प्रकल्प निर्माण होऊ शकला आणि त्याच्या पार्श्वभूमीवर असंख्य विचारांचे मंथन, वर्षभर चाललेले संवाद-चर्चा यांचा परिपाक होऊन उद्ध्वस्त झालेल्या जगात एक नवीन शिल्प घडवून आणण्याचा पराक्रम झाला.

आपल्याला तो मनुष्य फक्त दिसतो. एका ध्येयाने प्रेरित झालेला आणि त्या ध्येयाच्या पूर्तीसाठी लागेल तो त्याग करण्यास तयार असलेला मनुष्य– जगात पुष्कळ माणसे अशी असतात की जी स्वतःला ध्येयवादी समजतात, आणि त्यांपैकी काही खरेखुरे ध्येयवादी असतात देखील. पण बहुधा ही माणसे निष्क्रिय असतात. ते एक तर दांभिक प्रचारक असतात किंवा स्वप्नाळू असतात आणि जेव्हा त्यांचा ध्येयवाद प्रत्यक्ष कसोटीला उतरविण्याचे कठीण काम त्यांना करावे लागते तेव्हा त्यांच्या पायां खालची वाळू हलके हलके घसरू लागते कारण जगाकडे बघण्याची त्यांची दृष्टी व प्रयत्न सत्याला सामोरे जाऊ शकत नाहीत आणि नेमके हेच गुण मायनरच्या अंगी निसर्गतः प्रकर्षाने वसत होते. त्यामुळे ह्या शेतकऱ्याच्या मुलाने आपला मार्ग सोडला नाही आणि तो कुणाच्या भुलावणीला फसला नाही. एक दिवस त्याला आपला रस्ता



स्वच्छ, समोर दिसला आणि तेव्हापासून तो ती वाट चालू लागला. तो रस्ता दगडांचा आहे हे त्याला पूर्णपणे माहीत होते. तो म्हणत असे, "मुलांना मदत करण्यास नुसते गोड शब्द पुरेसे नसतात तर त्यासाठी प्रत्यक्ष काम करावे लागते." आणखी पण त्याचे असे म्हणणे होते की, "मुले जेव्हा भुकेली असतात तेव्हा त्यांची भूक मिटविण्यास भाकरीची गरज असते. जागतिक सुधारकांची पवित्र व्याख्याने उपयोगी पडत नाहीत." म्हणून मला वाटते की बालग्राम चळवळीची ही जी वाढ हळूहळू झाली आणि नंतर त्याला जे कायम स्वरूप आले ही एक सुरस रहस्यकथा आहे. आणि जेव्हा ही कल्पना प्रत्यक्षात उतरली त्या दिवसापासून खऱ्या लढाईला सुरुवात झाली. त्यावेळी हर्मन मायनरला एक मार्ग नक्की स्वीकाराला लागला. तो म्हणजे एकतर ही लढाई लढणे किंवा जी माणसे निव्वळ शब्द आणि संकल्पांची शाब्दिक पखरण घालीत असतात त्यांच्यात सामील होणे. त्याने लढाई लढणाऱ्यांच्यात स्वतःला झोकून दिले आणि त्या क्षणापासून त्या बालग्रामच्या चळवळीला प्रत्यक्ष विकासाची दिशा लाभली. प्रस्थापित तत्त्वांशी तो एक न मिटणारा संघर्ष होता हे पण लक्षात घेतले पाहिजे. हा मनुष्य-स्वभावाचा एक सिद्धांत आहे. सुरुवातीस असे भासले की इम्स्ट मधल्या त्या पहिल्या बालसदनातच मायनरच्या ह्या सुधारलेल्या विचारांना मूठमाती मिळेल. पुष्कळ प्रतिष्ठित नागरिक एकत्र झाले आणि त्यांनी मायनरला खूप विरोध केला. त्याचे नावच पुसून टाकण्याचा प्रयत्न केला. त्याचे बिचाऱ्याचे नाव आत्तापावेतो फक्त विद्यापीठाच्या विद्यार्थ्यांच्या यादीतच होते. इतर कुणालाही त्याची माहिती पण नव्हती. त्याने केलेले अर्ज, पाठवलेली विनंतिपत्रके त्या अधिकाऱ्यांच्या टेबलावर पडत असत व बेफिकीर वृत्तीने ती कचऱ्याच्या टोपलीत फेकून दिली जात कारण अधिकाऱ्यांना वाटायचे की सामाजिक सुधारणा करण्याचा मक्ता फक्त त्यांचाच आहे. त्या खेड्यातल्या एका शेतकऱ्याच्या मुलाला काय समजतं ? टिरोलमधे सर्व ठाकठीक व्यवस्था असताना हा नवीन मनुष्य येथे येऊन काय करणार आहे ? अशा प्रकारची उदासीनता प्रत्येक नागरिकाला वाटत होती. मायनरला ह्या प्रतिकूल वृत्तीचा खूप त्रास झाला पण त्याने माघार घेतली नाही. तो काही स्वतःसाठी किंवा स्वतःच्या स्वार्थासाठी झगडा नव्हता. तो उपेक्षित मुलांच्या कल्याणासाठी आणि सर्व अनाथ मुलांचे भवितव्य उज्ज्वल व्हावे म्हणून झगडत होता. जरी सत्ता त्याच्या हातात नसली तरी भलाई त्याच्या बाजूने होती. दरवर्षी प्रयत्न करीत असताना त्याला थोडी-थोडी सत्ता मिळत होती. पण लढाई लढताना प्रतिपक्षाकडे बरेच अधिक सामर्थ्य होते. एका बाजूला चेष्टा, थंड प्रतिसाद आणि दरवाजे बंद करणे ही त्यांची आयुधे होती तर मायनरच्या हातात फक्त अविश्रांत श्रम हे एकच शस्त्र होते. कुणी माझ्यावर टीका केली तर मी ती लक्षात न घेता त्यावर प्रतिटीका करीत नाही. वर्तमानपत्रांतील टीकास्पद मजकुराला

मी उत्तरच देत नाही. मी कधी माझ्या चरित्र-हननाबद्दल तक्रार केली नाही. कुणावर मी प्रतिहल्ला पण केला नाही आणि करणार पण नाही. मी फक्त माझ्या ध्येयासाठी काम करतो. त्या उपेक्षित मुलांच्या कल्याणाची मला आस आहे आणि मी त्याला माझी सर्व शक्ती, बळ देईन. प्रतिकार करून मी त्यांचे भवितव्य संकटात आणणार नाही.''

मायनर स्वतःच्या हेतूशी प्रामाणिक राहिला. त्याच्या सौजन्यशीलतेमुळे प्रतिपक्षाला सामोरे जाऊन त्यांच्याशी हस्तांदोलन करून समझोता करण्याची त्याची नेहेमी तयारी असायची. पुष्कळ वर्षे अशी तपस्या केल्यावर त्याला खरी मान्यता मिळाली आणि एक दिवस जगाला कळून चुकले की मायनरने स्वीकारलेला मार्ग हाच अधिक कल्याणकारी मार्ग आहे !

मायनर म्हणत असे की, ''जुन्या संस्था किंवा जुनी वसतिगृहे ह्यांना काहीच यश मिळाले नाही असे मी कधीच म्हणणार नाही. त्या संस्थेच्या कार्यकर्त्यांनी जो त्याग केला आहे त्याबद्दल मला खूप आदर आहे. किंवा आपल्या समाजातील काही सामाजिकदृष्ट्या त्याज्य असलेल्या बालकांसाठी अशा संस्थांची गरज आहे. ही जी नवीन बालग्रामाची चळवळ मी उभी करीत आहे त्यामुळे इतर संस्थांतील प्रकाश मालवून तिथे आज अंधार करण्याची माझी मुळीच इच्छा नाही. फक्त त्यात काही सुधारणा व्हाव्यात असे मला वाटते.'' त्याने ह्या सुधारणा पण स्पष्टपणे विशद केल्या होत्या. ''जुने जे शैक्षणिक क्षेत्रातील अनुभव व अभ्यास आहेत ते व नवीन पण लक्षात घेता त्यावरून एक गोष्ट सिद्ध होते की एखाद्या मुलाला केवळ आईबाप नाहीत ह्या एकाच मुद्द्यावर तो जरी शारीरिक, मानसिकदृष्ट्या निरोगी असला तरी अनाथालयात किंवा एखाद्या बंद संस्थेत पाठविले जाते हे बरोबर नाही. ह्या बालग्रामच्या नवीन चळवळीमुळे जनतेचे ह्या वंचित मुलांकडे लक्ष वेधले जाईल आणि ते मूल लोकांच्या अधिक सान्निध्यात येईल. हे काम खासगी सामाजिक कार्य म्हणून होऊ शकेल आणि बालग्राम ही जी वसाहत बनेल, ती जगात सर्व ठिकाणी नमुना म्हणून उपयोगी पडेल. त्यामुळे अनाथ मुलांची सार्वत्रिक व्यवस्था होऊ शकेल. ह्या व्यवस्थेत अनाथ मुलांच्या संरक्षणाची जी नवीन पद्धती आहे ती अंमलात आणताना लक्षात येणारे सर्व धोके त्यांनी पत्करले आहेत. ही गोष्ट मात्र नक्की आहे की असंरक्षित मुलांचे भवितव्य घडविण्याची जी समस्या आहे त्याला फक्त बालग्राम हे एकच उत्तर आहे आणि तोच सर्वांत अधिक कल्याणकारी मार्ग आहे !''

१९४९ साली हर्मन मायनरने ह्या अधिक कल्याणकारी मार्गाचा अवलंब करून त्यासाठी एक नवीन संस्था स्थापन केली. त्या वर्षाच्या अखेरीसच बालग्रामच्या वसाहतीचा आराखडा तयार झाला आणि ह्या अधिक कल्याणकारी मार्गावरील पहिल्या नंबरचा मार्गदर्शक दगड रोवला गेला !



## संग्रामाचा काळ...

## सहानुभूति नको, जिव्हाळा हवा ! (पान ९८)

अजून मायनरच्या कामाचा पाया मजबूत बनला नव्हता. तरीदेखील १९५३ च्या डिसेंबरमधे जेव्हा मी प्रथम इम्स्टला गेलो तेव्हा तेथील बालग्रामची १० घरे बघून माझे मन हरखून गेले. ह्या वसाहतीत अनाथ मुलांना 'घरे' मिळालेली दिसली. हे सर्व कसं शक्य झालं ? १९४९-१९५३ ह्या चार वर्षांत हे प्रचंड काम कसं झालं ?

हर्मन या यशाबद्दल कधी विशेष बोलत नसे. कारण ही चार वर्षे तो सतत श्रम करीत होता, बरे-वाईट अनुभव घेत होता आणि वारंवार पराभव पण स्वीकारत होता. "माझी माझ्या कल्पनेबद्दल खात्री होती म्हणूनच मी हे सर्व सहन करू शकलो. ह्या कामात एकचित्त होण्यासाठी मी इतर सर्व गोष्टी सोडून दिल्या. मी माझा अभ्यास विसरलो आणि त्याबरोबरच माझे सुरक्षित भविष्य पण ! तरुणांच्या संघटनेचे काम मी सोडून दिले आणि त्या परगण्याचा युवक नेता म्हणून मी माझी लढाई स्वतःशी आणि जगाशी अशी एकदम सुरू केली. मी त्या वेळी एखाद्या वाळीत टाकलेल्या माणसासारखा जगत होतो. सर्व जुन्या मित्रांना भेटण्याचे मी टाळत असे. पण जेव्हा माझी ही कल्पना साकारत होती, तेव्हासारखा मुक्त समय मला माझ्या आयुष्यात मिळाला नव्हता. मला मदत करणाऱ्या मंडळींना गोळा करण्यात मला अति दूरवर असे परिश्रम करावे लागले. आणि सरतेशेवटी मला असे पहिले मित्र मिळाले. आम्ही रात्रीच्या रात्री एकत्र बसून प्रचारपत्रके तयार केली, विनंतीचे अर्ज लिहून काढले आणि दिवसभर सिनेमा थिएटरसमोर, हॉटेलसमोर आणि खासगी घरांसमोर उभे राहून ती वाटण्याचे काम केले. आम्हाला पोलिसांनी अनेक वेळा हटकले आणि तासन् तास आम्हाला प्रश्न विचारले गेले. ते एक युद्धच सुरू होते पण त्याच काळात पहिला मोठा विजय पण मिळाला. लवकरच आम्हाला दहाजण स्त्री-पुरुष मित्र भेटले, ज्यांनी एकजीव होऊन बालग्रामच्या कामाला सर्वस्वी मदत केली. जितका आम्हाला बाहेरून विरोध होत होता तितके आम्ही एकमेकांजवळ येत होतो आणि कृतनिश्चय होऊन काम करीत होतो. मला जेव्हा प्रथम १०० देणगीदार मिळाले, तेव्हाच माझी खात्री झाली की पैसे जमविण्याची माझी पद्धत अचूक आहे. मी लोकांकडून फक्त



दरमहा १ शिलिंग एवढीच वर्गणी मागत असे. एक शिलिंग ही फार मोठी रक्कम नाही आणि सर्वसाधारण माणसाला ती देणे जड जात नाही. पण जर एक हजार, किंवा दहा हजार किंवा १ लाख लोकांनी ही वर्गणी दिली तर ती रक्कम मोठी होईल आणि त्यातून ह्या उपेक्षित मुलांच्या कल्याणाचे काहीतरी भरीव काम होऊ शकेल. ह्या कल्पनेने प्रेरणा घेऊन आम्ही अथक श्रम केले व अनेक मित्र आणि आश्रयदाते आम्हाला मिळाले. जेव्हा आजच्या ह्या इम्स्टमधील छोट्या प्रयत्नांना वर्तमानपत्रांतून प्रसिद्धी मिळाली तेव्हा आमच्या मार्गातील पहिला अडसर दूर झाला. अर्ज भरभरून येऊ लागले. लोकांना दाखविण्यासारखे आमच्याजवळ काहीतरी होते. ते एक छोटेसे घर टिरोलच्या एका पठारावर उभारलेले होते. अवतीभवतीच्या दाट झाडीतील ते चिमुकले घर ! कुठे काही धागेदोरे नाहीत, किंवा सामजिक कार्यकर्ता म्हणून समाज ज्यांना ओळखत नाही. स्वतःच्या पायावर उभे राहावयाचे म्हणजे एक मोठे धाडसच होते, यात शंका नाही.

पुढच्या काही वर्षांत मायनरला ह्याचा पदोपदी अनुभव आला होता. त्याने एक फार मोठा अक्षम्य असा अपराध केला होता. खाजगी संस्थांनी आणि सरकारी खात्यांनी बालकल्याणाची जी परंपरागत पद्धती अवलंबिली होती आणि ज्याचा इष्ट परिणाम दिसत नव्हता तरी त्याचाच पाठपुरावा ते करीत होते. अशा ह्या सनातन पद्धतीस धक्के देण्याचे काम तो करीत होता. मायनरनें मनातल्या मनात त्यांना उत्तर दिले होते. तुम्ही जर कल्याणाची कामे मनापासून केली असती तर तुम्हाला माझे बोलणे बोचले नसते. पण तुम्ही स्वतःचे माप कमी घालता. सर्व शहाणी माणसे पोटा-साठी काम करीत असतात. पण जर तुम्हाला याच्या पलीकडे जायचे असेल तर व दुसऱ्यांना मदत करायची असेल तर तुम्हाला स्वार्थत्याग करावा लागेल आणि तो करायची तुमची तयारी नाही. तुम्हाला तुमच्या पुंजीवर दुसऱ्याने हात टाकलेला खपत नाही. तुम्हाला असे पण वाटते की समाजाची सेवा करायला फक्त तुम्हीच लायक आहात आणि म्हणूनच तुम्हाला माझा राग येतो ! मी एक नवीन सामाजिक कार्य करण्याचे धाडस केले आहे. त्यासाठी माझे स्फूर्तिस्थान तुमच्याऐवजी दुसरे कुणीतरी आहे. मला समाजकार्यात पडायचे नाही ! ती समाजसेवा आता भरपूर झाली आहे ! आता आपल्याला गरज आहे ती फक्त शेजाऱ्यावर प्रेम करण्याची. माझ्या मनात निराधार मुलांविषयी करुणा आहे. त्या मुलांना मदत करण्याच्या माझ्या कामात तुम्ही अडथळे का आणता ? तुम्ही समाजाचे कल्याण करणारे अनुभवी कार्यकर्ते ! मला विरोध का करता ?

पण हे सर्व तो उघडपणे बोलला नाही. ज्या वादविवादातून काही फलनिष्पत्ती नाही, त्यात पडायची त्याची इच्छा नव्हती. ही त्याची वृत्ती पण त्याच्या विरोधकांना

आवडत नव्हती. आणि त्यामुळे सर्वजण त्याला विरोध करण्यास तुटून पडले होते. त्यांनी पैसे देऊन गुप्तचर त्याच्यामागे लावले. वर्तमानपत्रांतून त्याच्या खाजगी जीवनावर शिंतोडे उडविण्याचा प्रयत्न केला. अगदी त्याच्या बालपणीच्या इतिहासापर्यंत ते पोचले. त्यांना कुठेतरी काहीतरी त्याच्या विरुद्ध शोधून काढून त्याला गप्प बसवायचे होते.

"परमेश्वरच फक्त काही गोष्टींना साक्षीदार असतो ही माझ्या दृष्टीने किती भाग्याची गोष्ट आहे ?" असे मायनरला वाटत असे. "त्यावेळी एखादी क्षुल्लक चूक माझ्या हातून झाली असती, तरी या लोकांनी मला माफ केले नसते."

परंतु कदाचित हे सर्व हल्ले आणि आलेल्या अनेक अडचणींमुळे मायनर अधिक कणखर बनला. अतिशय वेगाने वाढणाऱ्या ह्या कामाची धुरा सांभाळण्यासाठी व तरुणांच्या संघाची जबाबदारी पेलण्यासाठी एका मजबूत कार्यकर्त्याची जरुरी होती. "ज्यांना वास्तविक मी नकोसा वाटत होतो, त्यांनीच प्रत्यक्षात मला खूप मदत केली. त्यांनी मला खूप मजबूत आणि टणक बनविलं आणि त्यामुळेच मी ह्या क्रांतीला सामोरा जाऊ शकलो. ही क्रांती भलेपणा आणण्यासाठी केलेली क्रांती होती. माझ्या यशाचे श्रेय काही प्रमाणात मी माझ्या विरोधकांना अवश्य देतो."

इम्स्टमधे पहिले बालसदन विकसित होऊ लागले तसतसे त्याच्या समस्या पण वाढू लागल्या. पाण्याचे नळ टाकायला हवे होते. विजेची लाईन आणणे जरुरीचे होते, रस्ता करायला हवा होता, खडकाळ जमीन सपाट करून घ्यायला हवी होती. सर्व नीटनेटके करून घेण्यास पैशांची जरुरी होती.

मायनरला ही सर्व कल्पना होती. त्या वेळेपर्यंत त्याच्याकडे एक हजार शिलिंग पण खर्चायला नव्हते. सुदैवाने त्याचा मित्र, जो माजी सैनिक व कॉंट्रॅक्टर होता, त्याने अजून रकमेची मागणी केली नव्हती. त्याने घर बांधून दिले होते. धीम्या गतीने पण काळजीपूर्वक रीतीने , जेव्हा त्याच्या गवंड्यांना काम नसे, तेव्हा त्यांच्या-कडून तो हे काम करून घेई. पण काम वाढत होते. प्रगती होत होती. ज्यावेळी हे बांधकाम चालू होते त्यावेळी मायनर व त्याचे मित्र इन्सब्रुकमधे एकत्र डोकी घासून बालग्रामला आवश्यक असणाऱ्या आर्थिक स्थैर्याचा विचार करीत होते. नवीन संस्थेकडे एक शिलिंग नियमितपणे दान पाठविणाऱ्यांची संख्या दररोज वाढत होती. त्या ओंगळवाण्या दिसणाऱ्या कचेरीत काही लोक प्रत्यक्ष येऊन वर्गणीची रक्कम मायनरच्या समोर टेबलावर आणून ठेवीत असत. त्यांना हे सर्व काय चालले आहे ते पाहाण्याची उत्सुकता पण होती. काही लोक असे पण होते, की जेव्हा ते येऊन प्रत्यक्ष पाहत असत की फक्त काही थोडे स्त्री-पुरुष ह्या बालग्रामचे काम करीत



आहेत. तेव्हा नकारार्थी मान हलवून ते आपला शिलिंग घरी परत घेऊन जात. पण दुसऱ्या काही लोकांना ह्या छोट्या समूहाचे काम, त्यातला ध्यास व प्रामाणिकपणा स्पर्शून जात असे. आणि ते एक शिलिंगच्या ऐवजी १०० शिलिंगची नोटदेखील टेबलावर ठेवून जात असत. मायनरला आठवत असे, पहिल्यांदा सुरुवातीस गरीब लोकच यायचे, मग पेन्शनर आणि कामगार येऊ लागले . त्यानंतर मध्यमवर्गीय लोक आले आणि शेवटी श्रीमंत आले. ते खूप हिशोबी होते पण त्यानंतर त्यांनी खूप उदारतेने देणग्या दिल्या. कारण त्यांची खात्री पटली होती की, आम्ही जे करीत होतो ते चांगल्यासाठीच करीत होतो."

स्वतःच्या शेजाऱ्यावर प्रेमाचा वर्षाव करणे आणि त्यागाची भूमिका घेणे ह्या दोन गोष्टी मायनरने समाजात आणल्या आणि त्याचे प्रतीक म्हणून ही बालग्रामची चळवळ ठरली जी पुढे विकसित झाली.

## १९५० – इमारतींचे वर्ष

१९५० साल उजाडले. ह्या वर्षात खूप बांधकाम झाले. वसंतऋतूच्या सुरुवातीस मायनरने १००० वर्गणीदार व हितचिंतक मिळविले होते. त्यांच्या मदतीवर तो अवलंबून राहू शकत होता. ह्याशिवाय त्याला आणखी मोठ्या देणग्या पण मिळाल्या आणि त्यामुळे पहिल्या बालसदनाचे काम वेगाने पुरे झाले. एक दिवस तो अतिशय अभिमानाने बालग्रामच्या कचेरीतून फिरला आणि त्याने आपल्या मित्रांना जाहीरपणे सांगितले. "आज मी आणखी ४ बालसदने बांधण्याची ऑर्डर देत आहे." मित्रांना वाटलं की तो गमतीने बोलत आहे. पण त्याने लगेच खुलासा केला. "नाही, हे अगदी खरं आहे. आज मी इम्स्टला गेलो होतो. तिथल्या पंचायतीने मला रस्ता बांधून द्यायचे कबूल केले आहे. शिवाय ते वीज आणि पाणी पण पुरविणार आहेत. आणि हे सर्व त्यांच्यातर्फे देणगी म्हणून करणार आहेत. याचा अर्थ असा आहे की, या गोष्टीवर खर्च करण्यासाठी आपण जे पैसे बाजूला ठेवले आहेत त्या पैशांतून आपण आणखी घरे बांधू शकू. त्या पैशांतून आपल्याला ४ घरांच्या भिंती निश्चित उभ्या करता येतील. मग काय करायचे ते पाहू. जोपर्यंत भिंतींचे काम वर येईल तोपर्यंत आपल्याला आणखी मित्र मिळतील. पण आपल्या कामाचा विस्तार आत्ताच संपूर्ण ऑस्ट्रियाभर केला पाहिजे. ह्या लहानशा टिरोलमधून आपल्याला पुरेशी मदत मिळणार नाही आणि आपले बालग्राम हे ऑस्ट्रियातील सर्व मुलांसाठी खुले राहिले पाहिजे. माझी अशी पक्की खात्री आहे की आपल्याला सबंध ऑस्ट्रियातून देणगीदार

मिळतील."

आणि खरोखरीच तसे झाले. बालग्रामच्या कचेरीतून सर्व देशभर प्रचारपत्रके रवाना झाली. मायनरच्या प्रचंड आवेगाची कल्पना असणाऱ्या त्याच्या मित्रांनी क्षणाचाही विचार न करता त्याच्या कामात उडी घेतली. बालग्रामच्या यशस्वितेसाठी त्याने कुठल्याही निर्बंधांची पर्वा केली नाही. त्याला काही कष्ट किंवा अडथळे जाणवलेच नाहीत. त्याच्या डोळ्यांसमोर फक्त नवीन घर, नवे बालग्राम आणि आनंदी मुलांचे चेहेरे दिसत होते!

त्या वर्षी बालग्रामचा प्रचार पण खूप झाला. मी आमचेकडे असलेला सर्व फंड खर्चून टाकला. आम्ही जितकी अधिक पत्रके काढीत होतो तितके अधिक पैसे आम्हाला मिळत होते. आमची देणगीची रक्कम तिप्पटीने चौपटीने वाढली. त्यामुळे आमची बांधकामे झपाट्याने पूर्ण होऊ लागली. १९५० च्या अखेरीला मायनरने सर्व कर्जाची परतफेड केली होती आणि पहिली ५ घरे जवळपास पूर्ण झाली होती.

ह्या सबंध वर्षात मायनर स्त्रियांचा पण शोध घेत होता. कारण बालसदनांना अनुकूल माता हव्या होत्या. पण त्यासाठी नेमक्या कोणत्या स्त्रियांची निवड करावी हे अजून त्याला उमगत नव्हते. त्या अविवाहित असाव्यात हे तर नक्कीच. याशिवाय त्यांना स्वतःची मुलेबाळे नसावी. त्यांनी जगाचा थोडाफार अनुभव घेतलेला असावा. पण त्यांना प्रशिक्षण देण्याची गरज आहे का? बालक मंदिरात शिकविणाऱ्या शिक्षिकांतून त्यांची निवड करता येईल का? खेड्यात राहणाऱ्या स्त्रियांपेक्षा शहरातील प्रशिक्षित स्त्रिया अधिक उययुक्त ठरतील का? अनेक प्रश्न!

त्यालाच हे कळत नव्हते. त्याने स्वतःच्या कल्पनेप्रमाणे त्यांचे चारित्र्य व त्यांचे व्यक्तिमत्त्व यांचे काही आराखडे बनवले व स्त्रियांच्या मुलाखती घेतल्या. त्याने आपल्या मित्रांना पण त्यांच्याशी बोलायला सांगितले. त्याचे एक इन्सबुकमधील प्रोफेसर मित्र त्यांचे बरोबर विनावेतन काम करीत असत. त्यांच्याबरोबर तो नेहमी शैक्षणिक चर्चा करत असे. त्या प्रोफेसरना पण त्याने मातांच्या मुलाखती घेण्यास सांगितले. आणि अशाप्रकारे त्यांना पहिल्या सुरुवातीच्या माता मिळाल्या. त्या सर्व पाच जणी ग्रामीण भागातून आलेल्या होत्या. एकही अपवाद नव्हता. त्या अतिशय धार्मिक वृत्तीच्या आणि समजूतदार होत्या. आणि त्यांना आयुष्यभर मुलांची सेवा करावयाची होती. त्या अनुभवी आणि साध्या होत्या. मोठ्या कुटुंबातून त्या वाढल्या असल्यामुळे घर कसे चालवावे याची त्यांना पूर्ण कल्पना होती. त्यामुळे ९ मुलांची माता बनून राहाणे ह्या कल्पनेची त्यांना बिलकूल धास्ती वाटली नाही.



## दुर्दैवी मुलांची भरती

१९५० चा नाताळ सण जवळ येत होता. एका खेड्यातून ५ मुले असलेली एक बाई निघून गेली होती आणि सर्व गावाचे लक्ष त्या घटनेकडे लागलेले होते. मागच्या वर्षी त्या लहान मुलांचे वडील वारले होते, आणि एका लहानशा झोपड्यात ती मुले राहत होती. त्यांची अतिशय गरिबी होती. त्यामुळे ५ मुलांचा निर्वाह करण्यासाठी त्यांच्या आईला जीवापाड श्रम करावे लागत होते. आणि आता नाताळ ५ दिवसांवर आला असताना ती नाहीशी झाली होती. शेजारपाजाऱ्यांनी त्या मुलांची काळजी घेतली. सर्वांत लहान मूल फक्त ६ महिन्यांचे होते. सर्वांनी आसपास शोध घेतला होता पण बाई कुठे सापडत नव्हती. मग त्या मुलांच्यात जी सर्वांत मोठी ९ वर्षांची मुलगी होती तिने सुचविले की, घरासमोर असलेल्या खोल विहिरीत तिचा शोध घ्यावा. सर्वांनी विहिरीच्या काठावरून मोठमोठे दिवे लावून आत पाहिले तेव्हा ती तळाशी पडलेली दिसली. पाच मुले अनाथ झाली होती. "नाताळात आता त्यांनी कुठे जायचे?" गावच्या धर्मगुरूंनी यावर विचार केला आणि वर्तमानपत्रात वाचलेली एक बातमी त्यांच्या लक्षात आली. टिरोलमधे एक नवीन बालग्राम उघडले असून तिथे अनाथ मुलांचा संभाळ केला जातो. त्याने वर्तमानपत्राच्या कचेरीत फोन करून बालग्रामचा फोन नंबर घेतला आणि सरळ फोन लावला. कचेरीत मायनरने तो फोन उचलला.

ईम्स्टमधल्या बालग्रामात १९५० च्या नाताळपूर्वीच्या संध्याकाळी ५ घाबरलेली, रडणारी मुले दाखल झाली. पहिल्या घरात एका बाईने आपल्या थरथरत्या हातांनी नाताळचे झाड बनवले होते. त्या झाडावर खूप मेणबत्त्या लावल्या होत्या. आणि त्या मेणबत्त्यांचा प्रकाश त्या ओटीवरच्या खिडक्यांतून बाहेर फाकला होता. ते सर्व दृश्य पाहून बऱ्याच लोकांना आपले अश्रू आवरणे अशक्य झाले. "या, आपण सर्वजण मिळून आता नाताळचा सण साजरा करू या; कारण इथे आपण छोटासा स्वर्ग निर्माण केला आहे."

मायनरला आता आपल्या स्वतःच्या संघटनेतील काही मुलांना बालग्रामात ठेवता येणे शक्य झाले होते. त्या संघटनेत अशी काही अडचणीत सापडलेली मुले होती की त्यांचे पुनर्वसन करणे आवश्यक होते. त्यांच्यासाठी त्याला एक घर बांधायचे होते. त्याप्रमाणे त्या मुलांना आणून ठेवल्यावर ती एक बालग्रामची वसाहत पूर्ण झाली.

आणि मग आणखी मुले आली. अनाथ मुले, टाकलेली मुले, छळ केली जाणारी मुले, वाट चुकलेली मुले आणि वृत्तीने बेचैन झालेली मुले सर्वजण येऊ

लागली.

नंतर पीटर आला.

जवळच्या खेड्यात राहणाऱ्या ९ वर्षांच्या पीटरला आईवडील नव्हते. तेव्हा-पासून तो एका म्हाताऱ्या बाईकडे राहत होता. ती म्हातारी जेव्हा मेली तेव्हा तिने स्वतःचा पलंग पीटरला दिला. त्या पलंगावर ती दोघे झोपत असत. जेव्हा त्या म्हातारीची स्मशानभूमीत रवानगी झाली त्या रात्री त्या म्हातारीची मोठी मुलगी पीटर जवळ त्या पलंगावर झोपली आणि पीटरला ते घर सोडावे लागले. आता त्याला कुठे बसायलादेखील जागा नव्हती. कारण त्याची एकमेव वडिलार्जित खाटदेखील तिच्या नातेवाईकांनी त्याच्याकडून हिसकावून घेतली होती. तो जेव्हा बालग्रामात आला तेव्हा म्हणाला, "माझा तुमच्या कुणावरच आता विश्वास राहिला नाही आणि माझ्याकडून पण तुम्ही चांगल्या वागण्याची अपेक्षा करू नका."

मग क्लाउस आला. जानेवारी १९५१मधे इम्स्टला तो १२ वर्षांचा मुलगा आपण होऊन आला होता. त्याने वर्तमानपत्रात बालग्रामची माहिती वाचली होती. तो मायनरला म्हणाला, "आता यानंतर मला घरात राहाणे अशक्य आहे. कृपा करून मला इथे ठेवून घ्या."

चौकशीअंती माहिती कळली की बरेच वर्षांपासून त्याला आईचे सुख मिळाले नव्हते. आणि आई गेल्यापासून बाप दारू पिऊन व्यसनी बनला होता. एका झोपड-पट्टीत दारूड्या बापाच्या सोबत हा मुलगा वाढत होता. वस्तीतील शेजारी पण दुर्व्यसनी आणि वाईट वृत्तीचे होते. त्यामुळे त्याला भूक, दुर्वर्तन व वंचना याशिवाय दुसऱ्या कशाचाच अनुभव आला नव्हता. शेजाऱ्यांना वाटायचे की हा मुलगा पण बिघडलेला आहे. तेव्हा त्याला हाकलून दिलेला बरा. तो मुलगा म्हणाला, "जर तुम्ही मला माझ्या घरच्या लोकांबद्दल काही माहिती विचारलीत तर मी हे सर्व फोडून तोडून टाकीन. त्यापेक्षा मला येथून पण घालवून द्या. नाहीतरी मी वाईटच मुलगा आहे."

आणखी काही आठवडे गेले. क्लाउस ज्या घरात राहात होता तिथून एक दिवस मायनरला बोलावणे आले. त्या बालसदनातील कुटुंबाचे संध्याकाळचे जेवण चालले होते. क्लाउसच्या मांडीवर १ वर्षांची लिसा बसली होती आणि तो तिला अतिशय काळजीपूर्वक भरवीत होता. "पहिला घास लिसाचा आणि दुसरा घास क्लाउसचा" असे तो प्रत्येक घासाबरोबर म्हणत होता आणि ह्यावेळी त्याच्या चेहेऱ्यावर समाधान, आनंद दिसत होता. आपल्या लहान बहिणीबरोबर खेळायला त्याला आवडत होते.



त्या घराची गृहमाता प्रेमाने हसून सांगत होती, "दररोज झोपायला जाण्यापूर्वी तो छोट्या लिसाच्या खोलीत जातो आणि ती नीट झोपली की नाही हे पाहातो." एकदा ती आजारी झाली तेव्हा त्याने आजारीपणाचे सोंग करून शाळेत जाण्याचे टाळले आणि तो तिच्यासोबत राहिला. आणि तिच्या अंथरुणापासून हलला नाही. त्याला तिची इतकी काळजी वाटत होती की रात्री पण तो खूप वेळा उठला. आईच्या दरवाज्यावर खटखट करून लिसाची प्रकृती कशी आहे ते विचारीत होता. थोड्याच दिवसांत क्लाउसने घरची जबाबदारी संभाळायला सुरुवात केली आणि प्रत्येक कामात आईला मदत करू लागला. तो बाजारात जायचा, लाकडे तोडायचा, चूल पेट-वायचा आणि दर रविवारी आपल्या सर्व पाचही भावंडांना घेऊन चर्चला जायचा.

ह्या दिवसांत त्याच्या आईने मायनरला बोलावून घेऊन सांगितले, "तुम्ही आता क्लाउसला ओळखू पण शकणार नाही. तो आता शांत, समाधानी झाला आहे. त्याचा स्वतःविषयीचा न्यूनगंड निघून गेला आहे. दुसऱ्याची मदत करण्यात त्याला आनंद वाटतो आणि तो कठीण काम करू शकतो, ह्याचा त्याला आत्मविश्वास वाटतो. एका बिघडलेल्या मुलाच्या अवस्थेतून तो आता एक चांगला मदतगार मुलगा बनला आहे. प्रेमाचा शब्द ऐकला की त्याला कृतज्ञता वाटते. विशेषतः जेव्हा तो संध्याकाळी अंथरुणावर पडतो तेव्हा मी त्याचे जवळ जाऊन त्याचा हात हातात घेऊन त्याला 'शुभरजनी' म्हणते तेव्हा त्याला धन्य वाटते. तो पण मला चमकणाऱ्या डोळ्यांनी सांगतो, "आई, तू पण स्वस्थपणे झोप. तुला धन्यवाद." मला अजून हे मात्र कळले नाही की मी त्याच्याशी प्रेमाने वागते आणि मदत करते म्हणून तो मला मानतो की मी त्याच्या छोट्या बहिणीची– लिसाची काळजी घेते म्हणून मी त्याला आवडते. एक गोष्ट मात्र नक्की की छोट्या लिसाने त्याला जिंकून घेतले आहे.

आज क्लाउस ३५ वर्षांचा गृहस्थ झाला आहे. त्याचे लग्न झाले आहे. आणि त्याला ३ मुले पण आहेत. तो फर्निचर बनविण्याचा व्यवसाय करतो. मातृदिनाच्या दिवशी तो मुलांसाठी खाऊ घेऊन बालग्रामात येतो.

मग आला इवान.

रशियनांनी ताबा घेतल्यानंतर जन्मलेल्या ह्या मुलाची काहीच माहिती मिळाली नव्हती. युद्धानंतरच्या गोंधळात आई बेपत्ता झाली होती आणि त्याच्या आजीने प्रेमाने त्याचा सांभाळ केला होता. त्या आजीसारखी प्रेमळ आजी मिळणे कठीण! पण नंतर दुर्दैव आडवे आले आणि २ वर्षांच्या सशक्त निरोगी इवानची आजी एक दिवस मृत्युमुखी पडली. तो जगात एकटा, अगदी एकटा पडला. जेव्हा तो ४ वर्षांचा झाला तेव्हा एकदा मायनर बालग्रामात फिरत असताना त्याच्या अंगावर उडी मारून

चढला. त्याने मायनरला विचारले, "हे खरे आहे का, मला सांगा की मी तुम्हाला रशियात सापडलो आणि तेव्हापासून मी तुमचा झालो ?"

"होय इवान, आता तू कायमचा आमचा आहेस."

मग आली मारिआ.

तिचा जन्म विमानात झाला होता. तिचे वडील बेपत्ता होते. तिची आई टिरोलच्या निर्वासितांच्या छावणीत ३ मुलगे आणि छोट्या मारिआला घेऊन दाखल झाली. तिथून ती एका दुधाच्या डेअरीत कामाला जाऊ लागली. आणि तिन्ही मुलगे पण शेतात काम करू लागले. त्यांना जर्मन भाषा जवळपास येतच नव्हती. त्या आईने नवीन घरात बस्तान बसविण्याचा व मुलांना नीट सांभाळण्याचा खूप प्रयत्न केला. तिच्याबद्दल लोकमत चांगले होते. ती एखाद्या पुरुषासारखे काम करायची. हे सर्व कष्ट ती तिच्या मुलांसाठी करायची. हिवाळ्यात ती स्वयंपाकिणीचे काम करीत असे. आणि कामाला जाताना मारिआला सोबत नेत असे. एकदा थंडीच्या दिवसात बाजार करण्यासाठी ती शेजारच्या गावी गेली होती आणि उशिरा घरी येत होती. बर्फ खूप पडला होता. पर्वताची उंच उंच रांग दिसत होती. एकदम तिच्या लक्षात आलं की गरम वाऱ्याचा झोत येऊ लागला आहे. यामुळे आता बर्फाचे तुकडे सुटून पडू लागतील ही भीती वाटून आणि रात्रपण फार झाली होती म्हणून ती एका वाटेतल्या शेतकऱ्याच्या घरी आश्रयाला गेली. शेतावरील एका लहानशा झोपडीत रात्री झोपली असताना एक मोठी बर्फाची शिळा वेगाने आली आणि त्या झोपडीला वाहून घेऊन गेली. दुसऱ्या दिवशी सकाळी मारिआच्या मृत आईला बर्फातून खणून काढावी लागली. मारिआ पोरकी झाली. तिचे भाऊ पण तिला संभाळू शकले नाहीत.

नंतर ५ मुले एकदम आली.

त्याचे वडील सरकारी नोकरीत होते. त्यांची सांपत्तिक स्थिती पण चांगली होती. कारण वडिलार्जित इस्टेट मिळाली होती. त्यांच्याकडे एक गाडी पण होती. एकदा ते व त्यांची पत्नी मोटारीतून हिंडायला गेले होते. जानेवारीतली बर्फाळ संध्याकाळ होती. एका ओढ्यावर पुलावरून गाडी जात होती. दाट जंगलातल्या छोट्या रस्त्याने गाडी जात होती. गाडी अचानक घसरू लागली. पुलावरून खाली पडली, २/३ वेळा गटांगळ्या खाल्ल्या आणि ओढ्याच्या मध्यावर येऊन थांबली. दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हा ती पाच मुले झोपून उठली, तेव्हा ती पोरकी झाली होती. त्यांचे आईबाप मेले होते आणि ओढ्याच्या तळाशी त्यांची प्रेते पडली होती. बर्फ पडू लागला होता आणि कुणाच्याही लक्षात ही घटना आली नव्हती. अतिशय भयंकर असे दुर्दैव ! पण निदान पाची मुलांची ताटातूट झाली नव्हती. सर्वजण एकत्र बालग्रामच्या एका बालसदनात वाढत होते !



## नवीन घर

आणि अशी ती सर्व मुलं आली. एकापाठोपाठ एक पहिली पाच बालसदने भरून गेली आणि त्यातून मुलांचे आनंदी जीवन सुरू झाले. १९५१च्या उन्हाळ्यापर्यंत एकूण ४५ मुले झाली. हर्मन मायनरचा प्रकल्प झाला. त्याचा शेवट यशस्वी होणार की नाही ? पुष्कळदा वाटायचे की होणार नाही. सर्व वेगळं होतं आणि वेगळंच होतं. बालसदनांच्या मातांना पण ह्या नवीन कामात स्वतःची भूमिका तपासून घ्यायची होती आणि हे काम काही सोपं नव्हतं. त्यांच्यापाशी अजून मुलांचे कपडे धुण्याची मोरी नव्हती. बाहेर एक नळ सोडलेला होता. त्याच्या खाली कपडे धुवावे लागत असत. किराणामाल इम्स्टहून वाहून आणावा लागे. जमीन खडबडीत होती आणि मळलेली नव्हती. लहान मुलांसाठी बालवाडी नव्हती. इम्स्टच्या लोकांचा अजून विश्वास बसला नव्हता. ही गोष्ट नंतर एकदा त्या मेयरने कबूल पण केली होती की सुरुवातीस तो चुपचाप रात्रीचा जायचा. बालसदनाभोवती घिरट्या घालून सर्व ठीक चालले आहे ह्याची खात्री करून घ्यायचा.

अशा प्रकारे १९५१ हे वर्ष प्रत्यक्ष अनुभवांचे होते. प्रात्यक्षिकांची ती कसोटी होती. हळूहळू तिथल्या कौटुंबिक जीवनाचा एक ढाचा तयार झाला. आणि नंतर तो प्रत्यक्ष कार्यक्रम म्हणून अंमलात आणला गेला.

हर्मन मायनर बालग्रामचा पहिला संचालक बनला. अचानक तो ५० मुलांचा बाप बनला आणि त्याला त्याची ही भूमिका खूप आवडली. दिवसभर तो मातांना सल्ला देत असे, मदत करीत असे. आणि त्यांच्या समस्या दूर करीत असे. रात्री मात्र तो इन्सब्रुकच्या आपल्या कचेरीत फिटझ् बरोबर काम करीत असे. बालग्रामच्या अनेक नोंदी कराव्या लागत असत. त्यांच्या नावाची कार्डे, त्यांना प्रतिबंधक लस टोचल्याची सर्टिफिकेटस् नीटपणे फाईलमध्ये लावून त्यांचे व्यवस्थित टिपण ठेवले जाई. सुरुवातीपासूनच प्रत्येक नोंद व्यवस्थित ठेवण्यावर मायनरचा कटाक्ष होता. ह्या व्यवस्थेत हेळसांड चालण्यासारखी नव्हती. नाहीतर इतर संस्थांना टीका करण्याची संधी मिळाली असती. शासनाच्या वेगवेगळ्या खात्यांकडे पत्रव्यवहार करावा लागे. गुन्हेगार मुलांची माहिती पाठवावी लागे, कल्याणकारी संस्थांशी पत्रव्यवहार करून दत्तक देण्याबाबत कोर्टात जावे लागत असे. सर्व प्रकारच्या नवीन जबाबदाऱ्यांबद्दल प्रथम माहिती करून घ्यावी लागत असे आणि नंतर त्यांची अंमलबजावणी करावी

लागे.

१९५१ सालच्या उन्हाळ्यापर्यंत बालग्रामचे जीवन सुरळीत सुरू झाले होते. शाळेतून पाहिले रिपोर्टस् आले आणि सरासरी प्रत्येक मुलाची प्रगती चांगली झाली होती. खरं पाहता, बालग्राममधे येण्यापूर्वी या मुलांना शाळेचा गंधदेखील नव्हता. ह्या शिक्षणाच्या प्रश्नाचे पण उत्तर नीट सापडले होते. नेहमीच्या शाळेत जाणाऱ्या मुलांची उपस्थिती स्पृहणीय होती. मायनरच्या विरोधकांना नेमके ह्याच ठिकाणी काहीतरी टीकेला लक्ष्य मिळेल असे वाटले होते. त्यांनी भविष्य वर्तविले होते. "मुले शाळेत जाईनाशी झाली म्हणजे आपोआप त्याच्या योजनेला मूठमाती मिळेल, जेव्हा ती मुले इम्स्टच्या शाळेत जाऊन धिंगाणा घालतील, तेव्हा त्यांचे ते दुर्वर्तन पाहून वरिष्ठ अधिकाऱ्यांना दखल घ्यावी लागेल आणि हा धिंगाणा थांबविण्याकरता मुलांना शाळेतून हाकलून द्यावे लागेल."

पण झालं उलटंच. बालग्राममधले मुलगे आणि मुली शाळेत जात असताना इतर मुलांइतक्याच खोड्या करू लागली. कमी नाही आणि जास्त पण नाही. त्यांच्या बद्दल फार थोड्या तक्रारी येत. याउलट बालग्रामच्या लहान मुलांना वरिष्ठांजवळ जाण्याची अधिक संधी देण्यात यायची. त्यामुळे वरीष्ठांच्या मनात नकळत सहानुभूती निर्माण होत असे. कालांतराने ही गोष्ट सिद्ध झाली की बालग्रामच्या मुलांची शाळेतील उपस्थिती हाच या चळवळीतील शिक्षणाचा भक्कम पुरावा आहे आणि ह्या मुलांना गावातील संस्थांच्या शाळेतून पाठविणे हाच एक त्या उपेक्षित वंचित मुलांना एकमेव मार्ग आहे. मायनरने सर्वसाधारण मुलांच्या शेजारची जागा ह्या अनाथ मुलांना मिळवून दिली. इम्स्ट शहरातील चांगल्या लोकांच्या मुलांच्याजवळ शाळेतील बाकांवर ही मुले बसू लागली. अनाथ मुलांच्या शेजारी बसणारा मुलगा सरपंचाचा असेल किंवा सफाई कामगाराचा असेल. अनाथ मुलीच्या शेजारी बसणारी मुलगी औषधांच्या विक्रेत्याची मुलगी असेल किंवा रस्ता साफ करणाऱ्या कामगाराची मुलगी असेल. सर्व साधारण जगातले जे जीवन आहे त्या जीवनाच्या प्रवाहात अनाथ मुले पण सामावली गेली. नंतरच्या शालेय जीवनात जेव्हा ह्या मुलांचा प्रवेश झाला तेव्हा त्यांचे जीवन खऱ्या अर्थाने नेहमीच्या सर्वसाधारण चाकोरीत जाऊन बसले. सर्वसाधारण सामाजिक जीवनप्रवाहात एकरूप होणे ही एक उपाययोजनाच होती. कारण आत्तापावेतो जे मूल निराशेत जगत होते, सर्वांना अप्रिय होते, त्याज्य होते, कारण त्याला घर नव्हते आणि अनाथालयात दाखल होण्याशिवाय दुसरे जीवन नव्हते. अशा मुलाला सर्वसामान्य बनविण्याची ही एक जीवनपद्धती होती.

सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे अनाथालयाच्या खर्चाच्या तुलनेत बालग्रामच्या



मातेला दरमहा एक ठराविक रक्कम तिचा घरखर्च चालविण्यासाठी मिळत असे. समाजकल्याणविषयक संस्थांना ही गोष्ट एखादा बॉंब पडल्याइतकी भयानक वाटली. सामुदायिक रसोडा कुठे आहे ? जेवण्याचा हॉल कुठे आहे ? घरांना ऊबदार ठेवण्यासाठी गरम हवा कुठून येते ? विजेचा मध्यवर्ती मीटर कुठे आहे ? धान्य भरण्याचे कोठार आणि जेवण वाढण्याची जागा कुठे आहे ? ह्यापैकी एकही गोष्ट इम्स्टच्या बालग्रामात दिसत नव्हती.

मायनरची इच्छा होती की प्रत्येक कुटुंबाने आपले कौटुंबिक जीवन स्वतंत्रपणे जगावे आणि त्यात त्याला यश आले. माता आणि मुलं आपापल्या पिशव्या घेऊन जवळच्या दुकानात खरेदीला जाताना दिसू लागली. प्रत्येक बालसदनात माता स्वतःच्या स्वतंत्र स्वयंपाकघरात स्वतःच्या आवडीप्रमाणे जेवण बनवू लागली. कधी कुणाच्या घरात नूडल्स बनत असत, तर कधी तुर्की पक्वान्ने बनविली जात. प्रत्येक कुटुंबाने आपली एक स्वतंत्र जीवनपद्धती बनविली आणि हळूहळू त्या कुटुंबात आपले एक विश्वच निर्माण झाले, अनाथालयाचे विस्तृत, कळाहीन घर संपुष्टात आले आणि प्रत्येक घर चालविण्याची जबाबदारी आईवर पडल्यामुळे आणि सर्व काम तिलाच करावे लागत असल्यामुळे ती स्वाभाविकच खर्चात काटकसर करू लागली. मुलांना विजेच्या दिव्याची बटणे बंद करण्याची सवय लावल्यामुळे विजेच्या बिलांत कपात झाली. प्रत्येक घरच्या परसात भाजीपाला लावला गेला. त्यामुळे मुलांना ताजी भाजी, फळे खायला मिळू लागली आणि घरखर्चात बचत झाली. प्रत्येक कुटुंबाला मिळालेल्या ह्या आर्थिक स्वातंत्र्यामुळे घरात होणारा खर्च तर कमी झालाच पण मुलांना त्यातून उत्तम शिक्षण मिळाले. अनाथांच्या कुटुंबात बचत सुरू झाली. मातेला हिशोब ठेवावा लागला. अंदाजपत्रक करावे लागले आणि कित्येक वेळा मुलांना बजावावे लागले की, "हे पहा, आज जेवणात फक्त बटाट्याचा रस्सा केला आहे. त्यामुळे वरण केले नाही तरी रश्शाबरोबर पोळी खा म्हणजे जी बचत होईल त्यातून ह्या रविवारी आपण पक्वान्न करू शकू." ह्यामुळे मुलांना स्वयंपाकघर खूप आवडू लागले आणि तिथे ती जमू लागली. तिथे बसून आईला स्वयंपाक करताना पाहणे त्यांना आवडायचे. तिथे बसल्यावर मग भुकेच्या तोंडी काही वस्तू पण पडायची. मुली आईला स्वयंपाकात मदत करायच्या तर मुलगे भांडी घासून साफ करायचे. सर्व मुलांना वाटायचे की हे माझे घर आहे, माझे घर आहे. इथे मला काम केले पाहिजे, मदत केली पाहिजे, वाटून खाल्ले पाहिजे, म्हणजे सर्वांचेच पोट भरेल.

## व्हिएन्नाच्या वाटेवर

१९५१ साली जेव्हा हे पहिले बालग्राम आकार घेऊ लागले होते त्याच्यात वारंवार सुधारणा होत होत्या आणि शेवटी त्याला एक निश्चित रूप येऊ लागले होते, त्यावेळी हर्मन मायनरचे सर्व प्रयत्न टिरोलच्या बाहेर आणखी वर्गणीदार जमविण्याचे होते. एक दिवस त्याने आपल्या विश्वासू मित्रांना सांगितले की, "आपल्याला लवकरच व्हिएन्ना ह्या राजधानीच्या शहरात आपले एक ऑफिस उघडावे लागेल. टिरोल मध्ये बसून आपल्याला व्हिएन्ना जिंकता येणार नाही.. त्यासाठी आपल्याला राजधानीत ठाण मांडून बसावे लागेल." असे म्हणून तो व्हिएन्नाला निघाला. त्याची जुनी ट्रंक मोडली होती म्हणून त्याने पुठ्ठ्याचे खोके घेतले आणि त्यात नित्य लागणाऱ्या वस्तू व कपडे बांधून घेतले. दुसऱ्या दिवशी तो भग्नावस्थेत असलेल्या व्हिएन्नाच्या पश्चिम विभागीय स्टेशनासमोर जाऊन उभा राहिला. त्याची पुठ्ठ्याची पेटी एका हातात घेऊन दुसऱ्या हाताने तो शहराचा नकाशा पाहात होता. एक क्षणभरदेखील त्याला चुकल्यासारखे वाटले नाही. तो समोरच्या रस्त्याने व्हिएन्नात जागा शोधायला निघाला आणि ती त्याला सापडली पण. सीटीहॉलच्या पाठीमागची एक छोटीशी खोली. त्याला त्याच्या बालग्रामच्या कल्पनेत रस घेणारा एक तरुण उत्साही कार्यकर्ता पण मिळाला.

मायनरची योजना फलद्रूप होऊ लागली. व्हिएन्नाच्या कचेरीतून झालेल्या प्रकाराला चांगला प्रतिसाद मिळाला. व्हिएन्नाच्या चौकातील मोठे सोन्याचे घड्याळ लवकरच त्याच्या कामाची टिकटिक करू लागले. एक वर्षात मित्र व आश्रयदार व वर्गणीदार यांची संख्या दहापटीने वाढली आणि एक लाख मार्कस् जमले. आता इम्स्टच्या वसाहतीत वाढ करणे शक्य होते. १९५२मध्ये आणखी नवीन बालसदने बांधली गेली आणि एक समाजमंदिर पण उभे राहिले. ह्या समाजमंदिरात एक बालवाडी, एक करमणुकीची जागा, एक धोब्याची भट्टी, एक शिवणाची खोली, एक छंद व्यवसायाची खोली, आणि मुलांना देणगी मिळालेले कपडे ठेवण्यासाठी सोयीस्कर अशी कपाटे पण बनली. आता इम्स्टही खरीखुरी बालग्रामची वसाहत बनली. छोटीशी पण नमुनेदार वसाहत.

१९५३ डिसेंबरमध्ये हर्मन मायनरने वार्ताहरांना बोलावून जेव्हा बालग्रामची कल्पना विशद करून सांगितली तेव्हा मी एकटा पत्रकार हजर होतो. तेव्हा ह्या बाल ग्रामात १० बालसदने चालू होती. त्यावेळी मायनरला व त्याच्या मित्रांना ४ वर्षांच्या बांधकामाचा अनुभव पाठीशी होता. सुरुवातीच्या सर्व अडचणी दूर झाल्या होत्या



पण तरीदेखील भलाईसाठी सुरू केलेली मायनरची ही क्रांती ढासळण्याच्या धोक्यात होती. मायनरला अनेक चिंता होत्या. अजून पुष्कळ मित्र व आश्रयदाते मिळावयाला पाहिजे होते. शिलिंग देणाऱ्या वर्गणीदारांचा एक संघ बनविण्यात यश मिळत होते. पण हा संघ आणखी मोठा व्हायला हवा होता. ह्या कामासाठी आतून बाहेरून मजबुती यायला पाहिजे होती. कारण अजून त्याची वाढ होत होती !

## स्थानिक वार्ता

लिंझला थोडे दिवस जाऊन मायनर इम्स्टला परत गेला होता. जाताना तो मला त्याच्या योजनेबाबत बेचैन करून गेला होता. माझे मन त्या विकासाच्या कामात रमू लागले होते. भलाईसाठी करावयाच्या कामाचे माझे आकर्षण वाढले होते आणि मी त्या विचाराने पेटून निघालो होतो. इम्स्टच्या या माणसाला मदत करण्याची माझी तीव्र इच्छा होती आणि त्याच्यासोबत राहून मला झगडायचे होते. लिंझला एका वर्तमानपत्राचा मी हंगामी संपादक होतो आणि त्यामुळे माझे उत्पन्न बऱ्यापैकी होते. मायनरच्या खांद्याला खांदा लावून मला काम करावेसे वाटत होते.

पण रोजच्या जीवनाच्या रामरगाड्यात मी पुन्हा गुरफटलो आणि पुन्हा एकदा मी हर्मन मायनरला निराश करणार ही मला खात्री वाटू लागली. हे खरं आहे की मधल्या वेळात तो पण लेख छापून आला होता. पण राजकीय घडामोडींना पुन्हा महत्त्व आले होते.

तीन आठवड्यांत मला हर्मनची काहीच बातमी नव्हती, आणि मला पण त्याच्या इम्स्टमधील कामाचा विचार करायला फुरसद मिळाली नव्हती. कधीमधी तो विचार आला, तरी आजूबाजूचे राजकीय वातावरण इतके क्षुब्ध होते की ते नवनवीन रिपोर्ट छापून आले की, माझ्यातला पत्रकार जागृत व्हायचा. कुठे हरताळ सुरू होता तर कुठे निदर्शने चालू होती. पैशांची किंमत रोज घसरत होती. शांततेसाठी करार होत नव्हते आणि तुल्यबळ राष्ट्रे आपापली ताकद अजमावीत होती.

एक दिवस माझ्या टेबलावर एक रिपोर्ट येऊन थडकला. तो स्थानिक संपादकासाठी होता म्हणून मी त्याला देण्यासाठी माझ्या सेक्रेटरीकडे तो देत होतो. तेवढ्यात त्यातला मजकूर मला दिसला आणि एखाद्या बाँबमुळे व्हावा तसा क्षोभ माझ्या मनाला झाला आणि मी तो वाचू लागलो.

माझ्या शहराच्या जवळील एका गावात एक खून झाला होता. एका माणसाने आपल्या बायकोला आपल्या ५ वर्षांच्या मुलाच्या समक्ष नदीत बुडवून मारले होते.

त्या खुनी माणसाला अटक झाली होती आणि त्या मुलाची रवानगी अनाथालयात झाली होती. याशिवाय त्या रिपोर्टात आणखी काही नव्हते. पण त्याने मी मात्र कार्य-प्रवृत्त झालो. माझ्या डोळ्यांसमोर तो लहान मुलगा मला दिसू लागला. तो आपल्या मृत आईच्या समोर उभा राहिला असेल. काय झालं आहे हे समजण्याचं त्याचं वय नसलं तरी त्याला एवढं नक्की कळलं असेल की काहीतरी भयंकर दुर्घटना घडली आहे आणि आता आपली आई काही आपल्याला मिळणार नाही. ह्या घटनेशी आपल्या वडिलांचा काहीतरी संबंध नक्की असेल. कारण इतर लोक बापाच्या मिठीत विसावलेल्या त्याला त्याच्यापासून दूर घेऊन गेले होते. कदाचित् तो ओरडला असेल. त्याने आक्रोश केला असेल. पण लोकांनी त्याला शांत केला असेल. तो एका गाडीत समाजसेवकाशेजारी बसला असेल. नंतर रडतरडत तो दुर्बल मुलगा अनाथा-लयाच्या गेटमधून आत गेला असेल आणि पुन्हा कधीही घर मिळणार नाही अशी त्याची परिस्थिती असेल.

का कुणास ठाऊक, पण जिथे घटना घडली होती तिथल्या पोलिसचौकीला मी फोन केला. त्या मुलाचे व त्या अनाथालयाचे नाव विचारले. मला हे करून काय करावयाचे होते ? मला खरंच तेव्हा कळत नव्हतं. मी फक्त माझ्या आंतरिक ऊर्मीला प्रतिसाद दिला होता. त्या उलरिश नावाच्या मुलाचे चित्र माझ्या डोळ्यांसमोरून हलेना.

दुसऱ्या दिवशी मी हर्मन मायनरला इम्स्टमधे फोन लावला आणि त्याला विचारले की, ह्या उलरिश नावाच्या मुलाला तो इम्स्टच्या बालग्राममधे प्रवेश देईल का ? पण ते शक्य नव्हते. कारण इम्स्ट पूर्ण भरलेले होते. एकही जागा रिकामी नव्हती आणि नवीन बांधकाम जे सुरू होते ते पूर्ण व्हायला निदान ६ महिने तरी लागणार होते.

नंतरच्या काही आठवड्यात– महिन्यात मला उलरिशशिवाय दुसरे काही सुचत नव्हते. सतत तो डोळ्यांसमोर उभा दिसायचा. त्याच्या प्रश्नाने माझी झोप उडून गेली. त्याने मला वेगाने हर्मन मायनरच्या त्या जगात ओढून नेले. बालग्राम-शिवाय मला काही दिसेनासे झाले आणि मी स्वतःला बजावले की, आज मला त्याला संपूर्ण मदत केलीच पाहिजे. पण ती कशी करावी ?

## माझे पहिले भाषण

असंख्य प्रचारपत्रके आणि मुख्यत्वेकरून 'बालग्राम संदेश' हे दर ३ महिन्यांनी प्रसिद्ध होणारे बातमीपत्र सर्व मित्रांना व आश्रयदात्यांना पाठविले जात असे. टिरोल



व आसपासच्या सर्व शहरांतून हर्मन मायनरच्या बालग्रामची लोकांना माहिती होत होती. पण सुरुवातीस ज्याप्रमाणे पहिल्या बालग्रामास जोरदार विरोध झाला होता त्याचप्रमाणे आत्तादेखील जोरदार विरोध होऊ लागला होता. इथे पण विरोधक निर्माण झाले आणि त्यांनी ह्या नवीन योजनेला हाणून पाडायचा पवित्रा घेतला. मी इम्स्टमधे जो लेख लिहिला होता त्यात मायनरला 'मुलांचा ऑस्ट्रियन त्राता'' असे संबोधिले होते. त्यामुळे बऱ्याच लोकांच्या विचारांना चालना मिळाली होती आणि लवकरच एक नवा वादविवाद सुरू होणार असा रंग दिसत होता. मायनरसाठी पहिले काम कोणते करायचे ते माझ्या लक्षात आले. मला शहरातील लोकांना मायनरची योजना नीट समजावून सांगितली पाहिजे. ती योजना नवीन होती आणि टीकेला न भिता ती योजना लोकप्रिय बनवली पाहिजे.

नंतर मायनर बरोबरच्या आणखी एका बैठकीची मला मदत झाली. मायनरच्या विरूद्ध जे हल्ले केले होते त्याची मी व्यवस्थित नोंद केली आणि त्याच्याबरोबर त्या-विषयी सविस्तर चर्चा केली. सर्वांत मोठी टीका म्हणजे बालग्रामच्या रचनेत मुलां-साठी वडिलांची जागा नव्हती. आमच्या विरोधकांनी ह्या मुद्द्यावर जोरदार हरकत घेतली होती आणि तो मुद्दा घेऊन मला आघाडी उघडायची होती. म्हणून मी लिंझ-मधे बसून माझे व्याख्यान तयार करू लागलो. मी काही भित्तिचित्रे छापली, रेडिओ-तून जाहिराती दिल्या आणि ह्या सर्व तयारीनंतर एका भरगच्च हॉलमधे प्रवेश केला. स्टेजवर चढत असताना माझे अंतःकरण थरथरत होते. मी स्वतःला म्हटले, ''मी आत्तापर्यंत पुष्कळ व्याख्याने, भाषणे दिली आहेत आणि मला अशा चांगल्या भर-लेल्या हॉलमधे श्रोत्यांपुढे बोलायला आवडतं.'' पण यावेळची गोष्ट वेगळी होती. मला असे वाटले की युद्धाच्या आघाडीवर मी एकटाच आहे आणि हर्मन मायनरचा झेंडा हातात घेऊन अनुभवी प्रशिक्षित समाज कार्यकर्त्यांना पटवून देणार आहे. अशा वेळी भावनेच्या आहारी न जाता तर्कशुद्ध पद्धतीनेच मला हे वाङ्युद्ध जिंकले पाहिजे.

मी बालग्राममधील पित्याच्या भूमिकेविषयी बोलणार होतो. मी त्या प्रश्नाचा गंभीरपणे विचार केला होता आणि माझी पूर्ण तयारी झालेली होती. बोलायला सुरु-वात केल्यावर माझा आत्मविश्वास वाढला आणि संकोच गेला.

''बंधु–भगिनींनो,

जेव्हा एखादा राजनीतीतील संपादक सामाजिक कल्याणाविषयीच्या प्रयोगाबद्दल बोलायचे ठरवतो, तेव्हा ती नेहमी घडणारी गोष्ट नसते. त्यामुळे मी कल्पना करू शकतो की, आज ज्या बंधुभगिनी येथे मुद्दाम उपस्थित झाल्या आहेत, ज्यामधे माझ्या परिचयाचे बरेच सुप्रसिद्ध समाजशास्त्रज्ञ व तज्ज्ञ पण आहेत, ते आज माझी फजिती बघण्यासाठीच आलेले आहेत. पण तुम्हाला हे ठाउक आहे की, जो मनुष्य

दैनंदिन उलाढालीत मध्यभागी स्थित असतो आणि आजकालच्या जगातील त्रुटींची जाणीव ज्यामुळे त्याला इतरांपेक्षा अधिक स्पष्ट होते, त्यालाच नवीन योजनांमुळे जो नवा प्रकाश समाजात येत असतो तो दिसतो. आणि अचानक अंधःकार दूर व्हावा त्याप्रमाणे त्याला या प्रयोगांचे महत्त्व पटू लागते. हा जो नवीन अनुभव आहे तो अवर्णनीय आहे. हा प्रकाश म्हणजे हर्मन मायनरने दाखविलेला नवीन प्रकाश. त्याने १९४९ साली इम्स्टमधे टिरोल परगण्यात बांधलेली बालग्रामची वसाहत.

प्रत्येक युगाबरोबर नवनवीन कल्पना येत असतात. त्यांना मूर्त स्वरूप येईपर्यंत त्या सुप्त अवस्थेत पडून असतात. त्या कल्पना जर थोड्या आधी किंवा थोड्या उशिरा आल्या तर मानवतेच्या विकासाच्या वेगात त्या वाहून जातात. त्यांचे काही महत्त्व उरत नाही. आणि एखाद्या थंड वाऱ्याच्या झुळूकीप्रमाणे त्या वाहून जातात. कारण त्या कल्पनांचे संयोजक कमजोर असतात. संयोजक जर अति शक्तिमान असले तर त्या कल्पना एखाद्या वादळाप्रमाणे वेगवान बनतात.

२० वे शतक हे मुलांचे युग आहे. ह्या युगाला हे नाव मुळीच शोभत नाही. ते कुणी दिले आहे कुणास ठाऊक. इतिहासाच्या कुठल्याही पर्वात इतक्या अज्ञान मुलांची हत्या झाली नसेल. बॉंबचा हल्ला, गॅसचा फवारा, बंदुकीच्या गोळ्या सर्व शस्त्रास्त्रांनी त्यांचा संहार केला आहे. त्यांना भूकबळी बनविले आहे. असंख्यांना निर्वासित केले आहे. फसवले आहे. हिंसेचे लक्ष्य बनविले आहे, वंचित, टाकावू बनवले आहे. आईपासून आणि त्यांच्या घरापासून त्यांची ताटातूट केली आहे. आणि तरीदेखील आपण म्हणतो की हे युग मुलांचे आहे. हा कसा ऐतिहासिक विपर्यास आहे ! लाखो मुलांचे बळी गेल्या दोन्ही महायुद्धांत गेले आहेत. म्हणून आता आपल्याला मुलांची ओळख व आठवण झाली आहे का ? आणि आत्ताच आपल्याला ही जाणीव का झाली आहे ? अत्यंत क्रूर असे युद्ध संपून आता ९ वर्षे झाली आहेत. आत्ताचे दिवस आनंदाचे आहेत. आपले राहाणीमान आर्थिकदृष्ट्या रोज उंचावत आहे. आज आपल्याजवळ जरुरीपेक्षा अधिक खायला आहे. आपल्या डोक्यावर व्यवस्थित छप्पर आहे. अशा वेळी आपल्याला उच्चविकसित संस्कृतीची फसवी देणी कशासाठी हवीशी वाटतात ? जर पूर्वी युद्धामुळे आपण मुलांना विसरलो असलो, तर आज त्यांना आपण नवीन मिळालेल्या संपन्नतेमुळे अव्हेरत आहोत.

तंत्रज्ञानाच्या ह्या नवीन विकासामुळे आता आपली फुरसदच हिरावून घेतली आहे आणि सततची घाई हा आपला नवीन शत्रू निर्माण केला आहे. त्यामुळे आपल्याला मुलांकडे पाहायची दृष्टी नाही आणि अंतःकरण पण नाही.

कदाचित अजून वेळ आली नसेल, पण या युगात मुलांकडे पाहण्याची आपली



भूमिका बदलली पाहिजे. ह्या युगाच्या पलिकडे जाऊन जर आपण पाहू शकलो तर लक्षात येईल की मुलाविषयीचा काहीतरी विचार सुरू झाला आहे. आपण बालग्रामची ही चळवळ म्हणजे त्यातील एक नवीन विचार मानू शकतो. आपण त्याकडे निव्वळ बालग्रामची एक वसाहत म्हणून बघता कामा नये. एवढाच विचार पुरेसा नाही की बालग्रामात काही घरे बांधलेली असतात आणि त्यामध्ये निराधार, पोरक्या मुलांना एक घर मिळवून दिले जाते. पण ह्या बाह्य आवरणापलिकडे जाऊन आपण त्या कल्पनेचा अधिक विचार करायला हवा. जर ही कल्पना फलद्रूप व्हायला हवी असेल तर त्याला आजच्यासारखी अनुकूल वेळ नाही. नाहीतर पूर्वी जे मोठे मोठे शिक्षणतज्ज्ञ होऊन गेले, उदा. (पेस्टॉलॉझी, फ्रँक किंवा डॉन बॉस्को) त्यांनी ह्याची सुरुवात केव्हाच केली असती. १९४५ च्या पराभवानंतरच्या काही वर्षांत वरील शिक्षणशास्त्रज्ञांच्या विकासोन्मुख सामाजिक शिक्षणपद्धतीत हळूहळू परिवर्तन होत गेले आणि आज ह्या बालग्रामच्या स्वरूपात त्याचा विकास आपल्याला स्पष्टपणे दिसत आहे आणि आत्तापावेतो अज्ञात असलेल्या एका हर्मन मायनरच्या रूपाने वावरत असलेल्या वैद्यकीय विद्यार्थ्याला ही कल्पना सुचली आहे. इन्नसब्रुकचा हा विद्यार्थी ह्या कल्पनेचा मुख्य प्रणेता आहे. पुष्कळ वर्षे युद्धभूमीवर राहिल्यानंतर तो वास्तववादी बनला आहे. तो वास्तवाला सत्यनिष्ठेने सामोरा गेला आणि जे वास्तव नाही त्याचा सामना हवेत मनोरे बांधून केला नाही तर सत्यसृष्टीवर आधार ठेवून केला आहे, त्याची कल्पना साधी आहे, कुणालाही पटेल अशी आहे. स्पष्ट आणि सरळ आहे. मानवतेच्या इतिहासात अशाच सरळ साध्या कल्पनांची भर पडली आहे आणि त्यामुळे इतिहास संपन्न बनला आहे.

वाट चुकलेल्या मुलांच्या संदर्भात ज्या कल्याणकारी योजना इतकी वर्षे राबविल्या जात होत्या आणि त्यामुळे परिस्थिती अधिकच खालावत चालली होती. अशा वेळी १९४९ साली हर्मन मायनरने आपली नवीन योजना सर्वांचा विरोध पत्करून समाजापुढे मांडली. जागतिक महायुद्धे आणि त्यानंतरच्या काळात हजारो मुले अनाथ झाली. बेघर झाली. एक सबंध पिढी संकटात आली. कारण त्यातले बहुसंख्य निराधार बनून घोर निराशेत जगत होते. हर्मन मायनरला ह्या मुलांना त्यांनी गमावलेले कौटुंबिक जीवन, त्यातली आस्था आणि शाश्वती मिळवून द्यायची होती. कारण त्याने ओळखले होते, जर मुलाची वाढ नैसर्गिक व्हायची असेल आणि त्याला स्थिरता यायची असेल तर त्याला घर, कुटुंब मिळवून देणे हीच एक वास्तविक भूमिका होऊ शकते. कितीही चांगली अनाथालये किंवा सामाजिक संस्था असल्या तरी त्या घराची जागा कधीच घेऊ शकणार नाहीत हे एक प्रमाणित सत्य आहे. शिक्षकांनी कितीही कष्ट केले किंवा कौतुकास्पद असे त्याग केले तरी संस्थेला घराची सर कधीच येणार

नाही. म्हणून हर्मन मायनरने आपली छोटीशी सुरुवात टिरोलमधील इम्स्ट या गावी एक बालसदन सुरू करून केली. माझी खात्री आहे की, आता इथून प्रेरणा घेऊन इतर प्रांतांत व सर्व ऑस्ट्रिया देशांत अशी बाउग्रामे आता सुरू होतील.

सुरुवातीस हर्मन मायनरचे काम हा एक प्रयोगच होता. पण त्याच्या डोक्यातील योजना स्पष्ट होती. ह्या हरवलेल्या मुलांसाठी घर मिळवून देणे, त्यांना स्थिर जीवनाचा अनुभव प्राप्त करून देणे, कुटुंब जीवनातील जिव्हाळा त्यांना लाभेल अशी व्यवस्था करणे, एक मायाळू आई त्यांना शोधून देणे आणि भावा-बहिणींचे सुख त्यांना परत मिळवून देणे ही त्या योजनेची अंगे होती. ही मुले आता समाजकल्याणाच्या केसेस नव्हत्या तर ते मानवी जीव होते. त्यांना मोकळ्या नियमबद्ध समाजात आणून सोडणे हे त्याचे मुख्य काम होते. ते आता अशा वातावरणात राहाणार होते की जिथे बंधने नव्हती, तारांची कुंपणे नव्हती. शाळेला जाण्याचे रस्ते मोकळे होते. थोडक्यात म्हणजे एका मोकळ्या जगात ते राहाणार होते आणि वाळीत टाकलेले त्यांचे वंचित जीवन संपणार होते.

आत्ता हे बालग्राम सुरू होऊन ५ वर्षे झाली आहेत. आणि आपण त्याचा ताळेबंद बघू शकतो. त्यात आपल्याला असे दिसते की या मुलांच्या शिक्षणात चांगलीच प्रगती झालेली आहे. आत्तापावेतो अशी कधीच झालेली नव्हती. ह्या यशामुळे ह्या नवीन योजनेची अचूकता सिद्ध झाली आहे आणि समाजकल्याणाच्या ओझ्यांनी वाकून गेलेल्या मुलांनी नवीन सुटकेचा निःश्वास टाकला आहे.

५ वर्षांच्या ह्या अनुभवानंतर प्रत्यक्षात असे दिसून आले आहे की ही योजना लवचिक आहे. अनुभवाने ती बदलली आहे आणि आज त्याचे जे स्वरूप आहे ते बरेचसे स्थिर आणि कायम आहे. बालग्रामच्या सुरुवातीपासूनच ही योजना लवचिक स्वरूपाची होती आणि त्यात सुधारणा करण्याची, तिला अधिक काटेकोर व उत्तम बनविण्याची सर्वांचीच धडपड सुरू होती. आपल्या प्रयोगांची निश्चिती कोणता शास्त्रज्ञ खात्रीपूर्वक देऊ शकेल ? लुई पाश्चरला अनेक वेळा प्रयोग करावे लागले तेव्हा त्याचा प्रयोग सिद्ध होऊ शकला. आवश्यक ते जंतू तयार व्हावेत म्हणून त्याने किती वेळा माती सुपीक बनवली ? मग शिक्षणाच्या क्षेत्रात जेथे ध्येय आत्मिक विकासाचे असते, असे किती प्रयोग व्हायला हवेत त्याची कल्पना करा. आजच्या या संध्याकाळी मी शिक्षण आणि संस्था यांच्यात कसेकसे परिवर्तन झाले हा विषय बालग्रामच्या या संदर्भात मांडायला उभा राहिलो नाही. मी फक्त या बालग्राम चळवळीच्या मुळाशी जो विचार आहे तो अधिक स्पष्टपणे मांडू शकतो. ५ वर्षांत हा विचार कमजोर झाला नाही, किंवा त्याला कुणी हलवू शकले नाही. त्यात बदल झाला नाही आणि तो विचार म्हणजे या बालग्रामच्या वसाहतीत पिता असण्याची आवश्यकता नाही हा



आहे.

गेल्या १० वर्षांत हर्मन मायनरने ह्या बालग्रामात जे काम केले त्यावरून हे सिद्ध झाले आहे की मुलांना पिता नसणे ही जी आपल्याला कमकुवत कडी वाटते ती तशी नसून ती सगळ्यांत मजबूत स्थिती आहे. इम्स्टमधल्या यशाने ते सिद्ध केले आहे.

एक दिवस संध्याकाळी माझ्यासोबत बालग्रामच्या ह्या कुटुंबात आपण अवश्य चला. तेथे संध्याकाळचे जेवण चालू असेल. मुलांची प्रार्थना म्हणून झाली असेल आणि सर्वजण मोठ्या गोल टेबलाभोवती बसून जेवत असतील. त्या टेबलाच्या मध्यभागी एक मोठे भांडे असेल आणि त्यात गरम गरम बटाट्याचा रस्सा ठेवलेला असेल. मोठे मुलगे त्यातून वाढून घेतात. लहान मुली पण पोटभर घेतात. आईच्या मांडीवर सर्वांत लहान मूल बसलेले असते. जेवताना मुलांची खूप बडबड चालू असते. मोठा १२ वर्षांचा भाऊ लहान बहिणीला आईकडून स्वतःकडे मागून घेतो. आई पण हसून तिला त्याच्या स्वाधीन करते आणि त्याबरोबरच तिची पेजेची वाटी व चमचा पण देऊन टाकते. ३ महिन्यांपूर्वी हा १२ वर्षांचा मुलगा तिच्याकडे आलेला असतो. एक भरकटलेला मुलगा, ज्याला इतर उनाड मुलांची संगत लागलेली असते. जेव्हा तो या बालग्रामात येतो तेव्हा त्याला ते आवडत नाही व सारखा नाक मुरडीत असतो. "यानंतर आता हेच तुझे घर आहे." त्यांनी त्याला सांगितलेले असते. "छट्" म्हणून तो तुच्छतेने म्हणालेला असतो कारण याचेपूर्वी तो ८ वेगवेगळ्या होम्समधून गेलेला असतो आणि प्रत्येक ठिकाणी त्याला हेच सांगितलेले असते. 'फुकट गेलेला मुलगा' असतो तो ! आणि आता त्या ९ जणांच्या कुटुंबातील सर्वांत लहान मूल त्याच्या मांडीवर बसलेले असते आणि त्या लहानशा तोंडात तो प्रेमाने चमचा चमचा पेज भरवीत असतो. लवकरच ती सर्व मुले आपापल्या बिछान्यात झोपायला जातील आणि हा मुलगा अंथरुणावर पडून आपल्या आईची वाट पाहील. कारण ती प्रेमळ आई रात्री त्याच्यापाशी येईल. पोटच्या मुलाप्रमाणे त्याच्यावर माया करील आणि त्याला पांघरूण घालून जाईल.

जेव्हा आपण या घरातून बाहेर पडू तेव्हा तुम्हाला फार मोठ्या शिक्षण विषयक सिद्धांताचे ज्ञान या बालग्रामात होणार नाही. पण तुम्हाला जो काही अनुभव येईल तोच या शिक्षणाचा मूळ गाभा ठरेल. परमेश्वराने 'आई' ही एक व्यक्ती अशी निर्माण केली आहे की, तिचे मातृत्व ही मनुष्यमात्राला मिळालेली मोठी देणगी आहे.

मातृत्वाचे शिक्षण हे बालग्रामचे फार मोठे मूलभूत प्रशिक्षण आहे. बालग्रामात काम करणाऱ्या मातांना जो अनुभव हवाहवासा वाटतो, स्वतःचे हरवलेले सुख पुन्हा मिळावेसे वाटते त्यासाठी हा एक सुंदर अनुभव त्यांना मिळतो. ज्या ठिकाणी ह्या

मातृत्वाचा आविष्कार नसतो तिथे बालग्राम नसते. पण जिथे हा आविष्कार ओतप्रोत दिसतो त्या ठिकाणी बालग्रामचे अस्तित्व आहे हे नक्की मानावे. हर्मन मायनरच्या या नवीन योजनेचा आत्मा म्हणजे मातृत्वाची भूमिका आणि त्यासाठी एका चांगल्या प्रेमळ स्त्रीची निवड करून तिच्यामार्फत सर्व शिक्षणाचा नवीन पाया घालणे हा मुख्य कार्यक्रम. हे मातृत्व जितके कसदार असेल तितके बालग्राम यशस्वी होते नाहीतर अपयश पदरी पडते.

मनुष्याच्या नैसर्गिक विकासाच्या ज्या प्रेरणा असतात तोच मानसशास्त्राचा मुख्य गाभा असतो. हे मानसशास्त्र स्त्रीला मातृत्वाची ओढ लागते त्याला फार महत्त्व देते. त्याला ते अतिशय महत्त्वाची, स्वनिर्मितीची शक्ती मानतात. पण शेवटी विश्लेषणात असे दिसते की ही शक्ती म्हणजे दुसरे-तिसरे काही नसते. स्त्रीला ही नैसर्गिक शक्ती असते, की ज्यामुळे ती छोट्याशा, असहाय्य बालकाला स्वतःच्या जीवनात सामावून घेते, त्याची काळजी घेते. त्याची सेवा करते.

ह्या संदर्भात आधुनिक मानसशास्त्राचे असे म्हणणे आहे की, सर्वात प्रथम संरक्षणाचा अनुभव लहान मुलाला आईच्या हातांवर येत असतो, आणि मनुष्यप्राण्याला ह्या अनुभवाचा फायदा दीर्घकाळपर्यंत मिळत असतो. ज्या माणसाला हा प्राथमिक अनुभव येत नाही त्याला आयुष्यभर निराशामय जीवन जगण्याची भीती असते. खरोखरीच मातेच्या प्रेमाला दुसरा पर्याय नाही. ती फक्त एकच व्यक्ती म्हणजे आईच असू शकते, जी त्या मुलाला आधार देते, शाश्वती देते, ज्याचा उपयोग त्याला पुढे आयुष्यभर होत असतो. इम्स्टमधे जाणाऱ्याला हा अनुभव येतो की ज्या निराधार मुलांना आई म्हणजे काय ते माहीत नव्हते, कुणाही प्रेमळ किंवा आधारभूत वाटणाऱ्या स्त्रीच्या सहवासात ते कधी आले नव्हते. त्यांचे सर्व जीवनच बदलून गेले. ही मुले आजारी बनलेली होती, घाबरलेली होती आणि त्यांच्या अस्थिर वृत्तीमुळे इतर मुलांच्यात मिसळण्याची त्यांना भीती वाटत होती. सुरुवातीच्या काळात आई आणि मूल यांच्यात फार मजबूत असे प्रेमाचे बंध बनत असतात. आणि म्हणूनच प्रेमळ आई नसल्यामुळे मुलाचे जे नुकसान होत असते, त्याच्या तुलनेत अगदी चांगल्या बापाचे नसणेदेखील तितकेसे हानिकारक नसते. मूल आईच्या गर्भाशयात वाढते हे फक्त एकच कारण नसते तर त्याच्या वाढीला, विकासाला, ह्या जगात पहिली भित्री चिमुकली पावले टाकून चालायला त्याला आईचीच मदत असते. त्याला स्वतःचे अस्तित्व मिळवून देणे, आधार देणे, संरक्षण देणे ही कामे ती एक प्रेमळ मातेसमान असणारी स्त्रीच करू शकते. ती खरोखरीच माता असावी लागते किंवा जिच्या अंतःकरणात मातृत्वाचा पाझर फुटला आहे अशी स्त्रीच हे काम करू शकते.



ह्या बालग्रामच्या मातेचे व्यक्तित्व व तिची कार्यशक्ती ही सर्व ह्या भावनेच्या मुळाशी निगडीत आहे. अशाप्रकारे माता बनण्यासाठी ज्या स्त्रियांची निवड केली जाते, त्या बहुतेक सर्वजणी नैसर्गिक, घरगुती स्वाभाविक वातावरणातून, बहुतेक ग्रामीण भागातून आलेल्या असतात. त्यांचे व्यक्तित्व निरागस असते, त्यांच्या श्रद्धा अढळ असतात, त्या वयाने प्रौढ असतात. (बालग्रामच्या माता बहुतेक २५ ते ३५ वयोगटातील असतात.) अविवाहित असतात, अपत्यविहीन असतात आणि ह्यांना ही फार मोठी पण सुंदर अशी जबाबदारी दिलेली असते. ह्या स्त्रियांना प्रशिक्षण दिले जाते. परीक्षा घेतल्या जातात, दीर्घकाळपर्यंत मुदत दिली जाते आणि भविष्य काळातील त्यांच्या जबाबदारीसाठी त्यांना सज्ज केले जाते. अशाप्रकारे ज्या स्त्रिया खरोखरीच सक्षम माता बनू शकतात, अशाच स्त्रिया ह्या कामासाठी पुढे येतात. ह्याच्या मोबदल्यात ह्या स्त्रियांना व्यक्तिगत खूप आनंद मिळत असतो आणि त्या सुखावल्या म्हणजे सहस्र पटींनी तो आनंद त्या मुलांना वाटीत असतात. तुम्हाला जर सुखी, आनंदी, समाधानी स्त्रिया पहायच्या असतील तर ईम्स्टच्या बालग्राममधे जाऊन पहा. ह्यामधे ध्येयपूर्तीची कास तर आहेच, पण त्याबरोबर कामाचा पण भरपूर बोजा आहे. ९ मुलांचे कुटुंब वाढविताना, त्या मुलांना मातेच्या प्रेमाने वेढून टाकताना, मायेची ऊब देताना जे अनुभव येत असतात त्यात त्या स्त्रीचे अंतःकरण फुलून निघत असते. तिचा आत्मिक विकास त्यात होत असतो.

अशा या स्त्रीच्या जीवनात पतीला सामावून घ्यायला वावचं कुठे आहे ? प्रत्येक नैसर्गिक कुटुंबात पिता हा एक आवश्यक घटक मानला जातो. कारण तो कमावीत असतो. अधिकार गाजवीत असतो. पण ह्या कृत्रिम कुटुंबात त्याला जगायचं नाही. उलट त्याचे अस्तित्व ह्या सुखी कुटुंबाला संकटात घालू शकते.

बालग्रामचे कुटुंब हे केव्हाही स्वाभाविक कुटुंबाची बरोबरी करू शकणार नाही. खरं जे कुटुंब असतं त्याची जागा कधीच कुणाला घेता येणार नाही. बालग्रामचे कुटुंब हे एक कृत्रिम कुटुंबच आहे. मात्र खऱ्याखुऱ्या कुटुंबाच्या अत्यंत निकटतम जाणारा तो एकमेव पर्याय आहे आणि आतापर्यंतच्या समाज कल्याणाच्या अनेक योजनांच्या इतिहासात कुठल्याही संस्थेनं कुटुंबासमान वाटणारी ही बालग्रामची व्यवस्था अद्यापपावेतो केलेली नाही. त्या आईचे जागी एका विवाहित जोडप्याची नेमणूक करणे म्हणजे अक्षरशः खऱ्या कुटुंब व्यवस्थेपासून दूर जाण्यासारखे आहे. हा जो विरोधाभास आहे तो आपण बारकाईने पाहू या.

हे काम पत्करायला कोणती जोडपी तयार होतील ? फारच क्वचित प्रसंगी निरोगी व प्रसन्न जोड्या पुढे येतील. कारण बहुतेक सर्व जोडप्यांची स्वतःची मुले असतील, त्यांची स्वतःची घरेदारे असतील आणि बाप त्या घराचा कर्ता-करविता

असेल.

कारण फक्त स्थिरस्थावर झालेली आणि प्रसन्न वातावरण असलेली कुटुंबे ह्या कामाची जबाबदारी पेलू शकतील, आणि मग तो एक नमुना बनेल.

पण जे जोडपे एकत्र सुखाने वाढले आहे, ज्याने स्वतःचे एक कौटुंबिक जीवन घडविले आहे, त्यांना बालग्राममध्ये येऊन राहण्याचे काही कारण नाही, गरज नाही आणि कोणतीही प्रेरणा पण नाही. परिणामी ह्या कामासाठी अर्ज करणारी बहुतेक जोडपी अशी असतील की, त्यांना स्वतःचे घर नसेल, किंवा काही नोकरी-धंदा नसेल, किंवा मुले नसतील किंवा आणखी कुठेतरी काहीतरी बिनसलेले असेल आणि हीच अगदी प्रथम व मूलभूत अडचण आहे.

आपण जरी असं धरून चाललो की आपल्याला खूप चांगली नमुनेदार जोडपी या कामाला मिळतील; तरी त्याबरोबरच लगेच एक अडचण व्यवस्थापनाचे दृष्टीने येईल व ती सोडविणे फार कठीण होऊन जाईल. या जोडप्यांपैकी प्रत्येक नवऱ्याला स्वतंत्र नोकरीधंदा असेल. बालग्रामात सर्वांना काम देणे तर शक्य नाही. प्रत्येकाच्या कामाचे स्वरूप भिन्न असेल आणि त्यामुळे बालग्रामच्या आसपासदेखील त्यांना काम मिळणार नाही. ह्या सर्व गोष्टी कदाचित शहरात शक्य होऊ शकतील. पण हर्मन मायनर आपली सर्व बालग्रामे फक्त शहरातच निर्माण करू शकणार नाही.

समजा, त्यातूनही एखाद्या माणसाला जवळपास काम मिळाले, तर तो स्वाभाविकच आपला आठवड्याचा किंवा महिन्याचा पगार घरी घेऊन येईल. आता बालग्रामात मुलांच्या घरखर्चासाठी केलेली तरतूद आईच्या हातात दिली जाते. त्यामुळे काय होईल की आर्थिक व्यवस्था दुहेरी राहील. इतकेच काय पण दुटप्पी पण होईल. एका बाजूला हा नवरा आहे, जो आपल्या मिळकतीपैकी स्वतःकडे काही रक्कम ठेवू पाहील आणि तिकडे ती बालमाता असेल जिला बालग्रामच्या कचेरीतून ९ मुलांच्या खर्चाची रक्कम मिळत राहील. त्यामुळे तिच्या खर्चाच्या तरतुदीत तिच्या नवऱ्याचा हिस्सा हा नेहमी दुय्यम प्रकारचा राहील.

शिवाय नवऱ्याला, नवरा बनून राहायलाच आवडत असतं. त्याला त्याची बायको हक्काची वाटते. तिने त्याच्यासाठी वेळ दिला पाहिजे. प्रेम, आधार दिला पाहिजे आणि तिने त्याची काळजीपण घेतली पाहिजे हा त्याचा अधिकार त्याला वाटत असतो. तो संध्याकाळी घरी आला की बायकोने त्याच्या सोबत राहावे असे त्याला वाटेल, आणि नेमकी त्या वेळी त्याची बायको मुलांची धुणी तरी धूत असेल किंवा कपडे तरी शिवत असेल. तिचा सर्व वेळ तिला ९ मुलांच्या पालनपोषणास द्यावाच लागतो. रात्री काय किंवा दिवसा काय, आठवड्यांमागून आठवडे तिचे काम चालूच असते. तिचे दिवस पण लहानच असतात. शाळेला जाण्यापूर्वी मोठ्या मुलांना



पण तयार करायचे असते. घराचा केर-वारा, धुणे-पुसणे करायचे असते. घर नीटनेटके करून ठेवायचे असते. बाजार करायचा असतो आणि जेवण पण बनवायचे असते. सबंध दिवस त्या मुलांच्या कामात आणि काळजीत गेल्यानंतर नवऱ्यासाठी तिच्याकडे वेळ कुठे आहे ? जी कुटुंबे नैसर्गिक असतात, त्यांना जरी पुष्कळ मुले असली तरी त्या घरात हे प्रश्न इतके गंभीर वाटत नाहीत पण इथे ती मुले तिची स्वतःची नसतात आणि तिचा नवरा त्याच्या स्वभावधर्मामुळे ह्या मुलांवर तितके मनापासून प्रेम करणार नाही जितके त्याची बायको करू शकेल. लवकरच त्या मुलांना तो "ती वात्रट गुंड मुले" असे मानू लागेल आणि अशा मुलांसाठी माझ्या बायकोला वेळ आहे आणि लग्न केलेल्या नवऱ्यासाठी मात्र मुळीच वेळ नाही असे त्याला वाटू लागेल आणि शेवटी एके दिवशी तो स्वाभाविकरीत्या चिडून मित्रांकडे पत्ते खेळायला निघून जाईल किंवा दारूच्या गुत्त्याकडे वळेल. म्हणजेच कुटुंबव्यवस्थेतील दुर्लक्ष बालग्रामात पण अनुभवाला येईल आणि त्याचे अपेक्षित वाईट परिणाम दिसू लागतील. पण मग हे लक्षात येईल की आता आपण या जोडप्याला घालवू शकणार नाही. कारण त्याची आपणच अशी तांत्रिक व्यवस्था केलेली असेल की त्यामुळे ते घर हे कायदेशीररीत्या त्या जोडप्याच्या मालकीचे बनलेले असेल.

मी यापूर्वीच सांगितल्याप्रमाणे जर ते जोडपे निरोगी असेल तर त्यांना स्वतःची मुले असतील. म्हणजे मग त्या कुटुंबातील मुलांचे आपोआप दोन गट पडतील आणि आई कितीही उत्तम असली तरी ह्या दोन्ही गटांना एकत्र वाढवू शकणार नाही. त्याचा तिला आंतरिक त्रास होईल. कारण मुले एकमेकांशी क्रूरतेने वागतील. ही मुले सावत्र होतील आणि ती मुले त्यांना हिणवतील आणि स्वतःचे आईवडील फक्त स्वतःसाठीच मिळाले पाहिजेत अशी त्यांची वृत्ती बनेल. प्रत्येक पालक-कुटुंबात नेमके हेच घडत असते.

तत्त्व आणि वस्तुस्थिती यांतील हा फरक आहे आणि तो इथे स्पष्टतेने दिसून येईल. तात्त्विकदृष्ट्या जे अधिक आकर्षक आणि नमुनेदार वाटते, ते प्रत्यक्षात मात्र बालग्रामच्या मूळ हेतूशी विसंगत ठरते.

बालग्रामच्या ह्या प्रयोगाला यश मिळण्याची शक्यता आहे. याचे एकच कारण आहे, आणि ते म्हणजे आईवडिलांच्या जागी इथे फक्त एकटी आईच आहे. आणि ती आई फक्त त्या मुलांसाठी आहे. मुलांची सेवा करणे हेच तिचे काम आहे. आणि ही मुले कशी आहेत ? आजारी, सत्त्वहीन, ज्यांना अधिक लक्ष आणि प्रेम द्यायला हवे, ज्यांच्यासाठी त्याग करायला हवा आणि इतर नैसर्गिक कुटुंबातील मुलांपेक्षा ज्यांना संरक्षणाची अधिक गरज आहे.

याचा अर्थ असा पण नाही की, बालग्राममधे पिता ही भूमिका बजावलीच

जाणार नाही. सुरुवातीपासूनच असा प्रयत्न केला आहे की एकच एक आई असल्या मुळे जे हे एकांगी नाते निर्माण केले आहे. त्याची भरपाई करण्यास पित्याची भूमिका निभावणारा एक मनुष्य हवा. ह्यासाठी प्रत्येक बालग्रामात एक संचालक नेमला जातो. त्याची भूमिका मुलांना धाक वाटावा अशी असते तर मातांना तो आपला सहाय्यक व मार्गदर्शक वाटतो. त्यामुळे हा पुरुष संचालक बालग्रामातील हरवलेल्या पित्याची उणीव भरून काढतो. आणि तसं पाहिलं तर आपण पितृविहीन जगातच राहत आहोत. आपल्या युगातील मुलं ही बरीचशी आईवडिलांच्या मदतीशिवायच वाढत असतात. जेवण घेतात. जेव्हा आई-बाप कामाहून घरी येतात तेव्हा त्या मुलाची झोपायची वेळ झालेली असते. जेव्हा शनिवार-रविवारची सुट्टी मिळते आणि वडिलांना बराच वेळ असतो, तेव्हा मुलांना आजीकडे पाठविले जाते. म्हणजे आई-बापांना मोकळीक मिळते आणि ते स्कूटर-मोटार घेऊन लांबलांब प्रवासाला जात असतात. पण बालग्राममधील संचालक पिता हा नेहमी बालग्रामध्ये हजर असतो आणि त्या १२० ते १३० मुलांना त्याचा सहवास मिळतो. मुलांची छोटी दुःखे, त्यांच्या गरजा, त्यांचा अभ्यास, पाहून तो त्यांना सल्ला देत असतो आणि अशा प्रकारे मुलाच्या वडिलांची भूमिका तो सांभाळीत असतो.

बालग्राममधे हा संचालक जेव्हा नेमला जातो तेव्हा त्याची निवड अत्यंत कसोशीने केली जाते. त्या संचालकाचे शिक्षण किती झाले आहे ? तो तज्ज्ञ आहे का ? हे बघण्यापेक्षा तो माणूस म्हणून कसा आहे हे आधी बघितले जाते. बालग्रामांचे हे संचालक वेगवेगळ्या व्यावसायिक क्षेत्रांतून काम केलेले असे असतात आणि त्यामुळे ते शिक्षक किंवा मानसशास्त्रज्ञच असतील असे नाही. पण ती चांगली सज्जन माणसे असतील, त्यांच्या अंतःकरणात करुणा असेल, समजूतदारपणा असेल, प्रेम असेल आणि पितृत्वाची भावना असेल.

अशा प्रकारे बालग्रामच्या ह्या वातावरणात त्या मुलाला आई मिळते आणि पित्याची भूमिका संभाळणारा एक संचालक पण मिळतो आणि ती दोघे मिळून कुटुंबाची कर्ती माणसे होतात. ही दोन महत्त्वाची माणसे मिळाल्यानंतर आपण मुलांना आणखी काही देण्याची गरजच उरत नाही. हेच सर्व घडवून आणण्याची हर्मन मायनरची इच्छा आहे. त्या मुलाला कुटुंबात स्वस्थ व निर्धास्त वाटले पाहिजे. मुद्दाम ओढूनताणून काहीतरी शिक्षण देण्याची त्याची कल्पनाच नाही. म्हणून तुमच्या हे लक्षात येईल की, बालग्राममधे मातांची संख्या शिक्षकांपेक्षा अधिक आहे. शिक्षक शिकवितात आणि निघून जातात. आई शांत असते आणि त्याच्याजवळ राहते. जेव्हा शिक्षक शिकवत असतात तेव्हा ते सर्व मानसशास्त्रीय युक्त्या चालवीत असतात. पण आईची भूमिका मात्र क्षमाशील असते. शिक्षण हे सर्वोच्च आणि सुरस



आणि जेव्हा त्याचा उपयोग परमेश्वराने योजना केलेल्या अर्थाने होत असतो तेव्हा शिक्षण ही एक मोठी संधी असते. ते इतके उपयुक्त असते की त्यामुळे मुलांच्यात परिवर्तन येते व त्यांचे चांगले व्यक्तिमत्त्व घडते पण त्याची अंमलबजावणी प्रेमाने व आस्थेने व्हायला हवी. नाही तर ते रूक्ष आणि औपचारिक बनून जाते.

"आजची मुले जी भरकटली आहेत, हा युरोपातील मानवी संस्कृतीवर लागलेला मोठा डाग आहे. त्यांच्या रोगी शरीरावर उठलेले ते व्रण आहेत." हे शब्द एका जर्मन शास्त्रज्ञाचे आहेत, आणि त्यामुळे आपले डोळे उघडले पाहिजेत. हर्मन मायनर याने एका नवीन उपाययोजनेची सुरुवात केली आहे, जी आशादायक आहे आणि ज्यामुळे हे व्रण, ह्या जखमा भरून येऊ शकतात आणि म्हणूनच आपण त्याच्या ह्या प्रयोगाचा आदर केला पाहिजे. आपण त्याचे हात मजबूत केले पाहिजेत आणि उगीच घाईगर्दीत काहीतरी निष्कर्ष काढून त्याच्या कामात विघ्न आणता कामा नये.

मी जेव्हा इम्स्टमधल्या ह्या बालग्रामला प्रत्यक्ष भेट दिली, तेव्हा माझ्या लक्षात आले, हा एक निव्वळ साधा प्रयोग नाही पण भरकटलेल्या मुलांना सुधारण्याची एक नवीन पद्धत येथे सुरू झाली आहे. हे बालग्राम पाहिल्यानंतर मला नवीन प्रकाश दिसला. माझ्या आशा पल्लवित झाल्या. मी खूप आशावादी बनलो आणि माझी अशी खात्री पटली की, निश्चित एक दिवस असा उजाडेल की बालग्रामच्या ह्या सुंदर परिसरातून उत्तम पिढी निर्माण होईल. आपल्या ह्या जमान्यात आपल्याला हा प्रेमाचा उद्रेक अनुभवायला मिळालाच पाहिजे."

माझ्या भाषणानंतर श्रोत्यांचा प्रतिसाद हळूहळू आला, पण तो निश्चित आला आणि थांबून थांबून जोरदार बनला. त्यामुळे एक चांगली चर्चा सुरू झाली आणि ते अपेक्षितच होते. मी केलेला खुलासा लोकांना पटला होता. मी एक सुटकेचा निःश्वास टाकला. मी बाहेर रस्त्यावर आलो तेव्हा अचानक हर्मन मायनरशी माझी गाठ पडली.

"सुरुवातीच्या मानाने तू खूपच चांगला बोललास." तो म्हणाला.

मी त्याला प्रत्युत्तर देण्यासाठी शब्द शोधू लागलो. "वा ! कमालच करतोस की तू ! मला त्या स्टेजवर बोलायला लावलंस आणि तेदेखील एका अपरिचित अशा विषयावर, आणि तू मात्र आरामात श्रोत्यांच्यात बसून राहिलास, कारण भाषण ऐकून तुला माझी चेष्टा करायची होती !"

त्या संध्याकाळी आम्ही लिंझमधे एक छोटे ऑफिस उघडण्याचे ठरविले. हे ऑफिस मध्यवर्ती कचेरीची शाखा म्हणून राहील. येथून बालग्रामच्या योजनेस प्रसिद्धी मिळेल. त्याचा दूरवर प्रचार होईल आणि नवनवे वर्गणीदार मिळतील. मला सुरुवातीस खूप उत्साह वाटला पण नंतर मनात शंका येऊ लागली, "तिथे ह्या

कामाची जबाबदारी कोण घेणार ?" मी विचारले, "तुला माझ्या संपादकीय जबाबदारीची कल्पना आहे. मला त्यासाठी जवळपास वेळ नाहीच आणि आणखी काही करणे तर अजिबात शक्य नाही."

"भलतंच काय बोलतोस ?" मायनरने उत्तर दिले. आपण या ऑफिसात एक सेक्रेटरी ठेवूया. इन्सब्रुकमधली एक मुलगी माझ्या माहितीत आहे. ती नक्की लिंझमधे काम करायला आपण होऊन तयार होईल. तिला आपण रहायची जागा शोधून काढायला हवी. तू फक्त नवनव्या योजनांचा पाठपुरावा करून आपल्या ऑफिसला काम पुरवायचे. एखाद्या लढाईची जशी पूर्वतयारी करतात तसे मोर्चे तू बांध. प्रत्येक मुद्द्यांचा विचार कर. आयुष्यात एकदा तरी रचनात्मक काम कर."

"पत्रकारिता हा व्यवसाय काय तसा नाही वाटत तुला ? आम्ही दररोज एक नवीन वर्तमानपत्र तयार करीत असतो, त्यात निवेदन देतो, अहवाल छापतो आणि साधारण पणे शहाणपणाची मानता येतील अशी संपादकीयं पण लिहितो. तुझ्या बोलण्याची हिंमत वाटते मला."

"हे जरी तू काहीही म्हणालास तरी तुझी रोजची वर्तमानपत्रे कचऱ्याच्या टोपलीत पडतात किंवा जाळली जातात. नाहीतर दुसऱ्या कुठल्यातरी घाणेरड्या कामासाठी त्याचा उपयोग होत असतो. पण जर तू बालग्राममधे काम केलेस तर तू भविष्यकाळ घडविण्याचे काम करशील. तुला तुझ्या मेहनतीचे फळ मिळेल. त्या यशाचा तू साक्षीदार बनशील आणि ह्यातच तुझे खरे काम आहे."

"माझे संपादकीय लिखाण हे पण माझे खरे काम आहे सद्‌गृहस्था." मी पुन्हा म्हटले. "पण खरं काम असो, वा खोटं असो, मी काही आता स्वतःला बदलू शकत नाही. पण तरीदेखील मला जे शक्य आहे ते मी करीन."

अशा तऱ्हेने मायनरने मला ओढून घेतले आणि त्याच्या त्या गळाला माझा मासा अडकला. ह्या बालग्रामच्या नवीन जगात खोलवर जाऊन काम करण्याचे ठरविल्यामुळे माझ्या अंतःकरणात एक समाधानाची भावना उमटली आणि त्याचा परिणाम म्हणजे मी माझे संपादकाचे काम अधिक उत्साहाने करू लागलो.

## बालग्राम संदेश त्रैमासिक

हर्मन मायनरने व्हिएन्नात जे बालग्रामचे ऑफिस उघडले होते, ते आता खूपच गतीने काम करीत होते. तीन परगण्यांचा कारभार तिथून चालत असे आणि तिथून बालग्राम-संदेश नावाचे एक त्रैमासिक सर्वांना पुरविले जात असे. माझ्या ध्यानात



आले की या नव्या पत्रिकेने मायनरच्या कामाला चांगलीच गती व मदत मिळाली.

ते मासिक म्हणजे एक सामान्य कागदावर छापलेले एक पत्रक होते. १९५१ च्या उन्हाळ्यात ते सुरू झाले. नवीन सामाजिक विकासाच्या कामांची सविस्तर माहिती मित्रांना व हितचिंतकांना मिळावी या उद्देशाने ते मासिक सुरू केले होते. ह्या पत्रकाच्या माध्यमाचा उपयोग करून सर्व मित्रांना आणि वर्गणीदारांना एकत्र जोडण्याची मायनरची कल्पना होती. ही सर्व मंडळी दरमहा एक शिलिंग देणारी होती. ही पैसे जमविण्याची अगदी साधी योजना सुरुवातीला होती. पण नंतर त्याचा फैलाव जगभर झाला आणि ती पूर्ण जगात यशस्वी झाली. १९५१ मधे पत्रिकेच्या जनकाला, हर्मन मायनरला ही कल्पना पण नसेल की असा एक दिवस उजाडेल की जेव्हा जगातील लाखो लोक ही पत्रके वाचू लागतील. वेगवेगळ्या भाषांतून ती छापली जातील आणि त्यामुळे दुनियेच्या कानाकोपऱ्यांतून त्याला मदत मिळेल.

सुरुवातीचे ह्या मासिकाचे काही अंक छापून तयार करण्याची जबाबदारी फ्रिटझ् हायडरची होती. बालग्राम संदेश तो तयार करणार होता. त्याचे शालेय शिक्षण संपले होते आणि त्याला आता सर्व वेळ उपेक्षित मुलांच्या कल्याणासाठी देण्याची इच्छा होती. म्हणून फ्रिटझ्ला बालग्राम संघटनेचा सेक्रेटरी म्हणून नेमण्यात आले होते. ह्या गोष्टीमुळे मायनरला विलक्षण आनंद झाला होता आणि त्याने 'बालग्राम-संदेश' पूर्ण तयार करून, छापून घेण्याची जबाबदारी त्याच्यावर टाकली होती. फ्रिटझ् हायडरच्या लवकरच हे अनुभवास आले की ह्या त्याच्या छोट्या त्रैमासिकाचे अंक प्रत्येकवेळी वाढत्या संख्येने छापावे लागत होते आणि हर्मन मायनरच्या योजनेच्या घवघवीत यशाचे ते एक लक्षणीय गमक होते.

## अनाथाश्रमातील उलरिश

शेवटी मला एकदा उलरिशची बातमी लागली. त्या लहान मुलाच्या दुर्दैवाने माझे अंतःकरण हेलावून गेले आणि कदाचित् नकळत त्याचे माझ्यावर उपकारच झाले असे मला म्हटले पाहिजे कारण त्यामुळे बालग्रामसाठी काहीतरी भरीव काम करण्याची प्रेरणा माझ्या मनात उद्‌भवली.

एक दिवस मी त्याच्या पणजीबाईंना भेटायला गेलो. महाप्रयासाने मी त्यांचे घर शोधून काढले आणि मी त्यांच्यासमोर बसून माहिती घेत होतो.

उन्हाळ्याचे दिवस होते ते. पण त्या कोंदट अंधाऱ्या खोलीत सूर्याचे किरण जेमतेम पोचत होते. कारण त्या झोपडीची खिडकी फारच लहान होती. तेवढाच मंद

प्रकाश त्या बाईच्या सुरकुत्यांचे जाळे असलेल्या चेहेऱ्यावर पडला होता. तिने डोक्याला काळा रूमाल बांधला होता. उलरिशची ती पणजी एका आरामखुर्चीत बसली होती. तिच्या मांडीवर एक प्रार्थनेचे पुस्तक होते आणि तिने आपले हात धरून ठेवले होते, तिची मान पुढे झुकलेली होती. ती बहुतेक झोपली असावी किंवा स्वप्नसृष्टीत असावी. दरवाज्याच्या कुरकुरण्याने तिला जाग आली आणि मी भेटायला आलो आहे, ह्या गोष्टीचे तिला मुळीच आश्चर्य वाटले नाही. कदाचित् तिच्याकडे अलीकडे बरेच लोक भेटायला येत असावेत. फक्त पोलिस किंवा गुप्तपोलिसच नाही तर शेजारीपाजारी पण चौकशीला आले असतील. लोकांना चांभार चौकशा करायची वाईट सवय असते. प्रत्येक गोष्टीत स्वतःचे नाक खुपसायला त्यांना आवडते आणि अगदी मरताना शेवटी तो कोणत्या कपातून चहा प्यायला हे पण त्यांना जाणून घ्यायचे असते.

मी कशासाठी आलो याची काहीच माहिती नसताना तिने मला सरळ विचारलं, "तुम्ही पोलिस ठाण्यावरून आलात की बालगुन्हेगार कोर्टाकडून आलात ?"

मी तिला समजावून सांगितले. मग ती आणखीच त्रयस्थपणे बोलायला लागली. "तुमच्या त्या वर्तमानपत्रापासून मला दूरच ठेवा. तुमच्या येण्यापूर्वी बरेच बातमीदार माझ्याकडे आले होते. माझ्यासारख्या म्हातारीला तुम्ही का त्रास देता ? मला जे काही सांगायचे होते ते सर्व मी सांगून टाकले आहे."

पण मी काही वृत्तपत्रासाठी रिपोर्ट लिहायला आलेलो नव्हतो. मला फक्त उलरिशविषयी अधिक माहिती हवी होती आणि तीदेखील माझ्या स्वतःच्या माहिती-साठी. त्या क्षणी तरी मला तिच्याकडे येण्यात सभ्यतेचा भंग केला आहे असे वाटले. मला खरोखरच इथे काय हवे आहे ? मी कशासाठी आलो आहे ? मी ह्या गरीब बिचाऱ्या बाईला विनाकारण त्रास देतो आहे ? कदाचित् आत्ताच ही बाई थोडी सावरली असेल पण तरीदेखील आम्ही एकमेकांशी बोलू लागलो. पण जेव्हा उलरिशचे नाव निघाले आणि मी फक्त त्याची चौकशी करायला आलो आहे हे तिला समजले तेव्हा मात्र ती बरीच उत्तेजित झाली. "परमेश्वरा, गरीब बिचारा तो मुलगा ! त्यानंतर मी त्याला अजून पाहिलाच नाही. माझे पाय चालत नाहीत. मी जेमतेम इथून उठून चर्चपर्यंत जाऊ शकले किंवा कधीतरी दुकानापर्यंत चालू शकले तरी मला केवढा आनंद वाटेल. पण तो गरीब बिचारा मुलगा--" अश्रू आणि खोकल्याची उबळ आवरीत तिने मला उलरिशची कहाणी सांगितली. मी जेव्हा व्हिएन्नात विद्यार्थीदशेत शिकत होतो, तेव्हा मी बालगुन्हेगारांच्या कोर्टातल्या केसेसबद्दल वर्तमानपत्रातून लेख लिहीत असे आणि त्या पैशांच्या मदतीने माझे शिक्षणाचा खर्च भागत असे. ह्या तरुण मुलांच्या अडचणीबद्दल मला भरपूर माहिती



होती. तरीदेखील ह्या पिचलेल्या म्हातारीची कथा ऐकून माझ्या अंतःकरणात एक नवीन पीळ निर्माण झाला. माझ्यातील वृत्तपत्रकार संपून गेला. चोखंदळ वाचकांसाठी मुलांच्या दुर्दैवाची कथा रंगवून लिहिण्याची ऊर्मी जिरून गेली आणि त्याऐवजी एक मदत करायला उत्सुक असलेली व्यक्ती उभी राहिली. त्या मुलाचे नशीब उघडण्या-साठी काहीतरी करायची प्रबळ इच्छा होऊ लागली.

"मला व माझ्या पतीला ४ मुलं झाली. त्यांपैकी ३ मुलगे पहिल्या महायुद्धात बळी पडले. फक्त माझी मुलगी जिवंत राहिली. माझा नवरा लोहारकाम करीत असे. ह्या तीन मुलांच्या मृत्यूचा त्याला खूप मोठा धक्का बसला आणि तो आजारी झाला. वयाच्या ५०व्या वर्षी तो पण मरून गेला. आमचे लोहारी दुकान बंद पडले आणि मी ह्या झोपड्यात रहायला आले.

माझ्या मुलीचे लग्न झाले आणि ती शहरात रहायला गेली, आणि दुसऱ्या महा युद्धात झालेल्या बाँबहल्ल्यात ती पण मरण पावली. तिचा नवरा युद्धआघाडीवर होता. ह्या दोघांचे एकुलते एक मूल माझ्याकडे आले. हाय देवा, लीझेर्ल मला माझ्या मुलीसारखी होती. मला माझ्या आयुष्यात आता फक्त ती एकटीच उरली होती. फक्त माझी लीझेर्ल ! मी तिला माझ्या या हातांनी वाढविली आणि तिचं लहानपण जास्तीत जास्त सुखी व्हावं म्हणून मी झटले. ती मला 'आई' म्हणायची. आम्हा दोघींचे एकमेकींवर खूप प्रेम होतं. ती १३/१४ वर्षांची झाली, तरीदेखील तिला झोपायच्या वेळी मी लागायची. तिच्या अंथरुणावर बसून मी तिला रोज पऱ्यांच्या कथा सांगत असे. ती खूप चांगली, मेहनती मुलगी होती. तिला मी कपडे शिवायला शिकवलं आणि मग तिला हा उनाडटप्पू भेटला. त्याला मी पाहिलं आणि त्या क्षणा-पासूनच मला तो आवडला नव्हता. मला त्याची धास्ती वाटायची. पण लीझेर्ल त्याच्या प्रेमात पडली. मी खूपदा तिला सांगून पाहिलं, "लीझेर्ल, त्या माणसापासून तू दूर रहा. तो चांगला वाटत नाही. तू फक्त १६ वर्षांची आहेस. अजून लहान मूल आहेस." पण त्या बदमाषानं तिला आपल्या बोटावर नाचवलं आणि शेवटी त्यांचं लग्न झालं. मी किती रडली असेन ! पण मी त्यांना थांबवू शकले नाही. ती दोघे शहरात रहायला गेली आणि तिथे उलरिशचा जन्म झाला. काही दिवसांनी ते रहात असलेली शहरातील खोली खाली करण्याची नोटीस त्यांना मिळाली म्हणून तिघेजण माझ्याकडे येऊन राह्यला लागले. तो एक विक्रेता एजंट होता आणि सारखा दौऱ्या-वर जायचा. पण माझी लीझेर्ल माझ्याजवळ रहात असे, आणि छोटा उलरिशविषयी मला खूप अभिमान वाटायचा. त्याची वाढ खूप छान झाली होती. "ह्या मुलाचे सर्व चांगले होईल" असे मला वाटत असे. मी त्याच्याकरता रोज देवाची प्रार्थना करायची. आणि त्याला विनवणी करायची की, "देवा, ह्या मुलाचे आयुष्य त्याच्या

आजी-आजोबांपेक्षा आणि पणजी-पणजोबांपेक्षा खूप सुखी कर." मी आळवणी करायची, की "देवा आणखी युद्ध होऊ देऊ नकोस." आणि आता पहा, एका फटक्यात सर्व संपून गेलं आहे. त्या तिच्या पाजी नवऱ्याने खूप दिवसांपासून दुसरी बाई ठेवली होती आणि माझ्या लीझेर्लला त्याच्या वाटेतून दूर सारण्याचा प्रयत्न तो करीत होता. त्या दिवशी लीझेर्लला घेऊन तो ओढ्याच्या काठी फिरायला गेला, तेव्हाच माझ्या पोटात गोळा उभा राहिला. खूप चिंता वाटू लागली. तुम्हाला त्याची कल्पना येईल. त्याने उलरिशला सोबत नेण्याचे टाळले, कारण त्याला न्यायचेच नव्हते. पण जेव्हा उलरिश आरडाओरडा करू लागला आणि रडायला लागला तेव्हा तो त्याला घेऊन गेला. जेव्हा ते तिघे येथून गेले तेव्हा मी खूप रडले. काहीतरी अशुभ घडणार असं माझं मन मला सांगू लागलं. थोड्या वेळाने पोलिस आले आणि माझ्या लक्षात आलं की काहीतरी अनिष्ट घडलं असणार! माझी लीझेर्ल पुन्हा मला दिसली नाही! नंतरचे काही आठवडे मी तर अंथरूणच धरलं आणि माझा शक्तिपात झाला. माझ्या लीझेर्लच्या अंत्य-दर्शनालादेखील मी स्मशानात जाऊ शकले नाही. पण तो देव अजून देखील मला नेत नाही! तेव्हापासून मी पुन्हा त्या मुलाला पण पाहिला नाही. हायरे परमेश्वरा, माझ्या गरीब बिचाऱ्या उलरिशला काय काय त्रास सोसावा लागत असेल!"

त्याच दिवशी संध्याकाळी मी उलरिशची काही खेळणी कपडे घेऊन त्या अनाथाश्रमात गेलो. त्या दुर्घटनेनंतर त्याला तिथे पाठवले होते. दाराच्या फटीतून मला तो फक्त ओझरता दिसला. त्या खोलीच्या एका कोपऱ्यात तो आणखी १५/२० मुलांचे बरोबर बसलेला होता. तो स्वतःच्याच विचारात गढून गेलेला दिसत होता. त्याचा चेहेरा फिकट दिसत होता आणि त्याचे डोळे बहुतेक रडून रडून सुजले असावेत असे वाटत होते. त्याचा चेहेरा सुंदर होता. त्याचे डोळे मोठेमोठे व निळे होते. त्याच्या केसांची झुलपे त्याच्या कपाळावर पसरलेली होती. एकदा त्याने माझ्याकडे चटकन् पाहिले पण फारसे लक्ष दिले नाही.

विचारग्रस्त होऊन मी घरी गेलो. माझा १ वर्षांचा छोटा मुलगा मायकल हाताच्या मुठी हनुवटीखाली दाबून स्वस्थ झोपलेला दिसला. मी माझ्या पत्नीच्या निकट जाऊन बराच वेळ उभा राहिलो. तिला माझ्या विचारांचा अचूक पत्ता लागत असे.

तिने मला विचारले, "आपण आपल्या ह्या छोट्याची खूप काळजी घेऊ, चांगले आईबाप बनू. होय ना?"

"होय, 'मी तिचे वाक्य पुरे केले. "आणखी पण जी मुले आपल्याला होतील त्यांची आपण अशीच खूप काळजी घेऊ." आम्ही दिवे बंद केले. त्या लहान बाळाचा



मंद श्वासोच्छ्वास क्षणभर ऐकला आणि खोलीतून बाहेर पडलो.

आत्ता कदाचित् उलरिश पण अंथरूणावर पडला असेल. कदाचित् त्याला झोप येत नसेल किंवा पणजीची आठवण येत असेल, आईची आठवण येत असेल, वडील आठवत असतील आणि ते झोपडीचे घर पण डोळ्यांसमोर दिसत असेल. कदाचित् त्याच्या डोळ्यांतली आसवं त्याच्या गालांवरून ओघळत असतील. तो आपले हुंदके दाबून टाकीत असेल. कारण नाहीतर ती मावशी येऊन त्याला म्हणेल, "चूप".

## आमचं अभियान - व्यर्थ !

लिंटझ्मधील आमच्या पहिल्या ऑफिसचा मला खूप अभिमान वाटत असे. पहिल्या मजल्यावर ही जागा होती आणि त्याला जिना मागच्या बाजूने होता. मग एका छोट्या अंधाऱ्या बोळकंडीतून जावे लागायचे. पुन्हा काही पायऱ्या चढायच्या, आणि अगदी शेवटी एका जुन्यापुराण्या दरवाज्याचा हँडल हाती लागायचा. ५ × ५ च्या त्या खोलीचा दरवाजा ठेंगणा होता. त्यातून वाकून जावे लागायचे. त्याची जमीन करकर वाजायची अीण वरच्या सिलिंगचे तुकडे मधून मधून गळून पडायचे. त्या खोलीला एकुलती एक खिडकी होती आणि त्यामुळे पूर्वीच्या काळी जशा दरोडेखोरांच्या गुहा असत आणि त्या खिडकीतून एक बंदूक रोखलेली असे. त्याची आठवण व्हायची. प्रकाश जास्ती आत येऊ नये, अशीच व्यवस्था त्या खोलीची होती. इतके असूनदेखील मला त्या खोलीचा अभिमान वाटत असे. कारण ही खोली आम्हाला सापडली होती आणि त्याचे दरमहा भाडे अगदी कमी म्हणजे मुलांच्या सर्वसाधारण खाऊच्या पैशांइतके होते. नंतर आम्ही कसेबसे करून त्यात एक लहान टेबलपण आणले होते, एक टेलिफोन जोडला होता, एक जुनाट टाईपरायटर आणला होता, कॉपींग मशीन दानात मिळविलं होतं आणि थोड्या स्वस्तातल्या खुर्च्या पण आणून टाकल्या होत्या. ह्या सर्व गोष्टीचे आम्हाला विलक्षण समाधान वाटत असे.

आम्हाला म्हणजे, मला व माझ्या सेक्रेटरीला. कारण ती सेक्रेटरी स्वयंसेविका बनून इन्स्ब्रुकहून लिंझला येऊन पोचली होती. ४/५ वेळा राहाण्याची जागा बदलल्यानंतर ती आता तिच्या एका दूरच्या मावशीकडे राहात होती आणि अशाप्रकारे लिंझमधे तिची विनामूल्य रहाण्या-जेवण्याची व्यवस्था झाली होती. आता आमच्या प्रचाराच्या अभियानाला कोणताच अडथळा उरला नव्हता. आम्ही छोटासा खाजगी समारंभ करून आमच्या ह्या ऑफिसचे उद्घाटन केले, बालग्रामच्या यशाची मुहूर्तमेढ रोवली आणि आम्ही आमच्या ह्या ऑफिसचे नाव ठेवले ओयासिस (oasis). आता

यानंतर गोष्टी सुरळीत चालायला काहीच हरकत नव्हती. आणि लिंझमधे सर्व नीट सुरू झाले. तेवढ्यात डॅन्यूब नदीला पूर आला आणि त्याच्या भोवतीची वस्ती अर्धी अधिक पाण्याखाली गेली. हजारो माणसे निराश्रित झाली. आणि बरीचशी वाहून पण गेली. यमराजाने (सेंट पीटरने) स्वर्गाची सर्व दारे उघडून टाकली होती आणि त्याच वेळी आमचे वर्गणीदार बनविण्याचे प्रचंड अभियान सुरू होण्याच्या मार्गावर होते. आम्ही (Oberosterreich) सर्व शहरभर पोष्टाने पत्रके पाठवून दिली होती. आमच्या जवळ असलेली सर्व रोख रक्कम आम्ही वापरून टाकली होती. याशिवाय आमचे स्वतःचे पैसे पण त्यात घातले होते पण अजून छपाईचे बिल द्यायचे राहिले होते. पण त्या यमराजाला आमची काळजी वाटत नव्हती. बालग्रामच्या योजनेची माहिती अद्याप कानांवर गेली नसावी आणि अक्षरशः आमचे सर्व काम वाहून गेले होते. लोक फक्त पूरग्रस्तांच्या मदतीसाठी आणि त्यांच्या पुनर्वसनासाठी पैसे पाठवीत होते. लाखो रुपयांचे नुकसान झाले होते, ते भरून काढायचे होते. हजारो लोकांची घरे आणि मालमत्ता वाहून गेली होती. काळजीपूर्वक रीतीने तयार केलेली बालग्रामची प्रचार- पत्रके कुणाचेही लक्ष वेधून घेत नव्हती. पूर ओसरल्यानंतर एका संध्याकाळी मी अनवाणी बाहेर पडलो. माझी विजार गुंडाळी करून गुडघ्याचे वरती ठेवली आणि त्या पुराच्या पाण्यातून मी आमच्या ऑफिसकडे चालत गेलो. आमच्या त्या ऑफिसात आम्ही दोघांनी पुन्हा एकदा छोटा समारंभ केला. एकत्र बसून चहा प्यायलो पण तो पहिल्याइतका सुखावह नव्हता. पण आम्हाला त्याची जरूरी होती. माझ्या छोट्या चांगल्या सेक्रेटरीला तर त्याची निश्चितच गरज होती. मी गेलो तेव्हा टेबलावर हात टेकून त्यात आपले डोके दाबून ठेवून ती हुंदके देऊन रडत होती.

अशा रीतीने हर्मन मायनरला मदत व्हावी म्हणून सुरू केलेल्या आमच्या अभियानाचा श्रीगणेशा झाला, "काळजी करू नकोस" हा मायनरचा ठरावीक सल्ला होता. मी त्याला सर्व हकीगत सांगितली. त्यावर तो म्हणाला, "पुढच्या वेळी आपल्याला यापेक्षा बरे दिवस येतील. त्याची काळजी करू नकोस आणि जे काही पैसे देणगीच्या रूपात जमा होतील, ते सर्व पूरग्रस्तांच्या मदतीसाठी पाठवून दे."

## मध्यवर्ती कचेरीत

नंतरच्या आठवड्याच्या शनिवार रविवारी मी मोकळा होतो, म्हणून इन्नसब्रुकला गेलो. मायनरने सर्व कार्यकर्त्यांची एक बैठक बोलावली होती. अजून ते वर्तुळ लहान होते. फ्रिट्झ् हेडर त्या सभेला बालग्राम संस्थेचा सेक्रेटरी म्हणून उपस्थित



होता आणि बैठकीची सर्व जबाबदारी त्याच्यावरच होती. मायनर म्हणाला, "हे पहा, फ्रिट्झला आपल्या सोबत राहणे फार कठीण होते. त्याच्या वडिलांची इच्छा होती की त्याने आणखी शिकावे. पण ग्रॅज्युएट झाल्याबरोबर फ्रिट्झ्ने जाहीर केले की आता तो फक्त बालग्रामसाठीच काम करणार. त्यामुळे घरात खूप विरोध झाला. आता ते वादळ शांत झाले आहे. पण हेडर कुटुंबाने मात्र माझ्याशी वैर धरले आहे. कारण त्यांना वाटते, की मीच फ्रिट्झ्ला अधिक अभ्यास करून उच्चशिक्षित व्हायला विरोध केला."

त्या बैठकीत फ्राउ हेलन डिड्ल होती. ह्या बाईंना मी प्रथमच पाहिले पण मायनरने त्यांच्याबद्दल खूप माहिती सांगितलेली होती. माझ्या डोळ्यांपुढे तिचे जसे चित्र उभे होते, तशीच ती दिसत होती. अंगाने स्थूल, आईसमान वाटणारी आणि चमकणारे डोळे असलेली. अशा स्त्रिया फार कमी भेटतात. त्या कधी ट्रेड नर्सच्या गणवेशात दिसतात, किंवा सूतिकेच्या भूमिकेत असतात. तर कधी बालविकास मंदिरात शिक्षिका म्हणून दिसतात. एखाद्या शेतकऱ्याची पत्नीपण शेतावर काम करताना तशी दिसते. फार काय अशी एखादी बाई रस्त्यावर पण दिसते. एखाद्या धडपडणाऱ्या मुलाला अलगद उठवते, त्याचे कपडे झटकते आणि आपल्या मोठ्या हँडबॅगमधून रूमाल काढून त्याचे डोळे पुसत असते. अशा स्त्रियांच्या सहवासात एक प्रकारची निश्चिंतता वाटते. त्यांच्या चेहेऱ्यावरून त्यांची संरक्षक भूमिका समजून येते, जीवनात त्या एखाद्या कड्याप्रमाणे खंबीरपणे उभ्या असतात. त्यांचे वय वाढत नाही पण अनेक पावसाळे त्यांनी पाहिलेले असतात. अशीच ही 'ममा डिड्ल' होती. हर्मन मायनरने तिला हे नाव दिले होते.

त्याने मला सांगितले होते की, ही बाई माझी पहिली मदतनीस आहे. जेव्हा मला कुणाची गरज वाटायची, नेमकी ती तिथे असायची आणि असं वाटायचं, की ती नेहमीच तिथे असली पाहिजे. ती लगेच कामाला सुरुवात करायची. ती कधी दमायची नाही. आम्ही रात्ररात्र बसून पत्रके तयार करीत असू, देणगीची पत्रे तयार करीत असू, ती नेहमी मदत करायची. तिचे जीवन शुष्क झालेले होते. पण त्याची तिला पर्वा नव्हती. तिचा नवरा मोठा बांधकाम करणारा ठेकेदार होता. तो दुर्दैवीरीत्या मरण पावला आणि नंतर तिचा एकुलता एक मुलगा पण पदवीधर झाल्यावर ८ दिवसांनी गेला. आमच्या सोबत काम केल्याने तिला समाधान वाटत असे. बालग्राम संस्थेची पहिली सभासद होण्याचा मान तिला मिळाला होता, याचा तिला आनंद होता. आमच्या नवीन संस्थेसाठी देणगी म्हणून पहिला शिलिंग तिने टेबलावर आणून ठेवला होता आणि नंतर खूपच पैसे दिले, पण त्याबद्दल अवाक्षरदेखील काढले नाही. तिला फक्त काम करावयाचे ठाऊक होते. त्यासाठी धन्यवाद मिळण्याची अपेक्षा पण

तिने ठेवली नव्हती. ईम्स्टमधल्या बालग्रामाची ती पहिली माता होती. तिने पहिले बालसदन मांडले. बालग्रामाची माता कशी असली पाहिजे याचा ती एक उत्तम नमुना होती. तिने मातेचे काम अत्यंत सहजपणे केले आणि आजदेखील आमचे ऑफिसचे काम, पत्ते ओळीने लावणे, यादी व्यवस्थित ठेवणे ही कामे ती तितक्याच सहजतेने करते आहे."

तिथे डॉ. लुडविश क्योगूल होते (Dr.Ludwig Kogl) १९४६ मधे विद्यापीठात असताना मायनरची व त्यांची ओळख झाली होती. दोघांनी पुष्कळ वेळा एकत्र बसून अनेक प्रश्नांची चर्चा केली होती. त्यामुळे त्या दोघांची छान मैत्री जमली होती. १९४९ साली जेव्हा बालग्राम संस्थेची स्थापना झाली तेव्हा डॉ. क्योगूल स्वाभाविकपणेच एक संस्थापक सभासद म्हणून हजर होते आणि नंतरच्या काळात त्यांनी अत्यंत सक्षमतेने कार्यकारिणी मंडळाचे विनावेतन सभासद म्हणून काम केले. १९६२ साली जेव्हा मायनर आपली ही चळवळ युरोप खंडाच्या बाहेर नेण्याच्या प्रयत्नात होता, तेव्हा त्याला त्याचे जागी ऑस्ट्रिया देशात काम करणारी व्यक्ती हवी होती. आणि म्हणून १९६२ च्या डिसेंबर महिन्यात डॉ. क्योगूल यांची निवड ऑस्ट्रियातील संस्थेचे उपाध्यक्ष म्हणून झाली आणि पाठोपाठ, त्या संस्थेचा सर्व पत्रव्यवहार कारभार ते पाहू लागले.

आणखी पण तिथे काही स्त्रीपुरुष होते, ज्यांनी हे काम स्वेच्छेने स्वीकारले होते व आज अनेक वर्षे काम करीत होते.

अशा तऱ्हेने वेगळ्या वृत्तीच्या माणसांचा हा गट पाहून मला समाधान वाटले व आश्चर्य पण. मला ती माणसे चांगलेपणासाठी प्राणार्पण करणाऱ्या योद्धयांप्रमाणे वाटली. मी आश्चर्यचकित होऊन मायनरला विचारले, "इतकी चांगली माणसं तुला मिळाली मायनर ?"

तो हसला, "मी ती मिळविण्यात फारसा प्रयास केलेला नाही. ती आपण होऊन आली आणि आमच्याकडून काहीच लाभ होणार नाही हे ठाऊक असल्यामुळे योग्य तीच माणसे आली. त्यांना मुलांसाठी बालग्राम बांधण्यात खरा रस होता आणि म्हणून आम्ही खूप वेळा एकत्र बसलो. रात्रीच्या चर्चा केल्या आणि शून्यांतून ह्या बालग्रामची निर्मिती कशी करावी, याबद्दल बोललो आणि शेवटी जेव्हा बाहेरचे लोक आम्हाला अधिकाधिक विरोध करू लागले तेव्हा आम्ही आपोआप आणखीच एकमेकांच्या जवळ येत गेलो. आम्ही सर्वजण खरेखुरे हटवादी बनलो. कधीकधी आम्ही आमच्या त्या पहिल्या चंद्रमौळी झोपडीत बसत असू आणि आता पुढे काय करावे ते सुचत नसे. पण लगेच आमच्यापैकी कुणाला तरी एक नवीन कल्पना सुचायची आणि पुन्हा एकदा आमच्या अंगांत उत्साह संचार करायचा. एकदा १९४९ सालच्या



उन्हाळ्यात आम्ही फार खिन्न झालो होतो. पोलिसांनी येऊन आमच्या टेबलाला सील लावले, आमचा बँक अकाउंट बंद करून ठेवला आणि आमच्या संस्थेला सर्व कामे सुरू ठेवण्याची बंदी केली. कुणीतरी आमच्यावर आरोप केले होते. मी सर्व लोकांना भेटलो पण त्याचा काही उपयोग झाला नाही. मी फक्त एकच मागणी करीत होतो की आमच्या संस्थेची नीट चौकशी करावी. एका वकिलाची आम्ही मदत घेतली. खूप वेळा भेटीगाठी घेतल्या. नंतर, साक्षीपुरावे दाखल केल्यावर आम्हाला काम करण्याची परवानगी मिळाली. मात्र आमच्यावर खूप निर्बंध घातले गेले. आमच्या ऑफिसच्या कारभाराची तपासणी कधी झालीच नाही. जर तपासणी झाली असती, तर त्यांना सर्व रेकॉर्ड व्यवस्थित ठेवलेले आढळले असते व दोषारोप ठेवायला संधीच मिळाली नसती. पण नंतर आम्हाला कळले की अधिकाऱ्यांनी कुठल्यातरी लोकांच्या सांगण्यावरून आमची चौकशी केली होती आणि ते लोक उघडपणे आमच्याशी सामना करायला तयार नव्हते. याचा आमच्या कामावर त्यावेळी अनिष्ट परिणाम झाला. जवळपास आम्ही रसातळाला पोचलो. आमचा छोटासा समूह त्या लहानशा ऑफिसात जमला आणि आम्हाला पुढचा रस्ता सापडेना. अशा वेळी टेलिफोनची घंटा वाजली. ड्रॅझेल नावाचा उद्योगपती फोनवर बोलत होता. मी त्याचे नावदेखील ऐकलेले नव्हते. त्याने आम्हाला १२,००० शिलिंग्जची देणगी देऊ केली. आम्हा सर्वांना आनंदाने आभाळ ठेंगणे वाटले. त्या आनंदाचे वर्णन करणे अशक्य आहे. आमचे सर्वस्व सुरक्षित राहिले ! आणि ह्या सर्व उत्साहपूर्ण वातावरणात मी फक्त एकटा असा होतो की, मला खात्री वाटत होती ह्या पैशांत आमचा खर्चदेखील पुरा भागणार नाही. एक बालसदनची इमारत बांधण्याची कल्पना तर सोडूनच द्यावी लागेल. पण त्यावेळी मी काहीच बोललो नाही. कारण ती देणगी मिळाल्यामुळे आम्ही अधिक प्रयत्नशील बनलो होतो. अशा तऱ्हेने मी व माझ्या छोट्या विश्वासू चमूने पुष्कळ चांगले दिवस पाहिले आणि वाईट पण अनुभवले. आम्ही माघार घेतली नाही. म्हणूनच ईम्स्टमधील पहिले बालग्राम वाढू शकले.

फ्राउ डीड्ल मधेच म्हणाली, "त्या सर्वांसोबत परमेश्वर पण आपल्या पाठीशी होता, हर मायनर !" (संचालक)

मायनरने मधेच विरोध केला. "पण परमेश्वराचे आशीर्वाद एकतर्फी नसतात. जी माणसे काम करून स्वतःची मदत करतात त्यांनाच परमेश्वर मदत करीत असतो."

"आणि जे लोक प्रार्थना करतात त्यांना." ममा डिड्ल म्हणाली.

"तिचं म्हणणं बरोबर आहे" मायनर म्हणाला. "मी अत्यंत मनोभावे प्रार्थना करीत असे. प्रार्थनेशिवाय कोणत्याच कामाला यश मिळत नाही. त्यामुळेच आपला हा

छोटा समुदाय बराचसा धार्मिक प्रवृत्तीचा बनला आहे.''

''आमच्या या बालग्रामची पण एक स्वतंत्र प्रार्थना आहे.'' फ्रिटझ् हेडर म्हणाला. धर्मगुरूंनी त्याला संमतीपण दिली आहे. ही पहा ती प्रार्थना.'' त्याने आपल्या खिशातून एक कागद काढला आणि तो मायनरला दिला. मायनर मोठ्याने वाचू लागला.

**''आमच्या ह्या कुटुंबाचे जे सर्व सभासद आहेत, त्यांची आम्ही नीट काळजी घेऊ. आम्ही एकात्मतेने राहू. हे परमेश्वरा, आम्ही तुला विनवणी करतो की तुझा कृपामय आशीर्वाद आम्हाला सतत मिळू दे. तू आम्हा सर्वांना एकत्र आणिले आहेस म्हणून एकदिलाने तुझी सेवा करण्याची संधी आम्हाला दे. आमच्या या कुटुंबात नेहमी एकी आणि प्रसन्नता राहू दे. आमच्या ह्या बालग्रामचे अशुभापासून, पापापासून आणि वंचनेपासून संरक्षण कर. आम्हाला जे प्रिय आहेत, त्यांच्यावर दया कर आणि जे आम्हाला मदत करतात त्यांच्यावर कृपा कर. जसा तू आमचा सर्वांचा प्रेमळ पिता आहेस, आमच्यावर प्रेम करतोस, आम्हाला क्षमा करतोस त्याचप्रमाणे आम्हाला एक-मेकांवर प्रेम करण्याची आणि एकमेकांना क्षमा करण्याची शक्ती दे. हे दयाघना, तुझे आमच्यावर अनंत उपकार आहेत.''**

एक क्षणभर तिथे एकदम शांतता पसरली. आत्ता इथपासून पुढे इम्स्टमधील सर्व बालग्रामच्या माता आणि मुले ही प्रार्थना रोज म्हणतील. आमचे कार्यकर्ते मित्र पण त्यावेळी त्यांच्यात सामील होतील आणि एक दिवस कदाचित् शेकडो हजारो मुले ही प्रार्थना अनेक देशांतील बालग्रामांतून अनेक भाषांतून म्हणतील. बालग्रामची ही ज्योत सतत तेवत राहील. इम्स्टमधे त्याची सुरुवात झाली आहे आणि तो सर्वांना आदर्श नमुना आहे. दररोज इतकी सारी मुले व मोठी माणसे जेव्हा ही प्रार्थना म्हण-तील त्यावेळी त्यांना त्यांची ताकद व श्रद्धा वाढल्याचा अनुभव येईल.

इन्नसब्रुकमधील ते काही तास भुर्रकन निघून गेले. पुष्कळ गोष्टी चर्चा करून ठरवायच्या होत्या. व्हिएन्नामधे एक नवीन ऑफिस उघडण्यासाठी जागा शोधायची होती. सध्याची छोटी जागा वाढत्या कामाला पुरेशी नव्हती.

''व्हिएन्नामधे ऑफिस ठेवायलाच हवे'' मायनरने पुष्टी दिली. ''आपल्याला जर ही चळवळ ऑस्ट्रियाच्या बाहेर न्यायची असेल, तर आपल्याला टिरोलच्या बाहेर पडा-वेच लागेल. बालग्राम चळवळीच्या कामाचा आत्मा इन्नसब्रुकमधेच राहील, पण त्याचे शरीर (डोके) मात्र व्हिएन्नात असेल. तिथे आपल्याला युद्धाच्या तयारीने जावे लागेल. तिथून आपल्याला नवीन देश जिंकायचे आहेत. व्हिएन्नातून आपल्याला शेकड्यांनी व हजारोंनी माणसे मिळवता येतील.''

मायनर पुन्हा नवनवीन योजनांचा विचार करू लागला. ह्या वेळी आम्ही सर्व



मुद्दाम चूप बसलो. कारण अशा वेळीच मायनर आपले विचार बोलून दाखवीत असे.

''व्हिएन्नात आपल्याला कोण ओळखतो ? कोणीच नाही, जे थोडेफार वर्गणी-दार आहेत ते सोडून द्या. ६ महिन्यांपूर्वी व्हिएन्नाच्या वर्तमानपत्रांनी आपल्या कामाची दखल घेतली होती. पण त्यानंतर ते इम्स्टला विसरलेले दिसतात. पण आपल्याला त्यांना जागृत केले पाहिजे. आपल्याला ह्या व्हिएन्ना शहरातील प्रत्येक घरात जाऊन पोहोचलं पाहिजे.

''परंतु हर्मन, त्याचा अर्थ आपल्याला हजारो पत्रे पाठवावी लागतील.'' फिटझ् हेडर हसून म्हणाला.

''समजा. ती जरी लाखांनी पाठवावी लागली तरी आपल्याला ती पाठवायलाच हवीत. आपण थोडासा धोका पण पत्करायला हवा. अर्थात् आपल्याला वर्तमान-पत्रांची, रेडिओची, सर्व प्रकारच्या प्रसिद्धीची गरज लागेल. नाहीतर आपण असफल होऊ. आपल्याला व्हिएन्ना जिंकलंच पाहिजे.''

ती सबंध रात्र आम्ही एकत्र बसलो. दुसऱ्या दिवशी मी लिंझला परत गेलो. जाताना रेल्वेगाडीत बसलो होतो, तेव्हा मी इतका दमलो होतो की, डोळे उघडे ठेवणे मला अशक्य होते. पण मला झोप मात्र आली नाही. सर्व तऱ्हेचे विचार माझ्या डोक्यात पिंजून निघत होते. मी काय एखाद्या भ्रमिष्ट माणसाच्या तावडीत सापडलो आहे की कसं ? का एखाद्या आधुनिक गुरूच्या कच्छपी लागलो आहे ? मला नीट काही समजत नव्हते. मायनरला कोणत्या योजना अंमलात आणायच्या आहेत ? त्याच्या कल्पना तरी काय आहेत ? त्याला काय काय बांधायचे आहे ? आणि ते कशातून ? फक्त त्याच्या अटळ असलेल्या श्रद्धेतून ? सर्व डोलारा जो त्याने उभा केला आहे, तो एका क्षणात कोसळू शकतो. किंवा साबणाच्या फुग्याप्रमाणे फुटून जाऊ शकतो. जाऊ दे ! मी कसल्या ह्या भानगडीत उगीच पडलो आहे ? मला काय वर्तमानपत्रांचे काम पुरेसे नाही ? मला काय उत्तम भविष्यकाळाची उमेद नाही ? मग मी या इम्स्टमधल्या बालग्राम बांधणाऱ्या माणसाच्या नादी का लागलो आहे ? नंतर माझ्या डोळ्यांपुढे इन्नसब्रुकमधील त्याचे सगळे मदतनीस उभे राहिले. त्यांच्या-पैकी कोणीही स्वतःच्या स्वार्थाचा विचार करीत नाही किंवा काम केल्याने स्वतःचा काय फायदा होईल याची पर्वा करीत नाही. पण प्रत्येक जण एक तऱ्हेच्या धुंदीत काम करीत आहे. तेवढ्यात माझे विचार उडी मारून माझ्या लहानग्या मित्राकडे - उलरिश-कडे पोचले. आम्हाला जर काही साध्य करता आले, जर आम्हाला पैसे मिळाले, जर त्यामुळे आम्हाला बांधकाम आणखी वाढवता आले, तर आपोआपच उलरिशला त्यात जागा मिळण्याचा संभव होता.

नाही. आता माघार घेऊन उपयोग नाही. हर्मन मायनरला पण त्याच्या कल्पने-

तून माघार घेता येणे शक्य नव्हते आणि त्याच्या या नवीन सहयोग्याला, मला पण मायनरने पूर्णपणे जिंकून घेतले होते.

## काल्डोनात्झो मधील सुट्टी (CALDONAZZO)

उन्हाळ्याच्या सुरुवातीपर्यंत आमचे शहरातील बालग्रामचे काम फारसे वाढले नाही. डॅन्यूब नदीचा पूर ओसरला होता. उद्ध्वस्त झालेला परिसर थोडासा दुरुस्त झाला होता आणि ते काम आमच्या अपेक्षेपेक्षा लवकर झाले होते. पूर आला होता ही घटना आता भूतकाळात गडप झाली होती. कारण रोजचे दैनंदिन जीवन सुरू झाले होते. आमच्या 'oasis' ऑफिसमधील काम पण नेहमीप्रमाणे होऊ लागले होते. माझे काम खूपच वाढले होते. वृत्तपत्रांच्या सभांना फ्रान्स व इटलीमधे जावे लागत असे आणि ह्या सभा इतक्या लांबत, की माझे अनेक दिवस त्यात निघून जात. तरी-देखील आम्ही नाव-पत्त्यांच्या याद्या जमविण्याचे काम वेगाने करीत होतो. कारण हिवाळ्याच्या सुरुवातीस आम्हाला रस्तोरस्ती हिंडून वर्गणी गोळा करण्याची परवानगी मिळाली होती. मध्यंतरी आम्हाला व्हिएन्नामधे एक नवीन जागा मिळाली होती आणि आम्ही आमचे ऑफिस तिथे हलविले होते. एक धर्मादाय लॉटरी उघडण्यास आम्हास अनुमती मिळाली होती. काही लोकांनी बालग्रामसाठी प्रतिवर्षी एक कॅलेंडर छापून घेण्याची सूचना दिली होती. सभासद बनविण्याचे अभियान सुरू करायचे होते त्यासाठी घरोघर जाऊन अर्जाचे फॉर्म्स वाटून झाले होते. ईस्टमधल्या कामा-साठी नवीन मित्र मिळविण्याचे काम खूप कार्यकर्ते मंडळी आपण होऊन करत होती.

आता सुट्टीचे दिवस जवळ येत होते. मायनरने मला एका मुलांच्या उन्हाळ्या तील सुट्टी शिबिरात येण्याचे निमंत्रण पाठविले. हा कँप इटालीमधे ट्रेटोजवळील काल्डानात्झोला होणार होता.

मी जेव्हा रेल्वेने इटालीत पोहोचलो, तो दिवस खूप उन्हाळ्याचा होता. स्टेशन वर उतरून मी शिबिराची जागा शोधीत होतो. मी केव्हा येईन त्याची आगाऊ सूचना मी कुणालाच पाठवली नव्हती. शेवटी मला तो कँप काल्डोनात्झोच्या सुंदर सरोवराच्या काठी वसवलेला दिसला. अगदी किनाऱ्याला लागून काही तंबू ठोकलेले होते. मुले इकडून तिकडे उंडारत होती. पाणी उडवीत होती. मला एक लाल-पांढरे निशाण दिसले. त्यावर बालग्रामचे चिन्ह छापलेले होते. दोन लहान मुले सुंदर जीवनाचे प्रतीक असे एक झाड हातात धरून उभी आहेत, असे ते सूचक चित्र होते. हे निशाण एका उंच खांबावर फडफडत होते. कँपच्या मागच्या बाजूला



द्राक्षांच्या बागा होत्या आणि त्या टेकड्यांपर्यंत पोचलेल्या होत्या. ते सर्व रम्य दृश्य पाहून छोट्या स्वर्गाची कल्पना येत होती.

एका छोट्या तंबूच्या बाहेर बसून हर्मन मायनर लिहीत होता. मी त्याच्यापुढे जाऊन कडक शिस्तीने उभा राहिलो आणि त्याला सलाम करून म्हटले, "कँप कमांडरपुढे मी नम्रतेने हाजिर होत आहे."

"कामाला लाग. लगेच काम सुरू कर." असे उत्तर मला मिळाले. त्याच्या स्वतःच्या तंबूच्या शेजारी माझा पण तंबू उभा करण्याची अनुमती मिळाली व एक तंबू पण मंजूर झाला.

"माफ करा. पण मी माझा तंबू आणला आहे."

"फारच छान ! आपण तो लगेच ठोकू या."

जेव्हा आम्ही माझा तंबू ठोकण्याचे काम करीत होतो तेव्हा मायनरने मला ती सुंदर जागा कशी मिळाली, त्याबद्दल माहिती सांगितली. इम्स्टमधील बाल-ग्रामात सर्व स्थिरस्थावर झाल्यावर मायनरच्या लक्षात आले की, ह्या मातांना पण वर्षातून एकदा सुट्टी मिळायला हवी. पण त्या आता सुट्टीवर गेल्या की मुलांचे काय करायचे ? मायनरला ह्या प्रश्नाचे पण उत्तर सापडले. जेव्हा सर्व माता सुट्टीवर जातील तेव्हा फक्त एक माता बालग्रामात राहील आणि ती सर्व लहान मुलांना सांभाळील. त्या मातेला नंतर सुट्टीवर पाठवता येईल आणि स्वतः मायनर सर्व मोठ्या मुलांना घेऊन सुट्टी-शिबिराला सरोवराकाठी जाईल. तिथे शिक्षक व विद्यार्थ्यांना कँपचे काम मिळेल. बालग्रामच्या मातांना ६ आठवड्यांची सुट्टी व विश्रांती निर्वेध मिळेल. त्यावेळी त्यांची मुले सरोवराच्या काठी असलेल्या छोट्या वर्गात त्यांची सुट्टी खूप मजेत घालवतील.

तेव्हापासून आजपर्यंत हे चालत आले आहे. फरक इतकाच आहे की, आता युरोप खंडातील १० देशांतील जवळपास २००० मुले आपल्या बालग्रामच्या मुलांची सुट्टी-शिबिरे चालवीत आहेत. सरोवराच्या काठी तंबू ठोकून ती मुले राहतात. मुली तिथल्या जवळपासच्या बंगल्यांतून राहातात. करमणुकीचे कार्यक्रम, खेळांच्या स्पर्धा, पायी भ्रमण, नाटके आणि संगीताच्या मैफिली होत असतात आणि त्यामुळे मुले एकमेकांजवळ येऊन त्यांचे परस्पर संबंध वाढतात. वेगवेगळी भाषा बोलणारी आणि वेगवेगळ्या देशांतून आलेली ती मुले देश, भाषा ही बंधने पार करून एक मोठा युरोपियन परिवार एकत्र राहिल्याप्रमाणे वावरतात. त्यांचेकडे पाहून ती कुठल्या दुःखद परिस्थितीतून आली असतील याची आठवण पण येत नाही.

पण अजून आम्हाला भविष्यात काय होणार आहे याची चाहूल लागत नव्हती. हर्मन मायनरलादेखील ते माहीत होते की नाही कुणास ठाऊक ? का त्याला ती

योजना समजली होती आणि तो आमच्यापासून ती लपवून ठेवीत होता ? तो त्या सरोवराच्या काठी मिळेल तितकी जमीन घेण्याचा प्रयत्न कसोशीने करत होता. आमचा त्याला विरोध होता कारण इतका मोठा खर्च करण्याची आमची तयारी नव्हती. पण मायनर अधिकाधिक जमीन घेतच राहिला. ही जमिनीची गुंतवणूक त्याने केली नसती तर आज जी आंतरराष्ट्रीय शिबिरे सरोवराच्या काठी नियमित होत आहेत ती कधीच झाली नसती. पुष्कळ वर्षे ही जमीन थोडीदेखील खरेदी करणे कठीण झाले होते. किंमती पण आकाशाला जाऊन भिडल्या होत्या. पुन्हा एकदा मायनर बरोबर होता.

मी जेव्हा प्रथम गेलो तेव्हा काल्डोनाझ्झोच्या ह्या कँम्पमधे फार थोडी मुले होती. पण नंतर तंबूतील त्या रोमांचक जीवनाची गोडी लागून ही सुट्टी शिबिराची जागा कायमची म्हणून ठरविली गेली. मुलांना खाटा नव्हत्या. मुलांनी आपले बिछाने व ब्लँकेटे आणली होती. जमिनीवर गवत पसरून ही अंथरुणे त्यावर घालीत असत. एक जुनी मोडकळीस आलेली वखार होती. त्यात कँपचे स्वयंपाकघर थाटले होते. आणि त्यात पाठीमागचे बाजूस ममा डिड्ल उभी असायची. तिच्या हातात एक भली मोठी युद्धकालीन, फेकून दिलेली किटली असायची. इथे पण मायनरची पहिली मदतनीस तत्परतेने हजर असायची. त्या किटलीतील सूप अगदी उकळीचे, गरम असायचे आणि २ भांड्यांची झाकणे एकत्र वाजवून ती म्हणायची, "चला मुलांनो, सूप प्यायला." आणि मुले धावत धावत आपली वाटी घेऊन सूप घ्यायला यायची. संध्याकाळी गाणी, गोष्टी, हास्यविनोद व शेकोटी असायची. मला स्वतःला हा कार्यक्रम खूप आवडत असे.

कँपमधल्या माझ्या मुक्कामाचा तो शेवटचा दिवस होता, आणि सर्व कँपमधे गडबड उडाली होती. कारण एक मुलगा पळून गेला होता ! ११ वर्षांचा हा मुलगा दुपारच्या विश्रांतीनंतर नाहीसा झाला होता. दुपारच्या जेवणाच्या वेळी तो होता. पण नंतर केव्हा निघून गेला, ते कुणाच्याच लक्षात आले नाही. आता दुपारचे तीन वाजले होते. सर्व तंबूंतून शोधून पाहिले पण तो सापडला नाही. मग आम्ही कसोशीने शोध घ्यायला सुरुवात केली. मुलांना सोबत घेऊन आम्ही सर्व आजूबाजूचा परिसर शोधून पाहिला. पण तो सापडलाच नाही. तो पाण्यात नक्की गेला नव्हता. कारण सरोवराच्या काठावर नेहमी एक प्रौढ मनुष्य उभा असायचा आणि चांगला शिकविणारा शिक्षक सोबत असल्याशिवाय मुलांना सरोवरात पोहण्याची बंदी घातलेली होती. मग तो मुलगा गेला तरी कुठे ? मायनरने सर्व तंबू-नेत्यांना एकत्र बोलावले. कुणालाच काही सुचत नव्हते. सकाळी तो मुलांच्या एका टोळक्यात होता आणि ती मुले बोरे पाडायला गेली होती आणि परत येताना इतर मुलांप्रमाणे त्याने



पण एक मोठी पिशवी भरून बोरे आणली होती. आज संध्याकाळी सर्व मुलांना बोरे व खडीसाखर मिळणार होती.

जेव्हा दुपारपर्यंत तो मुलगा परत आला नाही, तेव्हा मायनरने इटालियन पोलिसांना कळवायचे ठरवले. पण त्याने त्यापूर्वी पून्हा एकदा सर्व कँपची कसोशीने पहाणी करावयाचे ठरविले. खरं म्हणजे तो प्रयत्न व्यर्थ होता. पण तरीदेखील ती पहाणी केली. पण सापडला नाही. अचानक ममा डिडलूने आनंदाने आरोळी दिली. "हा इथे आहे पहा !" आणि कोपऱ्यात रचलेल्या लाकडांच्या ढिगाऱ्यामागून तिने त्याला बाहेर आणले. तिथे पहावे हे कुणालाच सुचले नव्हते. मुलगा घाबरला होता आणि हट्ट पण करीत होता. हळूहळू त्याच्या नाहीसा होण्याचे कारण समजले. तो एका दुसऱ्या मुलाशी भांडला होता. तो मुलगा दादागिरी करणारा होता. "ही गोष्ट आता स्पष्ट झाली आहे." मायनर म्हणाला. "मी तुम्हाला समजावून सांगतो हा मुलगा जरा वागायला विचित्र आहे. त्याला दुसऱ्यांशी भांडता येत नाही. तो अधिकच विचित्रपणाने वागतो. त्याची कहाणी पण अतिशय खिन्न करणारी आहे. त्याला त्याचे वडील माहिती नाहीत. त्याच्या आईने त्याला एका भटक्या जमातीत देऊन टाकले. तो त्या विमुक्त लोकांबरोबर चार वर्षे भटकत होता. एकदा समाजकल्याण विभागाच्या लोकांनी त्याला उचलले आणि एका पालक-कुटुंबात पाठवून दिले. त्याचे पालक आई-बाप वाह्यात, दारूडे होते. ते जेव्हा दारूच्या गुत्त्यात जात असत, तेव्हा ते बेसुमार पिऊन घरी येत असत. तेव्हा या मुलाला रडताना पाहून त्याला खूप मारीत असत. जेव्हा शाळेत जाण्याची वेळ आली, तेव्हा तो प्रवेशपरीक्षेत नापास झाला. पुन्हा जेव्हा शिक्षकाने त्याला शिक्षा देऊन आत घेतले, तेव्हा तो वर्गाच्या बाहेर उभा राहिला. त्याला आत घेऊन जाणे कठीण झाले. तो आडमुठा बनला.

"पुन्हा समाजकल्याण विभागाचे लोक आले आणि त्यांनी त्याला दुसऱ्या पालक कुटुंबांत पाठवले. तो ९ वर्षांचा होईपर्यंत वेगवेगळ्या ८ पालक-कुटुंबांत राहून आलेला होता. तो म्हणजे एक समस्या बनली होती. तो कुणाला आवडत नव्हता, एकाकी पडला होता, आणि सर्व वडील-माणसांचा तो तिरस्कार करायला लागला होता. ह्या तिरस्काराची जागा नंतर अवज्ञेने घेतली. त्यावेळी त्याला एका छोट्या शेतावरच्या पालक-कुटुंबात ठेवलेले होते. त्या कुटुंबात आधीची ४ मुले होती. त्यामुळे ह्याला सावत्र मुलाप्रमाणे वागवले जात होते. जेव्हा ती सर्व मुले खेळत असायची तेव्हा ह्याला काम करावे लागायचे. त्या सर्व मुलांना झोपायला खाटा होत्या. ह्याला मात्र अंधाऱ्या तबेल्यात झोपावं लागायचं. त्याने काही केले असो किंवा नसो, प्रत्येक गोष्टीत त्याच्यावर आळ घेतला जायचा. त्याला नेहमी हेच शब्द कानावर पडायचे, "तू

फुकट्या, आळशी, चोर, बदमाष !" कुणीही त्याच्याशी एकही शब्द प्रेमाने बोलत नसे. शाळेत पण तो सतत नापास व्हायचा. एकदा निराशेच्या भरात त्याने तबेला पेटवून देण्याचा प्रयत्न केला. जेव्हा पालक बापाने ते पाहिले तेव्हा त्याने त्याला मरेपर्यंत चोपून काढले. मग पुन्हा समाजकल्याणाचे लोक आले. ह्या मुलाला आपल्याकडे पाठवलं. आता जवळपास तो वर्षभर आपल्याकडे राहत आहे. अजून त्याचा आडमुठेपणा कायम आहे. पण तो पुष्कळ सुधारला आहे. शाळेत पण आता बरा राहतो. त्याच्या बालसदनाची जी माता आहे, ती एखाद्या देवदूताप्रमाणे आहे. ती त्याला पुनःपुन्हा माफ करते, रागवत नाही, नेहमी त्याच्याशी चांगली वागते. त्याचं खूपच कौतुक करते आणि क्वचितच त्याच्यावर रागावते. थोडक्यात म्हणजे तिला तो आवडतो. त्यामुळे तो हळूहळू बदलत आहे. केव्हातरी तो सुधारेल अशी मला आशा वाटते. पण अजून तो प्रतिकार न करता संरक्षण कसे होईल याच भीतीत असतो. जर तुम्ही त्याच्यावर रागावलात, तर तो आणखीच आडमुठेपणाने वागतो. आज तेच झालं. त्या मोठ्या मुलाशी झालेलं भांडण हेच त्याचं कारण आहे. त्याच्याशी तो भांडू शकत नाही. आणि म्हणून त्याने लपून बसायचे ठरवले.

संध्याकाळी मुले जेव्हा त्यांच्या अंथरुणात जाऊन झोपली तेव्हा सर्व मोठी माणसे शेकोटीभोवती जमली. मायनरने पुन्हा तो विषय सुरू केला. नेहमी असं म्हटलं जातं की, जी मुले अशी अवघड बनतात ती बहुतेक रोगी मनःस्थिती असलेल्या पार्श्वभूमीवर आलेली असतात. त्यांचे बालपण कठीण अवस्थेत गेलेलं असतं. त्यांचे बरेचसे शिक्षणविषयक प्रश्न जर त्यांचे वातावरण सुधारले तर आपोआप सुटतात. तिथे त्यांना प्रेम व आपुलकीची वागणूक मिळते. वडील माणसांची माया मिळते आणि सर्वांपेक्षा अधिक महत्त्वाची गोष्ट, एक प्रेमळ बाई त्याला आई म्हणून लाभते. सर्व मुलांना या वातावरणाचा निश्चित लाभ मिळतो व ती सुधारतात. पण काही मुले फारच लौकर सुधारतात. काही मुलांना खूप वेळ लागतो. अगदी वर्षानुवर्षे, त्यांना सर्वसाधारण स्वाभाविक बनविण्यासाठी लागतात. फक्त मानसिकदृष्ट्या आजारी मुले सुधारत नाहीत. अलीकडे आमच्याकडे असा एक मुलगा आला होता पण आम्ही त्याचे काही करू शकलो नाही. अशा मुलांना तज्ज्ञ डॉक्टरांची गरज असते.

"आपण सर्वजण ह्या प्रवृत्तीचे बनलो आहोत आणि ह्या प्रवृत्ती पिढ्यांतून आनुवंशिकतेने आपल्याला मिळत असतात. ह्या आनुवंशिकतेच्या विरोधात आपण काय करणार ? नेहमी ते तसंच राहणार." एका तंबूच्या नेत्याने आपले म्हणणे मांडले. तो एका धार्मिक कॉलेजचा इन्सब्रूकमधील विद्यार्थी होता.

मायनरला त्याचे म्हणणे पटले नाही. "नाही, नाही. आपण त्या प्रवृत्तीचा जास्ती उदोउदो पण करू नये किंवा त्याकडे दुर्लक्ष पण करू नये. पण बऱ्याच वेळा



ह्या आनुवंशिक प्रवृत्ती सुधारता येतात. कारण मनुष्य जो शेवटी तयार होतो तो फक्त आनुवंशिकतेवर अवलंबून राहत नाही. त्यासोबत त्याचे वातावरण व त्याचे शिक्षण ही दोन अंगे पण तितकीच महत्त्वाची असतात.

हे सर्व बोलणे संपेपर्यंत मध्यरात्र झाली होती. सरोवरातून चंद्रमा हळूहळू वर येत होता. सर्व वातावरण शांत होते. फक्त रातकिड्यांचा आवाज त्या अंधारात ऐकू येत होता आणि तो संगीताप्रमाणे भासत होता. एका तंबूतून एका लहान मुलाच्या ओरडण्याचा आवाज ऐकू आला. बहुधा तो स्वप्नात घाबरला असावा. पुन्हा सर्व शांत झाले. त्या मुलाच्या पूर्वायुष्यातील एखाद्या शोकप्रसंगाची त्याच्या सुप्त मनात असलेली भीती झोपेत उद्रेक होऊन बाहेर पडली असावी. तंबूत झोपलेल्या त्या सर्व मुलांच्या बाबतीत हा अनुभव येत असे. एक शांत असा मुलांचा समूह जणू. या ठिकाणी त्यांचा पुनर्जन्म होत असे.

काल्डोनाझोमधील माझी ती शेवटी संध्याकाळ होती. दुसऱ्या दिवशी पहाटे मला निघायचे होते. वास्तविक आणखी काही दिवस राहण्याची माझी इच्छा होती. कारण ह्या महत्त्वाच्या चळवळीचे भविष्य त्या काळात घडत होते. आणि मला त्यात भाग घेण्याची संधी मिळाली होती. ते भविष्य उज्ज्वल होते. फक्त गरीब टाकलेल्या मुलांचे भविष्यच नव्हे तर आम्हा सर्वांचेच भविष्य उज्ज्वल होणार होते.

## लिंझमधील देणगी अभियान

देवाशपथ, मला कधी कुणी सांगितलं असतं तर खरंच वाटलं नसतं की रस्त्यावर उभे राहून वर्गणी जमा करणं इतकं मेहनतीचं काम असतं म्हणून ! पण शहरात रस्त्यावर उभे राहून देणगी जमविण्याची आम्हाला परवानगी मिळालेली होती. त्यामुळे आता आम्हाला हे अभियान चालविणे भागच होते. दान-पेट्या कुठून मिळवायच्या ? गोळा करण्याला स्वयंसेवक कुठून आणायचे ? हे अभियान नीटपणे कसे चालवायचे ? मला स्वतःला यातला काहीच अनुभव नव्हता.

मला माझ्या वर्तमानपत्राच्या कामातून जेवढी फुरसद मिळायची त्यातला प्रत्येक क्षण मी आमच्या 'ओएॅसिस' ऑफिसच्या कामात घालवायचो. माझ्या सेक्रेटरीने तर तिथेच एक कॉट टाकून ठेवली होती, कारण बऱ्याच रात्री तिला घरी जायला वेळच मिळत नसे. आम्ही असे ठरविले होते की फक्त लिंझमधेच नाही तर सर्वच मोठमोठ्या शहरांतून हे अभियान चालवायचे. त्यासाठी आम्हांला खूप पत्रव्यवहार, टेलिफोनचे संपर्क, शाळांतून व युवक-संघांतून व्याख्याने, चर्चासत्रे, आणि बऱ्याच गोष्टी

ठरवायच्या होत्या. तसेच स्वयंसेवकांसाठी सविस्तर सूचनांचा मसुदा तयार करायचा होता, आणि पेट्या भरल्यावर मोजणीची पण व्यवस्था करायची होती. जेव्हा रेड क्रॉस संस्थेतून आम्हाला खूप दानपेट्या मिळाल्या तेव्हा माझ्या मनावरील ओझे उतरले. दुसऱ्या बऱ्याच सामाजिक संस्थांकडून पण आम्ही दानपेट्या मिळविल्या.

आमची कचेरी एखाद्या पेट्यांच्या गुदामासारखी दिसू लागली. खोलीत फिरायला पण जागा उरली नाही.

एके दिवशी संध्याकाळी, "मी तुमच्यासाठी २०० पेट्या आणल्या आहेत." असे म्हणत म्हणत मायनर कसाबसा कचेरीत घुसला. "चला, आपण त्या गाडीतून काढून वर घेऊन येऊ."

मी घाईघाईनं माझ्या वर्तमानपत्राच्या कचेरीत जायला निघणार होतो पण त्या पेट्या वरती आणून मग जावे असे मी ठरवले. आम्ही दोघांनी भरपूर पेट्या उचलल्या. एका दोरीत त्या पत्र्याच्या पेट्या ओवल्या व आमच्या छोट्या जिन्यातून त्यांना वर नेऊ लागलो.

"खूप जड झालं आहे." मायनर म्हणाला आणि मी जोराने त्या पेट्या वरच्या काही पायऱ्यांवर ढकलून दिल्या. तेवढ्यात पेट्यांना बांधलेली ती दोरी तुटली आणि कानठळ्या बसतील एवढा डब्यांचा आवाज ऐकू आला. जणू काय सर्व घरच हादरून पडते आहे असे वाटले. सबंध जिन्यावरून त्या पेट्या घरंगळत खालच्या मजल्यावर आल्या. आणखी पण दूर अंतरावरील एका बोळकांडीत शिरल्या आणि इमारतीच्या व्यवस्थापकाच्या दारात थडथडत जाऊन आपटल्या. ती व्यवस्थापिका घाबरून जाऊन दाराबाहेरच धावली. इतर लोक पण घाबरले होते. त्या इमारतीत इतके लोक राहतात हे मला त्या दिवशच कळले. आमच्या अवतीभवती सर्व माणसे आश्चर्यचकित होऊन हातवारे करीत होती. "मला ठाऊक होते की ही भीक मागणारी माणसे इथे राहू दिली तर आपल्याला नक्की त्रास होईल आणि त्याप्रमाणे तो झालाच."

"वा !दान-पेट्या ! मला या पेट्यांचा वीट आला आहे ! ते नाझी आल्यापासून आम्हाला वर्गणी देण्यापलीकडे दुसरा उद्योगच उरला नाही."

मायनरने व मी मुकाट्याने त्या पेट्या पुन्हा दोरीला बांधल्या. तोपर्यंत हे टोमणे मारणे चालूच होते. शेवटी एकदाचे आम्ही त्या सर्व पेट्या घेऊन आमच्या ऑफिसात शिरलो.

मायनर म्हणाला, "ठीक आहे, काम करीत असताना अशा गोष्टी होणारच, सर्व सहन करायला शिकलं पाहिजे." मग तो त्या पेट्यांच्या ढिगावर बसून सिगरेट



ओढू लागला आणि मी माझ्या कचेरीत गेलो.

पुन्हा मध्यरात्री मी कार्यालयात आलो. तोपर्यंत मायनर व सेक्रेटरींनी मिळून त्या सर्व पेट्या सील लावून ठेवल्या होत्या. स्वयंसेवकांना त्या कशा वाटून द्यायच्या ते पण ठरले होते. मला एखाद्या युद्ध आघाडीवरील मोहिमेसारखे सर्व वाटले. नाहीतरी आमच्यापुढे एक लढाईच उभी होती. ऑस्ट्रिया देशाच्या भूमीवर मायनरची कल्पना राबविण्यासाठी ते पहिले महायुद्ध होते ! माझी मोठी भिस्त शाळांवर होती. जर शिक्षकांनी मनावर घेतले व अपील केले तर पुष्कळ स्वयंसेवक मिळतील. व काम पुरे होईल असे मला वाटत होते. आमच्या ह्या रस्त्यावरील मोहिमेच्या तीनच दिवस आधी मला कळविण्यात आले की ह्या देणगी अभियानातून शाळांनी स्वतःला अलिप्त ठेवण्याचे ठरविले आहे कारण मुलांनी दानपेट्या घेऊन वर्गणी गोळा करीत हिंडणे त्यांना पसंत नव्हते. एका बाजूने विचार करता मला त्यांचे म्हणणे पटले. मला एक घटना आठवली आणि मी उदास झालो. हिटलरच्या वेळी मी रस्त्याच्या एका कोपऱ्यावर उभा राहून दानाच्या पेटीत छोटी देणगी लोकांकडून मागत होतो. प्रत्येक माणसाच्या पुढे जाऊन तो डबा वाजवायची मला खूप लाज वाटायची आणि मीच तो, आता स्वतः हे देणगी-अभियान सुरू करीत आहे ! नशिबाने जिल्ह्यातील रेड क्रॉस संस्थेने मला मदत करायचे कबूल केले होते. त्यांच्याकडे स्वयंसेवक पण तयार होते आणि त्यांनी त्यांचे मुख्य कार्यालय पण आमच्या स्वाधीन केले होते. पण मुख्य लढाई लिंझमधेच लढायची होती. प्रांताच्या मुख्य राजधानीत जर ही मोहीम यशस्वी झाली तर ती सगळीकडेच होणार होती आणि अशा ह्या महत्त्वाच्या मोहिमेसाठी ३ दिवसांवर ती आली असताना माझ्याकडे स्वयंसेवक नव्हते.

दुसऱ्या दिवशी मी माझे संपादकीय लिहू शकलो नाही. ते माझे लिखाणाचे काम मी शक्य तितक्या दूर ठेवले आणि विद्यार्थ्यांसाठी एक आवाहन तयार केले.

**सावधान ! महत्त्वाचे ! जरूर वाचा !**

*प्रिय तरुण मित्रांनो,*

*तुम्ही कधी बालग्रामविषयी काही वाचले आहे का ? हे बालग्राम म्हणजे टाकून दिलेल्या, आईबाप नसलेल्या मुलांची राहण्याची वसाहत. टिरोलच्या पर्वतराशीच्या कुशीत ईम्स्ट नावाच्या गावात असे एक बालग्राम बांधलेले आहे. तिथे दुर्दैवी मुले अतिशय आनंदाने वाढू शकतात. अशा ह्या मुलांना हा आनंद मिळवून देण्यासाठी तुम्ही पण तुमच्या परीने प्रयत्न केले पाहिजेत. तुम्हाला हे करणे सहज शक्य आहे ! त्यासाठी तुम्ही येत्या रविवारी आमच्या देणगी-अभियानात*

*सामील व्हा ! तुमच्या आईवडिलांची परवानगी घेऊन आमच्याकडे नावे नोंदवा !*

*आजच दाखल व्हा.*

*आमच्या १२, लिंझ येथील बालग्राम कचेरीत...*

अशी हजारो पत्रके छापून वाटली. कारण आमच्याजवळ फक्त २ दिवसांचाच अवधी होता. मी स्काऊटच्या मदतीने ही पत्रके तरुण मुलांच्यात वाटली होती. लिंझ-मधल्या एका मोठ्या शाळेसमोर सकाळी ७ वाजता उभा राहून मी स्वतः पत्रके वाटीत होतो.

मी माझं हे अनित्य स्वरूपाचे काम करीत उभा होतो तेवढ्यात माझ्यामागून एक आवाज आला. "डॉक्टर,आमच्या शाळेसमोर उभे राहून तुम्ही हा काय विचित्र-पणा करता आहात !"

ते शाळेचे संचालक होते आणि मी त्यांची मुलाखत शिक्षक परिषदेत नुकतीच घेतली होती. माझ्या त्या पत्रकांकडे त्यांनी वक्रदृष्टीने पाहिले आणि एक केविलवाणे हास्य पण त्यांनी केले.

मी स्वतःला बजावले की, तोंडातून रागाचा एक ब्र देखील उच्चारायचा नाही. 'काही वेळा आपण करू शकतो त्यापेक्षा अधिक करून दाखवू शकतो' हे मायनरचे वाक्य अजाणतेपणी मी मोठ्या ऐटीत म्हणून टाकले.

"हे पहा, मी बालग्रामच्या मदतीसाठी हे काम करीत आहे."

तो संचालक थोडासा आश्चर्यचकित झाला. त्याने एक विनवणी पत्रक वाचले. आणि नंतर तो मला त्याच्या ऑफिसात घेऊन गेला.

"पण माझी पत्रके...." मी विरोध केला.

"आम्ही त्याची व्यवस्था आत्ताच करू." त्यांनी हसून उत्तर दिले.

आम्ही दोघांनी त्याच्या ऑफिसात बसून हर्मन मायनर आणि त्याच्या ईम्स्ट मधील बालग्रामाची विस्ताराने चर्चा केली. तोपर्यंत तास संपल्याची घंटा पडली होती.

शेवटी ते संचालक म्हणाले, "माझी तुम्हाला मदत करायची इच्छा आहे."

मला एक विश्वासू असलेला मदतनीस मिळाला आणि माझी खात्री पटली की त्याने त्या दिवशी सकाळी पूर्ण वेळ आपल्या मित्रांना टेलिफोन करण्यात, त्यांच्याशी संपर्क करून विद्यार्थ्यांना या अभियानात जायला सज्ज व्हा म्हणून सांगण्यात घालविला असेल.

आज शनिवार होता. आमच्या कचेरीतील आमची तयारी पूर्ण होत आली होती. याद्या व पुस्तके तयार होती आणि स्वयंसेवकांना द्यायच्या सूचना पण तयार



होत्या. बस् तयारी जय्यत होती ! माझी सेक्रेटरी व मी कचेरीत शांतपणे बसून वाट पाहात होतो. सकाळ संपत आली, पण कुणीच आले नाही.

"अजून सर्व मुले शाळेत असतील." माझी शूर योद्धा मैत्रीण म्हणाली.

"ते नक्की येतील."

आणि खरोखरीच दुपारी १ वाजता दरवाज्यावर एक थाप ऐकू आली.

आम्ही दोघे एकदम म्हणालो, "आत या !"

माझ्या सेक्रेटरीने याद्या हातात तयार ठेवल्या आणि पेन्सिल पण. आणि दर-वाज्यात उभा असलेला एक पोलिस आम्हाला सामोरा दिसला.

"तुम्हाला काय देणग्या जमवायच्या आहेत ? मला ही काही पत्रके सापडली आहेत."

ह्या सर्वांचा काय अर्थ आहे ?" त्याने विचरले.

आमच्यावर तो शेवटचा वार होता. "आम्ही त्याची परवानगी घेतलेली आहे." मी स्वतःला सावरीत उत्तर दिले.

"कुठे आहे तुमची परवानगी ?"

मी त्याला तो कागद दाखवला. त्या अधिकाऱ्याने तो काळजीपूर्वक वाचला. आम्हाला सलाम ठोकून तो निघून गेला आणि आम्ही सुटकेचा निःश्वास टाकला.

आणि नंतर ते स्वयंसेवक आले ! त्यांच्यात काही मुले लहान होती, तर काही वयाने मोठी होती, लाजरी होती तर धीट पण होती. लालबुंद गालांची होती, तर फिकट चेहऱ्याची आणि तोंडावर वांग असलेली पण होती. त्यात बऱ्याच संख्येने मुली पण आलेल्या होत्या. काहींचे काळे कुरळे केस, तर काहींच्या सोनेरी केसाच्या वेण्या होत्या. आमचे हात सतत काम करीत होते भराभर. भराभर सर्व दानपेट्या गरम भज्यांसारख्या वाटून संपल्या. याद्या पण पूर्ण झाल्या. जेव्हा चर्चच्या घड्याळात पाचचे टोले पडले तेव्हा आम्ही शेवटची दानपेटी एका छोट्या मुलीला देत होतो. दुसऱ्या शहरातून पण टेलिफोनवरून माहिती समजली की सर्व पेट्या वाटून झाल्या आहेत. रेडक्रॉसच्या कचेरीतून सर्व पेट्यांचे वाटप झालेले होते.

"तुम्हाला वर्तमानपत्राच्या कचेरीत जायचं नाही का ?" माझ्या सक्रेटरीने मला विचारले.

मी त्याचा विचारच केला नव्हता. तो प्रश्न ऐकून मी धावतच निघालो. मी गेल्यावर आमच्या हिशेब-व्यवस्थापकाने हात धरून माझे स्वागत केले आणि तो हळूच म्हणाला, "तुमचं काहीतरी बिनसलेलं दिसतंय." आणि माझं बिघडलंच होतें कारण मी जे करायला हवं होतं तेच करत होतो. एका मानवीय, खऱ्या कामाला

मदत करीत होतो.

पण अजून खरी लढाई सुरू व्हायची होती ! रविवार सर्व काही ठरविणार होता. रात्री जेव्हा मी हवामानाचा अंदाज बातम्यांतून ऐकला, तेव्हा मला वाटले की पुन्हा एकदा देणगीची मोहीम पाण्यात वाहून जाणार ! कारण पाऊस पडणार, असे भविष्य वर्तविले होते. यापेक्षा आणखी वाईट ते काय होणार होते ? माझा त्या हवामानाच्या अंदाजावर विश्वास होता. पण त्याप्रमाणे पाऊस पडला नाही आणि तळपता सूर्य उगवला. मी अगदी लवकर उठलो व बाहेर पडलो. नाश्ता पण घेतला नाही. माझी बायको माझ्याकडे दयापूर्ण नजरेने पहात होती. वास्तविक मला घाईने बाहेर पडायची काहीच जरुरी नव्हती. कारण कामाची आखणी व्यवस्थित झालेली होती. मला आमच्या कार्यालयात चैन पडेना म्हणून मी शहरातील रस्त्यांवरून फिरू लागलो.

जिकडे-तिकडे माझे चांगले विद्यार्थी मित्र व मैत्रिणी मला दिसत होत्या आणि किती चांगल्या पद्धतीनं वर्गणी गोळा करीत होत्या ! लोकांच्या मागे मागे त्या धावून जात होत्या आणि प्रत्येक येणाऱ्याजाणाऱ्याच्या समोर डबा खडखडून दान मागीत होत्या.

पहिली दानपेटी पोलिसांनी आमच्या कार्यालयात आणून दिली.

"डॅन्यूब नदीच्या किनाऱ्यावर आम्हाला ही फुटलेली पेटी मिळाली." अधिकाऱ्याने गुरगुरत सांगितले.

"मला वाटते परमेश्वरा, काहीच नीट होणार नाही का ? पण आमच्या नशिबाने ती एकच तशी घटना घडली. आम्ही ८६० पेट्या वाटल्या होत्या आणि त्यापैकी ७९६ पेट्या आमच्या कार्यालयात जवळपास भरलेल्या संध्याकाळी परत आल्या होत्या. बाकीच्या पेट्या शोधून काढण्याचे काम मी नंतरच्या काही दिवसांत केले. कारण आमच्याकडे सर्व स्वयंसेवकांचे नाव-पत्ते होते. त्यांपैकी एकजण ती पेटी नेली असल्याचेच विसरला होता तर दुसरा मुलगा आपल्या आईवडिलांबरोबर २ दिवस सुट्टीला गेला होता. आणखी काही मुले आजारी झाली होती. तर काही मुलांना पेटी घेऊन आमच्या कार्यालयात येण्यासाठी फार चालावे लागणार होते. किंवा आणखी अशाच काही कारणांनी त्यांनी पेट्या परत केल्या नव्हत्या.

अजून ती रविवारची संध्याकाळ होती. आम्ही आमच्या कार्यालयात बसून झपाट्याने काम करीत होतो. दानपेट्यांची उतरंड रचली जात होती. मुले येत होती, जात होती. रस्त्यातून आरडाओरडा सुरूच होता, आणि त्यामुळे आमचे ते जुने घर एखाद्या वेड्यांच्या इस्पितळासारखे वाटत होते. आमच्या त्या व्यवस्थापिकेला तर



चकरावून गेल्यासारखे वाटत होते. ओरडून ओरडून तिचा घसा कोरडा झाला होता. बाकीचे सर्व भाडेकरू रहिवासी तक्रार करीत पायऱ्यांवर उभे होते. त्यांपैकी बरेच जण चवताळून आमच्या कार्यालयात घुसले. शिव्यांचा भडिमार सहन करायला मी आता शिकलो होतो. हे पण खरंच होतं की मुलांनी खूपच गडबड, गोंधळ माजवला होता आणि आम्ही मात्र त्या सर्व गडबडीत एकमेकांवर वाक्प्रहार करीत होतो. संध्याकाळी ७ वाजता त्या व्यवस्थापिकेने शेवटची जी मुले जिन्यावर दंगा करीत होती, त्यांना घालवून दिले आणि धाडकन् दरवाजा बंद करून घेतला. माझी सेक्रेटरी आणि मी कार्यालयात बसलो होतो. आमच्या समोर दान-पेट्यांचा ढीग होता आणि असहाय्यपणाने आणि अपराधी मनाने एकमेकांकडे पाहात होतो. शारीरिक आणि भावनिक श्रम पण भरपूर झालेले होते. दिवसभराची धांदल-धडपड आठवत होती व आत्ता त्याचं हसू पण येत होतं. मग आम्हाला आठवून आठवून खूपच हसू येऊ लागलं आणि तेवढ्यात दरवाज्यावर थाप ऐकू आली. ती व्यवस्थापिका आली असावी, असे वाटून जितक्या अनपेक्षितपणे आमचं हसणं सुरू झालं होतं तितक्याच अनपेक्षितपणाने ते बंद पण झालं. आम्ही घाबरलो व दरवाज्याकडे बघू लागलो पण ममा डिडल् हसत हसत आत येत होती. तोंड वासून मी तिच्याकडे पहातच राहिलो.

"काय चाललंय तरी काय ?" तिने विचारले.

"प्रथम मला माझं सगळं कौशल्य खर्च करून त्या व्यवस्थापिकेला खूष करून हे दार उघडून घ्यावं लागलं. कारण मला तुमच्याकडे यायचं होतं आणि तिला ते पसंत नव्हतं. मग या बोळकांडीतून येताना दहावेळा तरी माझं डोकं अंधारात भिंतीवर आपटलं आणि इथं येऊन मला काय दिसतंय तर या दान-पेट्यांच्या वेढ्यात तुम्ही दोघे गुरफटून गेला आहात आणि वेड्यासारखे हसता आहात."

पुन्हा एकदा आम्हाला मदत करण्यासाठी हर्मन मायनरने ममा डिडल्ला पाठविलं होतं. त्याला आधीच उमजलं होतं की आम्हाला मोजणीचा खूप त्रास होणार म्हणून त्यानं ममा डिडल्ला नीट व्यवस्था करायला पाठवलं होतं आणि काय चतुराईनं तिनं ती केली ! पूर्ण तीन दिवस आणि तीन रात्री ती त्या पेट्या घेऊन बसली आणि आतील दानाचे पैसे तिने मोजले. मला या कामाच्या त्रासाची कल्पनाच नव्हती. उलट मला असं वाटत होतं की या पेट्या परत केल्यावर मग पैशांची मोजणी सुरू होईल. मी जेव्हा पहिल्या पेटीचे सील फोडून त्यातील रक्कम टेबलावर ओतली तेव्हा माझा जीव घाबरून गेला. मी चांगली १५ मिनिटे होईतोपर्यंत हे मोजण्याचे काम करीत होतो. आणि अशा तऱ्हेच्या जवळपास १५०० पेट्या मोजायच्या होत्या. म्हणजे ह्या हिशोबाने त्या कामाला ४०० तास लागले असते !

त्यात जी नाणी जमली होती ती साबणचुऱ्याच्या डब्यात वेगळी काढून ठेवली. तीन पेट्या मोजून झाल्यावर हे काम असे जमणार नाही, हे मी कबूल करून टाकले. आम्ही त्या पैशांच्या आणि पेट्यांच्या ढिगांत पूर्णपणे गाडले गेलो होतो आणि खोलीत सर्व पसारा झाला होता, फक्त ममा डिडल् स्वस्थपणाने बसून एखाद्या यंत्राप्रमाणे पैसे मोजीत होती. आणि ती तशीच्या तशी कित्येक आठवडे बसली असती आणि सर्व पेट्या उघडून तिने पैसे मोजून दिले असते. पण तितक्यात मला एक लिंझमधील बँकेत काम करणारा मित्र भेटला. तो जुना मित्र असून बँकेत संचालक होता. त्याला मी माझी अडचण सांगितली. त्याने मला आश्चर्याने विचारले,

''तू खरंच इतका बावळट आहेस का ? का तू माझी गंमत करतो आहेस ? काही संस्था फक्त पैसा देण्याघेण्याचेच काम करतात असं तुला वाटतं ? तू ते सर्व पैसे पाठवून दे आणि मी एक दिवसात ते मोजून तुला परत पाठवून देतो.''

एका सूटकेसमध्ये मोकळ्या पिशव्या ठेवून मी मोठ्या अभिमानाने आमच्या कार्यालयात शिरलो. फ्राऊ डिड्लला ती कल्पना फारशी आवडली नाही. दुसऱ्यांच्या अनुभवापेक्षा तिचा स्वतःच्या कर्तृत्वशक्तीवर जास्ती विश्वास होता. पण त्याचा काही उपयोग नव्हता. थोड्याच वेळात बँकेचे शिपाई आले व सर्व पैसे घेऊन बँकेत परत गेले. दुसऱ्याच दिवशी आम्हाला एकूण देणगीचा आकडा कळला. १,४७,६८८.२१ शिलिंग्ज, आम्हाला मिळाले होते. रकमेवर विश्वास बसणं कठीण होतं. कारण त्या रकमेत आमच्या बालग्रामचं निदान अर्धे बालसदन तरी बांधून होणार होतं.

अशा रीतीने आम्ही मायनरसाठी पहिली लढाई लढलो होतो. त्यात आमचा पोलिसांशी सामना झाला किंवा आमच्या इतर भाडेकरू-शेजाऱ्यांना त्रास झाला. किंवा सर्वांत अधिक म्हणजे ते घर खाली करायची आम्हाला नोटीस मिळाली. कारण आम्ही निवासी इमारतीतील रहिवाशांच्या शांततेचा भंग केला होता. या व इतर घटना ज्या घडल्या, त्या केवळ प्रासंगिक आणि मामुली स्वरूपाच्या वाटल्या. यापेक्षा आता आणखी कोणते मोठे संकट येणार होते ? सुरुवातीच्या सर्व अडचणी मी सोडविल्या होत्या आणि सुरुवातीचे अडथळे पण आता पार करून झाले होते ! बालग्रामच्या कार्यकर्त्यांचा निःस्वार्थीपणा आणि त्यागबुद्धी ह्यांचा मला चांगलाच अनुभव आला होता, आणि ह्या नवीन सामाजिक कार्यामागची त्यांची भूमिका पण माझ्या लक्षात आली होती. एकाएकी माझ्या मनात हर्मन मायनर आणि त्याच्या मित्रमंडळींविषयी जास्ती आदर आणि खूप कौतुकाची भावना निर्माण झाली. मला समजून चुकलं की, किती अवघड असा रस्ता मायनरने तुडविला आहे आणि अजून किती उंच दरी त्याला चढायची आहे !

''त्याला तुझी जरुरी आहे'' मी माझ्या मनाला बजावले. ''तू आता त्याला ह्या



कठीण वळणावर सोडू शकत नाहीस. म्हणून सामना कर आणि सामना सतत चालू ठेव.''

## ओबरोस्टराइश मधील एक गाव

अलीकडे लिंझमधील लोकांना हे ठाऊक झाले होते की, मी फक्त राजकीय, संपादकीय लिखाणच करीत नसून थोडेफार सामाजिक कार्य पण विनावेतन करतो. बालग्रामची माहिती पण लोकांना होत होती आणि त्यासोबत माझे नाव जोडले जात होते. एकदा ओबरोस्टराइशच्या मुख्य लोकपालाने मला भेटीसाठी बोलावले.

तो म्हणाला, ''मी नुकताच ईम्स्टला गेलो होतो आणि तिथल्या सर्व गोष्टी बारकाईने पाहिल्या. आणि मी असे ऐकले की तू हर्मन मायनरला मदत करतो आहेस. तुला खरंच असं वाटतं की हे बालग्रामचे काम नक्की यशस्वी होईल ?''

''ते काम यशस्वी झालेच पाहिजे.'' मी उत्तर दिले. ''कारण त्या कामाच्या मागे एक जिवंत प्रेरणा आहे. त्यात एक निश्चित हेतू आहे. समाज कल्याणाच्या कालबाह्य पद्धतीला नवी दिशा देण्याचा त्यात प्रामाणिक प्रयत्न आहे.''

त्याला काही हे पटेना. मी पण माझ्या विशिष्ट पद्धतीने त्याला सांगण्याचा प्रयत्न करीत होतो.

''माझ्या डॉक्टर मित्रा,'' तो पुन्हा माझ्यावर प्रभाव पाडून बोलू लागला. ''युद्ध संपल्यानंतरच्या काही वर्षांत आपण आपल्या या इलाख्यात कायकाय सामाजिक सुधारणा करू शकलो याची तुला चांगली माहिती आहे. मागच्या वर्षी आपण या नवीन संस्थांची आणि होम्सची जेव्हा पहाणी केली, तेव्हा तू माझ्यासोबत आला होतास. अत्यंत आधुनिक पद्धतीने, नवनवीन पद्धती अंमलात आणून आम्ही हे प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करीत आहोत हे तर तुला मान्य करावेच लागेल. होय, ईम्स्टमधील ते बालग्राम स्वच्छ आणि सुंदर आहे, हे मी कबूल करतो पण तरीदेखील मला असे वाटते की, ज्या मुलाला ताबडतोब कुणी दत्तक घेऊ शकत नाही, त्याला पालक कुटुंबात ठेवणे हाच सर्वोत्तम उपाय आहे.''

पुष्कळ वेळपर्यंत आम्ही दोघे चर्चा करीत बसलो. शेवटी तो म्हणाला, ''जर मायनरला ओबरोस्टराइशमध्ये बालग्राम सुरू करण्याची इच्छा असेल तर मी त्याच्या मार्गात अडचण आणणार नाही.''

मी विचार करीत परत निघालो. या ठिकाणी एक बालग्राम ! हा विचारदेखील माझ्या मनात आला नव्हता. दुर्दैवाने त्यासंबंधी काही ठरविणे पण तितकेच कठीण

होते. जर ईस्टमधले बालग्राम पूर्ण झाले व एक नमुनेदार बालग्राम म्हणून ते उभे राहिले, तर मायनरने जिंकली असे म्हटले पाहिजे. एवढे झाले तर ते पुष्कळच होईल. त्याची ती नमुनेदार वसाहत पाहून शासकीय, तशाच खाजगी संस्थांना योग्य ती प्रेरणा मिळेल. नाही, उत्तर ऑस्ट्रियात हा विचार करणे अशक्यच आहे ! आत्ता-पर्यंत मायनरच्या आशावादीपणाबद्दल मी साशंक होतो. ही गोष्ट खरी होती की, तो जेव्हा भविष्यातील धाडसी योजना मांडीत असे, तेव्हा मी त्याक्षणी त्यात वाहून जात असे, पण त्यानंतर जेव्हा मी एकटा बसून त्यावर पुन्हा विचार करीत असे, तेव्हा माझे मलाच हसू येई. नाही, मायनरप्रमाणे मी स्वप्नाळू खास नव्हतो.

याशिवाय त्यावेळी मी इतका 'बालग्रामी' बनलो नव्हतो. त्यामुळे मी त्या दिवशीचा तो संवाद विसरून गेलो. इथे हे बालग्राम होणे शक्य नाही म्हणूनच त्याचा तो विचार त्याने नम्रतेने झटकून टाकला असावा, असे मला वाटले.

तेवढ्यात शहराच्या प्रमुख लोकपालाने पण तो विचार पुन्हा एकदा मांडला होता. व्होरालबर्गला जात असताना वाटेत तो ईस्टला थांबला होता व त्याने बाल-ग्रामचे काम जवळून पाहिले होते. त्याला, त्याच्या क्षेत्रात हे बालग्राम बांधायचे होते. एक लाख लोकांनी अगदी छोटी देणगी देऊन हे काम उभे राहू शकते, हे त्याने प्रत्यक्ष पाहिले होते.

हमरस्त्यावरून जात असताना ह्या ईस्ट बालग्रामची निर्देशक पाटी पण मोठी गंमतीदार लावलेली होती. "मुलांचे गाव." हे मुलांचे गाव कसे दिसत असेल ? तो लोकपाल गाजावाजा न करता ते मुलांचे गाव बघायला गेला होता पण त्याचा तो हेतू साध्य झाला नाही. तो नेमका मायनरच्या हातात सापडला आणि अशा मोठ्या व्यक्तीच्या भेटीचा लाभ कसा करून घ्यायचा याचे पूर्ण ज्ञान मायनरला होते. माय-नरने ठरवले की ह्या मोठ्या माणसाला मुलांच्या खेळाच्या स्पर्धांचे औपचारिक उद्घा-टनाला बोलवायचे. समारंभाला जरा उशीर होत असला तरी हरकत नाही. कारण तो काही थिटरमधला कार्यक्रम नव्हता. मुलांचे कार्यक्रम होते आणि त्यात भविष्याची संकल्पना होती.

त्या लोकपालाने उशीर झाला तरी ह्या कार्यक्रमाचा स्वीकार केला. त्याला मुले फार प्रिय होती आणि ह्या छोट्या सुबक बालग्रामातील वातावरण त्याला खूप आव-डले. त्या परिसरात खरंच काहीतरी जादू होती. कारण रोज असे वातावरण बघा-यला मिळत नव्हते. त्याच्या दैनंदिन कार्यक्रमात त्याला आर्थिक आणि सामाजिक प्रश्नांना तोंड द्यावे लागायचे. त्यामुळे त्याच्या चेहेऱ्यावर सतत चिंता दिसायची. पण इथे आल्यावर त्याचा चेहेरा टवटवीत झाला. इथे त्याला आशेचा किरण दिसला. प्रसन्नतेचा अनुभव आला, आणि भविष्याविषयी निश्चित मार्ग सापडला.



"हे खरंच एक आनंदाचं बेट आहे.– आपल्या जीवनातदेखील." तो म्हणाला.

मायनरने संवाद पुढे चालू ठेवला. "पण किती थोड्या लोकांना ह्याचे महत्त्व समजले आहे ?"

"याचं तुला आश्चर्य वाटतं ?" त्या पाहुण्यानं प्रश्न केला.

"चांगल्या गोष्टी अशाच अज्ञात ठिकाणी घडत असतात."

"पण कधीतरी त्या उजेडात यायला हव्यात."

"त्या जर खरोखरीच चांगल्या असतील तर आपण होऊन उजेडात आल्या-शिवाय राहाणार नाहीत. त्याबद्दल तू बिलकूल चिंता करू नकोस हर्मन मायनर."

"पण मला सतत चिंता वाटते कारण अधिकारी वर्गाकडून मला जरादेखील समजुतीची वागणूक मिळत नाही."

"सर्वप्रथम तुझी ही योजना लोकांना पटली पाहिजे. अधिकारी वर्ग हा एक जड समूह असतो."

"पण काही वेळा ह्या अधिकाऱ्यांची पण गरज भासते."

"त्यांच्या मदतीशिवाय तू यशस्वी होऊ शकतोस."

"ते घडण्यासाठी माझ्याजवळ पुरेशी शक्ती आहे किंवा नाही याची मला कल्पना नाही."

त्या लोकपालाने मायनरचे खांदे थोपटले. "भल्या माणसा, हे सुंदर बालग्राम ज्या माणसाने शून्यातून स्वतःच्या शक्तीने उभे केले, त्याच्याजवळ भरपूर सुप्त शक्ती असलीच पाहिजे. त्यामुळे तो आपले हे चांगले काम तर शाबूत ठेवेलच, पण सर्व तऱ्हेच्या विरोधांचा पण तो सामना करील. माझे हे शब्द लक्षात ठेव !"

"अजूनदेखील माझे विरोधक मला मारून टाकू शकतात, माझे काम मोडून टाकू शकतात आणि माझ्या कल्पनेचा चुराडा करू शकतात." मायनरने मुद्दामच एक गंभीर-भडक चित्र आपल्या पाहुण्यांसमोर मांडले. कारण त्याला त्यात पूर्ण ओढून घ्यायचे होते.

"जे चांगले असते ते कुणीच नष्ट करू शकत नाही. मागच्या युद्धाने हे सिद्ध केले की नाही ?"

"पण ते प्राप्त करून घेण्यास उशीर लागू शकतो, आणि हा उशीर म्हणजे हजारो गरीब मुलांची जीवितहानी."

"तो प्रश्न आता थोड्या मुलांचा राहिला नाही." लोकपाल गंभीर रीतीने बोलले.

"इथे हा फक्त प्रेमाचा आविष्कार आहे आणि तो घडून यायला वेळ लागतो

इतकंच, आणि आज जे मी प्रत्यक्ष पाहिलं, त्यावरून मी हे खात्रीपूर्वक सांगू शकतो की, हा प्रेमाचा आविष्कार घडून यायला आता फार वेळ लागणार नाही.''

मायनर चूप होता. आपल्याला एक चांगला मित्र मिळाला आहे, ह्याची त्याला जाणीव झाली. त्याने आपली बालग्रामची भेट पूर्ण केली व तो जाताना म्हणाला, ''केव्हातरी आम्ही पण आमच्या शहरात असे बालग्राम बांधू. लिंझमधे मला येऊन भेट. आपण त्याविषयी चर्चा करू.''

## मायनर हिशोब देतो !

ईम्स्टमधे आता १५ सुंदर बालसदने बांधून तयार झाली होती आणि त्यामुळे ईम्स्टमधील बालग्रामात आता १३० मुले रहात होती. आता हर्मन मायनर क्षणभर थांबून मागे वळून पाहू शकत होता. पण त्याला तशी सवयच नव्हती. तो सतत भविष्याकडे डोळे लावून बसायचा. पण उन्हाळ्याच्या सरत्या दिवसांत एके दिवशी त्याने आपल्या बालग्राम कमिटीच्या सर्व सभासदांना एकत्र बोलावले आणि तो भूत-कालीन गोष्टी सांगू लागला.

''मित्रांनो, आपण गेली ५ वर्षे सतत एकत्र काम करीत आहोत आणि तुमच्या ह्या सहकार्याबद्दल आज मला तुमचे आभार मानायचे आहेत. प्रकाशात पण आणि अंधारात पण तुम्ही माझी सोबत केलीत आणि जो विश्वास माझ्यावर टाक-लात, त्याबद्दल मी तुमचा ऋणी आहे. आपण खूप अंधारे दिवस अनुभवले आणि कित्येक वेळा आपल्या कामाच्या भवितव्याबाबत आपण निराश झालो.''

त्याने बालग्रामच्या त्या कमिटीकडे एकवार पाहिले. त्यात १२ स्त्री-पुरूष सभा-सद होते. त्यांचे व्यक्तिमत्त्व विशेष रूपाचे होते. त्यांच्या उद्योगधंद्यात ते निष्णात होते, आणि हळूहळू त्यांनी सर्व सोडून दिले होते. बालग्रामचे आपले स्वप्न साकार करण्यात गुंतलेल्या ह्या मजबूत उत्साही वैद्यकीय विद्यार्थ्याची त्यांनी सोबत केली होती आणि आपली सेवा सुपूर्द केली होती. मायनरवर पूर्ण विश्वास असल्याशिवाय ही ५ वर्षे अशा तऱ्हेने टिकाव धरणे शक्य नव्हते. हे हाती घेतलेले काम ५ वर्षांत कसे विकसित होईल याची कुणालाच कल्पना नव्हती. यांपैकी प्रत्येकाने आपले नाव, फार काय आपले नियोजित काम पण बालग्रामसाठी कायमचे देऊन टाकले होते. दुसऱ्या महायुद्धानंतर समाकल्याणाच्या अनेक योजना नावारूपाला आल्या. काही योजना जशा उद्‌भवल्या तशाच नष्ट पण झाल्या आणि आणखी काही योजना टीकेचे लक्ष्य बनल्या.



ह्या सर्व गोष्टींमुळे वर्तमानपत्रांना खाद्य पुरविले गेले. त्यांनी आम जनतेला धोक्याच्या सूचना दिल्या की ह्या नवीन समाजकल्याण योजनांना देणगी देताना सावधानपूर्वक माहिती घ्या. पण हे सर्व होत असताना मायनरच्या ह्या माणसांनी मात्र त्याला सोडले नाही, किंवा काम पण सोडले नाही. व्होरालबर्ग खेड्यातून आलेल्या ह्या माणसावर त्यांचा पूर्ण विश्वास बसला. त्याचा दुर्दम्य आशावाद आणि कोणत्याही संकटांचा सामना करण्याची त्याची शक्ती ह्यांचा प्रभाव त्यांच्यावर पडला होता.

मायनरचे लक्ष एका व्यक्तीकडे गेले. त्याचे टक्कल पडलेले डोके पुढे आणून तो मायनरचे भाषण ऐकत होता आणि त्याची त्याला गंमत वाटत होती. ह्या कमिटीचा आधारस्तंभ असलेला तो डॉ. श्लीसर होता. टिरोलच्या सभापतींनी त्याची नेमणूक ह्या कमिटीवर केली होती आणि कमिटीच्या सुरुवातीपासूनच त्याचे लक्ष त्या कमिटीच्या कारभाराकडे होते. जेव्हा बालग्रामचे पहिले छप्पर घालण्याचा समारंभ ईम्स्टमध्ये झाला, तेव्हा डॉ. श्लीसरचा दुय्यम अधिकारी तिथे आला होता आणि त्याने पहिले भाषण केले होते. त्याने हर्मन मायनरची कल्पना चांगल्या रीतीने उच-लून धरली होती. मायनरच्या ह्या सर्व सहयोगी मित्रांची त्याला खूप कदर होती आणि त्यांच्या ध्येयवादाबद्दल त्याच्या मनात आदरभावना होती. त्यांनी सर्वतोपरी मदत करावी, अशी त्याची इच्छा होती आणि त्यांच्या या धाडसी प्रयोगात त्यांचे त्यांनी नुकसान करून घेऊ नये अही त्याला सतत काळजी वाटत होती. आणि त्याने डॉ.श्लीसरला ह्या तरुण, नवीन संस्थेला मदत करायची शिफारस केली होती. डॉ. श्लीसर तेव्हा मोठ्या अधिकाराच्या पदावर होते आणि ते टिरोलमध्ये फार प्रसिद्ध होते आणि म्हणून डॉ. श्लीसर आज मुद्दाम उपस्थित होते. त्यांचे मन मात्र साशंक होते. मायनरचे मन पण साशंक होते, कारण अशा तऱ्हेने एका सरकारी अधिकाऱ्याने येऊन त्याच्या कामात गुप्तहेर म्हणून काम करावे ही कल्पना त्याला पसंत पडण्या-सारखी नव्हती. पण नशिबाने लवकरच हे साशंकतेचे पटल दूर झाले आणि दोघे प्रामाणिकपणाने, समजुंतीने विचार करू लागले. लवकरच डॉ. श्लीसरला समजून चुकले की हा वैद्यकीयशास्त्राचा माजी विद्यार्थी आपल्या कल्पनेशी प्रामाणिक असून त्याचा गांभीर्याने विचार करीत आहे, आणि एकदा निर्णय घेतला की आपल्या सर्व शक्तीनिशी ती कल्पना अंमलात आणण्याची धमक त्याच्या अंगात आहे. याचा परिणाम म्हणजे ते दोघे परम मित्र बनले. डॉ. श्लीसर त्याला योग्य वाटेल तेव्हा टीका करीत असे आणि कठोर उद्‌गार पण काढीत असे. धोक्याची सूचना देत असे, आणि कधीकधी काही सूचना उडवून लावीत असे. जेव्हा मायनर त्याच्या कल्पनेच्या आहारी जाऊन उतावीळपणे गोष्टी करीत असे, त्यावेळी त्याला ब्रेक लाव-

ण्याचे काम तो करायचा. कमिटी मीटिंगच्या वेळी आशावादी मायनर भराभरा आपल्या कल्पनांची भेंडोळी सभासदांपुढे मांडायचा. अशावेळी त्या कल्पनांना वास्तववादी बनविण्याचा प्रयत्न डॉ. श्लीसर करायचा. कारण तो व्यवहारी होता. ह्या नवीन कामाला त्याने कायद्याच्या चौकटीत बसवले. त्याने कायद्याचा अभ्यास केला, आणि सोसायटीचे सर्व व्यवहार नीट विचारपूर्वक मांडून त्यांत सुधारणा, फेरफार करून त्याची घटना व्यवस्थित बनवून सुरुवातीच्या Societas Socialis चे नवीन रूपांतर त्याने 'बालग्राम संस्था' या नावाने केले.

"आपण आपला पसारा नुसता वाढविण्यात काही अर्थ नाही." तो म्हणत असे. आपण एका निश्चित कामावर आपले लक्ष्य केंद्रित केले पाहिजे. बाकी सर्व गोष्टी आपोआप घडत राहातील. हे निश्चित काम म्हणजे आपली ही मुलांची वसाहत, आपले हे बालग्राम. मायनरला निश्चितपणे अशा व्यवहारी माणसाची जरुरी होती आणि त्याबद्दल त्याने आपल्या चांगल्या नशिबाला धन्यवाद दिले होते.

"आपले पहिले उद्दिष्ट साध्य झाले आहे." मायनर पुढे बोलू लागला. ईम्स्टमधे आपण बालग्राम बांधून पूर्ण केले आहे. ती एक अद्‌भुतरम्य घटना आहे. तुम्हाला माहिती आहे की, सुरुवातीस आपले भांडवल फक्त ६०० शिलिंगांचे होते. आजच्या घटकेस ईम्स्टमधे १५ घरे बांधून झालेली आहेत आणि १३० अनाथ मुलांना तिथे निवारा मिळाला आहे. ही अपूर्व घटना घडू शकली ती निव्वळ तुमच्या सहकार्यामुळेच! पूर्वीचा अनुभव नसलेल्या कोणत्याही सामाजिक कल्याण संस्थेला अशा तऱ्हेची कार्यक्षम, अनुभवी कमिटीची मदत असणे ही एक अत्यंत आवश्यक बाब आहे, हे मला आता माझ्या स्वतःच्या अनुभवांवरून खात्रीपूर्वक पटले आहे. आज आपण आपले पाय पक्के रोवून बसलो आहोत. आता आपल्या टेबलांना कुणी येऊन टाळे लावू शकणार नाही, किंवा आपली बँकेची खाती गोठवू शकणार नाही. कारण आपले सर्व पैशांचे व्यवहार चोख आहेत. कुणीही येऊन आपले हिशेब पाहू शकतो. कारण आपण पै न् पै चा हिशेब व्यवस्थित लिहून ठेवला आहे. मागच्या वर्षीचा ताळेबंद जर आपण पाहिलात तर आपल्या हे लक्षात येईल की आपला व्यवस्थापनाचा खर्च अगदी कमी आहे. फक्त शेकडा २.७ टक्के इतकाच आहे. अशा तऱ्हेने व्यवस्थापन खर्च अत्यल्प असलेली दुसरी कुठली समाज-कल्याण योजना असू शकेल? आणि नेमकी आपली ताकद इथेच आहे. इथे आलेला प्रत्येक शिलिंग निहित कामासाठीच खर्च होत असतो. प्रत्येक देणगीच्या शिलिंगमधून ह्या बालग्रामच्या भिंती वर चढल्या आहेत. सर्व व्यवहार सरळ आहे आणि खुला आहे! तुम्ही माझ्या वेगाला पायबंद घातलात ही चांगलीच गोष्ट केलीत. माझ्या अंतःकरणात नवीन काहीतरी घडवून आणण्याची जी काही ऊर्मी आहे, तिला मी दाबून टाकू शकत नाही.



तुमच्या विचारांत तर्काची शुद्धता आहे, ज्यामुळे आपोआप निर्बंध घातले जातात. अशा रीतीने आपण एकमेकांना पूरक बनतो आणि त्याची फार गरज आहे असे मला वाटते."

यावेळी मायनरच्या मनात काही स्वार्थी, मतलबी मंडळींचा विचार येत असावा. कारण पुष्कळ वेळा त्यांनी मायनरला आमिष दाखवून त्याचा उपयोग स्वतःच्या स्वार्थासाठी करून घेण्याचा प्रयत्न केला होता. अनुभवाच्या अभावी त्यांच्यावर विश्वास ठेवला असता तर तो कदाचित त्यांच्या जाळ्यात सापडला असता. एका बालग्रामच्या पाट्या रंगविण्याचे काम होते, आणि अल्प मोबदला घेऊन ते रंगवून द्यायला तयार झाले होते. आणखी एकदा काही फलक तयार करायचे होते व प्लास्टिकची पदके बनवायची होती. पुनःपुन्हा लोक त्याच्याकडे वरकरणी प्रसिद्धीच्या चांगल्या कल्पना घेऊन येत असत, पण त्यामागील अंतःस्थ हेतू संस्थेच्या नावाचा वापर करून स्वतःची तुंबडी भरून घेण्याचाच असायचा. पण त्यांच्या प्रयत्नांना मायनरने एकदादेखील संमती दर्शवली नाही आणि त्यांच्या जाळ्यात तो अडकला नाही. त्याची सदसद्विवेकबुद्धी त्याच्या उपयोगी पडली. अशा वेळी तो सगळ्या लोकांचे म्हणणे ऐकून घेत असे. त्याचा काळजीपूर्वक अभ्यास करीत असे आणि शेवटी आपल्या कमिटीपुढे त्यांच्या संमतीकरता सादर करीत असे.

संस्थेच्या सुरुवातीच्या काळात एक गोष्ट नक्की ठरली होती की, देणगी गोळा करण्यासाठी पगारी माणसे नेमायची नाहीत. देणगीची मोहीम सुरू करताना पोस्टाने पत्रे पाठवणे आणि आलेल्या देणग्या चेकने खात्यात जमा करणे यावर कटाक्ष ठेवला होता. सुरुवातीपासूनच ही पद्धत ठरवून दिली होती आणि नंतर त्याचा चांगलाच फायदा झाला. कारण त्यामुळे जे खोटे प्रचारक बालग्रामच्या नावावर लबाडीने लोकांकडे जाऊन देणग्या जमविण्याचा प्रयत्न करीत असत, त्यांच्यावर आळा घालणे शक्य होत होते.

अशा प्रकारे मायनरने ईम्स्टमधील आपल्या पहिल्या बालग्रामचा पूर्वीचा इतिहास वर्णन करून सांगितला आणि त्याच्या शुद्ध ४ तत्त्वांची पुन्हा एकदा उजळणी केली. ती चार तत्त्वे म्हणजे माता, बालक, घर आणि शाळा ही होत.

ह्या चार तत्त्वांचा आधार घेऊन त्याने आपली ही चळवळ उभी केली होती. या चार तत्त्वांवर त्याची नितांत श्रद्धा होती आणि तो त्या तत्त्वांना चिकटून होता.

"आणि आता" त्याने पुढे सुरू केले. "आपल्या या बालग्रामची पहिली मुलांची तुकडी बाहेर पडली आहे आणि त्यांनी आपले स्वतःचे जीवन घडविण्यास सुरुवात केली आहे. ह्या मुलांविषयी आपल्याला योग्य तो अभिमान वाटतो पण त्याबरोबरच आपली जबाबदारी पण वाढली आहे. आपल्याला त्यांना बालग्रामच्या छायेखालीच

ठेवायला पाहिजे आणि याच कारणासाठी इन्नसब्रुकमध्ये एक उमेदवार-विद्यार्थ्यांचे कुटुंब स्थापित करण्याची सुरुवात झाली आहे. तरी काही मुले बालग्रामच्या बाहेर पडून उद्योगधंदा शिकावा म्हणून बाहेरच्या जगात उमेदवारी करीत असली, तरी ती आपलीच बालग्रामची मुले आहेत आणि त्यांची काळजी घेणे आणि त्यांना मार्गदर्शन करणे हे आपले काम आहे. आपण केव्हातरी या उमेदवारांसाठी आणि विद्यार्थ्यां-साठी स्वतंत्र वसतिगृह बांधू या. बालग्रामातील मुली त्यांच्या कुटुंबात अधिक काळ-पर्यंत राहू शकतील, पण मुलगे चौदा वर्षांचे झाले की त्यांनी बालसदनाच्या बाहेर पडलेच पाहिजे. त्यांच्या सहशिक्षणाची कल्पना आपल्याला टोकापर्यंत न्यायची नाही. त्या मुलांचे बालसदन हे नेहमीच त्यांचे घर बनून राहील. रजेत किंवा सुट्टीत ते आपल्या घरी येऊन राहतील, आणि त्यांचे व मातेचे नाते नेहमीच अतूट राहील.''

भाषणांच्या अखेरीस मायनरने सर्वांना लोकपालांच्या भेटीची माहिती सांगितली. त्यांना एक नवीन बालग्राम उभे करायचे आहे हे पण त्याने सांगितले. डॉ. श्लीसरने नकारात्मक मान हलविली. ''प्रथम ईस्टचे काम पुरे करा. आपण उगीच सगळीकडे हातपाय पसरायला नकोत. आपल्याला पेलेल इतकेच काम करू या.'' पण मायनरने लवकरच जाऊन लिंझमध्ये लोकपालांची भेट घ्यावी हा निर्णय कमिटीने घेतला.

## ब्राइटनरशी समझोता

लिंझ येथील ती भेट अजून घडायची नव्हती आणि त्यामुळे माझ्यापुढे काय वाढून ठेवले आहे याची मला काहीच कल्पना नव्हती. मायनर ईन्सब्रुकमधे खूप व्यस्त होता. तिथे त्याला ऑफिससाठी एक छान जागा लोकपालाच्या मदतीने मिळाली होती. पण लवकरच कामाचा व्याप इतका वाढला की ती जागा पण अपुरी पडू लागली. या-पेक्षा मोठी जागा ईन्सब्रुकमधे मिळणं कठीण होते. तिथल्या ऑफिसवर लावलेली 'बालग्राम कार्यालय' नावाची पाटी लोकांचे चित्त आकर्षून घेत होती. मायनरला त्याचा उपयोग करून घेण्याची इच्छा होती. पण तरीदेखील यापेक्षा मोठी जागा मिळ-वणे ही त्यावेळची गरज होती. कारण फाइल्स ठेवायला जागा अपुरी होती. या फाईल्समध्ये रोज वाढत असलेल्या आमच्या वर्गणीदारांचे नाव-पत्ते होते. याशिवाय नाताळची आणि ईस्टरची भेटकार्डे गुंडाळून ती पाठवून देण्याचे मोठे काम होते. छाप खान्यातून ही कार्डे छापून आली की, त्यांचे ढीग आढ्यापर्यंत उंच लागत असत. काहीतरी करायला हवं होतं, आणि ते पण शक्य तितक्या लवकर. कारण आता ही शुभेच्छा कार्डे पाठवून देण्याची वेळ जवळ आली होती. एक दिवस ती कार्डे छापून येण्यापूर्वी मायनरच्या बलवत्तर नशिबाने त्याला एक ३ खोल्यांची जागा मिळून गेली.



एका उद्योगपतीने मायनरला एक जुनी गाडी भेट दिली होती. त्यातून तो रोज इन्सब्रुक व ईम्स्टदरम्यान जा-ये करीत असे. जेव्हा तो युनिव्हर्सिटीच्या समोरून जात असे, तेव्हा त्याच्या मनात कधीकधी पूर्वायुष्यातील प्रसंग थैमान घालीत असत. त्याचे लहानपणाचे स्वप्न अजून अपुरे होते. आत्तापर्यंत वास्तविक त्याचा अभ्यासक्रम पुरा झाला असता. १९४९ साली अभ्यासाला रामराम ठोकल्यानंतर त्याची व प्रोफेसर ब्राइटनरची पुन्हा गाठ पडली नव्हती. त्यावेळी प्रो. ब्राइटनर त्याच्याशी एक शब्दही न बोलता निघून गेले होते. तिथे उभ्या असलेल्या मायनरला त्यांच्या या वर्तनाचे अति-शय दुःख झाले होते. कारण त्याला त्याच्या प्रोफेसरविषयी अतिशय आदर वाटत होता.

प्रो. ब्राइटनरचा उपदेश त्याच्या पक्का लक्षात होता. त्याने सांगितले होते की अवांतर सर्व गोष्टी सोडून मायनरने फक्त अभ्यासावर लक्ष केंद्रित करावे, म्हणजे तो खरा उत्तम डॉक्टर होऊ शकेल. ह्या विद्यार्थ्याच्या आडमुठेपणाचा प्रा. ब्राइटनरला खूप राग आला होता. त्यामुळे एक दिवस जेव्हा प्रा. ब्राइटनर आपण होऊन ईम्स्ट-मध्ये आले तेव्हा मायनरच्या आश्चर्याला सीमा उरली नाही. त्यांनी मायनरचा हात पकडून त्याला सांगितले की, 'मी स्वतः आपण होऊन तुझे बालग्राम बघायला येथे आलो आहे आणि आता मी तुला सांगू इच्छितो की, माझ्या मतात खूप परिवर्तन झाले आहे. तेव्हा मला वाटत होते की अनाथ व निराधार मुलांची काळजी घेण्या-साठी समाजात भरपूर संस्था आहेत आणि त्यामुळे तू जेव्हा हा निर्णय घेतलास तेव्हा मी तुझ्यावर रागावलो होतो. मायनर, मी तुझ्याबद्दल खूप विचार केला. पण आता जेव्हा मी प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांनी तू जे मिळवले आहेस ते पाहिले, तेव्हा मी खूप आनंदित झालो. तू हे खूप मोठ्ठे काम केलं आहेस मायनर. खूपच भव्य आणि ते देखील तू शून्यांतून निर्माण केलं आहेस. त्याबद्दल मी तुझं मनःपूर्वक अभिनंदन करतो! हे काम फक्त आदर्शवादीच करू शकतात. पण आदर्शातदेखील सत्यच असावं लागते. नाहीतर तो आदर्श पोकळ ठरतो. याउलट तू व तुझे सहकारी आदर्श वादी असूनही त्यांनी सत्याची कास सोडलेली नाही. ईम्स्टमधल्या ह्या बालग्रामाचा मी आदरपूर्वक स्वीकार करतो. आज तू माझ्यावर विजय मिळविला आहेस आणि मी तुझा मित्र बनलो आहे.''

## पत्रकारितेला रामराम

१९५४ चा उन्हाळा संपून गेला. आमचे ते रस्त्यावरचे देणगी अभियान संपल्यानंतर आम्ही बेघर बनलो होतो. कारण आम्हाला कार्यालयाची जागा सोड-

ण्याची नोटीस मिळाली होती. त्या बाबतीत आम्हाला काहीच करणे शक्य नव्हते. त्या पत्र्याच्या पेट्यांमुळे आमची त्या व्यवस्थापिकेशी लढाई सुरू झाली होती, आणि आम्हाला माघार घेणेच योग्य ठरणार होते. कारण व्यवस्थापकांशी भांडण करण्यात काहीच अर्थ नसतो. कारण त्यांची नेहमीच सुरशी होत असते. सत्ता त्यांच्या हाती असते, हे जाणून आम्ही ती जागा सोडली. तिथल्या सगळ्या फाईल्स् आणि कागद-पत्रे मी माझ्या ऑफिसमध्ये हलवली, आणि माझ्या वृत्तपत्राच्या कचेरीतील एक पूर्ण कपाट भरून गेले. बालग्राम ऑफिस हे माझ्या कचेरीत आणणे योग्य नाही हे मला पटत होते. ऑफिसात जे काही सामानसुमान होते ते सर्व जुन्या वस्तू विकणाऱ्याला देऊन टाकले होते आणि या सर्व अडचणींचा कळस म्हणजे माझी सेक्रेटरी लग्न करून मला सोडून गेली होती. त्याबद्दल मला तक्रार करण्याचे कारण नव्हते पण पुढे काम कसे व्हायचे ? चांगली सुरुवात झालेले हे काम पुढे चालवायचे कसे ? माझ्या बायकोला मात्र थोडे हायसे वाटत होते. 'आता निदान कधी तरी तुझा चेहेरा आम्हाला घरात पाहायला मिळेल.' ती म्हणाली. माझ्या छोट्या मुलाला त्याचे पहिले दुधाचे दात दाखवण्याची संधी मिळणार होती कारण त्याचे दात जेव्हा फुटत होते तेव्हा आम्ही रस्तोरस्ती देणग्या जमवीत होतो.

पुन्हा मला उलरिशचा विचार करायला वेळ मिळाला होता. नाही, पण हे माझं विधान बरोबर नाही; कारण त्या छोट्या मुलांचा विचार माझ्या मनात पुष्कळ वेळा आला होता. ईम्स्टमधील बालग्राममध्ये त्याला ठेवण्याचा मी आटोकाट प्रयत्न केला होता आणि आता तशी अनुकूलता वाटत होती. इन्सब्रुकहून फ्रिझ हेडरचा फोन आला होता. तो म्हणाला होता, 'बालग्रामच्या कमिटीने उलरिशला प्रवेश देण्याचे ठरविले आहे. आता आमच्याकडे एक जागा आहे.'

नंतर त्याने मला काही आवश्यक सूचना पण दिल्या होत्या. कारण युवक मंत्रालयात जाऊन मला त्याची बालग्राममधे बदली करून घेणे आवश्यक होते. आता मला वाटले होते, की एवढे झाल्यावर काही अडचणी येणार नाहीत. मुख्य महत्त्वाची गोष्ट ही होती की तो मुलगा अनाथालयातून बाहेर पडणार होता व ईम्स्टला राहाणार होता. त्यामुळे तो कदाचित् आनंदी बनला असता व मोकळेपणाने हसू लागला असता. मग एक दिवस त्याचे पूर्वायुष्यांतील सर्व कटू अनुभव तो विसरून जाईल. त्याच्या मेलेल्या आईचा चेहेरा त्याच्या डोळ्यांसमोर पुसट होत जाईल, आणि नवीन मिळालेल्या आईचे चित्र अधिक स्पष्ट होत जाईल आणि एक दिवस असा उजाडेल की इतर मुलांप्रमाणे बालसदनातील त्या स्त्रीला तो 'आई' म्हणून हाक मारू लागेल.

दुसऱ्याच दिवशी मी त्या अनाथाश्रमात गेलो. पण उलरिशला तिथून हलवून पालक-कुटुंबात पाठविले होते. मी त्याच्या पणजीला भेटायला गेलो आणि तिला



सांगितले, आता आम्ही उलरिशला बालग्रामात ठेवू शकतो.

त्या वृद्ध स्त्रीने नकारार्थी मान हलवली "नको, नको, उलरिशची आता चांगली व्यवस्था झाली आहे. तुमच्या सहकार्याबद्दल मी तुमची आभारी आहे. पण आता उलरिश एका कुटुंबात रहात आहे व त्याचे वडील पेंटर आहेत. त्या नवराबायकोला स्वतःचे मूल नाही, तेव्हा पुढे मागे ते उलरिशला दत्तक घेण्याची पण शक्यता आहे."

एवढे समजल्यावर माझ्या दृष्टीने तरी माझे उलरिशबाबत काही कर्तव्य उरले नव्हते. मी मध्यस्थी करण्याची जरूर पडली नव्हती आणि मुलांचे नशीब उघडले होते. निदान, तेव्हा तरी मला तसे वाटले आणि मी घरी गेलो.

संपादकीय काम, छपाई, वर्तमान पत्रकारांच्या परिषदा या माझ्या जुन्या कामात मी पुन्हा गुंतलो. पुन्हा मी माझा जुना अवतार धारण केला. माझे मन आणि माझा आत्मा- दोन्हीत पत्रकार वसत होता. पण जेव्हा मला मायनरच्या नवीन निर्णयात माझ्यावर त्याने सोपवलेली जबाबदारी समजली तेव्हा मलाही आश्चर्याचा धक्काच बसला. त्याने उत्स्फूर्त, पण अत्यंत विचारपूर्वक असा हा निर्णय घेतला होता. मला न सांगता मायनर लिंझमधे आला होता. डॉ. ग्लाइसनरना तो भेटला होता आणि त्या दोघांनी मिळून ऑस्ट्रियात दुसरे बालग्राम सुरू करण्याचे ठरविले होते. नंतर त्याने मला सांगितले होते की, माझ्याबद्दल त्याने डॉ.ग्लाइसनरना व आणखी काही लोकांना पण विचारले होते. त्याने माझ्याबद्दल काही अपवाद ऐकले नसावेत. कारण त्याच दिवशी संध्याकाळी तो माझ्या ऑफिसात आला. बरोबर एक वर्षाने तो माझ्या ऑफिसात आला होता. माझ्या टेबलासमोर तो उभा राहिला आणि अगदी सहजपणे व थंडपणे त्याने जाहीर केले, "लवकरच आपल्याला दुसरे बालग्राम बांधायचे आहे. ते ओबरोस्टराइशमध्ये बांधू आणि तू ते बालग्राम बांधणार आहेस."

थोड्या दिवसांनी नाताळची सुट्टी सुरू झाली. त्या संधीचा फायदा घेऊन थोडे दिवसांनी, आमच्या घराच्या शांत व थंड वातावरणात मी माझ्या पत्नीपाशी ह्या विषयावर चर्चा करू लागलो. मला पडलेल्या अतिशय भन्नाट स्वप्नातदेखील बाल-ग्रामला सर्व वेळ देण्याचा विचार मी केलेला नव्हता. मी करूच शकत नव्हतो...

माझे कॉँट्रॅक्ट होते, माझे निश्चित अधिकाराचे स्थान होते, माझ्या धंद्यात माझे यश ठरलेले होते आणि मला चांगली मिळकत पण होती. शेवटची पण अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे मला माझ्या कुटुंबाचा विचार करणे भाग होते. माझा मोठा मुलगा २ वर्षांचा मायकेल लवकरच 'दादा' बनणार होता. तेव्हा कुटुंबाचा पाया भक्कम असणे आवश्यक होते, आणि तसं पाहिलं तर बालग्राम तरी काय होते ? एक समाजकल्याणाची योजना. काही लोक देणगी देतात म्हणून चाललेली एक संस्था. उद्या देणग्यांचा ओघ संपला की त्यांचे काय होणार होते ? मग मी कुठे

जाणार ? मला माझा धंदा आवडतो. त्यामुळे मी जगभर हिंडू शकतो आणि आता माझे काम फक्त देणगी-पेट्यांशी संलग्न राहील. लोक काय म्हणतील ? त्यांना वाटेल, की नक्की माझे डोके फिरले आहे ! आणि त्यांना खरोखरीच वाटले की मला नक्की वेड लागले आहे. मी माझ्या पब्लिशर्सना सांगून टाकले की मी पत्रकारितेचा आता राजीनामा देणार आहे. कारण माझा सर्व वेळ ओबरोस्टराइशमधे दुसरे बाल-ग्राम बांधण्यासाठी देण्याचा मी निर्णय घेतला आहे. पण मायनरलादेखील लोक असाच वेडा मानीत नव्हते का ? मला पण त्यांनी तसे मानले तर काय बिघडले ? माझ्यात काय जास्ती आहे ? आत्तापर्यंतचे सर्व मी त्याच्याकडूनच शिकलो आहे. आणि आता मला माझा निर्णय हो किंवा नाही हा नक्कीच घेतला पाहिजे. मी त्या बालग्रामच्या योजनेत स्वतःला पूर्णपणे झोकून दिलेले होते आणि आता त्यांतून परावृत्त होण्याची किंवा माघार घेण्याची माझी बिलकूल इच्छा नव्हती आणि अशा प्रकारे मी या कामाला संमती देऊन टाकली आणि त्याबद्दल क्षणभर ही मला खंत वाटली नाही.

## ओबेरोस्टराइश जिंकले !

थोड्याच अवधीत म्हणजे २६ फेब्रुवारी १९५५ ला ओबेरोस्टराइशला बाल-ग्राम संस्थेची स्थापना झाली व ओबेरोस्टराइशच्या लोकपालांच्या ऑफिरातच त्याचे कार्यालय सुरू झाले. या संस्थेचा संचालक म्हणून माझी नेमणूक झाली. मला या बालग्रामचे काम करण्यासाठी माझ्या एका मित्राने जागा दिली. तिथे बसल्यावर मला माझी जुनी वृत्तपत्राची कचेरी दिसत असे. पण खिडकीसमोर उभे राहून भूत काळाची रम्यता अनुभवण्यासाठी माझ्याजवळ कधी वेळच नसायचा. काम वाढत होते. नवीन योजना चांगल्या रीतीने ओबेरोस्टराइशच्या लोकांना पटवून द्यायची होती. आम्हाला पैसे हवे होते, नवीन मित्र व आश्रयदाते पण मिळवायचे होते.

पण सर्वात आधी आम्हाला नवीन बालग्राम बांधण्यास योईस्कर जागा बांधायची होती. सर्व संस्थांना आम्ही एक परिपत्रक पाठविलं होतं- ओबेरो-स्टराईशच्या लोकांची मदत करायची इच्छा होती. त्यांनी आम्हाला अनेक सूचना, माहिती व व्यवस्थापकीय पत्रे पाठवली, इतकी प्रचंड माहिती आम्हांला पुरवली गेली की मी सतत २ आठवडे रस्तोरस्ती भटकून वेगवेगळया जागा बघत होतो. एकदा मी असाच फिरत फिरत ट्राऊनझे नदीच्या किनाऱ्यावर वसलेल्या छोट्याशा सुंदर आलम्पुन्स्बर नावाच्या व्यापारी शहरात गेलो.



मायनरने मला एका वनराईत नेले. ''ही जागा मी तुला बालग्रामसाठी अगदी थोड्या किंमतीत देऊ शकतो'' तो म्हणाला. मी त्या सदा हिरव्यागार दिसणाऱ्या वन-राईत मनसोक्त फिरलो. ट्राऊनझेच्या उताराच्या खाली दिसत असलेल्या दृश्याने माझे मन वेधून घेतले. त्या जागेने मी मोहित झालो. तिथे पलीकडे सरळ उभी असलेली वृक्षराजी काहीतरी गूढ संदेश मला देत होती. फुलझाडांचा आवाज ऐकू येत होता. बाकी सर्व वातावरण शांततापूर्ण होते. मी उभा राहिलो, पुनःपुन्हा पाहिले आणि ऐकले.

दोन महिन्यांनंतर बरोबर याच जागी आमचे लोकपाल डॉ. ग्लाइसनरना घेऊन मी आलो, आणि त्यांच्या हस्ते ओबेरोस्टराइझच्या नवीन बालग्रामचे भूमिपूजन झाले. हा नवीन जन्म होत असताना क्षालच्या चर्चमधे घंटांचा नाद ऐकू येत होता, आणि वर आकाश निरभ्र होते. एकही ढग दिसत नव्हता.

लोकपाल म्हणाले, ''ओबेरोस्टराइझमधे एक नवीन प्रकाश येत आहे.''

ते छोट्या व्यासपीठावरून जमलेल्या आटोपशीर जनसमुदायाला संबोधित करीत होते. भूमिपूजनाचा हा छोटा समारंभ होता.

''इथे आम्ही निराधार मुलांसाठी एक बालग्राम वसाहत बांधणार आहोत. आणि मी खात्रीपूर्वक सांगतो की, आपल्या या भूगीत आपण एक प्रेमाची नगरी उभी करणार आहोत.''

त्याच वेळी उत्तर ऑस्ट्रियातील प्रत्येक घरात एक पत्रक पण पोहोचले.

ओबेरोस्टराइश मधे राहणाऱ्या स्त्री-पुरुषांनो, तुम्हाला हे ठाऊक आहे का, ईम्स्टमधील बालग्राम हे चांगल्या लोकांच्या छोट्या शिलिंगांच्या देणगीतून बांधले गेले ? आज ऑस्ट्रियातील १००,००० वर्गणीदार त्याला मदत करीत आहेत. ते दर महा फक्त एक शिलिंग एवढी वर्गणी देत असतात. ती त्यांची सभासदत्वाची फी असते आणि त्याच्या मोबदल्यात त्यांना बालग्राम संदेश' हे १२ पानांचे त्रैमासिक विनामूल्य पाठविले जाते. इतक्या मोठ्या संख्येने लोकांनी दरमहा एक शिलिंग वर्गणी दिल्यामुळे एक पूर्ण बालग्रामची वसाहत बांधून झाली आणि गेल्या ४ वर्षात त्या वसाहतीत आता १४० अनाथ मुले सुखाने राहत आहेत. ईम्स्टमधे हे बालग्राम ज्यांच्यामुळे उभे राहिले ते हर्मन मायनर आता ओबेरोस्टराइश मधे तसेच दुसरे एक बालग्राम बांधू इच्छितात. त्यासाठी अनाथ निराधार मुलांचे डोळे आशेने आपल्या ह्या शहराकडे लागले आहेत. आज त्यांना प्रेम मिळत नाही व भविष्याची पण शाश्वती नाही. ह्या मुलांना मदत करण्यात आपण एक मोठे करुणेचे काम कर-णार आहोत म्हणून ओबेरोस्टराइश नागरिकांनो, आपला मदतीचा हात पुढे करा. या कामाच्या

मागे कुठलाही राजकीय पक्षाचा हेतू नाही, किंवा सरकारी संस्था पण नाही. येथे फक्त प्रेम आणि त्यागाची भावना असेल, आणि त्यासोबत मूठभर लोकांचे धैर्य असेल. कारण ह्या धैर्यवान माणसांची मानवतेवरील निष्ठा अजून शाबूत आहे. तुम्ही दिलेला एकही शिलिंग येथे हरवणार नाही वाया जाणार नाही किंवा येथे व्यवस्थापन खर्चाचा आकडा पण फुगलेला दिसणार नाही.

आपण सर्वजण ओबेरोस्टराइशमधील ह्या नवीन संस्थेचे सभासद बनू या. एक शिलिंगाची रक्कम खर्च करताना आपण विचारदेखील करीत नाही. चटकन सिगरेट खरेदी करतो आणि धुरात वाया घालवतो. पण तोच शिलिंग जर तुम्ही दरमहा ह्या बालग्रामची सभासद वर्गणी म्हणून दिलात तर त्यातून एक प्रेमाची नगरी उभी राहील व एका चांगल्या कामास मदत केल्याचा आनंद आपल्याला मिळेल. कारण हे काम म्हणजे उपेक्षित, वंचित मुलांना मदत करणे हे आहे.

ओबेरोस्टराइशचे हे बालग्राम म्हणजे आपले काम असेल, त्यात आपल्याला आनंद मिळेल, आणि त्याचा आपल्याला अभिमान वाटेल. शेकडो मुलांचे भवितव्य आज तुमच्या हाती आहे. जर उत्तर ऑस्ट्रियातील प्रत्येक माणसाने हा एक शिलिंगचा संकल्प केला, तर आपले हे बालग्राम उभे राहणार आहे. हे पत्रक तुम्ही वाचा आणि तुमच्या देणगीचा एक शिलिंग दरमहा खालील पत्त्यावर नियमित पाठवा. ही तुमची मित्र व हितचिंतक म्हणून सभासदत्वाची वर्गणी आहे.

अनेक धन्यवाद,

बालग्राम ओबेरोस्टराइश
जिल्हा लिंझ

आता आम्हाला खरंच पैसे हवे होते. पैसे आणि अधिक पैसे. मी एकदम ७ बालसदने बांधायाचे ठरविले होते आणि लाखो रूपये लागणार होतें आणि ती रक्कम जमविण्यासाठी मी नानातऱ्हेच्या विचित्र योजना आखीत होतो. उदाहरणार्थ, 'फुलांची मिरवणूक'– बालग्रामच्या मदतीसाठी अभियान.'

भूमिपूजनानंतर थोड्याच दिवसांनी हा कार्यक्रम होता. माझ्या एका मित्राची नाटकाची तिकिटे विकण्याची एजन्सी होती. आम्ही दोघांनी एक योजना बनवली. आम्ही बऱ्याच कारखानदारांना भेटलो आणि त्यांनी त्यांच्या गाड्या फुलांनी सुशोभित करून मिरवणुकीत देण्याचे कबूल केले. काही बँडच्या पथकांनी राष्ट्रीय पोशाख घालून मिरवणुकीत सामील होण्याचे मान्य केले आणि काही क्लब्स्नी पण चांगले



पोशाख घालून येण्याचे ठरविले. पण हे सर्व ठरवीत असताना त्यातील येणाऱ्या अड थळ्यांची आम्हाला कल्पना आली नाही. आम्ही रात्रंदिवस काम करीत होतो आणि त्या मिरवणुकीचा ठरलेला रविवार जवळ आला. एका मोठ्या मोटारीवर हस्त-व्यवसाय शिकणाऱ्या मुलांनी बालग्राममधील घराचे एक प्रचंड मॉडेल बनवून ठेवले होते. त्यांनी हा लक्ष्यवेधी उद्योग त्यांच्या फावल्या वेळात केला होता. फुलांच्या मिरवणुकीच्या अग्रभागी हे मॉडेल राहणार होते. ह्या बालग्रामच्या घरामधे प्रत्यक्ष मुले बसणार होती, व घराच्या खिडकीतून रस्त्यावर फुले उधळणार होती. पण इतकी सारी फुलं आणायची कुठून ? शनिवारी ह्या प्रश्नाने आम्ही बेचैन झालो. त्याच्या आदल्याच दिवशी मी फोन करून ममा डिडलूला इन्सब्रुकडून लिंझला बोलावून घेतले होते. ती काहीतरी युक्ती शोधून काढील, अशी आशा मला वाटत होती आणि खरोखरीच फ्राउ डिडलूला युक्ती सुचली. लिंझमधे पोचल्याक्षणीच ती उद्यानांच्या संचालकांना भेटली व तिने त्यांच्याकडे फुलांचे दान मागितले. त्यांनी तिला परवानगी दिली व सांगितले की शहरात जेवढे बाग-बगिचे आहेत त्यांतली सर्व फुले तिने गोळा करावी. कारण एवीतेवी त्यांना नवीन रोपे लावायचीच होती. तेवढ्यात मी पण २० शाळकरी विद्यार्थिनी फुले गोळा करण्यासाठी जमविल्या. मोठमोठ्या टोपल्या हातात घेऊन फ्राउ डिड्ल आपल्या मुलींसह बगिचांतून फिरू लागली.

आमची बालग्रामची कचेरी म्हणजे एक वेड्यांचे घरच झाले होते. हजारो गुलाबाची फुले गोळा झाली होती. ती सर्व मुलांना वाटून द्यायची होती आणि मिरवणूक चालू असताना ही मुले ती फुले रस्त्यावरील प्रेक्षकांना विकणार होती. याद्या तयार करायच्या होत्या. सारखी लोकांची ये-जा सुरू होती. फोन वाजत होता ! एक पोलिस स्टेशनचा फोन आला. "आम्ही फ्राऊ डिड्ल नावाच्या एका बाईला कैद केले आहे. ती म्हणते की शहरातील सर्व बगिच्यांची फुले तोडायची परवानगी तिला मिळाली आहे." एका कठोर पुरूषाची वाणी ऐकू आली. मी धावतच पोलिस चौकीवर गेलो आणि खरंच तिथे ममा डिडलू आपल्या २० लाल डोळ्यांच्या मुलींच्या घोळक्यात बसलेली दिसली. तिचा चेहेरा पण रागाने लालबुंद झाला होता. नक्कीच तिने त्या पोलिसांना चांगले सुनावले असले पाहिजे. तिथूनच डायरेक्टर साहेबांना एक टेलिफोन केल्यावर सर्व प्रश्न मिटले. पोलिसांच्या संरक्षणात फ्राउ डिड्ल आणि तिच्या २० मुलींना बागेतून फुले तोडतांना पाहून शहरातले सर्व नागरिक संतापले होते, आणि त्यांनी अनेक वेळा ह्या मुलींना धमक्या पण दिल्या व फुलांना हात लावण्याची मनाई केली.

त्या सुंदर हवामानात आमची ती फुलांची मिरवणूक रीतीने पार पडली आणि आम्हाला त्यातून १,००,००० शिलिंग्ज् उत्पन्न झाले. त्यामुळे आमच्या नवीन बाल-

ग्रामच्या आणखी इमारती उभ्या राहणार होत्या. त्या सुरेख भूमीवर आमचे बालग्राम आकार घेऊ लागले. नंतरच्या काही आठवड्यांत मी ओबेरोस्टराइशचा खूप प्रवास केला, व्याख्याने दिली व बालग्रामच्या कल्पनेला जोरदार प्रसिद्धी दिली. व्हिएन्नाच्या एका माणसाने आमच्या कामावर एक छोटी रंगीत फिल्म तयार केली होती. फिल्म फार सफाईदारपणे केलेली नव्हती. पण वास्तववादी होती. त्यात एका दारूड्या माणसाच्या मुलाची दुर्दशा दाखवली होती. एक दिवस बापाने रेमंडला खूप मारले होते. तेव्हा तो घरातून पळून गेला होता, आणि बालग्रामची माहिती ऐकल्यावर टिरोलच्या त्या बालग्रामात जाऊन पोहोचला होता. त्या फिल्ममधे तो ईम्स्टला कसा आला व बालग्रामला कसा पोहोचला याचे चित्रण होते. तो एका करड्या रंगाच्या घराच्या समोर स्तब्धपणे उभा राहिला होता आणि मुलांना घराच्या आत-बाहेर करताना पहात होता. त्यामुळे बालग्राममधील वाढत असलेल्या मुलांच्या दैनंदिन जीवनाचे चित्र बघणाऱ्याच्या डोळ्यांपुढे उभे राहत होते. त्या मुलाला बालग्रामात प्रवेश मिळाला होता. आवश्यक ते कागदपत्र करून घेतले होते आणि मुख्य म्हणजे त्याला घर मिळालं होतं. ती एक १५ मिनिटे चालणारी परिणामकारक अशी फिल्म होती. शेवटच्या सीनमधे त्या मुलाला त्या बालग्रामच्या बाहेर बसलेला दाखवला होता. त्याच्या डोळ्यांतून अश्रू गळत होते. समोरच्या सुंदर पर्वत राशीकडे तो बघत होता आणि मनातल्या मनात त्या बाईच्या शब्दांची उजळणी करीत होता. ती त्याला नवीन घरात नेताना म्हणाली होती.

"रेमंड बाळा, तू मला आवडतोस आणि मी तुझ्यावर नेहेमी प्रेम करीन."

लाम्बाकमधे माझे पहिले व्याख्यान होते. त्या दिवशी दुपारी हर्मन मायनर माझ्याकडे आला होता, आणि माझ्यासोबत तो काही दिवस राहणार होता. व्याख्यानाच्या जाहिराती जेव्हा आम्ही रस्त्यावरून वाटीत होतो, तेव्हा त्याचे लक्ष एका फलकाकडे गेले.

"हाय देवा, हा तर सत्यानाश झाला !" त्याने सांगितले.

मी पण तो फलक वाचला. त्यावर लिहिले होते की, "स्पॅनिश नर्तकीचे नृत्य." आणि ते त्याच दिवशी, त्याच संध्याकाळी होणार होते. त्याचा परिणाम माझ्या व्याख्यानावर झालाच. व्याख्यान सुरू होऊन २० मिनिटे झाली होती, आणि हॉलमधे फक्त ३ वृद्ध महिला बसलेल्या होत्या. मी अगदी निराश झालो. ३ श्रोत्यांसमोर बोलणे माझ्या गणितात बसत नव्हते.

"आपण व्याख्यान रद्द करू या." मी सुचविले. यात काहीच अर्थ नाही.

मायनरला माझ्या या वागण्याचे आश्चर्य वाटले. माझ्या निराशेचे कारण पण



त्याला पटले नाही.

"म्हणून काय झालं ? आपण या तिघींशीच बोलू या."

"मी नाही बोलू शकणार, माफ कर, मला ते जमणार नाही." पण मायनर बोलू शकत होता, आणि जणू काय तो हॉल श्रोत्यांमी भरलेला आहे, असे मानून त्याने त्या ३ बायांना बालग्रामची माहिती सांगितली. इतके आवेशपूर्ण भाषण तो क्वचितच करीत असेल, आणि तरीदेखील त्यातल्या एकीला झोप लागली. दुसरीच्या हातात तिचे विणकाम होते आणि तिचे संपूर्ण लक्ष त्या विणकामात होते. फक्त तिसऱ्या बाईने त्याचे भाषण ऐकले आणि तिच्या डोळ्यांतले अश्रू गालांवर ओघळलेले मला दिसले. मला तिच्याकडे पाहण्याचा धीर झाला नाही. कारण मी पण माझे डोळे पुसत होतो. पण मायनर सारखा बोलत राहिला. त्याने एका मुलाच्या दुर्दैवाची गोष्ट सांगितली.

"पूर्व जर्मनीमधे राहणारी एक बाई युद्धामुळे विधवा झाली, आणि दारिद्र्यात पिचून मरण पावली. तिचं शरीर दुर्बल होतं, आणि परिस्थितीच्या तडाख्यात भुकेने आणि कष्टाने आणखी अशक्त बनून ती मेली. एका जुन्या अंधाऱ्या वखारीत गवताच्या पोत्यावर तिचा मृतदेह पडला होता. आत्तापर्यंत जिवंत असताना ती व तिचा मुलगा पीटर ह्याच गवताच्या पोत्यावर झोपत असत. आई मेल्यानंतर १२ वर्षांच्या ह्या पीटरला शेजारच्या ओळखीच्या माणसांनी दुसऱ्या झोपडपट्टीत पाठवून दिले होते, आणि तिथे तो एकटा पडला होता. तो सारखा वेगवेगळ्या झोपडपट्ट्यांतून हिंडत होता. पण त्याला जागा मिळत नव्हती. शेवटी तो एका शेतावर आला. तिने त्याला शेतीवरचे काम करण्यासाठी मजूर म्हणून ठेवून घेतले पण पीटर काम करीना. तो शहरात राहिलेला मुलगा होता, आणि त्याच्या आईप्रमाणेच तो शरीराने अशक्त होता. त्याला जनावरांची भीती वाटत असे आणि मुकादमाच्या दमदाटीने तो घाबरून जात असे. त्याचे घर सुटले होते, त्याची आई त्याला सोडून गेली होती. त्यामुळे तो अतिशय दुःखी होता. पण ह्याची जाणीव त्या शेतकरी कुटुंबाला नव्हती. तो जेव्हा गुरांना चारा द्यायला जात नसे, व काहीतरी बहाणे करीत असे किंवा अंधारात काही काम करायला कांकू करत असे तेव्हा ते दोघे त्याच्यावर खूप राग-वत असत. ते त्याला धाकदपटशा दाखवीत असत व मारीत असत. रात्रभर पीटर रडत असे. तो शेतकरी म्हणाला की, असल्या ऐदी मुलांना ठीक करण्यासाठी स्वतंत्र शाळा आहे आणि त्या शाळांचे क्रूर, भडक वर्णन त्याने केले.

"थांब थोडा ! तुला एकदा त्या शाळेत पाठवलं म्हणजे खरा चोप काय असतो ते नीट कळेल."

त्याच्या या बोलण्याने पीटरची भीती रोज वाढतच होती. जरा कुणी त्याला जोरात हाक मारली की त्याचे सर्व शरीर थरथर कापत असे, आणि एका सकाळी त्याच्यावर संकटाची गदा कोसळली. त्याच्या भित्रेपणाकरिता त्या शेतकऱ्याची मुले त्याला खूप चिडवत होती- ती मुले एकमेकांत दंगामस्ती करीत होती आणि त्या गोंधळात पीटरचा धक्का लागून मोठ्या खिडकीचे तावदान फुटले. आता सर्व संपले आणि शेतकरी रागावून अंगणात आला. त्याने हुकूम दिला,

"चल, तुझं चंबूगबाळं आवर !"

पीटरला वाटले की, आता त्याची रवानगी त्या भयंकर क्रूर शाळेत होणार. त्याने आपले गाठोडे बाधले. हुकुमाप्रमाणे दरवाज्यासमोर ठेवले आणि तो पळाला. दिवसभर तो शेजारच्या खेड्यात भटकत होता. रात्री तो शेतावर परत आला आणि घोड्याच्या तबेल्यात जाऊन त्याने स्वतःला टांगून घेतले.

"ह्या अशा गोष्टींमुळेच मी या निराधार मुलांच्या पुनर्वसनाचा विचार करू लागलो." मायनर सांगत होता. मला या मुलांना त्यांचं हरवलेलं घर परत मिळवून द्यायचं होतं. आणि त्यांना एक आई पण द्यायची होती. सव सामान्य माणसांसारखं वागायला ह्या मुलांना आधाराची फार गरज असते आणि म्हणूनच मी तुम्हाला इतका वेळ ईम्स्टमधे आम्ही बांधलेल्या त्या बालग्रामची माहिती सांगितली. आता लवकरच ऑबेरोस्टराइशमधे पण एक बालग्राम बांधण्याचा आमचा विचार आहे. खूप गरीब मुलांना तिथे निवारा मिळेल आणि त्यांचे भविष्य उज्ज्वल होईल."

शेवटी एकदा ते व्याख्यान संपले. फिल्मपण दाखवून झाली. झोपलेली 'आजी-बाई' जागी झाली आणि विणकाम करणाऱ्या बाईने आपले विणकाम बाजूला ठेवले. तिसऱ्या ऐकणाऱ्या बाईने रुमालाने स्वतःचे डोळे पुसले. २-३ शिलिंग त्या दानपेटीत टाकले गेले, आणि तो आवाज ऐकून मी फिल्म परत गुंडाळून ठेवू लागलो. जर ऑबेरोस्टराइशच्या लोकांनी बालग्रामच्या योजनेला असा प्रतिसाद दिला तर बालग्राम कसं उभं राहणार ? माझं मन उद्विग्न झालं. हे जमणारच नाही.

पण मायनर मात्र शांत, विश्रांत होता. "मी ३ लोकांपुढे व्याख्यान का द्यायचे नाही ? आपलं काम आहे की, आपल्या योजनेचं बीज जमिनीत पेरायचं. मगच ते उगवेल, फळ येईल त्याची वाट पाहिली पाहिजे. असं धीर सोडून चालणार नाही."

लिंझला परत आल्यावर मी एक शब्द बोललो नाही. पुढच्या आठवड्यात असाच प्रतिसाद मिळाला तर कसं व्हायचं ? पण त्या दिवशीच्या त्या नृत्याच्या कार्यक्रमानेच खरं पाहता, आमचं काम बिघडवलं होतं. नंतरच्या व्याख्यानांना चांगली गर्दी जमत होती. लोकांचा प्रतिसाद उत्तेजक होता. वर्तमानपत्राने प्रसिद्धी दिली होती आणि बीज अंकुरून त्याला चांगली फुले-फळे धरतील अशी आशा वाटू लागली



होती.

प्रचाराचा खूप जोर होता. रोज सकाळी रेडियोवर बालग्रामची जाहिरात देत होते. मी माझ्या सर्व परिचितांशी संपर्क साधला होता. वृत्तपत्रांतले माझे जुने मित्र मला सर्वतोपरी मदत करीत होते आणि त्या दिवसांत लोकांच्या कानावर बालग्रामची प्रसिद्धी रोज येऊन आदळत होती !

*"उत्तर ऑस्ट्रियात राहणाऱ्या स्त्री-पुरूषांनो, गेल्या काही दिवसांत तुम्हाला आमचे त्रैमासिक बालग्राम संदशची प्रत पोस्टाने मिळाली असेल. त्यावरून तुम्हाला यानंतरचे दुसरे बालग्राम ऑबेरोस्टराइशमध्ये सुरू करायचे आहे ही माहिती मिळाली असेल. आपण या निराधार मुलांच्या बाबत विचार करू या. ह्या महत्त्वाच्या कामाला हातभार लावण्यासाठी आपली छोटी देणगी अवश्य पाठवा.*

*ऑबेरोस्टराइशच्या स्त्री पुरुषांनो,*

*हर्मन मायनर, ज्याने ईम्स्टमध्ये पहिले बालग्राम सुरू केले, तो आता दुसरे प्रेमाचे घर बांधायला तुमची मदत मागत आहे. गरीब, टाकून दिलेल्या अनाथ मुलांसाठी त्याला हे दुसरे बालग्राम ऑबेरोस्टराइशमध्ये बांधायचे आहे. आपण या करुणेच्या कामाला मदत करू या, आणि आपली १ शिलिंगची देणगी दरमहा पाठवू या. लवकरच तुमच्याकडे 'बालग्राम संदेश' येऊन पोचेल. कृपा करून तो वाचा, व त्याची उपेक्षा करू नका.*

*उत्तर ऑस्ट्रियाच्या स्त्री-पुरुषांनो,*

*ऑस्ट्रियातील दुसरे बालग्राम अनाथ आणि निराधार मुलांना घरे मिळवून देण्यासाठी ऑबेरोस्टराइशमधे बांधले जात आहे. ईम्स्टमध्ये जे पहिले बालग्राम बांधले गेले, त्याच धर्तीवर हे बालग्राम पण बांधले जाईल. पहिल्या बालग्रामच्या संस्थापक हर्मन मायनर हा आपल्या उत्तर ऑस्ट्रियात आलम्युन्स्टर येथे होणाऱ्या बालग्रामच्या कार्यकारी मंडळाचा सभासद आहे. ह्या वास्तूत राहयला येणाऱ्या* *बालग्रामच्या कार्यकारी मंडळाचा सभासद आहे. ह्या वास्तूत राहायला येणाऱ्या* *अनेक अनाथ गरीब मुलांचा विचार करा. मदत करा. दरमहा १ शिलिंग पाठवा !*

हे पत्रक वर्तमानमत्रात व रेडियोवर प्रसिद्ध झालेच, पण सिनेमाहॉलमधे ही त्याची फुकट जाहिरात करण्यात आली. सर्वांना एकच हाक देण्यात आली आणि ती ठिकठिकाणी प्रसारित झाली. "बालग्राम तुमची मदत मागत आहे !" हळूहळू ऑबेरोस्टराइश पण सर झाले- हरमन मायनरच्या कल्पनेने लोकांना जिंकले. आम्हाला आणखी १,००,००० सभासद मिळाले, मित्र व हितचिंतक लाभले आणि त्यामुळे आमच्या कामाला चांगलीच बळकटी मिळाली.

# ईम्स्टमधील मातांची सभा

मी पहिल्यांदाच त्या हॉलमधे मातांची सभा आणि भावी माता बनू इच्छिणाऱ्या स्त्रियांची सभा पाहात होतो. त्या सभेत बराच गोंधळ व आरडाओरडा चालू होता. बायका गप्पा मारीत होत्या आणि मुलांचे अनुभव सांगून दिलखुलास हसत होत्या. त्यांना पाहून प्रत्येकाला वाटले असते की, ह्या स्त्रिया स्वाभाविक प्रकृतीच्या व समाधानी असल्या पाहिजेत. सबंध दिवसाचे त्यांचे काम व काळजी आता मिटली होती त्यामुळे त्या आनंदाने गप्पा मारीत बसल्या होत्या. प्रत्येक आठवड्याला ही मातांची सभा होत असे आणि ह्या माता आपल्या अडचणींबद्दल हर्मन मायनरशी मोकळेपणाने बोलत असत. मायनर पण अशा वेळी मुक्त मनाने विचार करीत असे. प्रथम त्याने आपल्या ओबेरोस्टराइशच्या भेटीबद्दल मातांना सांगितले व लवकरच तिथे दुसरे बालग्राम बांधले जाईल ही माहिती पण दिली. नंतर मग त्याने बालग्रामच्या मुलांच्या शिक्षणाबद्दल बोलायला सुरुवात केली. त्याने शिक्षकाची व माळ्याची तुलना केली. माळी ज्याप्रमाणे बी पेरतो, त्याला अंकुर फुटल्यावर त्याची काळजी घेऊन त्याला जिवंत ठेवण्याचा प्रयत्न करतो, त्याचप्रमाणे शिक्षकाचीही भूमिका असली पाहिजे. पुन्हा त्याने शिक्षकाची तुलना चित्रकाराशी केली. चित्रकाराचे काम तुलनात्मक दृष्टीने सोपे आहे. त्याचे चित्र त्याला आवडले नाही तर तो ते फेकून देऊ शकतो व पुन्हा नव्याने चित्र काढायला सुरुवात करतो. परंतु शिक्षकाचे तसे नाही. कारण त्याने एकदा जे शिकवले किंवा सांगितले, ते त्याला पुसून टाकता येत नाही. मायनर म्हणत होता, शिक्षक एकदा जे काम करतो, ते कायमचे असते आणि त्यामुळे आपण हे काम जबाबदारीने करायला हवं आहे. आपण त्याकडे दुर्लक्ष करून चालणार नाही किंवा त्यात चुका पण केलेल्या चालणार नाहीत.''

अवतीभोवती असलेल्या वातावरणाचा पण मुलाच्या घडणीवर परिणाम होत असतो हे त्याने सांगितले, ''लक्षात घ्या तुम्ही.'' तो मातांना गंभीरतेने संबोधीत करीत होता.

बालपणात आणि तारुण्यात प्रत्येक टप्प्यावर शिक्षण घेण्याची क्षमता मुलाच्या अंगी नैसर्गिकरीत्या असते. उदाहरणार्थ, काही पाठांतर करावयाचे असल्यास तरुण मुले ते लवकर करू शकतात. पण प्रौढांना पाठांतरास जास्ती वेळ घालवावा लागतो व मेहनत करावी लागते. तरुण मंडळींचे मन व शरीर लवचिक असतात. त्यांना घडवता येते. कारण ते परिस्थितीशी लवकर रूळतात. परिस्थितीचा परिणाम ताबडतोब होऊन त्यात ते तद्रूप होतात. अवतीभोवतीच्या वातावरणातून ते आकार व रूप धारण करत असतात आणि स्वाभाविकपणे ज्या समाजात ते वाढतात, तसे ते बनत



असतात. पुष्कळ वेळा असं घडताना दिसतं की, उत्तम कुटुंबातील मुले अपयशी होतात. एक दिवस ही श्रीमंत माणसं आपल्या मुलाकडे पाहून अवाक् होतात. कारण नेहमीचा अरुंद, मळलेला रस्ता टाकून तो मुलगा भलत्या मार्गावर गेलेला दिसतो. आणि त्यांना वाटतं की ही चूक सर्वस्वी त्या मुलाची आहे. पण जर त्या मुलाच्या परिस्थितीचा बारकाईने विचार केला तर असे दिसून येते की त्या मुलाच्या मनावर बाहेरच्या वातावरणातील त्रासदायक आणि कठोर घटकांचा परिणाम झालेला असतो. त्याच्या आईवडिलांना त्याच्यासाठी वेळ नसतो. त्यांना अधिकाधिक काम करून उद्योगधंद्यांतून वाढती कमाई करायची असते. त्यामुळे जेव्हा आईबापांचे त्या मुलाकडे लक्ष नसते, तेव्हा बाहेरच्या जगातील वाईट प्रवृत्ती त्याचा ताबा घेत असतात, आणि त्याला भलत्या मार्गाला नेत असतात. म्हणून आपल्या ह्या बालग्रामांत आपल्याला खूप खबरदार राहून मुलांभोवतालचे वातावरण सतत सुधारित राहील ही काळजी घेतली पाहिजे. मुलांच्या ज्या अनुवंशिक प्रवृत्ती असतात, त्यांचे अस्तित्व नाकारून चालणार नाही. त्यांचा प्रभाव पण आपल्याला कमी लेखता येणार नाही. पण आपण जर वातावरण उत्तम ठेवले, तर या प्रवृत्ती जास्ती डोके वर काढणार नाहीत आणि आपल्या व्यक्तित्त्वातील चांगुलपणाचा त्या मुलांच्या मनावर चांगला परिणाम झाल्याशिवाय राहाणार नाही. तुम्ही स्त्रिया आहात, चांगल्या माता आहात, तुम्ही मुलांना जवळ घेऊ शकता, त्यांचे अपराध पोटात घालू शकता; त्यांच्यामागे उभ्या राहू शकता आणि एकदा त्या मुलाचा तुम्ही अंतःकरणापासून स्वीकार केलात, की तुम्ही त्याला खूप आधार, विश्वास आणि शाश्वती देऊ शकता. त्या मुलाला तुमच्या सहवासात सुरक्षित वाटते.''

ह्या भाषणानंतर बराच वेळ चांगली चर्चा झाली. किती चिकित्सक बुद्धीने माता मुलांच्या वाढीबद्दल प्रश्न विचारीत होत्या, ते ऐकून मला आश्चर्य वाटले. त्या प्रश्नांची उत्तरे ठराविक तयार केलेली नव्हती. पण सर्व उत्तरांच्या मागे एक मोलाचे तत्त्व होते आणि ते तत्त्व म्हणजे एका सहृदय माणसाची आयुष्याची पुण्याई आणि त्यामुळे त्याला मिळालेले त्या विषयाचे गाढ ज्ञान ! समस्यांच्या शेवटी शेवटी मुलांना त्यांच्या वाढत्या वयाला अनुकूल ज्ञान देऊन कसे माहितगार बनवावे याची पण चर्चा झाली. काही मातांचे मुलगे आणि मुली वयाने वाढल्या होत्या आणि लवकरच हा प्रश्न त्यांच्या आयुष्यात उद्भवणार होता. तो कसा सोडवावा ?

मातांची सभा जवळपास मध्यरात्रीपर्यंत चालली होती. आम्ही बाहेर पडलो. वर आकाशात चंद्र चमकत होता. आम्ही काहीच बोललो नाही. प्रत्येकाच्या मनात स्वतंत्र विचारचक्र सुरू होते. हर्मन मायनर मातांच्या सभेत जे बोलला त्यातली शेवटची वाक्ये माझ्या कानात घुमत होती. आम्ही जेव्हा तिरोलच्या फाशीच्या खांबा-

पाशी आलो तेव्हा आम्ही पुन्हा एकदा ती पाटी वाचून काढली. "हे स्वर्गीय परमेश्वरा ! तू आम्हाला या बालग्रामात आमचे घर परत मिळवून दिलेस. आता तू येथेच आमच्या सोबत रहा आणि तुझा कृपामय हात, आशीर्वाद सतत या कार्यावर ठेव."

खरंच ते घरच बनलं होतं. हर्मन मायनरचं घर, तिथे काम करणाऱ्या त्या मातांचं पण ते घर होतं. अनाथ मुलांचं ते घर होतं आणि जरी मी फक्त तीनदाच ईम्स्टमधल्या या बालग्रामात आलो होतो तरी मलादेखील ते माझं घरच वाटू लागलं होतं.

## व्यवस्थापन कडक झालं !

लिंझला परत जाताना मी थोडा वेळ इन्सब्रुकच्या ऑफिसात थांबलो. नेहेमीप्रमाणे काम व्यवस्थित सुरू होतं. सतत वेगाने वाढणारी सभासदांची संख्या, त्यांचा हिशोब ठेवणे हे मोठेच काम होते. पत्त्यांची यादी सारखी फुगतच होती. दुसरी कामे पण चालू होती. प्रत्येक कामच इतक्या प्रचंड गतीने वाढत होते की, लवकरच ते हाताबाहेर जाईल अशी भीती वाटत होती. याचीच मायनरला खूप चिंता वाटत होती. जोपर्यंत हे सामाजिक काम लहान स्वरूपाचे होते आणि फक्त काही शेकड्यांनीच सभासद वर्गणीदार होते तोपर्यंत अडचणी कमी होत्या. नेहमी विनावेतन काम करणारे स्वयंसेवी कार्यकर्ते शोधावे लागत होते. पण कामाचे स्वरूप वाढतच होते, आणि त्यामुळे नवीन व्यवस्थापन आणणे भागच होते.

याचा परिणाम म्हणजे मायनर एक चांगला हुशार माणूस शोधू लागला. त्याने ह्या वाढत्या कामाची सर्व जबाबदारी उचलावी असे मायनरला वाटत होते. आणि पुन्हा त्याच्या नशिबाने त्याला हात दिला. कित्येक वर्षे एक मोठा उद्योग व्यवस्थित सांभाळणारा एक गृहस्थ त्याला भेटला. तो इन्सब्रुकमध्ये राहून पेन्शनवर निर्वाह करीत होता. त्या गृहस्थाला पण वाटले की, अजून आपल्यात भरपूर ताकद व उत्साह आहे आणि त्याचा उपयोग ह्या कामासाठी होऊ शकतो. त्याचे नाव होते डॉ. लेनर्ट. डॉ.लेनर्टने सिगारेट आपल्या दोन ओठांत कायमची दाबून धरून कित्येक वेळा इन्सब्रुकमधील बालग्रामचे काळजीपूर्वक निरीक्षण केलं होतं, कागदपत्रांचा अभ्यास केला होता आणि कार्यकर्त्यांबरोबर दीर्घ काळ चर्चा केल्या होत्या. मग त्यानं व्यवस्थापनाचे नवीन तंत्र बसविण्यास सुरुवात केली. सामाजिक संस्थेचा कारभार सुरळीत चालावा या उद्देशाने बसविलेले व्यवस्थापन फार तांत्रिक नाही, फार साधे पण नाही. पण आवश्यक त्या सर्व गोष्टींचा समावेश असलेले आणि पायाशुद्ध ! कारण



काही चुका होऊन चालणार नव्हते. प्रत्येक गोष्ट अगदी काटेकोरपणे व्यवस्थित केलेली असावी आणि मुख्यत्वे करून हिशेब नीट मांडलेले असले पाहिजेत. अशा तऱ्हेने विचारपूर्वक ठरवलेली ही व्यवस्थापनाची कडी म्हणजेच बालग्रामचा महत्त्वाचा कणा होता. ही व्यवस्था पक्की बसविल्यामुळे नंतर हजारो, लाखो लोकांना मित्र व हितचिंतक म्हणून संस्थेत नोंदवून घेता आले. सर्व बालग्रामचे एकत्रित हिशोब मध्यवर्ती कचेरीत ठेवता आले, व्यवस्थित ताळेबंद बनविता आले आणि सर्व सुव्यवस्थित झाले. हर्मन मायनर नवनवीन योजना आखीत होता आणि त्याला अंतर्गत मजबुती ह्या व्यवस्थापनाने मिळत होती.

लवकरच बालग्राम व्यवस्थेचे तीन प्रमुख विभाग मानण्यात आले. (१) प्रत्यक्ष बालग्राम वसाहत. (२) अंमलबजावणी विभाग आणि (३) व्यवस्थापन विभाग.

जर व्यवस्थापन नसले, तर इमारती व त्यांची दुरुस्ती होऊ शकली नसती. कारण व्यवस्थापन पण अंमलबजावणीवर बरेचसे अवलंबून होते. कोणी, काय कामे करावयाची हे आधी ठरवून घेऊन मग त्याची वाटणी करणे आवश्यक होते. कारण त्यासाठी यंत्रणा हवी होती. म्हणून एका मध्यवर्ती बिंदूपासून ही वेगवेगळी दिशांची कामे निर्माण झाली आणि शेवटी सर्वांची मिळून एकत्रित जोडलेली अशी एक व्यवस्था निर्माण झाली. बालग्रामच्या अस्तित्वात आजदेखील ही व्यवस्था निहित आहे ती व्यवस्था एकदम निर्माण झालेली नाही, तर तिचा सतत विकास होत गेला आहे आणि त्याच्या मुळाशी एका माणसाचे प्रचंड कर्तृत्व आहे. त्यामुळेच बाल-ग्रामाची ही चळवळ यशस्वी बनली आणि सबंध जगाच्या कानाकोपऱ्यापर्यंत जाऊन पसरली.

इन्सब्रुकला मी गेलो असताना बालग्रामचे हिशोब जवळून पाहण्याची संधी मला मिळाली. मी हे जेव्हा पाहिले,की १९५३ साली १५,७६,६०० शिलिंगांची देणगी मिळाली होती, आणि त्याचा विनियोग इम्स्टमधील बालसदने बांधण्यासाठी झाला होता तेव्हा मला खूप आश्चर्य वाटले. फर्निचर व घरातल्या वस्तू खरेदीसाठी १,५३,९०० शिलिंग वापरले होते. १९४९मधे मायनरने जेव्हा कामाला सुरुवात केली तेव्हा त्याच्याजवळ फक्त ६०० शिलिंगइतकेच भांडवल होते, याव्यतिरिक्त त्याच्याजवळ काहीच नव्हते. फक्त आपल्या योजनेवर अपरंपार विश्वास होता त्याचा. ४ वर्षांनंतर तो १७,००,००० शिलिंग गुंतवू शकला होता. १९५४मध्ये त्याने २० लाखांवर मजल मारली होती. ईम्स्टमधल्या एका वर्कशॉपने आणि आणखी ४ बालसदनांच्या बांधकामाने त्याचे ११,२१,००० शिलिंग संपवून टाकले होते. घरांच्या फर्निचरसाठी ४,४४,००० शिलिंग खर्च झाले होते आणि जमीन समान करायला १६,००० शिलिंग लागले होते. ११० मुलांचा निर्वाह चालवण्यासाठी ६,१५००० शिलिंग खर्च आला होता आणि आता प्रश्न फक्त एवढाच उरला होता की, मिळा-

लेली संपत्ती व्यवस्थित सांभाळायची आणि नवीन मिळविण्याचा प्रयत्न करायचा. कारण मायनरची ही कल्पना सतत वाढत राहिली पाहिजे. रेंगाळत ठेवून चालणार नाही.

इन्सब्रुकमधे कार्यालयाची जी व्यवस्था झाली होती त्यामुळे दानसंग्रहाचे काम सहज सोपे झाले होते. हे माझ्या पूर्वीच लक्षात आले होते. सर्व जिल्ह्यांतून काम वाढवण्याच्या ऐवजी मध्यवर्ती ठिकाणी ते मजबूत करणे जास्त महत्त्वाचे होते. ईन्स-ब्रुकमधील ऑफिस कार्यक्षम राहिले, तर सबंध ऑस्ट्रियात काम वाढणार होते. जिल्ह्याचे कार्यालय हे मदतरूप होऊ शकते. तिथे चतुर प्रतिनिधी असले तर त्या जिल्ह्यांतून बालग्रामची उभारणी त्यांच्या साहाय्याने होऊ शकते पण एकदा ते बाल-ग्राम उभे राहिल्यावर मग ह्या जिल्ह्याच्या कार्यालयाची गरज उरत नाही. कारण बाल-ग्राम हेच एक कार्यालय बनू शकते. पैसे जमविण्याची मायनरची जी कल्पना होती ती ह्या व्यवस्थेत बरोबर बसू शकत होती. त्याची पद्धती म्हणजे मित्र व हितचिंतक यांची संघटना मजबूत बांधून ठेवणे. सभासदांना आपण त्या बालग्रामचे एक घटक आहोत असे वाटले पाहिजे. त्यांच्या प्रत्येक देणगीबद्दल त्यांचे आभार मानायला हवेत आणि बालग्रामशी त्यांचा सतत संपर्क राहिला पाहिजे. त्यामुळे ह्या सभासदांच्या फाईल्स व्यवस्थित ठेवणे आवश्यक होते. प्रत्येक देणगी येईल तेव्हा त्याची व्यवस्थित नोंदणी व्हायला पाहिजे आणि दर ३ महिन्यांनी 'बालग्राम संदेश' सर्व वर्गणीदारांकडे पोचला पाहिजे.

हर्मन मायनरबद्दल सर्वजण तो व्होरालबर्गचा आहे याचा आवर्जून उल्लेख करा-यचे. हा उल्लेख सद्भावनेचा होता; पण त्यात थोडी खोच पण होती. कारण व्होराल-बर्गच्या सर्व मंडळींना व्यावहारिक, व्यापारी बुद्धी देवदत्त होती आणि मायनरच्या अंगी ती भरपूर होती. ज्या वेळी तो सामाजिक कार्यात होता तेव्हा त्याने आपले व्यवहारज्ञान इतक्या कौशल्याने वापरले होते की, त्या ज्ञानाच्या बळावर त्याने एखादा वस्त्रोद्योग सहजपणे हाताळला असता. त्याचे पाय नेहेमी जमिनीवर घट्ट रोवलेले असत. मग अपयश आले, किंवा प्रहार झाला, यश मिळाले किंवा सन्मान झाला तरी त्याची वृत्ती विचलित होत नसे. पर्वतारोहण करणाऱ्या एखाद्या पर्यटकाप्रमाणे त्याचे लक्ष सतत शिखराकडे लागलेले असायचे. तो प्रत्येक पाऊल विचार करून टाकत असे, आणि त्या गिर्यारोहण करणाऱ्याप्रमाणे तो कुठलाही अविचार करत नसे किंवा त्याला कशाचीही भीती वाटत नसे. त्याच्या डोळ्यांसमोर सतत विजय, त्याच्या कल्पनेचा विजय दिसत असे. थोड्या काळाने धुके विरून गेले आणि हवामान स्वच्छ झाले. समोरचे शिखर दिसू लागले. कल्पनेची भरारी मारली गेली आणि शिखर गाठणे सोपे झाले. पर्वतावर सोबत राहून आरोहण करणारे मित्र भेटले. त्यांनी



आधार दिला, शिड्या बांधल्या. त्यामुळे शिखर लवकर गाठता आले.

## उलरिशचे "Via Dolorosa"

मी लिंझला परत आलो आणि जेव्हा ऑफिसमधे गेलो तेव्हा एका वृद्ध स्त्रीला तेथे रडत असलेली पाहिली. मी तिला लगेच ओळखले. ती उलरिशची पणजी होती. ती आणखीच म्हातारी झाली होती. चेहेऱ्यावर जास्तीच सुरकुत्या आल्या होत्या. तिने माझ्याकडे बघितले आणि तिच्या डोळ्यांत भीषण दुःख सामावलेले मला दिसले.

काय झालं असावं ?

'उलरिश', ती अडखळत बोलली, पण हुंदक्यांमुळे पुढचा शब्द फुटेना. तिला थोडी शांत केल्यावर मग तिने सर्व हकीकत सांगितली. तो मुलगा आता त्या पालक कुटुंबात राहात नव्हता. ती जेव्हा त्याला भेटायला जायची, तेव्हा तिला तो अशक्त, घाबरलेला आणि दुःखी दिसायचा. पण तिने विचारल्यावर काही सांगायचा नाही. तिला वाटायचे, की आईच्या खुनाच्या त्या भयंकर धक्क्याने तो अजून अस्वस्थ असावा. एक दिवस तिने त्याच्या पाठीवर काळेनिळे वळ उठलेले पाहिले, आणि तिने समाजकल्याण खात्याकडे रिपोर्ट केला. चौकशी सुरू झाली. जे काही उजेडात आलं ते फार भयंकर होतं. उलरिश एका क्रूर मानसिक रुग्णाच्या हाती सापडला होता. त्या पालक आईने त्याला बेदम चोपून काढले होते आणि त्या मुलाच्या वेदना ऐकून तिला आनंदाच्या उकळ्या फुटत होत्या. आता तिला तुरुंगात टाकले होते, पण त्याचा उलरिशला काय फायदा त्या पालक कुटुंबात त्याचे शरीर व मन जबर जखमी झाले होते. त्याची फुफ्फुसे खराब झाली होती आणि त्याला त्वरित दवाखान्यात ठेवणे भाग होते.

त्या म्हातारीने नुकतेच ऐकले होते की, आम्ही लोक आता ओबेरोस्टराइश मध्ये पण एक बालग्राम बांधणार आहोत, म्हणून ती आम्हाला विचारायला आली होती की, उलरिश दवाखान्यातून सुटल्यावर आम्ही त्याला बालग्रामात घेऊ शकू का ? त्यामुळे त्याला एकदाची जीवनातली शांती मिळण्याचा संभव आहे.

ह्या लहान मुलाच्या करुणेच्या पोटीच मी बालग्रामकडे वळलो होतो, हे कबूल करायला हरकत नाही. आता पुन्हा त्याच मुलाच्या काळजीने मी बेचैन झालो. आता मी त्याला सोडणार नाही. मी स्वतः त्याच्या भवितव्याची काळजी घेणार, असे ठरवून मी तसे त्याच्या पणजीला आश्वासन दिले. समाधानाने तिची ती वाकलेली ठेंगणी मूर्ती दिसेनाशी झाली.

माझ्या कामाचे गांभीर्य या घटनेने आणखी वाढले. सर्व कामाच्या मुळाशी एक मानवी प्राणी होता. पोरका, वंचित मुलगा होता.जरी मला या एकट्या मुलाला वाचवता आले तरी माझ्या कामाचं सार्थक होणार होतं. अशा प्रकारे कितीतरी मुलांचे दुःखी जीवन हर्मन मायनरच्या उंबरठ्यावर येऊन ठेपलं होतं आणि त्यांना पुन्हा एकदा सुखी करण्यासाठी तो झटत होता. सदासर्वकाळ त्यांच्या दुःखाबद्दल बोलत राहाण्यापेक्षा काहीतरी पुनर्वसनाची रचनात्मक व्यवस्था करणे त्याला अधिक प्रिय होते.

कदाचित एक दिवस उलरिशला या जगाचा इतका तिटकारा आला असता की त्याने स्वतःला संपवून टाकले असते. मग अशा मुलाचा धिक्कार करण्याचा हक्क कुणाला मिळू शकला असता ? त्याला कुणीतरी सुधारसंस्थेत पाठवले असते, पण तोपर्यंत इतका उशीर झाला असता, की तो एक अट्टल गुन्हेगार बनला असता. आपण अशा मुलांना वेळेवर मदत करायला हवी आणि इतक्या थराला गोष्टी जाऊ देता कामा नयेत.

हॉस्पिटलमधे उलरिश मला अशक्त व कंटाळलेला दिसला. मी तिथल्या चांगल्या नर्सेसना भेटलो, आणि उलरिशला आनंदित, उत्साहित करा म्हणून त्यांची विनवणी केली. त्या खूप समजुतदार होत्या. तो लवकर बरा व्हावा, त्याचे शरीर व मन निरोगी राहावे म्हणून त्या झटून प्रयत्न करू लागल्या. मग आम्ही बालग्रामचे काम सुरू ठेवले. कारण या मुलाला एका शाश्वत जगात नेऊन सोडायचे होते.

## आणखी प्रगती !

त्या वेळेला आम्हाला कळून चुकले होते की, बालग्राम चालू ठेवण्याचा खर्च मोठा आहे आणि तो भागविण्याकरीता काहीतरी कायम स्वरूपाची योजना करून ठेवणे आवश्यक आहे ! संस्थेवर ही फारच मोठी जबाबदारी होती. आम्हाला आमचे मित्र पण ही धोक्याची सूचना देत होते. देणग्या जर एकदम बंद झाल्या तर कसं व्हायचं ? तेव्हा आपल्याकडे दोन बालग्रामे असतील. २०० ते ३०० मुले त्यात रहात असतील. त्यांना दररोज खायला काय घालायचं ? मग आपल्याला मातांना पण वेतन देता येणार नाही. सर्व गोष्टी एकदम थांबून जातील. मायनरने ह्या सर्वांचा विचार केला होता. त्याने उत्तर दिले. आपल्याला आणखी मित्र आणि आश्रयदाते मिळवले पाहिजेत. आपण ''प्रयत्नपूर्वक'' एक शिलिंग दरमहा देणाऱ्यांचे वर्तुळ वाढवलं पाहिजे. म्हणजे बालग्रामला आपद्कालात त्रास होणार नाही. मग आपले मित्र अशा



वेळी आनंदाने आणखी थोडा त्याग करून वर्गणी वाढवून देतील.

म्हणून पुन्हा एकदा एका नवीन युद्धाचा आराखडा तयार झाला. सर्व शाळांतून, प्रथम सभासद नोंदणीची मोहीम सुरू करायचे ठरले. मुलांनी मुलांसाठी काहीतरी केलेच पाहिजे. एक नवीन प्रचार वाक्य तयार झाले. 'तुमची अर्धी रोटी– एका बालकाची भूक मिटवी.' आम्ही शाळेतल्या मुलांकडून पैशाची मागणी केलीच नाही. आम्ही फक्त त्यांच्याकडून एकच अपेक्षा ठेवली होती की, त्यांनी बालग्रामचा प्रचार करून जास्तीत जास्त मित्र व आश्रयदाते आम्हाला मिळवून द्यावे. त्यासाठी आम्ही एक बक्षीस पण जाहीर केले होते आणि त्या मुलांच्या शाळांना पण हे बक्षीस दिले जाणार होते. बक्षीस म्हणजे शैक्षणिक साधने, चेंडू, सायकली आणि पुस्तके दिली जाणार होती. शिक्षकांनी पण खुशीने सहकार्य दिले. आमचं लिंझचं छोटसं ऑफिस ह्या कामाचं मुख्य केंद्र बनवलं होतं आणि लवकरच त्याला एखाद्या गुदामाचं रूप आलं.

याचा खूप चांगला परिणाम झाला. मुलांच्या प्रयत्नाने आम्हाला आणखी १,६०,००० नवीन सभासद मिळाले आणि त्यांनी दरमहा १ शिलिंग बालग्रामच्या मदतीसाठी द्यायचे कबूल केले. त्यांनी दिलेला १ शिलिंग म्हणजे त्यांना काहीच नव्हते. पण त्या पाठीमागची त्यांची जी त्यागाची भावना होती, ती आम्हाला अधिक महत्त्वाची वाटत होती. १ शिलिंग काही मोठी रक्कम नाही. प्रत्येकाजवळ शिलिंग असतो. पेन्शनर देखील तो देऊ शकतात. पण सभासद जो वेळ खर्चून पोस्ट ऑफिसात जात असत, रांगेत उभे राहून फॉर्म करून मनीऑर्डर करीत असत, ते श्रम आणि तो जवळ येऊ लागला आणि सर्व नव्या सभासदांना 'बालग्राम-संदेश' त्रैमासिकाचा अंक मिळाला. दररोज अंदाजे १०,००० मनीऑर्डर्स येत असत आणि याचाच अर्थ असा की, रोज १०,००० लोक आमच्या कामावरील आपला विश्वास व्यक्त करीत होते.

या सभासद मोहिमेबरोबर आम्ही आणखी एक प्रयत्न करून घराची किंमत देणारे देणगीदार मिळवले. हा पहिलाच प्रयत्न होता. बालसदनावर त्या देणगीदारांच्या नावाची पाटी लागणार होती. उत्तर ऑस्ट्रियातील फायरब्रिगेडने एक नवीन उदाहरण घालून दिले.

'मित्रांनो,' ओबेस्टोराइशच्या लोकायुक्ताने लोकांना हाक दिली. ''एखादे मूल जर आग लागलेल्या इमारतीत अडकले, किंवा पुरात वाहून जात असले तर आपण क्षणाचाही विचार न करता त्याला ओढून घेतो. अशा प्रकारे तुमच्या धैर्याची कसोटी लागत असते. आज आम्ही तुमच्याकडून एका वेगळ्या देणगीची अपेक्षा करीत आहोत. तुम्ही ओबेस्टोराइशमध्ये नव्याने बांधल्या जात असलेल्या एका बाल-

सदनाच्या बांधकामाच्या खर्चाची देणगी आम्हाला द्या. ह्या घरामधे ९ अनाथ मुलांना निवारा मिळेल आणि त्या घराला आपण संतपुरुषाचे नाव देऊ. मित्रांनो, बक्षिसांचे आमिष किंवा गोड शब्दांची उधळण तुम्हाला मोहात पाडणार नाही. कारण तुम्हाला त्यागाची आणि चांगुलपणाची उत्तम पारख आहे. याची जाणीव आम्हाला आहे. कारण तुमचा व्यवहार तसा आहे आणि आम्हाला एवढे पुरेसे आहे.''

त्या बालसदनासाठी पैसे जमले. लवकर इतर बालसदने पण देणगी स्वरूपात मिळाली. इथे पण सत्कृत्यांचा जणू महापूर आला आणि नवीन प्रथेला सुरुवात झाली. कारण यानंतर बालग्रामची सर्व सदने अशा तऱ्हेच्या देणग्यांतून उभी राहिली. मित्र व आश्रयदाते यांच्याकडून ज्या देणग्या मिळत असत, त्यांचा विनियोग बालग्रामच्या दैनंदिन खर्चासाठी, तरुण मुलांच्या नवीन वसतिगृहे बांधण्यासाठी आणि त्यांना व्याव सायिक शिक्षण देण्यासाठी होऊ लागला.

ईम्स्टमधील बालग्रामला व्हिएन्नाच्या रोटरी क्लबने एक बालसदन बांधून दिले. एका गावातील एका महिलेने मृत्युपत्र करून तिची सर्व मालमत्ता ईम्स्टच्या बालग्रामला दान देऊन टाकली. तिने आयुष्यभरची कमाई अनाथ मुलांना वाटून टाकली. आणखी एका सिमेंट कंपनीने सिमेंटची देणगी एका घरापुरती दिली. ज्युनियर रेड क्रॉस संस्थेने देणगी जमवून स्वतःच्या नावाने एक घर बांधून दिले. ओबेस्टोराइशने २,५०,००० शिलिंग्ज जमवून त्यांच्या नावाने घर बांधून देण्याचे ठरविले. जेनबॅक (Jenbach Wards) कंपनीने त्यांची डीझेलची गाडी ऑस्ट्रियातील सर्व जत्रांमधून फिरवली आणि ईम्स्टमधील बालग्राममधे जेनबॅक कंपनीच्या नावाने घर बांधले गेले. टिरोलच्या कंपन्यांना पण त्यामुळे प्रेरणा मिळाली. ऑस्ट्रियन सेव्हिंग्ज बँकेने एका घराचा खर्च देण्याचे ठरविले आणि त्यासाठी आपल्या सभासदांकडून वर्गणी गोळा केली. हे सर्व महिने खूपच आनंदाचे आणि उत्साहाचे होते. हे सर्व आपोआप घडत नाही याची आम्हाला पक्की जाणीव होती आणि म्हणूनच मदतरूप होण्यासाठी म्हणून आम्ही नियमितपणे व्याख्याने देणे, विनंती-पत्रे पाठविणे, आणि नवनवीन संपर्क साधणे ही कामे करीत होतो. कारण मुख्य काम लोकांचा उत्साह टिकवणे हेच होते. हर्मन मायनर सुरुवातीचे बोलणे करीत असे. कारण त्याच्या आदरणीय स्वभावामुळे लोकांना नाही म्हणणे कठीण जात असे. यापूर्वी तो मोठमोठ्या कंपन्यांच्या दारात गेला होता. पण संचालकांनी त्याला पाहून आपल्या ऑफिसची मजबूत दारे बंद करून घेतली होती. तेच लोक आता तीच दारे खुशीने उघडून त्याला आत बोलवू लागले होते. हा मनुष्य निश्चयी होता आणि त्याच्या डोळ्यांपुढे एकच संकल्प होता. निराधार, अनाथ मुलांना मदत करणे. त्याच्या संकल्पाला पुष्टी मिळाली आणि लोक त्याला सहकार्य करू लागले.



अर्थातच स्वाभाविकपणे थोडी माघार, थोडा विरोध, अपमान व दारे बंद हा प्रकार अधूनमधून होतच असे. पण मायनरला त्याची सवय होती. जुन्या अनुभवाने तो शहाणा झाला होता आणि इतक्या सहजपणे तो बंद दार पाहून परत येणारा नव्हता. दार बंद झाले तरी आपला हेतू साध्य करण्यासाठी नव्या नव्या युक्त्या शोधून काढत असे आणि या मोठ्या लोकांपर्यंत पोचत असे. एका उद्योगपतीने, जो माझ्या परिचयाचा होता, मला त्याच्याविषयी एकदा थोडक्यात सांगितले होते.

'तो त्रासदायक आहे, पण आवडेल असा पण आहे.'

दुसरा एकजण म्हणाला होता, 'हा तुझा मायनर आणि त्याचे ते बालग्राम- आता कुणाला सुखाची झोप घेऊन देत नाही. प्रत्येकाने त्याच्यासाठी काहीतरी करायलाच पाहिजे.'

होय. त्याने लोकांना बेचैन बनवले. लहान लोकांना पण आणि मोठ्या लोकांना पण. जेव्हा 'बालग्राम संदेश' एखाद्या अर्धवेळ काम करणाऱ्या कामगारांच्या हाती पडत असे तेव्हा त्यातील अर्जाचा नमुना फाडून घेऊन त्यावर सही करून पाठवल्याशिवाय त्याला चैन पडत नसे आणि एखाद्या मोठ्या उद्योग कंपनीच्या अध्यक्षांना ती वाचायला मिळत असे, तेव्हा त्यांना पण तो अर्ज तत्परतेने भरून पाठवावासा वाटत असे. दोघे देणगी पाठवून देत. एकजण १ शिलिंग पाठवायचा तर दुसरा २५,००० पाठवून द्यायचा आणि त्या दोघांचे आभार मायनर तितक्याच मनःपूर्वकपणे मानायचा. वृद्ध पेन्शनरने पाठविलेला एक शिलिंग आणि उद्योगपतीने पाठवलेले नोटांचे बंडल त्याला सारखेच महत्त्वाचे वाटायचे. आजपावेतो त्याने कधीही त्या एक शिलिंगाला कमी लेखलेले नाही. तो नेहमी म्हणतो, ''माझे सर्व काम छोट्या लोकांच्या शिलिंगांच्या देणगीतून उभे राहिले आहे. तो फार मोठा आधारस्तंभ आहे. माझ्यावर कितीही मोठे संकट आले तरी मी या आधाराने ते पार करू शकेन.''

लोकांना मायनरच्या ह्या वृत्तीची ओळख होती. त्यांना ही पण खात्री होती की त्यांनी दिलेला शिलिंग हा सत्कारणी खर्च होणार होता. तो नेहमी व्यवस्थित व चोख हिशोब देत असे. कुठेही अफरातफर नव्हती. प्रत्येक शिलिंग एक वीट बनून त्या बालग्रामची भिंत उभी करत होता. याची सर्व लोकांना खात्री पटलेली होती.

हजारोंच्या संख्येने लोक ईम्स्टमधल्या बालग्रामात येत असत. त्यांना हिंडवीत असताना तो म्हणायचा, ''हे बालग्राम तुमचं आहे.'' तुमच्या शिलिंगांनी ह्याचं बांधकाम झालं आहे. हे बालग्राम म्हणजे शेजाऱ्याच्या खऱ्या प्रेमाची साक्ष आहे. सर्व ऑस्ट्रियातील लोकांनी दिलेला एकत्रित पाठिंबा आहे. ज्या लोकांनी मदत केली त्यांनी कुठलेही राजकारण किंवा वर्गभेद यात आणलेला नाही. सर्व एकमेकांचे सच्चे बांधव

बनले आणि त्यांनी हे बालग्राम बांधून दिले."

## पहिला शासकीय सन्मान

सुरुवातीच्या ह्या संक्रमण कालात २ महत्त्वाच्या घटना घडल्या. आयुष्यातला पहिला जाहीर सत्कार हर्मन मायनरने स्वीकारला. त्याने तो मिळावा म्हणून कधीच अपेक्षा ठेवली नव्हती. तो लढवय्या होता पण त्याच्या युद्धाच्या विजयाची गाणी अजून कुणी गायली नव्हती. पण त्याला मनसोक्त आनंद मुलांच्या हसऱ्या डोळ्यांनी मिळवून दिला होता. बालग्रामच्या मुलांच्यात त्याचे विश्व सामावले होते आणि त्यांच्या ह्या विश्वात त्याला त्याच्या त्यागाचा भरपूर मोबदला मिळत होता.

इन्सब्रुक येथील विद्यापीठाने त्याला त्याच्या कामाची प्रशंसा करून डॉक्टरेटची पदवी बहाल केली होती. विद्यापीठाच्या त्या महत्त्वाच्या व्यासपीठावर तो सन्मान-पूर्वक बसलेला होता, आणि त्याच्या मनातल्या सुप्त भावना उफाळून वर येत होत्या. खूप वर्षांपूर्वी त्याने विद्यापीठ सोडले होते. अभ्यासाला रामराम ठोकला होता. आणि तो बालग्रामच्या योजनेच्या मागे लागला होता. पण हे सर्व करताना त्याचे बालपणचे जे स्वप्न होते, ते विरून गेले होते. आत्तापर्यंत जर त्याने नेटाने अभ्यास केला असता तर आज याच हॉलमधे याच व्यासपीठावरून त्याला वैद्यकीय डॉक्टरची पदवी मिळाली असती. पण त्याने वैद्यकीय शास्त्राचा अभ्यास सोडून दिला होता. वंचित आणि दुःखी मुलांसाठी त्याने शिक्षण अर्धवट सोडले होते. त्याने हा निर्णय घेतला होता, तेव्हापासूनच तो निर्णय योग्य असल्याची त्याची खात्री होती. पण त्याच्या अंतःकरणात खोलवर रुतलेली ती वेदना तो विसरू शकत नव्हता. अभ्यास सोडल्या-बद्दल नेहमी त्याला अतिशय वाईट वाटत असे. इतक्यात व्यासपीठावरील सर्व प्रोफे-सर्स उठून उभे राहिले, आणि मायनरला दिलेले मानपत्र रेक्टर वाचू लागले. मायनर ते शब्द ऐकत होता :

"हर्मन मायनरची बालग्रामची जी कल्पना आहे, त्याने हजारो लाखो लोकांचे लक्ष वेधून घेतले आहे आणि त्यांना दानाची प्रेरणा मिळाली आहे. त्यांना सुस्थितीत जन्माला घातल्याबद्दल त्यांनी त्या परमेश्वराचे आभार मानून त्याच्या कामाला त्याग-पूर्वक मदत केली आहे आणि त्यांच्या ह्या त्यागामुळे आपणा सर्वांच्या अंतःकरणा-तील चांगुलपणाची भावना जागृत केली आहे."

ह्या समारंभ झाल्यावर थोडेच दिवसांनी मायनरला दुसरा सन्मान मिळाला. ह्या वेळी व्होरालबर्ग मधील शेतकऱ्याच्या ह्या मुलाला शासनाच्या वतीने शहराच्या प्रमुख



ऐतिहासिक हॉलमधे बोलावून देशाची सेवा केल्याबद्दल चांदीचे गौरव पदक देऊन त्याचा सन्मान करण्यात आला. त्याच्या विषयी काढलेले उद्‌गार प्रामाणिक होते. मंत्री महाशय मानमत्र वाचीत होते,

"हर्मन मायनर, आज तुमचे स्वागत इथे करण्याचा बहुमान मला मिळाला आहे असे मी मानतो. हा महत्त्वाचा सन्मान समारंभ आहे आणि या महत्त्वपूर्ण प्रसंगी अध्यक्षांनी तुम्हाला हा बहुमान देऊन तुमचा सत्कार करण्याचे जबाबदारीचे काम माझ्यावर सोपवले आहे. अध्यक्षांनी हा बहुमान तुम्हाला देण्याचे ठरवल्यावर ते काम करण्यास शासनाच्या शिक्षण मंत्रालयाची निवड केली आहे, म्हणून मंत्रालयालाही हा बहुमान वाटतो. हा सन्मान म्हणजे ह्या कामाचा आणि काम करीत असलेल्या सर्व व्यक्तींचा सन्मान आहे. पण तुम्ही हे प्रचंड काम उभे केले म्हणून तुमचा व्यक्तिशः गौरव आम्ही करीत आहोत. हर्मन मायनर, तुमचा जन्म एका मोठ्या परिवारात अनेक मुले असलेल्या कुटुंबात झाला आहे. अशा कुटुंबाचे तोटे तुम्हाला माहिती आहेत, त्याचप्रमाणे अशा कुटुंबाचे फायदे पण तुमच्या परिचयाचे आहेत. युद्धकालीन कठीण परिस्थितीतून तुम्ही गेलेले आहात. अनेक कष्ट तुम्ही सोसले आहेत. एखाद्या कुटुंबात प्रथम पिता जातो, नंतर माता पण राहत नाही. अशा मुलांची करुण परि-स्थिती तुम्ही प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेली आहे. युद्धाचा दीर्घकाळ अनुभव-घेऊन परत आल्यावर तुम्ही तांत्रिक पेशा स्वीकारला नाहीत. त्या ऐवजी हे बालग्रामचे काम सुरू केलेत. एक मोठा साहसी प्रयोग तुम्ही केलात आणि मानवतेच्या नाजूक आणि मह-त्त्वाच्या तंतूला तुम्ही मजबूत बनविलेत, आणि तो मजबूत बनत असताना भौतिक गोष्टींची पण तुम्ही व्यावहारिकतेने जुळवाजुळव केलीत. मी स्वतःच्या डोळ्यांनी तुम्ही मिळविलेले यश पाहिले आहे. मला हे पण ठाऊक आहे की, तुम्ही स्वस्थ बसणारे नाहीत आणि तुमचे हे काम अद्याप झालेले नाही आणि तसे ते संपणारही नाही. तुमच्यासारख्या माणसांची सद्सद्विवेकबुद्धी सतत जागृत असते आणि ती तुम्हाला अशी कामे करायला प्रवृत्त करीत असते. असं काम हाती घेतल्यावर परिस्थितीजन्य अडचणी आणि न टाळता येणारा विरोध हा होणारच पण अशा परिस्थितीवरदेखील तुम्ही तुमच्या चिकाटीने व धैर्याने विजय मिळविला आहात.

संपूर्ण जीवितकार्य म्हणण्याइतकं तुमचं वय नाही, पण देशाकडून तुमचा हा सन्मान तुमचा सामना चालू असतानाच मिळाला आहे. जेव्हा स्वरक्षणासाठी युद्ध खेळले जाते आणि त्या मोठ्या युद्धात लढणाऱ्या सैनिकाला मोठे मानचिन्ह दिले जाते तशाच प्रकारचे हे मानचिन्ह मी आज तुम्हांला प्रदान करीत आहे. मुलांसाठी तुम्ही सुरू केलेले हे युद्ध अजून सुरूच आहे. आपल्या सर्वांत महत्त्वाच्या संपत्तीसाठी मुलां-साठी हे युद्ध आहे. त्या मुलांना तुम्ही एक आखीव रेखीव प्रकारचे जीवन मिळवून

दिले आहे. इतकेच नव्हे तर मायेचा पाखर असलेले एक घर पण तुम्ही त्यांना दिले आहे. ह्या घरात ती मुले मोठी होतील आणि आपण अपेक्षा केल्याप्रमाणे परिपूर्ण जीवनामध्ये त्याची परिणती होईल. तुमच्या पुढील कामात मी तुम्हाला सुयश इच्छितो.''

मंत्र्यांच्या या निवेदनावर काय उत्तर द्यावे ते मायनरला सुचेना. ते चांदीचे पदक असलेली पेटी हातात धरून त्याने बोलायला सुरुवात केली व एका मुलाची कहाणी सांगितली.

''एकदा गुस्टल नावाच्या आमच्या एका मुलाने आपल्या क्लाऊस नावाच्या मित्राला एक पत्र पाठवले. गुस्टल खूप दिवस एका सुधारगृहात राहत होता आणि क्लाऊस पण आता त्याच सुधारगृहात उनाड मुलांसोबत रहात होता. ती रविवारची दुपार होती आणि आकाश निळसर व निरभ्र होते. सूर्य मित्र बनून बाहेर पडला होता आणि बालग्रामला स्वतःच्या किरणांनी प्रकाशित करीत होता. गुस्टलचे पत्र अजून लिहून पुरे झाले नव्हते तेवढ्यात शेजारच्या घरातील मुलांनी त्याला खिडकीतून हाक मारली. गुस्टलला पत्रलेखनाची विशेष गोडी नव्हतीच म्हणून पत्र तसेच अर्धवट टाकून शेजारच्या मुलांच्या हाकेला बळी पडून बाहेर पडला व खेळायला गेला. पत्र तिथेच पडून होते. गुस्टलची बालमाता सहज तिथे आली आणि तिने ते पत्र पाहिले. त्या वेड्यावाकड्या लिहिलेल्या ओळी ती वाचू लागली. ''प्रिय मित्र क्लाऊस, मी खुशाल आहे. इथे आम्ही इतर सर्वसाधारण लोकांप्रमाणे राहतो.''

मी नेहमी ह्या लहानशा प्रसंगाचा विचार करीत असतो. मला पुनःपुन्हा लोक विचारतात, ''हर्मन मायनर, आम्हाला सांगा तरी तुमच्या या बालग्रामच्या शिक्षण-पद्धतीत विशेष तत्त्वे कोणती आहेत ?''

मला वाटते की गुस्टलच्या त्या २ ओळींच्या पत्रात ह्या प्रश्नाचे उत्तर आहे. आणि ते अगदी सोपे आणि सर्वोत्तम आहे. आमची मुले पुन्हा एकदा सर्वसाधारण लोकांप्रमाणे जगू लागतील.

बालग्रामचे जे प्रशिक्षण आहे त्याच्या यशाला कोणतीच विशिष्ट पद्धती कारणीभूत नाही. आमची ही मुले दुसऱ्या एखाद्या चांगल्या कुटुंबातील मुलांप्रमाणे राहतात. फरक इतकाच आहे की, ज्या बाईने त्यांना आपलेसे करून घेऊन त्यांच्यासाठी एका घराची निर्मिती केली आहे व त्या मुलांना घेऊन ती कनवाळू बाई राहत आहे तिलाच ही मुले 'आई' म्हणून हाक मारतात. ती त्यांची खरी आई नाही पण तरीदेखील ते तिला आईच्या ठिकाणी मानून तिच्यावर प्रेम करतात. आपल्याला आता शेवटी डोक्यातून ही कल्पना काढून टाकायला हवी की ज्या मुलाला आई-



वडील नसतात त्याला विशिष्ट पद्धतीने वाढवावे लागते. खरं तर ज्या मुलांना आई-बाप नसतात किंवा ज्या मुलांना आईबापांनी टाकून दिलेले असते त्यांना सर्वात अधिक ओढ कुटुंबातल्या आधाराची असते. प्रत्येक सर्वसाधारण मुलाचा हा जन्म-जात हक्क आहे. हा हक्क त्याला मिळवून देण्यासाठी त्या गरीब निराधार मुलांना बालग्रामची ही योजना मदत करीत आहे. ही गोष्ट नाकबूल करता येणार नाही की ही आईबाप-विरहित मुले बहुधा खूप विचित्र स्वभावाची असतात. पण त्यांना शिक्षण देताना शिक्षकांना ज्या अडचणी येतात त्यांचे मूळ दुसरीकडे असतं. आईबापांचा मृत्यू किंवा त्यांचे अपयश मुलांच्या नैसर्गिक जीवनाची चिरफाड करून त्यांना त्यांच्या सरळ मार्गापासून परावृत्त करीत असतात. त्यांचं आध्यात्मिक जीवन संपवून टाकतात.

''इतरांप्रमाणे मी राहतो'' हे त्या मुलाचे म्हणणे म्हणजे तो कुटुंबात आहे हे सांगणं असतं. दुसऱ्या कुठल्याही वातावरणात मूल नीट वाढू शकणार नाही व त्याची उन्नती होणार नाही. बालग्राममधे आलेल्या बहुतेक सर्व मुलांची ही हकीगत आहे.

आणि म्हणूनच मी काही जास्ती केले आहे असे मला वाटत नाही. फक्त या जगात राहण्याच्या दृष्टीने मी मुलांची तयारी करतो आहे. माझ्या सर्व मित्रांनी मला हे काम करायला मदत केली आहे, म्हणून मी ह्या मानचिन्हाचा स्वीकार माझ्या सर्व मित्रांच्या नावाने करतो आणि तो दिल्याबद्दल आपले मनःपूर्वक आभार मानतो. भविष्यकाळात त्यामुळे आम्हाला अधिक प्रेरणा मिळेल.''

नंतर आम्ही सर्वजण एका व्हिएन्नाच्या कॉफीहाऊसमधे बसून गप्पा करीत होतो. चांगुलपणासाठी जी लढाई चालू होती, त्या लढाईत एक छोटासा तह झाल्याचा आनंद आम्ही उपभोगीत होतो. पहिला प्रवेश यशस्वी झाला होता. हर्मन मायनरकडे सर्वांचे लक्ष गेले होते. आता त्याची उपेक्षा होण्याची संभावना नव्हती. लवकरच त्याच करुणामय कल्पनेचा अविष्कार संपूर्ण जगभर होणार होता !

❑

## कल्पनेचा जर्मनीवर प्रभाव !

१९५५-५६ साली हर्मन मायनरची बालग्रामची कल्पना ऑस्ट्रिया देशाच्या चतु:सीमा ओलांडून प्रथमच बाहेर पडली. जगातल्या अनेक देशांत या नवीन कल्पनेचे हार्दिक स्वागत झाले आणि लोक जुन्या समाजकल्याण शिक्षणाच्या पद्धती बदलण्याचा विचार करू लागले. हर्मन मायनरने नवीन सामाजिक सुधारणांची जी लाट समाजात आणली होती ती थांबली नाही. अर्थात सुरुवातीस जो विरोध ऑस्ट्रियात झाला होता, तोच विरोध आता इतर देशांत पण सुरुवातीच्या काळात होऊ लागला होता. पण हा असा होणारच हे कुणालाही समजू शकेल. शासन-व्यवस्थेने समाजकल्याणाचे काम स्वत:कडे घेणे ही एक महत्त्वाची लोकशाही अनुरूप अशी गोष्ट खासच होती. पण त्यामुळे सर्व पद्धती अधिक गुंतागुंतीची झाली. जुन्या वळणाची कामे लगेच नव्या रूपाने करणे अवघड होते. एक खाजगी स्वरूपाची समाजकल्याण संस्था म्हणून बालग्राम व्यवस्था पुढे येऊ पाहात होती. पण त्याच्यापुढीलदेखील सर्व अडचणी अजून सुटल्या नव्हत्या. हर्मन मायनरची कल्पना समाज-मानसात रुजायला अजून कित्येक वर्षे लागली असती. कारण शासकीय संस्थांची अनाथ मुलांना सांभाळायची जी परंपरागत पद्धत होती, ती बदलून त्यांना ही नवी पद्धत सुरू करण्यास मोठे मनोधैर्य लागणार होते. कारण जुनी वाट मळलेली होती आणि ती सोडणे कठीण होते. तरीदेखील प्रत्येक ठिकाणी विचारांचा समझोता सुरू झाला होता. सध्याच्या असलेल्या संस्था जरा सैल करून, अनाथ मुलांचे लहान गट करून त्यांचे कुटुंब बनवून त्यांची वाढ करणे ह्यासारखे उपाय योजलेले दिसत असले तरी पण प्रचलित संस्थापद्धतीपासून घाबरत दूर टाकलेले ते पाऊल होते. शासकीय बाल कल्याण व्यवस्थेत मुलाला अलग ठेवले जात होते. पण मायनरने हे जाहीर केले होते की अनाथ मुलांची उत्तम वाढ त्यांच्या सामाजिक अभिसरणामुळेच नीट होऊ शकते. मुलांसाठी काही संस्था किंवा निवासस्थाने ही समाजात ठेवावीच लागतील पण अशा संस्थांतून फक्त आजारी किंवा बिघडलेली मुले यांनाच ठेवण्याची गरज भासेल. कारण त्यांना विशिष्ट पद्धतीने केलेल्या उपचारांची जरुरी असेल पण जी मुले शारीरिक व



मानसिकदृष्ट्या पूर्ण निरोगी आहेत त्यांना सामाजिक प्रवाहात नेऊन सोडणे इष्ट आहे असे मायनरचे सांगणे होते. १९५४ मधे जर्मनीहून युर्गेन फ्रयोलिश (Jurgen Froelich) नावाचे तरुण गृहस्थ आले. त्यांचे मुख्य शहर जरी हॅमबर्ग होते तरी दुसऱ्या महायुद्धात ते दीर्घकालपर्यंत ऑस्ट्रियातील मिलीटरी हॉस्पिटलमध्ये आजारी म्हणून राहिले होते. त्यामुळे त्यांचे मन नेहमी ऑस्ट्रियात असे. एक दिवस ऑस्ट्रियाबद्दल वर्तमानपत्रात आलेल्या बातमीने त्याचे लक्ष वेधून घेतले. ईम्स्टमधील बालग्रामविषयी ती बातमी होती. बालग्रामच्या त्या नवीन कल्पनेने त्यांचे चित्त वेधून घेतले आणि एक दिवशी ते प्रत्यक्ष ईम्स्टला पोचले. त्यांनी ती मुलांची घरे पाहिली, मातांना व मुलांना पाहिले आणि बालग्राममधे अनाथ मुलांना मिळालेले नैसर्गिक व आनंदी जीवन पाहून त्यांना आनंद वाटला. नंतर ते हर्मन मायनरला भेटले आणि ही योजना जर्मनीला कशी नेता येईल याबद्दल त्यांचे चिंतन सुरू झाले.

साधारण त्याच वेळी (Munchen)चे डॉ. पीटर हेकर हे पण संयोगाने ईम्स्टला आले. त्यांच्या मनावरदेखील ह्या बालग्राम योजनेचा खूप परिणाम झाला. त्यांनी हर्मन मायनरला सांगून टाकले की जर अशा तऱ्हेचे एक बालग्राम आधुनिक समाज कल्याणाचा एक उत्तम नमुना म्हणून कधी जर्मनीत बांधायचे ठरले, तर ते त्याला सर्वस्वी मदत करतील.

ह्या योजनेचा ध्यास घेतलेल्या मायनरला येत असलेल्या प्रत्येक संधीचा उत्तम लाभ करून घेणे जमलेले होते. म्हणून त्याने लाण्डसट हेकर व युर्गन फ्रॉलिग या दोघांना तर बोलावून घेतलेच पण त्यांच्यासोबत त्याच्या दोन युद्धकालीन जर्मन मित्रांना पण आमंत्रित केले. इझारच्या किनाऱ्यावर झालेल्या या मीटिंगमधे मी पण उपस्थित होतो. तिथल्या स्थानिक संस्थेच्या अधिकाऱ्यांच्या ऑफिसमधे ही मीटिंग झाली आणि त्या मीटिंगमधे जर्मनीतील बालग्राम संस्था निर्माण झाली. जर्मनीच्या फेडरल रिपब्लिकमधे बालग्राम योजनेचा प्रसार करण्याचे या संस्थेने निश्चित केले. डॉ. हेकर यांनी या संस्थेचा पहिला अध्यक्ष म्हणून काम करण्याचे आनंदाने मान्य केले.

पण जर्मनीत हे बालग्राम केव्हा व कधी सुरू होईल याची कल्पना कुणालाच येत नव्हती. डॉ. हेकरच्या भोवती काही मंडळी जमा झाली होती. पण ते सर्व लोक निर्धन होते. ऑस्ट्रियात जी किमया घडली, ती जर्मनीत घडेल किंवा नाही याची सतत चिंता डॉ. हेकरना वाटू लागली होती.

परंतु मायनर त्यांच्याशी सहमत झाला नाही. मला अगदी नक्की ह्याच्या उलट वाटते. इथे पण आपल्याला दयाळू अंत:करणाची माणसे भेटतील. कारण सर्वांनाच

ह्या गरीब मुलांविषयी आपोआप प्रेम वाटते."

डॉ. हेकरने जे मान्य केले होते ते त्याने शब्दाबरहुकूम पाळले. जरी विरोध झाला तरी तो मागे हटला नाही. संस्थेच्या सुरुवातीच्या कठीण काळात, अध्यक्ष या नात्याने १९७२पर्यंत त्याने पराकाष्ठेचे प्रयत्न केले. त्यामुळे त्या संस्थेला जर्मनीतल्या कुठल्याही सामाजिक संस्थेला मिळाला नसेल इतका विश्वास बसणार नाही इतके यश मिळाले. अपरंपार असे यश त्याने मिळवून दिले आणि जेव्हा ह्या कामाची धुरा त्याने त्याच्यामागून येणाऱ्या अध्यक्षाला दिली. तेव्हा (Schleswig- Holstein)पासून बव्हेरियापर्यंत एकूण १२ बालग्रामे उभी झाली होती आणि १० लाखांहून अधिक वर्गणीदार सभासद झाले होते.

हर्मन मायनरच्या कल्पनाशक्तीचा विलासदेखील इतकी उंच उडी मारू शकला नव्हता. ज्यावेळी मुंचैन येथे संस्थेची स्थापना झाली त्यावेळी हे त्याला निश्चितपणे वाटले होते की, जर्मनीतल्या अनाथ मुलांच्या पुनर्वसनासाठी जर्मनीत एकाहून अधिक बालग्रामे उभारून मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था करावी लागेल.

पण जर्मनीतील सुरुवात कष्टाची होती. युर्गेन हॅंबुर्गवरून म्यून्शेनला राहायला गेला होता. तिथे राहून, टिरोलच्या बालग्रामाशी सतत संपर्क ठेवून काम करण्याचा त्याचा विचार होता. त्याने एक भाड्याची जागा घेऊन तिथे आपले ऑफिस सुरू केले आणि त्या ऑफिसच्या आवश्यक वस्तूंच्या खरेदीसाठी स्वतःची शिल्लक मोडून त्याने वापरली होती. इन्सब्रुकमध्ये पहिल्या पत्रकांची छपाई झाली होती. म्यूनुशेन येथील समाजकल्याणाच्या बाजारपेठेत जर्गनने ती पत्रके मोठ्या आशेने वाटून टाकली. पण त्याला चांगला प्रतिसाद मिळाला नाही. नंतरचे प्रयत्नदेखील असेच निष्फळ ठरले.

नवीन जर्मनीचा उदय होत होता. दुसऱ्या महायुद्धाच्या भग्न अवशेषांतून नवे राष्ट्र अति जलद गतीने वर येऊ पाहात होते. त्यामुळे बालग्राम बांधू इच्छिणाऱ्या ह्या थोड्या वेडपट माणसांची हाक त्यांचे कानांवर पडत नव्हती. कारखाने निर्माण करायचे होते. घरे बांधून काढण्याची पण मोठी गरज होती. नवीन रस्ते हवे होते आणि नवीन रेल्वेचे जाळे पण पसरायचे होते. प्रत्येक माणूस अजूनदेखील स्वतःचे अस्तित्वात झगडत होता. प्रत्येकाला शिखरावर जाण्याची इच्छा होती. जर्मनीची आश्चर्यजनक अर्थव्यवस्था नुकतीच कुठे गतिमान होत होती. पुनर्बांधणीच्या गोल गोल फिरणाऱ्या ह्या महान भोवऱ्यात साहजिकच कमी महत्त्वाच्या वाटणाऱ्या या समाजकल्याणाच्या प्रयोगाकडे लक्ष द्यायला कुणालाच वेळ नव्हता. पूर्व जर्मनीतून अनेक समस्या होत्या. त्यापुढे अनाथ मुलांसाठी असलेली अनाथालये बंद करून त्याऐवजी ही बालग्रामची नवीन समस्या कशाला उभी करायची असे साहजिकच सर्वांना वाटत



होते.

ही नवीन संस्था जसजसा बालग्रामचा प्रचार करू लागली तसतसा विरोध वाढू लागला. प्रस्थापित असलेल्या संस्थांनी विरोधाची मोहीम उघडली आणि विशेष करून ही नवीन कल्पना ऑस्ट्रियातून आयात केली असल्यामुळे विरोध जास्तीच तीव्र होऊ लागला. एक दिवस बालग्राम संस्था व युर्गेनवर बंधन घालून त्यांचे काम थांबविले गेले. त्यांचे बँकेचे खाते गोठविले आणि रोख ३२ मार्कस् होते ते पण जप्त केले गेले. युर्गेन फ्रोलिश आणि त्याच्या थोड्या जवळच्या मित्रांनी सतत २ वर्षे केलेली मेहनत वाया गेली. एके ठिकाणी त्यांना बालग्रामासाठी जमीन पण मिळाली होती आणि त्यावर अर्धवट बांधकाम झालेली काही घरे पण उभी होती. पण आता सर्वच गोष्टी एकदम थांबल्या व कामाला पूर्णविराम मिळाला. ज्या काही हजार लोकांनी वर्गणी देऊन आपला सक्रिय पाठिंबा व्यक्त केला होता, ते पण ह्या संकटाशी सामना करायला अपुरे पडले.

पण युर्गेन आणि त्याचे मित्र निराश झाले नाहीत. त्यांची खात्री होती की मायनरला जे यश ऑस्ट्रियात मिळाले, ते यश जर्मनीत पण मिळाल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा माघार न घेता त्यांनी आणखी कष्टाने काम सुरू ठेवले. डॉ. हेकरने पण धैर्य सोडले नव्हते. तो मधे पडला आणि सोसायटीच्या कामाची हमी त्याने स्वतःवर घेतली. त्याने सर्व टीकेच्या प्रहारांना व उलट्यासुलट्या प्रश्नांना समर्पक उत्तरे दिली. अखेरीस ह्या निश्चयी वृत्तीला फळ आले आणि हळूहळू परिस्थिती सुधारू लागली. बर्फाचा ढग एक दिवस वितळू लागला आणि जर्मनीत पण ह्या बालग्रामच्या योजनेने सर्वांचे लक्ष वेधून घेतले.

## अधिकाधिक कार्यकर्ते

बालग्रामची योजना खूप लोकप्रिय होऊ लागली होती आणि त्यामुळे 'बालग्रामसंदेश' या त्रैमासिकाचे बळ पण खूप वाढत होते. त्याची पाने वाढवून बालग्रामची सविस्तर माहिती त्यात द्यावी आणि बालग्रामच्या जर्मन भाषिक सर्व मित्रांना ते पाठवावे असे म्हटले. त्यामुळे हर्मन मायनरच्या विचारांचे ते प्रमुख मुखपत्र बनले. १९५३ मध्ये मायनरने आपला एक विद्यार्थी मित्र– अलबर्ट क्योलर याला आपल्या या पत्रिकेसाठी हेरून टेवले होते. अलबर्ट एका लोकप्रिय दर्जेदार सांस्कृतिक मासिकाचा संपादक होता, आणि म्हणून त्याने हे काम करावे असे मायनरने ठरवले होते. फीटझ् हेडरने ईम्समधील बालग्रामची सर्व मुख्य सूत्रे सांभाळली होती आणि त्यामुळे

मायनरला त्या जबाबदारीतून मुक्त केले होते. आता मायनरला अनेक विविध कामांना गवसणी घालायला वेळ होता. ह्या वेळात अलबर्ट क्योलरने बालग्राम संदेशाची घडी व्यवस्थित बसवून टाकली होती. इतकेच नव्हे तर त्याने त्या मासिकातून बालग्रामच्या तत्वप्रणालीचा चांगला प्रचार केला होता. हे करत असताना त्याने बालग्रामची एक प्रकाशन समिती तयार केली व तिचा मजबूत असा पाया घातला. पुष्कळ वर्षांपूर्वी मायनरने ह्या प्रकाशन समितीसाठी परवाना काढलेला होता. त्यामुळे त्यामार्फत त्याला ईस्टर व नाताळच्या दिवसांची भेटकार्डे पाठविणे, कॅलेंडरे छापून वितरीत करणे आणि इतर टपालाची व्यवस्था करणे ही कामे करता येत असत आणि त्यातून त्याला चांगली प्राप्ती होत असे. अलबर्ट क्योलर ह्या योग्य व्यक्तीची निवड त्याने योग्य जागी केली होती. काही थोड्या वर्षांतच त्याने ह्या प्रकाशन समितीचा बालग्रामसाठी प्रमुख प्रचारमाध्यम म्हणून उत्तम उपयोग करून घेतला. त्याला हे कळून चुकले होते की, त्याला कमीतकमी पैसे खर्चून बालग्रामच्या जास्तीत जास्त मित्रांशी सतत संपर्क ठेवायचा आहे आणि त्याने हे काम अत्यंत यशस्वीरित्या करून दाखविले. मायनरला आता ऑस्ट्रियातले काम आणखी वाढविण्याची संधी मिळाली. ती सर्व जबाबदारी त्याला स्वतःवर घेण्याची जरुरी नव्हती. ते शक्य पण नव्हते. पण जशी कामे वाढत होती, तशी माणसे पण मिळत होती !

टीकाकार तयारच होते ! आम्ही खूप माणसे वाढवीत होतो. खूप जास्ती प्रचार करीत होतो आणि खूप मुलांना 'घर' मिळवून देणार म्हणत होतो ! ज्यांची शासकीय खुर्ची डळमळीत झालेली होती तेच अधिक टीका करीत होते. कारण त्यांना वाटत होते, फक्त तेच व त्याची शासकीय व्यवस्था सर्व सामाजिक प्रश्नाची सोडवणूक करायला समर्थ आहेत !

त्यांना द्यायला योग्य असे उत्तर मायनरकडे तयारच होते. "जर आम्हाला काही चांगले निर्माण करायचे असेल तर त्यासाठी पैशांची गरज लागणारच. जर हे पैसे आम्हाला सरकार पुरविणार नसेल तर आपल्याला ते गोळा करावेच लागतील आणि त्यासाठी आपल्याला सर्व आधुनिक प्रचार-तंत्राचा अवलंब करावाच लागेल. प्रसिद्धीच्या माध्यमाचा उपयोग काय फक्त वॉशिंगमशीन विकत घेण्यासाठी किंवा सिनेमाच्या जाहिरातींसाठीच करावा असे काही आहे का ? चांगल्या कामासाठी ह्या माध्यमाचा वापर करणे हे आम्हाला पूर्ण नैतिकतेचे वाटते आणि बालग्राम हे एक चांगले काम आहे. आपण १ शिलिंगदेखील वाया घालवू नका. ईम्स्टमधल्या त्या बालग्रामकडे नीट बघा. जो मनुष्य आपला प्रत्येक शिलिंग काळजीपूर्वजक रितीने खर्च करतो, तोच असे बालग्राम बांधू शकतो आणि आमची अशी इच्छा आहे की, खूप बालग्रामे बांधली जावीत !



## आलम्युन्स्टरचे बालग्राम

ह्या काळात आलम्युन्स्टर येथील बालग्रामात ७ बालसदने बांधून झालेली होती. १९५६ मधल्या उन्हाळ्याच्या सुरुचवातीस त्यांचे उद्घाटन पण झाले होते आणि आता लवकरच तिथे जीवनसंगीत सुरू होणार होते. मागे वळून विचार केला, तेव्हा हे सर्व किती लवकर होऊन गेले असे माझ्या मनाला वाटले. ही घरे बांधून होत असताना मी त्यात पूर्ण गढला गेलो होतो. ज्या ठिकाणी डॉ. ग्लाइसनर– लोकपाल– यांनी १ वर्षापूर्वी भूमिपूजन केले होते, त्याच ठिकाणी ते आता घराचे उद्घाटन करीत होते. त्या जमिनीवर मुलांसाठी घरे उभी राहिली होती.

"ह्या बालग्राममुळे आमच्या देशात जास्ती सौंदर्य तर आणलेच आहे, पण त्या सोबत मायेची ऊब पण वाढलेली आहे. कारण येथून जो प्रेमाचा झरा वाहू लागेल, त्यामुळे प्रत्येक माणसाचे अंतःकरण अधिक संपन्न बनेल.

ही वेळ, ही घटका जी आहे, ती चांगुलपणावर व जगातल्या करुणेवर नवीन विश्वास व्यक्त करणारी आहे. लवकरच ज्यांना या जगात कुणी नाही अशी निराधार मुले येथे येतील व या घरात राहू लागतील. त्यांची काळजी घेणारी एक आई पण त्यांना मिळेल आणि त्यांना हे कायमचे घर मिळेल. आपल्या ह्या जमिनीवर आणखी ७ सुदृढ कुटुंबे स्थापित होतील. हे काम त्या बालग्रामच्या योजनेमुळे घडले आहे. कारण अत्यंत दारिद्र्य च आंतरिक निवाऱ्याचा अभाव असणाऱ्या मुलांना उचलून आणून इथल्या सुंदर व प्रकाशित वातावरणात त्यांना पुन्हा प्रेमाचे नवजीवन दिले आहे. हे सर्व बालग्राममुळे घडले आहे."

त्यावेळी समाजकल्याण अधिकारी पण तिथे आलेले होते. सुरुवातीस त्यांचे व माझे भयानक खटके उडाले होते. पण आता बालग्रामच्या चांगल्या कामाविषयी त्यांची पण खात्री पटलेली होती. ते म्हणाले, "बालग्रामाने सामूहिक कल्याणकारी शिक्षणासाठी नवीन मार्ग दाखविला आहे. डॉ. हर्मन मायनर यांचा अविरत, अथक् असा प्रयत्न ह्या गोष्टीला कारणीभूत आहे. सुरुवातीच्या सर्व अडचणींवर मात करून त्यांनी हा नवीन विचार जगासमोर मांडला आहे. वंचित, निराधार मुलांच्या पुनर्वसनासाठी येथे चांगल्या तऱ्हेने प्रयत्न केले जात आहेत हे आता सर्व लोकांच्या लक्षात आले आहे आणि लोकांना हे पण पक्के माहिती झाले आहे की, त्यांनी दिलेल्या प्रत्येक शिलिंगाचा येथे अतिशय काटेकोरपणाने खर्च केला जातो आणि योग्य त्या कामांसाठीच तो खर्च केला जातो."

# बालमातेच्या रोजनिशीतून

माझ्याकडे एका खास कामाची जबाबदारी होती. आमच्या या नवीन बाल-ग्रामासाठी मातांची नेमणूक करायची होती. ज्यांना बालग्राम-माता म्हणून काम करावयाची इच्छा आहे अशा स्त्रियांना शोधायचे होते. मी चर्चच्या मुख्यांना लिहिले. शहराच्या मेयरना पण पत्र पाठवलं. वर्तमानपत्रातून जाहिराती दिल्या आणि रेडिओवरून पण आवाहन केलं. मला चांगल्यापैकी प्रतिसाद मिळाला. शेकड्यांनी अर्ज आले आणि मी त्यांची छाननी अतिशय काळजीपूर्वक केली. बालग्राम-माता म्हणून काम करावयाला त्यातल्या १० स्त्रियांचे अर्ज अधिक अनुकूल वाटले. संबंध देशातून हे अर्ज आलेले होते. पूर्व-पश्चिम दक्षिण-उत्तर सर्व दिशांकडून अर्ज आले होते. त्यातल्या काही भगिनी शेतीत काम करणाऱ्या नर्सेस होत्या तर काही शिवणकाम करणाऱ्या स्त्रिया होत्या. शिक्षिका होत्या, तशा सेक्रेटरी पण होत्या. कुठून ना कुठून तरी त्यांच्या कानावर हे बालग्रामचे आवाहन पोचले होते. एक समाजकार्य म्हणून हे काम करण्याची त्यांची इच्छा होती आणि स्वतःचे जीवन मुलांच्या सेवेत घालवून जीवनाला अर्थ प्राप्त करून घेण्याची त्यांची इच्छा होती. सर्वांनाच माता व्हायचे होते. ह्या कामातील अडचणींची देखील सर्वांना पुरेशी कल्पना आलेली होती.

ह्या बालमातेचे दैनंदिन व्यवहारातील चित्र कसे पहा. सतत काम आणि सर्व प्रकारचे काम. घर स्वच्छ ठेवणे, घराचा कारभार चालविणे, स्वयंपाक करणे, बाजार-हाट करणे, तान्ह्या मुलांना सांभाळणे आणि मोठ्या मुलांचा अभ्यास करून घेणे. ह्या व्यतिरिक्त मुलांबद्दलच्या अनेक लहान-मोठ्या चिंता करणे, अर्थात् या चिंतेतून खऱ्या आईची पण सुटका होत नसते. पण तुलनात्मक दृष्टीने पाहिले तर ह्या मातेची मुले सांभाळायला अधिक अवघड असतात. कारण परिस्थिती किंवा वातावरणाने त्यांना पूर्णतया बिघडवलेलं असत, ती भित्री असतात, कमजोर असतात आणि नेहेमीच घाबरलेल्या त्रस्त मनःस्थितीत असतात. ह्याशिवाय त्या मुलांना नेहमी एकटेपणा वाटत असतो. संध्याकाळ झाली की मुले झोपी जातात. पण मातेची कामे चालूच राहतात. धुतलेल्या कपड्यांना इस्त्री करायची असते. ती ओटीवरच्या खोलीत उभी राहून इस्त्री करू लागते. एकटीच. कुणाची मदत नाही. विचार सुरू होतात. दिवस-भराच्या कटकटी पुन्हा डोके वर काढू लागतात. "मी खरंच, या मुलांना नीट वाढवू शकेन का ? हे माझे प्रेमापोटी केलेले कष्ट वाया जाणार का ? माझ्या या प्रयत्नांना काही अर्थ आहे का ?"

होय, कारण बालसदनाची माता होणं म्हणजे केवढा मोठा त्याग आहे, याची आम्हाला जाणीव आहे. पण गेल्या ५ वर्षांचा आमचा अनुभव आम्हाला हे पण



सांगतो की हे सर्व कटकटीचे काम असूनदेखील ह्या माता समाधानी व आनंदी आहेत. हे असे का घडते ? आपण यापैकी एखाद्या बालग्रामच्या मातेलाच हा प्रश्न विचारून पाहू या. एकदा मला एका मातेची डायरी पाहण्याची परवानगी मिळाली होती. त्याची सुरुवात अशी होती :

"ज्या कुटुंबात माता म्हणून काम करण्यासाठी माझी परीक्षा घेतली गेली आणि मी त्यात उत्तीर्ण झाले, त्या घरात मी आज वर्षभर राहत आहे. आणि ही माझी मुलं ! केवढा फरक आहे ! ती आजारी, वेदना सोसणारी मुलं. प्रथम मला सतत नजरेसमोर ठेवली पाहिजेत आणि त्यांना बरं केलं पाहिजे. त्यांना माझ्याकडे येऊन एक आठवडा होऊन गेला. ह्या आठवड्याचे वर्णन करणे अशक्यच आहे. माझ्या सबंध आयुष्यात मला जेवढा त्रास झाला नव्हता, तेवढा मी ह्या मुलांसाठी एक आठवडाभर सोसला. पण बालग्राममध्ये आल्यानंतर चांगली माणसं बनण्याची ही मुलांना मिळालेली शेवटची संधी हे मला ठाऊक असल्यामुळे मी हे सर्व कष्ट उपशीत आहे.

पण हे सर्व कसे होणार हे अजून मला कोडेच आहे. भिजलेली अंथरूणे, धक्का देणारे वर्तन, खोटे बोलणे, छोट्या वस्तूंची चोरी ह्या सर्व गोष्टी दिवसभर घडतच आहेत. त्यांचे ते साशंक, नकोसे वाटणारे चेहरे मला कधीकधी निराश बनवतात. इतर मुलांच्यात ज्या बालसुलभ प्रवृत्तींची आपण अपेक्षा करतो ती यांच्याकडून कधी मिळणारच नाही का? ते मला शत्रूसमान मानतात आणि माझ्याविरूद्ध कट करतात. परमेश्वरा ! हे सर्व सहन करायची ताकद मला कशी येईल ?"

नंतर मधे काही आठवडे उलटले. पुन्हा ती माता लिहिते, "आता संध्याकाळ झाली आहे, मी अगदी मेल्याइतकी थकून गेले आहे आणि मला सारखी भीती वाटते आहे की कुणीतरी मूल मला नक्की बोलवणार. मी माझ्याकडून उत्तम प्रयत्न करते, अगदी आटोकाट प्रयत्न करीत असते. पण जर माझे अवसान गळाले तर ही मुले पुन्हा रस्त्यावर पडतील. ती कुणाला आवडणार नाहीत. आत्ता जशी आहेत तशी ती नाहीतरी कुणाला आवडतील ? सर्व काही, खरं तर त्यांची प्रत्येक गोष्टच, बिघडलेली आहे. त्यांचे सर्व बालपण बिघडले आहे. त्यांचे ते अनुभव ऐकणं म्हणजे अंगावर शहारे येतात. मला माझ्या स्वतःच्या आनंदी बालपणीची आठवण येते. अजून मला गंभीरतेने स्वतःला विचारावेसे वाटते की खरच, तू या मुलांचे नशीब सुधारू शकशील का ? होय माझा विश्वास आहे, आणि मला हे काम केलंच पाहिजे. ते मी करून दाखवीन."

काही आशेचा किरण दिसायला बराच वेळ लागला. छोटीचे अंथरूण आता कोरडे राहू लागले. हान्सल रोज सकाळी सुप्रभात म्हणायचा. त्या म्हणण्यात आता

आपलेपणा आला. जॉर्जने आपण होऊन कबूल केले, की त्याने साखरेचा डबा चाटून फस्त केला आणि कपाटामागे लपवून ठेवला.

त्या दिवशी लीझेलचा वाढदिवस होता. तो साजरा करण्यासाठी म्हणून जेव्हा सर्व मुले त्या टेबलाभोवती आनंदाने बसली तेव्हा ते एक सुखी कुटुंब मला दिसले.

'आज मला किती आनंद वाटतो आहे !' त्या मातेने आपल्या डायरीत लिहिले होते. ''आजपर्यंत मी सहनशीलता दाखविली. त्या सर्वांचं बक्षीस मला आज मिळाले. संचालक मंडळी मला माझे काम चांगले असल्याची ग्वाही देत होते. इतर बालमाता पण मला समजावून सांगत होत्या की सुरुवातीस असाच त्रास त्यांना पण सोसावा लागला होता. तरीदेखील मला काही आतून समाधान वाटत नव्हते. आज, जेव्हा इतर सर्व मुले झोपली होती, लीझेल हळूच पायाच्या चवड्यावर नाचत खोलीत आली आणि म्हणाली, ''आई'' हाक मारून ती थोडा वेळ थांबली, आणि पुन्हा म्हणाली, ''आई,'' आजपासून मी तुझ्याशी चांगली वागेन. तू जितकी माझ्याशी चांगली वागतेस ना तितकीच मी पण तुझ्याशी चांगली वागेन. तिने तिचे दोन्ही हात माझ्या गळ्याभोवती टाकले आणि ती ओक्साबोक्शी रडू लागली. ते पाहून मला पण रडू आवरेनासे झाले आणि आवरावे तरी कशासाठी ? आम्हा दोघींच्या अश्रूंनं मुलांचे ते कमनशीब सर्व दूर वाहून गेले आणि त्या रात्री आम्ही परमेश्वराचे आभार मानीत यातून काहीतरी चांगले निर्माण होईल ह्या विश्वासाने निश्चिंतपणे झोपलो. लीझेलने मला नवीन मनोधैर्य मिळवून दिले.

पण मातांच्या जीवनात देखील चढउतार हे येतच असतात. हान्सल आता घरात खोटे बोलत नसे, पण शाळेत खोटं बोलायचा. त्याचा शाळेचा शेरा वाईट आला तेव्हा त्याने आईची खोटी सही करून प्रगतिपुस्तक परत दिले. दुसऱ्याच्या घरातून चोरी करून आणलेल्या वस्तूंचा एक ढीगच जॉर्जने दिमाखाने दाखवला. त्या सर्व गोष्टी म्हणजे चोरी आहे आणि त्याने त्या वस्तू परत केल्या पाहिजेत हे त्याला पटवून द्यायला बराच वेळ लागला. खलीन दररोज रात्री किंचाळून उठायची आणि रडत बसायची आणि आता विकीचे अंथरूण ओले व्हायला सुरुवात झाली होती.

''हे कधी संपणार आहे की नाही ?'' आई स्वतःलाच विचारीत असे.

''मी कधी काय पाप केलं आहे कुणास ठाऊक ?'' पण दुसऱ्याच वाक्यात ती पुन्हा लिहिते, ''मला इतके दिवस वाटत असे की मला न झेपणारे हे काम अंगावर घेतले आहे. पण आता इथे मुलांना सोडून दुसरीकडे निघून जाण्याची कल्पनाच मला करवत नाही. इथे आता घरातले त्यांचे वर्तन पुष्कळ अंशी ठीक झाले आहे. पण अजून बाहेर ते विचित्र वागतात.''



नाताळचा सण आला आणि मग ईस्टरचा सण पण आला. आता तिच्या डायरीतील तक्रारी कमी झाल्या आहेत आणि त्याच डायरीत जून महिन्यातील एका रविवारच्या पानात खालील मजकूर वाचायला मिळाला. जेव्हा मी सुरुवातीच्या दिवसांचा विचार करते, तेव्हा माझ्या मुलांना ओळखणेच मला कठीण जाते. आता मी खिडकीच्या समोर बसलेली आहे आणि बाहेर मैदानात खेळणाऱ्या माझ्या मुलांकडे पाहात आहे आणि अशी मी खूप वेळा बसते. आत्ता मी त्यांना खेळायला पाठविले. ती नजरेआड गेली तरी भीती वाटत नाही. खरच मी प्रथम जेव्हा आले, तेव्हा ही मुलं कशी होती, त्याचं चित्र मनापुढे उभं करणं खूप कठीण आहे. आता तीच ही मुले नाहीत. त्यांच्यात खूप बदल झालाय. आमच्या या बालग्रामात किंवा बाहेरच्या बालग्रामातदेखील आता मला कोणत्याही मातेच्या पुढ्यात माझ्या मुलांची लाज वाटणार नाही. एक वर्षाचा छोटा पीटर घरात आल्यापासून अँथनीचे वागणे खूप सुधारलेले आहे. जॉर्ज तर न्यायदेवतेच्या थाटातच वागतो जसा काही. लीझेल अजून चुप चुप असते. पण आता ती सुद्धा सुधारली आहे. तिचा फिक्कटपणा गेला आहे. हान्सल मला त्रास देतो. त्याचा रिपोर्ट अगदी वाईट आहे. त्याला बाकी सर्व आवडते. फक्त शाळा आवडत नाही. आता मला या सुट्टीत त्याला चांगली शिकवणी ठेवली पाहिजे. पण या आयुष्यात काहीच चिंता नाही असं तर कधीच घडणार नाही....

आपली मुलं जास्ती बिघडत आहेत हे पाहणाऱ्या आईला त्याचे किती दुःख होत असेल ! माझा अनुभव मात्र याच्या अगदी उलट आहे ! आणि ते माझे नशीब आहे, फार मोठ्ठे नशीब आहे ! खरोखर, त्या परमेश्वराचे आभार मानले पाहिजेत की त्याने मला बालग्रामात आणून पोहचविले ! बालग्रामची माता बनविले !''

फक्त इतक्याच प्रसंगांचं वर्णन ह्या डायरीत नाही. ती पुढे वर्णन करीतच जाते. आणि त्यात मुलांच्या आनंदात तिचा आनंद आणि त्यांच्या दुःखात तिचे दुःख सामावून गेलेले आपल्याला दिसते. पण हे शब्द एका महिलेचे आहेत. तिने दिलेल्या प्रेमामुळे तिच्याकडे सोपविलेल्या मुलांना आधार मिळाला आणि त्यांना सामाजिक जीवन प्राप्त झाले.

आलम्युन्स्टर बालग्राममधील मातांचा पण मला हाच अनुभव आला. काही दिवसांनी त्यातल्या एका बाईने मला खालील पत्र पाठविले.

*आदरणीय डॉ. साहेब,*

*मातृदिनाच्या दिवशी तुम्ही जे पत्र पाठविले त्याबद्दल मी तुमची खूप खूप आभारी आहे. माझी पण अशी इच्छा आहे की आपण सशक्त असावे. मी वारंवार त्या परमेश्वराचे आभार मानून त्याला सांगत*

*असते की देवा, तू मला हे किती संपन्न जीवन मिळवून दिलेस. ह्या जगात मुलांची माता होऊन राहण्यापेक्षा जीवनाचा आनंद दुसरीकडे कुठे असू शकेल का ? ही मुलं दुसऱ्याची असली म्हणून काय झालं ? उलट त्यात जास्तीच आंनद वाटतो. मी बालग्रामची माता झाले याचा मला कधी क्षणभर देखील पश्चात्ताप वाटला नाही. दिवस जात आहेत तसतसा माझा आनंद वाढतच आहे आणि आज मी खरीखुरी आनंदी स्त्री आहे. ज्या त्यागाविषयी तुम्ही पत्रात लिहिले आहे त्या त्यागाचा भरपूर मोबदला मला न मागता सतत मिळत आहे. ही सर्व मुले मला खूप आवडतात. ती मला माझीच मुले वाटतात म्हणून या मुलांना मोठे करणे हा माझा सतत वाढत जाणारा आनंद आहे !*

*माझ्या मनःपूर्वक शुभेच्छा !*

*आपली*

हे पत्र एका साध्याभोळ्या मातेचे आहे. १९५५ साली तिने शिवण शिक्षिकेचे काम सोडून दिले आणि अनाथ मुलांची माता बनून ती आमच्याकडे आली. तेव्हा-पासून तिने सोळा मुलांना वाढविले आहे. त्यातली ७ मुले विद्यार्थीदशा संपवून, व्यावसायिक शिक्षण घेऊन जगात यशस्वी जीवन जगत आहेत. अजून तिच्या बाल-सदनात ९ मुले आहेत. त्या सर्व मुलांची ती "आई" आहे. दुसरं काही नाही, फक्त "आई !" मी स्वतः जातीने तिच्या ११ मुलांना आणि ५ मुलींना ओळखतो. ती सर्व मुले भावनिकदृष्ट्या होरपळलेली होती. अवघड व हेकेखोर होती. त्यातल्या एका मुलाने तिच्या कपाटातील घरखर्चाचे सर्व पैसे चोरले होते. दुसऱ्याने एका खोलीत आग लावली होती, तर तिसरा बौद्धिकदृष्ट्या फार मागासलेला होता. एका मुलाने रागाच्या भरात तिच्या थोबाडीत मारली होती. एक मुलगा सतत अंथरूणात लघवी करायचा तर दूसरा मुलगा तोतरा होता. सात वर्षाची केथ खूप अशक्त होती. तिची अस्थिर नजर आणि उदास भाव. तिच्या सावत्र बापाने तिच्यावर अत्याचार केला होता. छोटा बर्नाड रात्री किंचाळत उठायचा. कारण त्याला पोलिसांनी एका अतिक्रूर बालक कुटुंबातून सोडवून आणले होते आणि त्याच्या मनात अजून त्या बेदम माराची भीती छपून बसली होती. त्या बालमातेने किती दुःख सोसले आहे आणि किती वाईट दिवस निभावून नेले आहेत याची मला पूर्ण कल्पना होती. त्या आजारी मुलांची शुश्रुषा तिने रात्रीच्या रात्री जागून केली होती. शाळेत पालकांच्या सभेत ती धड-धडत्या अंतःकरणाने जात असे आणि कित्येकदा सकाळच्या वेळी लवकर उठून तिने मुलींचे पायमोजे शिवून दिले होते.



आणि त्या मातेने हे पत्र लिहिले होते. त्या पत्रातून बालमातेच्या भूमिकेचा सुंदर आविष्कार दिसत होता. तिच्यामार्फत हर्मन मायनरने वंचित मुलांना पुन्हा मानवी समाजात आणून सोडले होते. ह्या मातांना हे जे यश मिळाले त्यामुळे ही गोष्ट सिद्ध झाली की, बालग्राम-योजनेत जी कुटुंब व्यवस्था अभिप्रेत आहे तीच खरी कल्याणकारी आहे आणि स्वाभाविकतेला धरून आहे.

समाजात अशा पुष्कळ स्त्रिया असतात, की ज्या काही ना काही कारणाने लग्न करीत नाहीत पण स्वतःची मुले असावीत, स्वतःचे कुटुंब असावे असे त्यांना नेहमी वाटत असते. त्यांना मातृत्वाची भूक असते आणि ते मिळाल्यामुळे त्यांच्या जीवनाला परिपूर्णता येत असे आणि समाजात अशी कित्येक मुले असतात की त्यांना आई नसते, अशा मातांना व मुलांना एकत्र आणून त्यांचे एक कुटुंब बनविणे ही बालग्रामची मूलभूत कल्पना आहे.

आलम्युन्सटरचे बालग्राम सुरू होण्यापूर्वी आम्ही भावी बालमातांसाठी शाळा सुरू केली. माझे डॉ. मित्र मानसशास्त्राचे प्रोफेसर होते. त्यांच्या पत्नीने हे काम अंगावर घेतले आणि त्यात खूप यश मिळवून तिने आमच्या बालग्रामचा पाया मज-बूत बनविला. बालग्रामची मातांना शिक्षण देणारी ही नवीन शाळा त्यामुळे सुरू झाली. जर्मन भाषा बोलणाऱ्या सर्व मातांच्या प्रशिक्षणासाठी जर्मन बालग्राम सोसा-यटीने हे काम सुरू केले. आज ती एक वर्षाचा पुरा शिक्षणक्रम आहे आणि वर्षा-नंतर परीक्षा घेऊन डिप्लोमा दिला जातो. अशा प्रकारे बालग्रामची माता हे स्थान सामाजिक सुरक्षिततेचे तर आहेच पण त्याबरोबरच स्त्रियांना तो एक चांगला उद्योग-व्यवसाय म्हणून त्याला मान्यता मिळाली आहे.

## बालग्राम कमिशन

बालग्रामचे काम मी सुरू केल्यानंतर पहिल्याच वर्षात मला जे व्हिलेज कमि-शनचे अनुभव आले ते हृदयस्पर्शी होते. ह्या कमिशनमधे प्रत्येक मुलाच्या दुःखाची कहाणी आम्हा सर्वांना सविस्तर सांगितली जात असे. आज पण कमिशनचे काम असेच चालते. आज कित्येक वर्ष आम्ही हे सर्व ऐकत आलो आहेत पण तरी देखील अजून आम्हाला फार वेळ ते ऐकणे सहन होत नाही. काही तास ऐकल्यानंतर आम्हाला ते ऐकणे मानसिकदृष्ट्या जमत नाही.

हर्मन मायनरने हे कमिशन सुरू केले, त्यात त्याची कल्पना होती की मुलांना घेताना त्यांची सर्व माहिती सर्वांना असायला हवी. सुरुवातीला मुलाला बालग्राममध्ये

प्रवेश कसा मिळतो ? पहिल्या काही वर्षात मुलांना त्यांच्या नशिबाने आमच्या दारात आणून पोहचविले. परंतु लवकरच जसजशी अधिक घरे बांधली गेली, तसतशी जास्ती मुले घेणे शक्य होत गेले आणि शासनाच्या बाल-कल्याणखात्याशी आमचे संबंध जोडले गेले. आज जवळपास बालग्रामच्या सर्व मुलांचे अर्ज आमच्याकडे शासनाकडूनच येत असतात. जिल्ह्यातील समाजकल्याण खात्याकडे सर्व बेघर मुलांची नोंद केली जाते आणि नंतर हे युवक-कल्याण खाते बालग्राम सोसायटीला या मुलांना घेण्याविषयी कळवीत असते. एक सविस्तर माहिती देणारा अर्जाचा नमुना भरून पाठविला जातो. हे पूर्ण भरलेले अर्ज नंतर बालग्राम कमिशनच्या मीटिंगपुढे येतात. ह्या मीटिंग्ज वरचेवर बोलावल्या जातात आणि तिथे त्या अर्जांची चर्चा होते. इतर बालग्रामच्या कमिटीज् ज्याप्रमाणे काम करतात, त्याचप्रमाणे हे कमिशनपण काम करते. ह्या कमिशनवर काही मंडळी तज्ज्ञ म्हणून तर काही मंडळी अनुभवी सभासद म्हणून काम करतात.

कमिशनमध्ये आलेल्या सर्व अर्जांची छाननी करतात. जर मुलांना प्रवेश देण्याबाबतच्या सर्व अटी पाळल्या असतील तर त्या मुलांना घेण्याचा निर्णय होतो आणि मग त्या मुलाला कुठल्या बालग्राममध्ये आणि कुठल्या बालसदनात ठेवायचे हे पण निश्चित ठरविले जाते. मुलाला घेताना २ अटी काटेकोरपणे पाळल्या जातात. एक म्हणजे ते मूल शारीरिक व मानसिकदृष्ट्या संपूर्ण निरोगी असले पाहिजे, आणि दुसरे म्हणजे त्याला शक्य तितकी त्याच्या घरी जाण्याची संभावना असता कामा नये. मुलाचे वय, मुलगा किंवा मुलगी आणि बालसदनातील शिल्लक जागा या गोष्टींचा विचार करून मग कुठल्या बालसदनात पाठवायचे ते ठरविले जाते. बालग्रामातील कुटुंब हे शक्य तेवढे प्रसन्न वृत्तीचे असावे आणि नैसर्गिक कुटुंबाप्रमाणे असावे हा पण प्रयत्न केला जातो. आणि म्हणूनच बालग्रामातील प्रत्येक बालसदनात आमच्याकडे मुलगे व मुली असतात आणि त्या वेगवेगळ्या वयाच्या पण असतात. त्यांचे सहशिक्षण हे अशा प्रकारे ठरविले जाते की प्रत्येक घरात मुलगे व मुली ह्या समवयीन नसतात. त्यामुळे पुष्कळशा कुटुंबांतून आपल्याला असे दिसून येईल की लहान मुलगे आहेत तर मोठ्या मुली आहेत किंवा मोठे मुलगे आहेत तर लहान मुली आहेत. ह्याला एकच अपवाद म्हणजे सख्खी भावंडे. जेव्हा एखादी मोठी मुलगी किंवा मोठा मुलगा घर सोडून बाहेर पडतो तेव्हा त्या बालमातेकडे एक लहान मूल सोपवले जाते आणि त्याचे वय वगैरे साधारण त्या कुटुंबात जुळण्यासारखं असतं.

इतक्या काळजीपूर्वक आणि बुद्धी प्रमाणतेने हे काम केले जाते. म्हणूनच कमिशन योग्य त्या मुलांनाच प्रवेश देऊन बालसदनात पाठवावयाचे काम करू शकते. ते मूल कसे दिसते किंवा त्याची सामाजिक परिस्थिती काय होती, ते



कोणत्या धर्माचे आहे ह्या व तत्सम गोष्टींचा विचारदेखील त्या निर्णयात केला जात नाही. त्याची गरज काय आहे यावर निर्णय मुख्यत्वे करून आधारीत असतो. त्याच्या दुःखद व वंचित परिस्थितीतून त्याची सुटका करून त्याला नवीन वातावरणात आणणे हा मुख्य हेतू असतो. फार क्वचित प्रसंगी असे घडते की, मुलाचे आईबाप त्याला परत न्यायला येतात. बालग्रामच्या सुरुवातीच्या काळात जे कटू अनुभव व निराशा पदरी पडल्या, त्यावरून कमिशनने आता काळजीपूर्वक मुले घेण्याची पद्धती सुरू केली. कोणत्याही मातेला आपले मुल येथे सहज टाकून जाता देता यावे ही आमची योजना नाही. ही गोष्ट हर्मन मायनर वारंवार सांगत असे. ही बालग्राम संस्था फक्त अशाच मुलांसाठी आहे की ज्यांना कुठल्याही तऱ्हेचे स्वतःचे घर अस्तित्वात नाही.

कधी कधी ट्रेनिंगची व्यवस्था नसल्यामुळे मुलांना बाहेर पाठवावे लागते. पण असे करण्यापूर्वी त्या मुलांचे संपूर्णतया निरीक्षण केले जाते. आमच्या उपचार केंद्रात त्याला ठेवले जाते. बहुतेक वेळा ही सर्व मुले मानसिकदृष्ट्या आजारी असतात. आणि त्यामुळे त्यांच्यावर स्वतंत्र व विशेष उपचार क्लिनिकमध्ये करण्याची गरज असते. अशा तऱ्हेचे ट्रेनिंग सेंटर ऑस्ट्रियात व्हिएन्ना शहरात होते. तिथल्या बालग्रामात हा विभाग होता व ह्या मुलांना तिथे पाठवण्यात येत असे. त्याचे संचालक प्रो.डॉ.हान्स आस्पेर्गर होते. ते व्हिएन्ना विद्यापीठाच्या मुलांच्या क्लिनिकचे पण प्रमुख होते.

हे निश्चित ठरून गेले होते की एकदा एक मूल बालग्राममध्ये घेतले की ते कायमचे त्या बालसदनाचे मूल मानले जात असे. मोठ्या मुलांना व मुलींना पण घरातून बाहेर पडल्यावरदेखील ते आपलेच घर आहे ही भावना कायम असायची. त्यामुळे ते जरी स्वतःच्या घरात राहत असले किंवा स्वतंत्र उद्योग करीत असले तरी आपल्या या घराकडे वारंवार वळून परत येत असत.

बालग्रामचा कारभार व्यवस्थित कसा चालावा याबाबत कमिशनने सुरुवातीस खूप गंभीर विचार केला.

आलेल्या अनुभवांतून ते शिकले आणि त्यावर आधारित असा एक एकत्रित सुरळीत कारभाराचा नमुना त्यांनी बनविला. दोन वर्षांनंतर हा नमुना अंमलात आणला. त्यामुळे बालग्राममधील सर्व कारभार नियंत्रित झाला आणि तो आजतागायत चाललेल्या कामाचा त्यांनी तो पाया घालून दिला. त्या मार्गदर्शनावर बालग्रामाचा कारभार चालतो.

## बालग्राम कुटुंब - म्हणजे लाईफ बोट

आलम्यून्स्टर येथील बालग्रामात ७ बालसदने बांधून काढायची प्रचंड तयारी वेगाने चालू असतानाच तिथे येणाऱ्या पहिल्या मुलांची भरती होती आणि सर्व मुले ईम्स्टला येऊन पोहोचली होती. तिथे त्यांच्यासाठी तात्पुरती पण पुरेशी व्यवस्था केली होती. हृदयविदारक असे नशीब असणारी कित्येक मुले वाट पहात होती आणि त्यांना ताबडतोब प्रवेश देणे आवश्यक होते. त्यात उलरिश पण होता. त्याला इस्पितळातून सोडून दिल्यावर तो सरळ ईम्स्टला पोहोचला होता.

तिथे मी त्याला पुन्हा भेटलो. त्याला सोबत घेऊन फिरायला गेलो. त्याचे लाल-लाल मजबूत शरीर. तो माझ्याबरोबर अनवाणी चालत होता. मी त्याला आलम्यून्स्टर येथील बालग्रामाविषयी सांगणार होतो. पण त्याला सर्व काही आधीच माहिती झालेले होते. हॉस्पिटलच्या एका नर्सने त्याला एकदा ते बालग्राम दाखवायला नेले होते. आणि तेव्हापासून त्या सुंदर बालग्रामात रहायला जाण्याची तो वाट पाहात होता.

बालग्राम संदेशात अल्बर्ट कोलरने खालील मजकूर सोप्या भाषेत लिहिला. "आपले आयुष्य हे एखाद्या वादळी समुद्रावरील प्रवासाप्रमाणे आहे. ज्याला कोणाला त्यातून आपले प्राण वाचवायचे असतील त्याच्याजवळ समुद्रात उपयोगी पडणारी लाईफ बोट हवी. संकटाच्या काळात त्याला त्यावर अवलंबून राहता आले पाहिजे. प्रत्येक मुलाचे कुटुंब ही त्याची लाईफ बोट असते. त्या कुटुंबात त्याला आदर, प्रेम आणि शाश्वती मिळत असते आणि त्यामुळेच त्याच्या सुखी जीवनाचा पाया घातला जातो. अशी कित्येक दुर्दैवी मुले आहेत की त्यांना जीवनाच्या प्रवासात सुरुवात करताना पुरेशी साधने व सोयी नाहीत आणि मग ते रसातळाला गेले की आपण त्यांनाच दोष देतो व ती मुलेच 'वाईट' होती, असे म्हणतो. पण त्याच्या ह्या अधो-गतीला मोठी माणसे किती जबाबदार आहेत, याचा विचारच आपण करीत नाही.

ज्या मुलाला आईबाप नसतात ते मूल एखाद्या बुडत्या जहाजावर प्रवास कर-णाऱ्या प्रवाशाप्रमाणे असते. त्याला घर म्हणून एखादी जागा हवी असते. आणि जिथे त्याला प्रेम व आधार मिळेल, अशा घराच्या शोधात ते सतत असते. व आपण एक सेकंदही वाया न घालवता त्याला मदत केली पाहिजे. आपल्या सर्वांचे हे कर्तव्य आहे की अशा या भटकणाऱ्या मुलाला आपण आई मिळवून दिली पाहिजे. भाऊ आणि बहिणी पण असल्या पाहिजेत. थोडक्यात म्हणजे एक घर– एक कुटुंब ही लाईफ बोट त्याला प्राप्त करून दिली पाहिजे."



## तृतीय बालग्राम

१९५६ या वर्षात जास्ती काही गाजावाजा न होता ऑस्ट्रिया देशातील तिसरे बालग्राम लिंझमध्ये ओस्टिरोल या ठिकाणी सुरू झाले. त्या गावच्या प्रमुखाची पत्नी एकदा ईम्स्ट येथील बालग्राम पहायला आली होती आणि तेव्हापासून तिने एकच ध्यास घेतला होता की तिच्या गावी लिंझमधे असेच बालग्राम सुरू करायचे. एक वर्षानंतर ह्या दृढनिश्चयी, कनवाळू अंतःकरणाच्या बाईने तिची महत्त्वाकांक्षा पूर्ण केली. तिने या नवीन कल्पनेसाठी भरपूर लोकमानस तयार केले. एक सोसायटी स्थापन केली आणि या सोसायटीला हरमायनरने आपल्या देणग्यांच्या पैशातून काही रक्कम दिली, आणि एका चांगल्या दिवशी पहिले बालसदन बांधून पूर्ण झाले. जवळ-पास राहाणारे खूप लोक ते बालसदन बघायला आले. जवळपास त्या गावांतील तर सर्वच लोक तिथे जमा झाले. त्यावेळी त्या नवीन वास्तूवर निळ्या आकाशाचे छत्र पसरले होते. डोंगरांची राशी पृष्ठभूमीवर चमकदार दिसत होती आणि त्या एका सुंदर बकुळीच्या नाजुक फुलाचे नाव त्या घराला देण्याचा एक घरगुती समारंभ पार पडला. रानामाळावर उगवणारे बकुळीचे फूल त्याच्या सुगंधाने माणसाला वेड लावते आणि माणूस त्याच्या शोधात जाऊन ते घेऊन येतो आणि आपले घर सुगंधीत करून टाकतो !

बकुळ बालसदनाची माता आपल्या ११ मुलांना सोबत घेऊन नवीन घराच्या पायऱ्यांवर उभी राहिली आणि हर्मन मायनरच्या हस्ते तिने घराची किल्ली घेतली. हे नवीन घर नुकतेच तयार झाले होते आणि त्यात ११ मुले राहाणार होती. ७ सख्खी तान्ही भावंडे आणि त्यांचेसोबत आणखी ४ तान्ही. पण या दोन्ही तान्ह्या मुलांच्या गटांना नशीबाचा फटका बसला होता. त्यांच्यासाठी दुसरं काय करणं शक्य होतं ? बालग्राम कमिशनने अत्यंत आग्रहपूर्वक बजावलं होतं की ७ पैकी जरा मोठ्या असलेल्या दोन मुलांना ईम्स्टला पाठवून द्यावे. पण ह्या नवीन घराच्या मातेने, त्यांना आपुलकीने ठेवून घेतले होते. तिला ती सर्व ११ मुले हवी होती आणि त्यापैकी एकाही मुलाला ती सोडायला तयार नव्हती. आज ती सर्व ११ मुले जगभर विखुर-लेली आहेत. त्यांच्या जागी आणखी १० नवीन मुले आली आहेत. ह्या घराला भरपूर मुले राहातील असा आशिर्वाद मिळाला आहे. आणि इतर घरातील मुलांच्यासाठी जेवढे कष्ट पडलेत, त्यापेक्षा या घरात ते किंचितही कमीजास्त नाहीत. असो ! लिंझ येथील जमीनच फार सुपीक आहे. त्यामुळे तेथे बालग्रामची वाढ इतक्या झपाट्याने होत असते. आस्टिरोलर गावात जी किसानांची वस्ती होती. त्यालाही बालग्रामे अनु-कूलच भासत होती. कारण त्या शेतकऱ्याच्या घरातून १५/१६ मुले जन्माला घालणे,

सर्वांनी एकत्र टेबलाभोवती बसून जेवण करणे यात नवीन काहीच नव्हते.

## युवानिवासांचा जन्म

१९५६ साली ईम्स्टमधील बालग्रामात जी मुले मोठी झाली होती त्यांनी स्वतंत्र ठेवणेच जरुरीचे होते. कारण त्यांना कुठेतरी व्यावसायिक शिक्षण देणे किंवा पुढील अभ्यासाला लावणे हे क्रमप्राप्तच होते. ह्या प्रश्नाची काही दिवस चिंता वाटत होती. इन्नसब्रुकमध्ये ममा डिडलूने अशा काही मुलांना एकत्र सांभाळून त्यांचा एक स्वतंत्र निवास सुरू केला होता. पण ते काही या प्रश्नाचे कायमचे उत्तर होऊ शकत नव्हते. एक नवीन इमारत बांधणे म्हणजे लाखो रुपये लागणार होते. ही इमारत लहान बांधून पण चालणार नव्हते. कारण बालग्रामची १०० मुले कधीतरी एकदम मोठ्या वयाची होणार होती आणि बालग्रामात त्यानंतर राहू शकणार नव्हती. ती मुले बाहेर पाठविली तरी त्यांचेवर देखरेख बालग्रामचीच राहाणार होती. नंतर ह्या बालग्रामच्या कामाला काहीच अर्थ उरणार नव्हता.

एक दिवस बालग्राम सोसायटीला इन्सब्रुकच्या जवळ असलेली एक जुनी सॅनिटोरियमची इमारत दाखविण्यात आली. मनात जरा साशंक होऊन हर्मन मायनर ती जागा बघायला गेला. पण तिथले नैसर्गिक सृष्टीसौंदर्य पाहून त्याने ती जागा विकत घेण्याचे नक्की ठरवले. पुन्हा एकदा सर्व शिल्लक कोरून कोरून एकत्र करण्यात आली आणि बालग्रामच्या तरुण मुलांसाठी पहिला निवास (हॉस्टेल) एगरडाख या ठिकाणी बांधण्यात आला.

यानंतरची अडचण म्हणजे या नवीन निवासाला संचालक नेमण्याची. त्यावेळी लिंझमधल्या वर्तमानपत्रातील एक जाहिरात एका तरुण माणसाच्या वाचनात आली. हा माणूस एका औद्योगिक कारखान्यात हिशोबनीसाचं काम करीत होता. त्याला ह्या जाहिरातीत रस वाटला आणि म्हणून त्याने ती पेपरमधून काढली व स्वतःच्या खिशात कोंबली. पुन्हा काही दिवसांनी ती त्याच्या हाती लागली. मी लिंझमधल्या वर्तमानपत्रात जाहिरात देऊन आमच्या बालग्रामसाठी एका कार्यकर्त्याची जागा जाहीर केली होती. आलम्युन्स्टरच्या नवीन बालग्रामच्या इमारतीचे बांधकाम सुरू होते. त्यामुळे मला लिंझमधील सर्व काम पाहणे अशक्य झाले होते. मी फक्त महत्त्वाचा पत्रव्यवहार बघत होतो. बरेच काम तसेच पडून होते. शिवाय आणखी प्रांतभर पण प्रचाराचे काम जोरात करायचे होते. आलम्युन्स्टरच्या बांधकामाला फार पैसे खर्च झाले होते आणि तेथे आमचे बालग्राम आम्ही आमच्याच ताकदीवर बांधायचे ठरवले



होते. त्यात आमचा खरा गौरव होता आणि म्हणून मी एका मदतनिसाच्या शोधात होतो. पण आमच्याकडे काम करायला कोण येणार ? कारण सामाजिक संस्था मोठा पगार देऊ शकत नाहीत आणि ध्येयवादाला चिकटून राहण्यातच इथल्या कामाचे यश अवलंबुन असते. पण ती जाहिरात वाचून रूडी माऊरहार्ड मला येऊन भेटला. आम्ही दोघे एकमेकांकडे ओढले गेलो. एका आठवड्यानंतर त्याने आमच्या लिंझमधील ऑफिसात काम करायला सुरुवात केली आणि तो आमच्या रस्त्यावरील देणगीच्या अभियानाची तयारी करू लागला. त्याला बालग्रामच्या कामाची नीट सविस्तर माहिती व्हावी म्हणून मी त्याला दोन दिवस ईम्स्ट येथील बालग्रामात पाठवून दिले. तिथे तो मायनरच्या तावडीत सापडला आणि दुसऱ्याच दिवशी आमच्या युवा-निवासाचा संचालक म्हणून काम करू लागला आणि अशाप्रकारे ऑस्ट्रियातील आमच्या युवकांसाठी असलेल्या उद्योग शाळेला संचालक मिळाला, आणि तो अजूनदेखील काम करीत आहे.

हर्मन मायनरच्या अचूक निर्णयशक्तीचे पुन्हा एकदा मला कौतुक वाटले आणि त्या त्याच्या शक्तीमुळेच त्या बालग्राम चळवळीच्या निर्मात्याला एवढे यश मिळाले. तो नेमलेल्या मनुष्यावर पूर्ण विश्वास व सर्व जबाबदारी टाकायला लगेच तयार होतो. परंतु हा त्याचा अंधविश्वास नसतो. त्याला अनेक वर्षाचा अनुभव आहे व माणसाची चांगली पारख त्याला करता येत असे. तो स्वतःची कधीच फसवणूक करून घेणार नाही. तो नवीन कार्यकर्त्यांशी खूप वेळ बोलतो व त्याला गोंधळून टाकतो. एकदा त्याने मला ईम्स्टवरून फोन करून सांगितले की नवीन नेमलेल्या एका कार्यकर्त्याला त्याने एका आठवड्यात काढून टाकले आहे. त्याने त्याचे वर्णन केले,

"त्या माणसाला अंतःकरणाची खोली नव्हती, विचारांची उंची नव्हती आणि त्यामुळे कोणतेच गुण त्याच्या अंगी नव्हते. मला वाटले की तो सद्‌गुणी असेल पण त्याच्यात कोणतेच गुण दिसले नाहीत किंवा त्याच्या अंतःकरणात काही तळमळ नाही. त्यामुळे त्याच्याकडून मला कुठलाच प्रकाश मिळाला नाही म्हणून मी त्याला जायला सांगितले."

माणसाचा अभ्यास करण्याची मायनरची एक विशिष्ट पद्धत होती आणि त्यावर आधारित तो आपले सहकारी नेमायचा. तो आपले निरीक्षण पण ठरावीक शैलीत मांडत असे. ठाशीव पण सत्य आणि सर्वात शेवटी म्हणायचे झाले तर मायनरने ज्या तऱ्हेने कार्यकर्त्यांची संघटना उभी केली त्यातच त्याच्या यशाचे रहस्य साठलेले होते. आता त्या संघटनेचा विस्तार इतका व्यापक झाला आहे की मायनरलादेखील स्वतःच्या चुका कबूल कराव्या लागतात.

आपण सर्व माणसेच आहोत आणि चुकीला पात्र आहोत. मी स्वतः खूप वेळा चुका केल्या आहेत. मी लोकांची निवड करताना, काम करताना, काम सांगताना खूप वेळा चुकलो आहे. पण मी त्या चुका मोकळेपणाने कबूल करतो आणि ताबडतोब दुरूस्त पण करतो. निर्णय घेण्याची शक्ती प्रत्येकाच्या अंगी असायला हवी पण तितकीच महत्वाची गोष्ट ही आहे की चुकीचा निर्णय घेतल्यास तो कबूल करायची ताकद पण अंगात असायला हवी. रुडीची निवड इतर मंडळींइतकीच योग्य होती व म्हणूनच त्याने व इतर सहकाऱ्यांनी ही बालग्रामची चळवळ हृदयाशी उचलून धरली व नावारूपास आणली.

तेव्हापासून रुडीने युवकांच्या निवासाचे काम केले. त्यात नवीन संशोधन केले आणि सर्व कल्पनाच नव्याने पुढे आणली. त्याने असे सिद्ध केले की हे युवानिवास छोटेच असावेत म्हणजे जास्ती गर्दीचा वाईट परिणाम त्यांच्यावर होणार नाही. ह्या युवानिवासात देखील कौटुंबिक वातावरण असावे म्हणूनच आज जगातल्या बहुतेक बालग्रामांनी संलग्न असा युवानिवास आपल्याला दिसून येतो.

## भलेपणातील शक्ती

ईम्स्टमधल्या बालग्रामात एकदा एक तरूण बाई स्वीडनहून आली व ती जाताना म्हणाली, "मी घरी परत गेल्यावर माझ्या देशबांधवांना सांगणार आहे की, मी एक शेजारधर्मातील प्रेमाचा आविष्कार पाहून आले आहे. मी आता खूप काही करू शकते. मी जगातले एक मोठे अद्भूत सत्य बघून आले आहे. यापूर्वी माझा त्यावर विश्वास बसला नसता. जर जगातील सद्भावनेवर, भलेपणावर आपला विश्वास असेल तर अशा तऱ्हेची यशस्वी कामे उभी राहू शकतात. मला आज हे असे वाटते आहे याचे काहीच आश्चर्य वाटायला नको. पण आज मला ही गोष्ट नक्की समजली आहे की, माणूसकीची भावना म्हणजे निव्वळ पोकळ शब्द नाहीत किंवा थोड्या लोकांचा त्यात स्वार्थ नाही. पण ती एक महत्त्वाची शक्ती आहे आणि तिचा आधार घेऊन आपण मोठमोठी संकटे पार करू शकतो.

जेव्हा जगात काहीतरी निर्णय घेण्याची वेळ येते तेव्हा किती वेळा आपण असत्याचा आधार घेऊन आणखी अशांतीच निर्माण करीत असतो. या लहान मुलांच्या दुर्दैवाला फक्त वरिष्ठ अधिकारीच जबाबदार नाहीत. कारण जर सर्वसामान्य लोकांनी थोडीफार सहानुभूती दाखवली असती, तर कदाचित या मुलांची ही दुर्दशा झाली नसती.



आज आपण बालग्रामात हे पाहू शकतो की जर आपल्याकडे भलेपणा असेल, भरपूर प्रेम असेल तर या दोन्हीच्या आधाराने आपण अगदी दडपल्या गेलेल्या, निराधार अशा मुलांच्या आंतरिक जीवनात प्रसन्नता आणू शकतो. आपण आपले हे ज्ञान सबंध जगाला शिकवायला हवे. तसे जीवन जगायला हवे. मी माझ्यापुरते तरी ठरविले आहे की ह्या बालग्रामच्या योजनेने माणसाच्या अंतःकरणातील सद्भावनेला हात घातला आहे. ती सद्भावना फैलावेल, विस्तारित होईल आणि सर्व जाती-धर्माच्या, देशाच्या लोकांपर्यंत ती पोचेल आणि त्यानंतर या जगात एकटी दुर्मुख मुले तर राहाणारच नाहीत, पण आपल्या सर्वांचेच जीवन अधिक समृद्ध व सुखी होईल.

## उलरिशं आलम्युन्स्टरमधे...

उलरिश माझ्या शेजारी मोटारीत बसला होता. गाडीत आणखी पण चार मुले होती. आर्नोल्ड नावाचा अकरा वर्षांचा एक निर्वासित मुलगा होता. त्याला आईबाबा नव्हते आणि कित्येक वर्ष तो बराकीमधून भटके जीवन जगत होता. ८ वर्षाच्या लीझलोट्टची आई सावत्र होती आणि ती तिला निर्दयपणे मारीत असे. १० वर्षाच्या रोलँडला अजून हसतात कसे तेच माहीत नव्हते. कारण त्याचे बालपण म्हणजे सतत दुःख आणि उपासमार. चौथा होता तो छोट्या मुनाट्टो चारच वर्षाचा होता तो! ईम्स्टहून मोटारीत बसून आलम्युन्स्टरपर्यंत जाण्यातच त्याला विलक्षण आनंद वाटत होता. खिडकीतून त्याने आपली नजर एकदाही वळवली नाही आणि मधून मधून मांड्या थोपटून तो आपला आनंद दाखवीत होता. त्याच्या जन्मानंतर त्याच्या आईने त्याला त्याच्या आजीच्या स्वाधीन केले होते आणि आजीला त्याला घराबाहेर काढण्याची लाज वाटत होती. त्याने फक्त स्वयंपाकघराच्या चार भिंतीपलीकडचे जग बघितलेच नव्हते. तो कधी बाहेर पडलाच नव्हता. त्याने कधी निसर्ग अनुभवलाच नव्हता. मित्रांबरोबर तो खेळला नव्हता आणि जग कसे दिसते त्याचे त्याला ज्ञान नव्हते. त्यामुळे आता स्वतःभोवतालचे काय पाहू आणि किती पाहू असे त्याला झाले होते.

या सर्व मानवी मालमत्तेला घेऊन मी आलम्युन्स्टरला पोचलो. माझ्या पाठीमागून हर्मन मायनरची गाडी होती व त्यात पण अशीच मालमत्ता भरलेली होती. त्याच्या पाठीमागे फिट्झ हेडरची गाडी होती आणि त्यात सात मुले कोंबली होती.

आणि ते बालग्राम सुरू झाले. आलम्युन्स्टर बांधून झाले होते आणि त्यातल्या पहिल्या ७ घरांचे दरवाजे उघडून त्यात या निर्वासित गरीब मुलांना आत घेतले गेले.

बालग्रामच्या तिथल्या मातांनी अनेक दिवस पूर्वतयारी करून ठेवली होती. घरं आरशासाखे स्वच्छ होती. टेबलावर फुलांची रचना करून ठेवली होती. आणि प्रत्येक घरात चहा-फराळाची आटोपशीर मांडणी करून झालेली होती. सगळीकडे एक अपेक्षेचे वातावरण होते. माझी खात्री आहे की माझ्या अंतःकरणात जी धडपड होत होती तीच धडपड त्या बालग्राम मातांच्या अंतःकरणातपण होत असली पाहिजे. त्या मातांच्या जीवनाचे, मुलांच्या जीवनाचे आणि माझ्यापण आयुष्याचे एक नवीन पर्व सुरू होत होते.

आम्ही जेव्हा आलम्युन्स्टरला पोचलो तेव्हा त्या मातेने पुढे होऊन छोट्या मुनाट्टोला मोटारीतून उचलून घेतले,

"तू आहेस तर तो मुन्ना !" ती त्याला म्हणाली. तिचा आवाज थरथरत होता.

"चल मी तुला दाखवते आपले घर आणि तू कुठे झोपणार ती जागा." मुनाट्टो जरा भीतभीतच मोठे डोळे विस्फारून तिच्या मागोमाग गेला.

आणखी सर्व मातांनी आपल्या मुलांचे असेच स्वागत केले. बालग्रामच्या कमिटीने त्या प्रत्येकीला ही मुले वाटून दिलेली होती. थोड्याच वेळात फक्त ३ पुरुष त्या हिरवळीवर उरले.

प्रत्येक घरात तो पहिला तास उत्साहाने साजरा होत होता. त्या मातेला मिळालेले मूल म्हणजे तिने जन्म देऊनच मिळवले आहे, अशा आनंदाने ती त्याला उचलत होती, मिरवत होती, छातीशी कवटाळून धरत होती. तिची नजर जणू त्याला सांगत होती, "तू कसा दिसतोस सुंदर की कुरूप, याची मला पर्वा नाही. तू रडतोस की हसतोस, तू चिंध्या घालून उभा रहा किंवा अंगावर सेलर सूट चढवून, तू एखादे वेळी खूप हट्टी स्वभावाचा असशील, तू चोरटा असशील, थोडं खोटं पण बोलत असशील, रोज तुझं अंथरूण भिजवत असशील, तू चोरटा असशील, तू भित्रा आणि पळपुट्या असशील. तू कसाही असलास आणि तुझ्यात काहीही गुणदोष असले तरी तू आता माझा मुलगा आहेस. मी तुझ्याशी तुझी आई म्हणून चांगली वागणार आहे. मी इथे नेहमी तुझ्या सोबत राहीन. स्वतःच्या पोटच्या मुलाप्रमाणे मी तुझ्यावर प्रेम करीन आणि तुझ्यासाठी मी सर्वस्वाचा त्याग करीन !"

अर्थात इतके सारे विचार ती बोलून दाखवू शकली नाही. नव्या बालग्रामातले जीवन सुरु झाले. इम्स्टमधील मुलांप्रमाणे इथली मुले पण रांगेनी शाळेत जाऊ लागली होती. आजूबाजूचे रहिवाशी ही मुले कोण आहेत, म्हणून त्यांच्याकडे कुतूहलाने बघत होते. पण थोड्याच दिवसात आलम्यून्स्टर गावातील नेहेमीच्या जीवनात हे बालग्राम रुळून गेले. आलम्यून्स्टर हे बालग्रामच्या प्रयोगाचे एक निरीक्षण केंद्र बनले. येथून बाहेर पडलेले प्रत्येक पाऊल त्याच्यासोबत येथले विचार घेऊन जात होते आणि



त्याचा प्रसार आलम्यून्स्टरच्या बाहेरच्या प्रांतात व इतर देशात पण झपाट्याने होत होता. हर्मन मायनरच्या या दुसऱ्या बालग्रामने त्याच्या विचारांना एक नवीन विजय, नवीन भरारी मिळवून दिली होती. ती चळवळ आता चांगली बळकट बनू लागली आणि जगातल्या सगळ्या अनाथ, दुर्बल मुलांचे दुःख मिटविण्याचे काम ती करू लागली.

## मातेची निश्चल मूर्ती

उपेक्षित मुलांच्या सुधारणेत मातेची प्रतिमा किती महत्वाची असते याचे प्रत्यक्ष ज्ञान आम्हाला एका ७ वर्षाच्या मुलाने करून दिले होते. त्यावेळी त्याला नुकतेच ईम्स्टमधील बालसदनात घेतले होते. बालग्रामच्या परिसरात हस्तव्यवसाय व चित्रकलेचा एक वर्ग होता. हा मुलगा ह्या वर्गात गेला की नेहमी एका आचाऱ्याचे चित्र रंगवायचा. त्या चित्राचा एकूण विषय कोणताही असला तरी त्या चित्राच्या मधोमध तो एका स्वयंपाक्याचे चित्र काढून ठेवायचा. त्या मुलाला विचारले की "तू आचारी बनणार आहेस का ?" तर तो नाही म्हणायचा. आम्ही अनेक तर्क वितर्क करीत होतो. शेवटी त्या कोड्याचे उत्तर आम्हाला सापडले. येथे बालसदनात येण्यापूर्वी तो नेहेमी अनाथाश्रमात राहिलेला होता. त्या अनाथाआश्रमाच्या स्वयंपाक घरात एक आचारी होता आणि त्याला हा मुलगा आवडायचा. तो त्याची काळजी घ्यायचा, त्याचं रक्षण करायचा, त्यामुळे मुलाला तो आईच्या ठिकाणी वाटायचा. त्या आचाऱ्यावर त्यामुळे त्या मुलाचा पूर्ण विश्वास होता आणि स्वतःच्या आईकडून जी सुरक्षितता त्याला मिळाली नव्हती ती त्याला या स्वयंपाक्याकडून मिळायची.

मायनरने बालग्रामात जी कुटुंब व्यवस्था निर्माण केली होती, त्याबाबत त्याला एक क्षणभरदेखील संदेह वाटला नव्हता किंवा आपला रस्ता चुकला आहे असे वाटले नव्हते. पण नेमके याच मुद्यावर लोक त्याच्यावर भरपूर टीका करीत असत. जे लोक तार्किक विचार करणारे होते, ते म्हणायचे की बालग्राममध्ये आई-बाप असे दंपती ठेवायला हवे. पण दुसऱ्या संस्थांनी जेव्हा जेव्हा असे दंपती ठेवून प्रयोग केले होते तेव्हा तेव्हा ते फसले होते व निराशा पदरी पडली होती. त्यांचे ते प्रयोग वांझ ठरले होते आणि त्यांनी काही सुधारणा, प्रगती घडली नव्हती. नंतर जेव्हा ऑस्ट्रियातील मोठ्या मोठ्या तज्ज्ञांनी आणि अधिकाऱ्यांनी मायनरच्या योजनेला पाठिंबा जाहीर रीतीने दिला तेव्हा आम्ही सुटकेचा निश्वास टाकला. विज्ञानाने मायनरची शिक्षण पद्धती तंत्रशुद्ध म्हणून स्वीकारली होती. डॉ.माईस्टर यांनी त्या बाबतीत पुष्कळ लिहिले.

ते म्हणाले, "हे आपल्याला मान्य करावेच लागेल की लहान मुलांचे शिक्षण हे ते ज्या कुटुंबात वाढत असेल तिथल्या आईकडून किंवा वडिलांकडून होत असते. जरी प्रशिक्षणाच्या तंत्रात कितीही अडचणी आल्या तरी आईवडिलांची भूमिका दुसरं कोणीच घेऊ शकणार नाही. आपण जरी हुबेहूब दुसरी व्यवस्था निर्माण केली आणि त्याची अंमलबजावणी खूप काळजीपूर्वक केली तरी कुटुंबात जे मुलाला मिळते ते आपण कधीच देऊ शकणार नाही."

म्हणूनच आपल्याला कौटुंबिक वातावरणाची निर्मिती करायला हवी. त्या अनाथ मुलाला आईबाप वाटतील अशी माणसे मिळवून द्यायला हवीत आणि या नव-निर्मितीत बालग्रामची योजना ही खूपच शास्त्रशुद्ध आणि यशस्वी ठरली आहे अस म्हटलं पाहिजे. इथल्या 'मातेला' सांभाळायला दिलेल्या मुलांची संख्या आटोपशीर हवी. ८/१० मुले सांभाळणे अवघड नाही. ती व मुले सतत एकमेकांच्या सान्निध्यात राहातात आणि सर्वात लहान मुलाला आईच्या कुशीत विसावा मिळू शकतो. जेव्हा हे काम करावयास प्रत्यक्ष आई अस्तित्वात नसते, तेव्हा ही माता तितक्याच तत्परतेने ते करू शकते आणि जरी या बालग्रामात महत्वाची प्रतिमा ही आईची बनते तरी वडिलांच्या प्रतिमेचा पण काही लाभ त्या मुलांना मिळत असतो. बालग्राममध्ये जो संचालक आहे, तो या कुटुंबाच्या पितृस्थानी आहे आणि आपल्या ज्ञानाने व अनुभवाने तो वडिलांची भूमिका अत्यंत यशस्वी रीतीने निभावून नेताना दिसतो आणि म्हणून माझा असा विश्वास आहे की बालग्राममधून जे नवीन जीवन घडत आहे त्याचे आपण कौतुक केले पाहिजे आणि त्यावर पूर्ण विश्वास व्यक्त केला पाहिजे.

बालग्रामातील मातेच्या भूमिकेत काय जादू भरलेली आहे, याची प्रचिती आम्ही अनेक वेळा घेतलेली आहे. आपण कितीही शास्त्रीय दृष्टीने याचे विवेचन केले तरी ते अपुरेच रहाणार आहे. पण मुलांनी लिहिलेल्या पत्रांतून ही प्रेमाची बंधने लवकर स्पष्ट होतात. अशी दोन पत्रे मी खाली उद्धृत करीत आहे.

१८ वर्षांचा जॉर्ज बालग्राम ईम्स्टमध्ये वाढला व नंतर मोटार मॅकॅनिकचा अभ्यास पुरा करून कामाला लागला. त्याने आपल्या बालसदनाच्या आईला पत्र पाठविले.

*प्रिय आईस,*

*गेली १८ वर्षे मी तुझ्या सोबत मातृदिनाला हजर होतो. यावेळच्या मातृदिनाला मात्र मी तेथे असणार नाही. मी आता हे जे लष्करात काम करीत आहे, ते पूर्ण झाल्याशिवाय मला घरी येता येणार नाही. मी ज्याच्याकडे काम करीत होतो, त्या माझ्या*



*पूर्वीच्या मालकाने मला पत्र पाठविले आहे व लिहिले आहे की माझे लष्करातले काम संपले की तो पुन्हा मला नोकरी देणार आहे. मी बहुतेक ते करीन कारण तो मालक चांगला मनुष्य आहे आणि मला त्याने खूप शिकवले आहे. त्यानंतर मी माझा स्वतःचा मोटार दुरूस्तीचा कारखाना सुरू करणार आहे. मी मुद्दाम हे पत्र लिहून तुला कळवीत आहे की, तू जसा मला निरोप देऊन पाठवून दिलेस तसेच मी राहिलो आहे. माझ्यात काही बदल झाला नाही. तू म्हणाली होतीस, "माझ्या बाळा, तू नेहमी प्रामाणिक रहा." आता तू माझी काळजी अजिबात करू नकोस. इथे पण मला चांगले प्रामाणिक मित्र मिळाले आहेत. लष्करातून सुटल्यावर त्यातला एक जण शिक्षक होणार आहे आणि दुसऱ्यानं छपाईचे काम शिकून घेतले आहे. आता मला जवळपास १९ वर्षे पूर्ण होतील. मला समजू लागले आहे की बालग्राममध्ये राहिल्यामुळे माझ्यात व माझ्या जीवनात किती मोठा बदल तुझ्यामुळे, माझ्या प्रिय आईमुळे घडून आला! माझ्यामुळे तुला खूप त्रास झाला आणि काळजी पण वाटली असेल त्याची मला कल्पना आहे. पण आता मला त्याची नीट आठवण येत नाही. मी कसा होतो, किती खोड्या करत होतो आणि तुला कसे सतावीत होतो हे चित्र आता नीट आठवता येत नाही. मला त्या दिवशीची ती संध्याकाळ आठवली की मात्र अजून माझी मलाच लाज वाटते. मी तुला म्हटले, "तू माझ्याकरीता एवढा त्रागा का करतेस? तुला हवंय तरी काय माझ्याकडून? मी खूप मार खाल्ला आहे पण त्याचा माझ्यावर काही परिणाम झाला नाही. आता तुझ्या या ऊसासे टाकण्याने मला काय वाईट वाटणार आहे? मला त्याची पर्वा नाही" असं बोलून मी तुला रडवलं होतं. त्याची मला आज शरम वाटते. पण आई, या सबंध जगात फक्त तू एकटीच व्यक्ती अशी आहे की, जिने मला कधी सोडलं नाही आणि सतत सोबत केली. यापूर्वी मी ज्याचेकडे राहत होतो. ते लोक मला नेहमी "तू फुकट गेलेला मुलगा आहेस", असे म्हणून हिणवायचे पण तू असं कधीच म्हटलं नाहीस. एकदा जेव्हा मी तुझ्या बटव्यातून २० शिलिंग काढून घेत होतो तेव्हा तू ते पाहिलस, पण तरीदेखील तू असं म्हणाली नाहीस की," आता मला कळलं या घरात कोण*

*चोर आहे ते'' मी नेहमी तुझे पैसे चोरत होतो. त्यावेळी फक्त तू एकदा माझ्याकडे पाहिलेस आणि म्हणालीस,'' हे बघ, ते पैसे मी बटव्यात ठेवले होते. कारण आता आपल्या छोट्या बेबीचा वाढदिवस आहे. तिला बाहुली आणायची होती.'' त्या प्रसंगानंतर मला पुन्हा चोरी करायची बुद्धी झाली नाही. जर चुकून माझ्या मनात कधी वाईट कृत्य करण्याचा विचार चमकलाच तर मला तुझा चेहरा दसू लागतो आणि मी तूझा आवाज ऐकू लागतो. मला प्रामाणिकपणे असे वाटते की तुझ्या त्या वागण्याने तू प्रत्येक वेळी मला वाचवलेस आणि मला आणखी बिघडू दिले नाहीस. मी आता नेहमीच चांगला वागेन म्हणजे तुला आणि माझ्या सर्व छोट्या भावंडांना माझी लाज वाटणार नाही.*

*जर माझ्या आयुष्यात तू मला भेटली नसतीस किंवा दुसरे कोणीतरी जिला मी आवडत नाही अशी कोणी व्यक्ती भेटली असती तर माझं काय झालं असतं कोणास ठाऊक ! माझ्या त्या दोन छोट्या भावंडांना हे कधीही कळता कामा नये की तू त्यांची खरी आई नाहीस. असं झाले तर मला खूप आनंद होईल. आणि त्यांना जर कधी काळी ते कळलं तर त्यांना माझ्याप्रमाणे वाटावं. माझी जन्मदाती कशी होती ती तर मला नीट आठवतच नाही. पण तिच्या जागी मी तुला मानलं आहे. तुझ्यापेक्षा कुणाची आई अधिक चांगली असेल असे मला वाटत नाही. ह्या रविवारी मातृदिन आहे. जेव्हा माझी लहान भावंडे हातात फुलांचा गुच्छ घेऊन तुला भेटतील, कविता म्हणतील त्यावेळी मी तिथे असायला पाहिजे होतं असं मला सारखं वाटतं आहे. मी जरी १९ वर्षांचा झालो असलो तरी तुझी आठवण आली की मला अजून मी लहानच आहे, असे वाटते. तू माझ्यावर पूर्ण विश्वास ठेव. फक्त मला चांगली आई नेहमी असायला हवी आहे. मला तुझी खूप गरज आहे.*

*तुझा*
*जॉर्ज.*

दुसरा एक मुलगा बालग्रामच्या बाहेर पडला व आता तो हॅम्बुर्गमध्ये नोकरी करीत आहे. त्याने आपल्या आईला पत्र पाठविले आहे.



*माझ्या अत्यंत आवडत्या आईस,*

*आता कुठे तुला पुन्हा पत्र पाठवायची संधी मिळाली आहे. मी येथे आल्यापासून, गेल्या कित्येक आठवड्यात मला काय काय करावे लागले याची तुला कल्पना येणार नाही. सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे आनलीझ व माझे लग्न झाले. तू आमच्या लग्नाला आली असतीस तर मला खूप आनंद वाटला असता. पण मला कळत होतं की नुकतीच तुझ्याकडे नवीन मुले आलेली होती आणि त्यांना सोडून येणे तुला शक्य नव्हते. त्या मुलांच्या मनःस्थितीची मला चांगली जाणीव आहे. कारण मी त्यातून गेलो आहे. मी या जगात अगदी एकटा होतो. जेव्हा मला तू भेटलीस आणि मला घर मिळालं. सुरुवातीला मी तुला खूप त्रास दिला. खूप दुःख दिलं. आणि माझी खात्री आहे की, आत्ता पण तुझी मान नकारार्थी हलवून तू म्हणत असशील की ह्याला लग्न करायची एवढी घाई काय झाली होती ? पण हे बघ आई, आता मी समजूतदार झालो आहे आणि मला लग्न करायची इच्छा आहे, मग ते आत्ता केले काय किंवा नंतर केले काय ? फरक पडणार आहे ? इथे हॅम्बुर्गमध्ये मला चांगली नोकरी आहे आणि माझ्या पगारात माझा व आनलीझचा संसार चांगल्या प्रकारे चालू शकेल याची मला खात्री आहे. ॲन उत्तम गृहिणी आहे आणि तिच्या चांगल्या स्वयंपाकाचे मला रोज अनुभव येतात. याशिवाय, ती हिशोबी आहे आणि तिच्या वयाच्या मुलींना तिच्यापासून पुष्कळ गोष्टी शिकता येण्याजोग्या आहेत. एक तरुण नवरा या नात्याने पण मी खूप सुखात आहे. एक चांगलं घर कसं असावं हे तुला महित आहे आणि म्हणूनच मी बहुतेक चांगली मुलगी शोधू लागलो आणि ती मिळाल्यावर लगेच हा आनंदाचा संसार थाटला. तुझ्याजवळ होतो त्याचप्रमाणे इथे पण मी अतिशय समाधानात रहात आहे. तुझी प्रतिमा माझ्या डोळ्यापुढे ठेवूनच मी या मुलीची निवड केली आहे. आपल्या आवडत्या माणसाकरता लहानमोठा त्याग करण्यात माणसाला नेहमीच आनंद वाटतो. आता आम्ही आमच्या घरात नवीन सामान, फर्निचर आणलं आहे. त्याचे वर्ण मी तुला पुढच्या पत्रात लिहिन. घर खूप आरामशीर आहे. होय आई, तुझा एक मानलेला मुलगा आता चर्तुभुज झाला आहे !''*

*तुझ्याकडची नवीन बातमी काय आहे ? त्यात ग्रेटीसचं अपँडिक्स काढले का ? मेरीचा अभ्यास कसा चालला आहे ? तुमच्या सर्वांची मला सारखी आठवण येत असते आणि तुमचं पत्र आलं की मला खूप बरं वाटतं. पुन्हा तुमची भेट केव्हा होईल ते आज सांगता येत नाही पण माझे विचार तुझ्या दिशेने नेहमीच प्रवास करतील. तू पाठविलेल्या तारेबद्दल मनःपूर्वक धन्यवाद. तुझ्या पत्राबद्दल पण. आणि तू जे माझ्यासाठी सर्व चांगले केलेस त्याबद्दल मी तुझा आभारी आहे. आपल्या सर्व कुटुंबियांना माझे प्रणाम सांग. पुन्हा लवकर पत्र पाठव. माझी काळजी करू नकोस आई, आणि माझ्या हार्दिक अभिवादनाचा स्वीकार कर.*

*हर्बर्ट*

## बालग्राम माता - हा उत्तम पेशा

बालग्राममध्ये येऊन काम करू लागल्यानंतर माता कशा बदलतात, व त्यांना त्यांच्या आयुष्याचे सार्थक झाले हे कसे वाटते हे ईस्टमध्ये काम करणाऱ्या एका मातेच्या खाली नमूद केलेल्या पत्राने विशद होईल.

"मी तेव्हा २२ वर्षांची होते, आणि एका कचेरीत एक डिझाईनर म्हणून काम करीत होते. माझे पुष्कळ मित्र होते. त्यातच एकदा मला एक तरुण इंजिनियर भेटला आणि माझे नशीब उघडलं. त्याने मला लग्नाची मागणी घातली, मी ती स्वीकारली आणि आनंदाच्या भरात मला सर्व जग एखाद्या परीच्या राज्याप्रमाणे सुंदर वाटू लागले. आमच्या लग्नाची तारीख ठरली. आम्ही एक घर शोधले. आणि भविष्यातील सर्व बेत ठरवून टाकले. आम्ही जी रोमांचकारक स्वप्ने बघत होतो, ती कदाचित जुन्या वळणाची असतील पण आम्ही अगदी सुखात होतो. नंतर एक दिवस मला माझ्या कचेरीत एक निरोप आला. एका बांधकामावर काम करताना माझ्या भावी पतीला अपघात झाला आहे आणि त्याला गंभीर स्वरूपाच्या जखमा झाल्या आहेत. त्याला बरे वाटावे म्हणून मी रात्रंदिवस देवाची प्रार्थना केली. डॉक्टरांचे शिकस्तीचे प्रयत्न पण व्यर्थ गेले. माझं जग दुभंगलं. मला कुणाशी बोलावसं वाटेना. आईबाप पण नकोसे झाले आणि मित्र पण भेटू नयेत असे वाटले. मी जे करत होते त्यात आता मला काहीच अर्थ वाटत नव्हता. माझ्या आयुष्यातले ते अंधारे दिवस, आठवडे आणि महिने होते. मी देवावर रूसले होते. जगावर रागावले होते.



एक दिवस 'बालग्राम संदेश' माझ्या हाती पडला. इतके दिवस मी ते मासिक कधी वाचलेच नव्हते. माझ्या आईला ते आवडत असे. पण मी लक्षच दिले नव्हते. पहिल्यांदा मला कळलं की बालग्रामला काम करण्यास माता हव्या आहेत. त्या एकट्या असाव्यात आणि अनाथ, उपेक्षित मुलांवर मातेप्रमाणे प्रेम करून त्याचा प्रेमाने सांभाळ करणाऱ्या असाव्यात. पहिल्यांदा आपण ह्या मुलाची माता होऊ शकतो हा विचार माझ्या मनातदेखील आला नव्हता. पण बालग्रामची कल्पना मला पसंत होती. तिथलं वातावरण, तिथल्या मातांचे जीवन आणि त्यांच्यावर सोपवलेली ती अनाथ, निराधार मुले यांविषयी माझ्या मनात कुतूहल होते. पण मी ह्या सर्व गोष्टी माझे मन दुसरीकडे कुठेतरी गुंतवावे म्हणून वाचीत होते इतकेच. मग मी माझ्या मित्रमंडळींना सांगत सुटले, की मी बालग्रामची माता म्हणून जाण्याचा विचार करीत आहे आणि ते ऐकून त्यांना खूप आश्चर्य वाटले. माझे पण आईवडील सुरुवातीला साशंक होते. पण माझ्या सर्व विचारांची मांडणी नीट केली आणि माता बनण्याचा निर्धार केला. आता मला या जगापासून पळून जायचं नव्हतं तर जगाशी मिळतं घेऊन रहायचं होतं. "पण तुझ्याजवळ खूप प्रेम आहे द्यायला." आई म्हणाली. पण तिच्या म्हणण्याचा अर्थ वेगळा होता आणि मला वेगळे वाटत होतं. मी माझा अर्ज पाठवून दिला.

आज माझ्याजवळ ९ मुले आहेत. मुलगे आणि मुली. त्यातली काही मुले सुरुवातीस फारच विचित्र होती. आणि त्यांनी अक्षरशः माझ्या सहनशीलतचा अंत पाहिला. पण अखेरीस मी त्यांना माझ्या प्रेमाने आणि विश्वासाने जिंकून घेतले. पुष्कळ वेळा आमच्या बालग्राममध्ये पाहुणे येतात. आणि प्रश्न विचारू लागतात, तेव्हा माझ्या चटकन् लक्षात येते की अरे, खरंच ही काही आपली स्वतःची मुले नाहीत पण माझा जीव त्यांच्यावर जडलेला आहे. क्षणभरच मला विचार पडतो व मी दुःखी पण होते. पण असं वर्ष कधी येतं का ? ज्या वर्षात काळेकुट्ट ढग पण दिसत नाहीत किंवा पाऊस पडत नाही ? आनंद पण कधी पूर्णतया निर्भेळ नसतो. म्हणून मी हे जीवन समाधानाने जगे. कारण माझी खात्री आहे की मी माझ्या मुलांच्यात प्रेम निर्माण करीत आणि त्यांच्या हृदयात सद्भावना जागृत करीन. मग मी पत्करलेला पेशा उत्तम आहे ना ?

## मायनरची भव्य गुप्त योजना

१९५५पासून मायनरच्या डोक्यात एक विचार सतत होता. तो काहीतरी ठरवित आहे हे आमच्या लक्षात आले होते पण त्याने सुरुवातीची चर्चा आमचे कोणाजवळच केली नाही. जेव्हा व्हिएन्नात त्याला काही काम असायचं तेव्हा तो व्हिनर-

वॉल्डपर्यंत मोटारीने जाऊन यायचा. तिथे उतरून आजुबाजूची वस्ती बघायचा. मधेमधे थांबून काळजीपूर्वक बघायचा. गाडीतून उतरून थोडं अंतर चालायचा आणि पुन्हा हलकेहलके गाडी चालवीत परत यायचा. त्या संध्याकाळी तो खूप प्रसन्न दिसायचा. २-३ वेळा मी त्याच्या बरोबर गेलो होतो. येताना आम्ही एखाद्या दुकानात जाऊन थंडगार पेय प्यायचो. मायनरला चांगली स्वच्छ वाईन पण आवडायची आणि ती त्याला मिळाली की तो खूष होऊन थोडी अधिक प्यायचा आणि त्याचा परिणाम जो व्हायचा त्यामुळे त्याची जीभ सैल सुटायची आणि त्याच्या मनातले लपलेले विचार बाहेर पडायचे. असेच एकदा व्हिएन्नापर्यंत जाऊन आल्यावर त्याने त्याच्या डोक्यात असलेली योजना व्यक्त केली. त्याला व्हिएन्नाच्या सरहद्दीवर एक मोठे भव्य चौथे बालग्राम बांधायचे होते. मला तशी शंका वाटतच होती पण मी ती बोलून दाखविली नव्हती. कारण मायनरच्या एकट्याच्या निर्णयाला मानणारा मी होतो. कुठल्याही योजनेची पूर्ण तयारी झाल्याशिवाय मायनर बोलून दाखवीत नसे पण आता आम्ही उत्साहरंजित होऊन ह्या बालग्रामची चर्चा करू लागलो.

"ते एक भव्य बालग्राम असले पाहिजे. माझ्यामते निदान २५ घरे तरी तिथे असली पाहिजेत." मायनर म्हणाला. त्याला लागणाऱ्या पैशांचा प्रश्न त्याने हाताने उडवून लावला. त्याच्या मनात कधी शंकादेखील येत नसे. काम चांगले असेल तर पैसा उभा राहतोच ही त्याची दृढ श्रद्धा होती आणि ही योजना चांगली होती यात शंकाच नव्हती. फक्त त्याच्या मित्रांना एकच चिंता वाटत होती की या योजनेसाठी लागणारे लाखलाख कुठून येणार ? जागतिक राजकारणात २ प्रसंग असे घडले, की त्यामुळे या कार्यक्रमाला चांगली गती मिळाली. ऑस्ट्रियाचा तह झाला आणि त्याचा परिणामस्वरूप इतर देशातील जे सैन्य ऑस्ट्रियात तळ ठोकून होते, ते परत स्वदेशी गेले आणि त्यामुळे व्हिएन्नाच्या आसपास स्वस्त दराने जमीन विकत घेणे शक्य झाले. मायनरची नजर एका जुन्या बगिच्यावर होतीच आणि त्याला ती जागा बालग्रामचे दृष्टीने फारच अनुकूल वाटत होती. आलेल्या संधीचा फायदा तत्काळ करून घेणे फार अगत्याचे होते. कारण जमिनीच्या किंमती एका रात्रीच्या पोटात पण वाढण्याची चांगलीच शक्यता होती. जवळची सर्व शिल्लक मोडून ही जमीन त्याने विकत घेऊन टाकली.

दुसरी जागतिक घडामोड म्हणजे एका वर्षात हंगेरी येथे झालेले बंड. शेकडो, हजारो लोक हंगेरीची सीमा ओलांडून ऑस्ट्रियात घुसले आणि त्यांनी शाळा, मोठ्या इमारती, वखारी मिळेल त्या जागेत ते वस्ती करून राहू लागले. ह्या निर्वासितांचे हाल अति हृदयविदारक होते. त्यांचे लोंढेच्या लोंढे कष्टाने प्रवास करून येत होते. त्यात शेकडो मुले होती. त्यांची घरे नामशेष झाली होती व आईवडिल परागंदा झाले होते.



त्यांच्यासाठी लवकरच काहीतरी व्यवस्था करणे भाग होते. हिंटरब्रुल (Hinterbruhl) येथे ताबडतोब एक मोठे बालग्राम बांधण्याचा आदेश देण्यात आला. एकाच वेळी २० घरे बांधून तयार करायचे ठरले.

दोन आर्किटेक्ट कंबर कसून कामाला लागले. एका बांधकाम करणाऱ्या कंपनीने जमीन फोडून सरळ करायचे अवघड व महाग काम अंगावर घेतले. बुलच्या मागे असलेला तो जुना बगिचा या कामासाठी निवडला गेला. येथेच बसून त्या प्रसिद्ध फ्रान्स शुर्बेट (Franz Schubert) नावाच्या कवीने त्याची विख्यात कविता लिहिली होती. Am Bruhremuvordem Tore खूप मोठे बांधकाम सुरू झाले. प्रचंड मोठे ट्रॅक्टर्स आणून जमिनीचे तुकडे उचलून घेऊन जमीन सपाट केली गेली. क्रेनस् लावून विटांचे ढीग इकडून तिकडे हलवू लागले. सतत मोठमोठ्या ट्रक्सच्या खेपा सुरू झाल्या आणि त्यातून वाळू आणि खडी येऊ लागली. ह्या सर्व गडबडीत मध्यभागी हर्मन मायनर बसून शांतपणे आपला पाईप ओढीत असे. त्याच्या डोक्यात योजना आकार घेऊ लागली होती. हे एवढे मोठे बालग्राम चालविण्यासाठी त्याला पैसेच पैसे जमा करायचे होते.

आणि मायनरने ते जमविले. मोठमोठ्या औद्योगिक कंपन्या व बँकांच्या डायरेक्टर्सना भेटून, त्याने त्यांच्याकडून घरे बांधण्याचे आश्वासन मिळविले. व्हिएन्नामधे राहणाऱ्या प्रत्येक माणसाला त्याने एक विनंतीपत्र पाठवले. 'प्रेमाची मागणी'. १९५६च्या मातृदिनाचे दिवशी त्याने शहरातील सर्व स्त्रियांना खालीलप्रमाणे आवाहन केले.

"व्हिएन्नात राहणाऱ्या मातांनो आणि महिलांनो, ईम्स्ट येथील बालग्रामात जो एक छोटा प्रसंग घडला, त्याचे वर्णन करून मी या पत्राची सुरुवात करीत आहे. काही आठवड्यांपूर्वी एका बालसदनातील ९ मुलांपैकी ३ मोठी मुले माझ्याकडे आली. माझ्या ऑफिसात शिरताना त्यांना संकोच व लाज वाटत होती. त्यांच्या मनातून त्यांना एक मोठी विनवणी करायची होती.

'आमच्या छोट्या मेरीचा वाढदिवस परवाचे दिवशी आहे. तर तुम्ही कृपा करून त्या दिवसासाठी आमच्याकरता एक छान पुष्पगुच्छ घेऊन याल का ? तुम्ही तो इन्सब्रुकवरून आणा. ती फुलं खूप सुंदर निवडून आणा. त्याला नक्षीदार कागद गुंडाळून आणा आणि त्याभोवती एक मोठा रिबनचा बो बांधून आणा. आमच्या मेरीला फुलं खूप आवडतात."

हा प्रसंग प्रिय मातांनो, आणि पत्नींनो, माझ्या हृदयाला स्पर्शून गेला. तो छोटा हाइन्स ज्या दिवशी प्रथम बालग्रामात आला तेव्हा मी तिथे होतो. जणू काय तो एक दुःखाचे गाठोडेच बनून आलेला होता. मी छोट्या ईलाला बापाचा क्रूर मार खाऊन

काळीनिळी पडलेली पाहिली आहे. छोटा सेपल आपल्या आईवडिलांच्या समाधीजवळ बसून अजून केविलवाणा रडतो. काळानं एका भयानक अपघातात त्याच्या आई-वडिलांना हिरावून नेलेलं आहे. मी ओंगळवाण्या घाणेरड्या परिस्थितीतून मुलांना गोळा केलं आहे. निष्पाप, छोटी मुलं. ह्या लहानशा वयात त्यांना दारिद्र्य व दुःख याशिवाय दुसरं काही ठाऊकच नाही, आणि माणूस राहू शकणार नाही अशा जागी त्यांना ढकलून दिलेलं आहे. अशा मुलांना उचलून मी बालग्रामात आणून ठेवलं व आता माझे नशीब थोर आहे की, ह्याच मुलांना एका बाईने स्वतःच्या पदराखाली मायेने घेतलं आहे. मुलांचा पण ह्या मानलेल्या आईवर स्वतःच्या आईइतका विश्वास आहे आणि त्यामुळे या बालगमातेचे जे उपकार झाले आहेत, ते वर्णन करण्यास माझ्याजवळ शब्द अपुरे आहेत. त्या तिघा मुलांनी माझ्या हातात जे थोडे पैसे ठेवले होते, त्यातून काही हा मोठा सुंदर पुष्पगुच्छ विकत घेणे मला शक्य नव्हते. पण नंतर त्यांच्या आईने मला आणखी पैसे आणून दिले. मी जेव्हा ती वाढदिवसाची फुले विकत घेत होतो, तेव्हा मला माझ्या आवडत्या दिवंगत आईची आठवण झाली. ती मला ज्याप्रमाणे आपली वाटते, त्याचप्रमाणे बालग्रामच्या माता पण ह्या मुलांना आपल्या वाटतात. त्या माता ह्या मुलांसाठी सर्वतोपरी त्याग करतात. आनंदाने त्यांचा सांभाळ करतात. व आयुष्यभर त्यांच्या खस्ता खातात. मला माझ्या अनेक हजारो माता-भगिनींची पण आठवण आली. त्या बालग्रामच्या मैत्रिणी बनल्या व आश्रय-दात्या पण झाल्या. वर्षानुवर्ष त्या लहानमोठ्या देणग्या नियमितपणे पाठवित आहेत आणि त्यामुळे आपल्या ऑस्ट्रियातील बालग्रामचे काम उत्तम रीतीने उभारले आहे, आणि व्यवस्थित पद्धतीने चालू आहे.

मला रोज असंख्य पत्रे येतात आणि हे बालग्राम सुरू केल्याबद्दल लोक माझे अभिनंदन करतात. तुम्ही जे माझे आभार मानता त्याची माता, भगिनींनो मला खरंच लाज वाटते. वास्तविक पाहाता मी तुमचे आभार मानायला हवेत. माझ्या माता-भगिनींनो, तुमच्या प्रेमावर हे बालग्राम उभारले गेले आहे ह्याची मला आंतरिक जाणीव आहे. त्याबद्दल मी तुमच्यापुढे नतमस्तक आहे. तुम्ही जो माझ्यावर विश्वास टाकलात, आणि जी मदत मला केलीत, त्याबद्दल मी हात जोडून तुमचे आभार मानतो. पण माझे हात रिकामे मात्र नाहीत. मी आता व्हिएन्नाला लवकरच येत आहे. व्हिएन्नाच्या हद्दीवर आपण आता चौथे ऑस्ट्रियन बालग्राम बांधणार आहोत. मी लवकरच हे आश्वासन पूर्ण करणार आहे. आमच्या मुख्यालयात तातडीचे विनंती अर्ज येत आहेत व हे काम लवकर व्हावे म्हणून लोक मागे लागले आहेत. त्या उद्ध्वस्त मुलांची आत्यंतिक गरज माझ्या हृदयात नवीन धैर्य निर्माण करते आहे आणि म्हणूनच मी तुम्हाला खालील ओळी लिहून विनंती करीत आहे.



मला ह्या बालग्रामच्या उभारणीकरता शक्यतो सर्व सहाय्य करा. ह्या व्हिएन्नाच्या आवडत्या भूमीत आपण इम्स्टसारखे एक सुंदर बालग्राम बांधूया. छोट्या अनाथ मुलांसाठी घर, तिथे त्यांना मातेचे प्रेम मिळेल व त्यामुळे आंतरिक सुरक्षितता वाटेल. एक नवी कल्पना आपण मूर्त स्वरूपात आणू. ज्या मुलांना आईबाप नाहीत अशा मुलांना परमेश्वराला अभिप्रेत असलेले शक्य तेवढे नैसर्गिक कौटुंबिक वाता-वरण निर्माण करून देऊ या. त्यात एक परिवार राहील. मुलाला प्रेमळ आईचे सुख मिळेल आणि आनंदी भावाबहिणींचा सहवास पण लाभेल.

माता-भगिनींनो, मला तुमच्या कष्टाची कल्पना आहे. त्या कष्टांची कधी कोणी विषेश कदर पण करीत नाही हे पण मला माहीत आहे. रोजचे दैनंदिन जीवन सुरळीत चालावे म्हणून तुम्ही किती त्रास घेता याची मला जाणीव आहे आणि म्हणूनच मी तुमच्याकडून फार मोठ्या त्यागाची अपेक्षा करीतच नाही. मी फक्त तुम्हाला एकच विनंती करतो की, आमची जी मित्रांची व आश्रयदात्यांची संघटना आहे, त्यात तुम्ही सामील व्हा. ऑस्ट्रियातील बालग्रामासाठी फक्त महिन्याला एक शिलिंग पाठवून द्या. हा एक शिलिंग जेव्हा खूप लोकांकडून मिळेल तेव्हा त्यातून खूप काहीतरी चांगले निर्माण होईल. आमच्या बालग्राम चळवळीचा तो मुख्य पाया आहे. जगात जी मुले एकटी आहेत, प्रेमावाचून उघड्यावर तळमळत पडली आहेत त्यांना यातून एक नवीन घर देता येईल. एका आनंदी बालपणाचा अनुभव त्यांना मिळेल. एक उज्वल भविष्य आणि सन्मानाचे जीवन त्यांना मिळेल.

बालग्रामच्या मुलांचा प्रतिनिधी म्हणून त्यांच्यासाठी मी तुमचे आभार मानतो आहे आणि तुम्हाला हार्दिक शुभेच्छा पाठवीत आहे.

तुमचा विनित, हर्मन मायनर

व्हिएन्नामधील बालग्रामचे ऑफिस अगदी लहान आहे पण अजूनदेखील हर्मन मायनर तिथेच बसतो. ती खोली इतकी लहान आहे की, तिथे फक्त एक लहान टेबल व जेमतेम दोनच खुर्च्या राहू शकतात. इथेच त्याने अनेक लोकांच्या गाठीभेटी घेतल्या आणि इथेच लोकांनी त्याच्यासमोर टेबलावर शिलिंगावर शिलिंग ठेवून त्याचा ढीग रचला. एकदा एक म्हातारी बाई एक छोटे पोते घेऊन आली. गेली ५० वर्षे तिने त्यात छोटी नाणी साठवून ठेवली होती. आता तिला ह्या पैशांतून जीवन तयार करायचे होते. एका पेन्शनरने कोंदणात बसवलेले सोन्याचे लॉकेट आणून दिले. चित्रे, दाग-दागिने, शेअर्स, साठविलेली पोष्टाची तिकिटे, सर्व वस्तूंचे दान हर्मन माय-नरला मिळत असे. एका गृहिणी मातेने लिहिले होते, "प्रिय हर्मन मायनर, मी या

पत्रासोबत १०० शिलिंग्ज् पाठवत आहे. इतकी रक्कम मी तुम्हाला दरमहा मी जिवंत असेपर्यंत पाठवीन. माझा मुलगा निर्वतला आहे आणि आता माझे म्हणण्यासारखे मला जगात कुणी उरले नाही. म्हणून मला त्या गरीब निराधार मुलांना मदत करावीशी वाटते.''

उद्योगपतींनी विटा, सिमेंट, पाईप, इमारती लाकूड, स्टोव्ह, विजेच्या वायर्स, दरवाजाच्या मुठी, गालीचे, अमूल्य अशा अनेक विविध वस्तू पाठविल्या. व्हिएन्नातील सर्वात मोठ्या बालग्रामच्या उभारणीसाठी लोकांनी प्रेमाने दिलेल्या दान वस्तूंची ती एक मोठी मिरवणूकच होती.

''मला हे नक्की माहीत होतं, की व्हिएन्नाचे सोन्यासारखे शुद्ध अंतःकरण मला कधीच ऊणे पडू देणार नाही. आता मी या व्हिएन्नात राहाणाऱ्या लोकांसाठी असे एक बालग्राम बांधीन, की प्रत्येकाला त्याचा अभिमान वाटला पाहिजे.'' मायनर म्हणाला.

आणि जेव्हा त्या बालग्रामचा उद्घाटन-समारंभ झाला, तेव्हा व्हिएन्नातून हजारो लोक तिथे उपस्थित राहातील. मायनरने सर्वांचे मनःपूर्वक स्वागत केले. यावेळी प्रथमच व्हिएन्नातील सर्व उच्चभ्रू लोक, राजकारणी, उद्योगपती आणि श्रीमंत सर्वजण एकत्र आले. यापैकी एका राजकीय पुढाऱ्याने भाषण केले. तो म्हणाला, ''ऑस्ट्रियामध्ये ज्या ज्या लाकांनी जबाबदारीची कामे अंगावर घेतली आहेत, त्यांना स्वतःच्या कामासोबतच अनेक चिंता पण स्विकाराव्या लागल्या आहेत. त्यात मुख्य चिंता उपेक्षित मुलांची आहे. जो मनुष्य ह्या आपल्या चिंतेत सहभागी होतो आणि ती दूर करण्यास मदत करतो, त्याला आपण धन्यवाद दिले पाहिजेत.''

आपली शासनाची खाती पुष्कळशी कामे करतात, पण त्यांना आणखी पण खूप कामे असतात. अनेक खात्यांचे मंत्री पण जबाबदारीने काम उरकीत असतात. पण जी मंडळी स्त्रिया आणि पुरूष बालग्रामसाठी काम करतात, ते फक्त कामाविषयी वाटणाऱ्या प्रेमामुळे करीत असतात. त्यांच्या अंतःकरणात बालग्रामचे ध्येय सतत प्रज्वलित आहे आणि म्हणूनच ते गरजू मुलाला कायम मदत करीत असतात. अशांना आपण मदत करण्यात आपलाच गौरव आहे, हे कुणालाही कबूल करावे लागेल. कालच मी हंगेरीहून आलेल्या निर्वासितांच्या छावण्यांना भेट दिली होती. तिथे मी बरीच मुलेपण पाहिली. पण त्यांच्या चेहऱ्यावर कुठल्याही तऱ्हेची वेदना मला दिसली नाही. इतर निर्वासित खूप वंचित, दुःखी, त्रस्त दिसत होते. पण ही मुले मात्र हसत होती. कारण काय ? कारण त्यांच्या आईनं त्यांना जवळ घेतले होते. त्यांना ठाऊक होते की आपले आईबाप आपल्याजवळ आहेत आणि ते जवळ आहेत म्हणजेच त्यांचे ते घर आहे. ते निर्वासित नाहीत. ते पाहून माझ्या लक्षात आहे की, ज्या



मुलांना आईबाप नाहीत त्यांना एक घर वसवून देणे हे किती महत्त्वाचे आहे ! घर म्हणजे काही फक्त तलाव, जंगल, टेकड्या किंवा जमीन नाही. घर म्हणजे प्रेम, आपलेपणा आणि म्हणूनच आपल्याला ह्या बालग्रामाच्या वातावरणात, प्रेमाची ऊब अनुभवायला मिळते. इथे काम करणाऱ्या बालमातांच्या हृदयात ही प्रेमाची ज्योत अखंड तेवत असते आणि या प्रेमभावनेचा आविष्कार हृदयाबाहेर होऊन सर्व वातावरणाला मायेची ऊब देत असतो.

मातृदिनाचे ते विनंतीपत्रक अधिक देणग्या मिळवण्यासाठी पाठविले होते. आम्हाला ५,००,००० नवीन सभासद करायचे होते. या बालग्रामचा सर्व खर्च तसेच ३ बालग्रामांचा खर्च, (ईम्स्ट, आलस्यूस्टर आणि लिंझ) चालवायला वर्षाकाठी लाखोंनी पैसे लागणार होते. यापैकी समाजकल्याण खात्याकडून आम्हाला देणगीच्या रूपाने जमा करणे भाग होते.

ह्या नवीन सुंदर बालग्रामाचा बांधकाम खर्च एकदम अचानक येऊन थडकला होता. कारण मायनरने आम्हाला ह्यापूर्वी त्याची कल्पना दिली नव्हती. त्यामुळ खर्च सतत वाढतच होता. त्याचबरोबर आम्हाला या बालग्रामासाठी चांगल्या मातांची निवड पण करायची होती. पण ह्या सर्व अडचणीतून आम्ही पार पडलो. एकदा पेटलेली ज्योत तेवत ठेवलीच पाहिजे. विझू देता उपयोग नाही. आता आमच्या डोक्यात एकच विचार, हे हिंटरब्रूल बालग्राम बांधून झालेच पाहिजे. आणि समाज-शिक्षणाच्या जागतिक पद्धतीत त्यामुळे क्रांतीकारक बदल झाला पाहिजे.

मी दुसऱ्या दिवशी हिंटरब्रूलला जाणार होतो ह्मणून आदल्या दिवशी संध्याकाळी उलरिशला बरोबर घेऊन फिरायला गेलो होतो. आम्ही दोघे अलीकडे एकमेकांच्या खूपच जवळ आलो होतो. तो मला वडिलांप्रमाणे मानीत होता. आणि मी पण मनाशी ठरवले होते, की मी त्याला स्वतःच्या मुलाप्रमाणे वागवीन. त्यानेच तर मला या बालग्राम चळवळीत ओढून घतले होते. त्याचे व माझे नशीब आता आमची फारकत करणार होते. मी त्याच्या खांद्यावर हात ठेवला आणि म्हटले, ''उलरिश मला तुझी लाज वाटेल असं काही करू नकोस आणि जेव्हा तुला माझी गरज लागेल तेव्हा हे लक्षात ठेव की मी नेहमी तुझ्यापाशी आहे.''

एक वर्षानंतर हिंटरब्रूलच्या बालग्रामात २०० मुले राहू लागली. २५ सुंदर घरे असलेली ती वसाहत एखाद्या गावाप्रमाणे दिसू लागली. ईम्स्टप्रमाणे येथे पण आम्ही मधोमध एक कारंजे बांधले. एका उंच टेकडीवर बगिचामध्ये आम्ही सुरुवातीलाच एक मोठे समाजमंदिर बांधून काढले होते आणि त्याची शिल्परचना इतर वातावरणाशी जुळणारी केली होती.

हिंटरब्रूलचे हे मोठे बालग्राम निर्माण झाल्यामुळे ते सर्व युरोपखंडातील भव्य

बालग्राम बनले आणि त्यामुळ आता हर्मन मायनरच्या विचाराची ज्योत अखंड तेवत राहिली. ईम्स्टमध्ये ही कल्पना राबविण्यास खूप त्रास झाला होता. कारण ती कल्पना अजून कसोटीला लागायची होती, पण आता ती कल्पना हिंटरब्रूलमध्ये सर्व कसोटीत तावून सुलाखून निघाली होती आणि एक प्रतीक म्हणून जगाला दाखवता येत होती. त्या कल्पनेचा सुंदर विलास या बालग्रामात होत होता. या नवीन चळवळीचे ते मुख-चिन्ह होते. बालग्रामचे काम आता पहिली प्रयोगाची अवस्था संपवून धीम्या गतीने पण निश्चित पावलांनी, माणूसकीवरील श्रद्धेचे मूर्तिमंत प्रतीक बनत होते. हे बालग्राम पाहायला सर्व जगातून तज्ज्ञ मंडळी येत होती. वर्तमानपत्रकार दुरून आणि जवळून येऊन गर्दी करीत होते. राजे आले, तसेच अध्यक्ष पण आले. शेकड्यांनी व हजारोंनी सबंध ऑस्ट्रियातून लोक आले. व्हिएन्नाचे लोक तर सर्वात आघाडीवर होते आणि त्यापैकी प्रत्येकाला आपण या बालग्रामचे जनक आहोत असा सुखद अनुभव आला. त्या पेन्शनराला पण वाटले की, त्याचा दरमहा पाठविलेला एक शिलिंग या कामी आला, तसेच त्या उद्योगपतीला पण आपल्या नावाची पाटी त्या बालसदनावर झळकताना पाहून समाधान वाटले. ह्या बालग्रामने हे स्पष्टपणे सिद्ध केले की सामूहिक केलेला त्याग नेहेमी काहीतरी भव्य व चांगल्या गोष्टींची निर्मिती करतो. आजकालच्या ह्या भौतिकवादी अहंकारी जगात पण हे सत्य उठून दिसते. लोकांची जी उदासीनता असते, ती झटकून टाकली पाहिजे. जर आपण त्यांच्यापर्यंत पोचलो तर त्यांना सत्कर्म करण्याची इच्छा होते. लोकांपर्यंत कसे पोचायचे ही कला हर्मन मायनरला चांगल्या रितीने अवगत होती आणि त्यामुळे आता कोणीही मनुष्य कामाकडे कानाडोळा करूच शकत नव्हता.

## युरोपातील विजययात्रा

ज्याप्रमाणे फेडरेल रिपब्लिक जर्मनीत झाले तसेच आता फ्रान्स देशात पण घडले. एक दिवस एका पब्लिक स्कूलच्या शिक्षकाने (Gilbert Cotteau) एक लहानशी ईम्स्ट बालग्रामाविषयीची बातमी पेपरमध्ये वाचली आणि त्याचे विचारचक्र सुरू झाले. १९५६ मध्ये जेव्हा शाळांना सुट्टी झाली तेव्हा तो स्वतः टिरोलला गेला. तिथल्या शेरे पुस्तकात त्याने खालील गोष्टी लिहिल्या.'

"उपेक्षित मुलांना मदत देण्याची सुंदर अभिनव पद्धती. मी यासाठी फ्रान्समध्ये प्रचार करीन."

त्याला वाटत होते की हे काम फार सोपे आहे. पुन्हा एक दिवस तो टिरोलला आला व त्याने हर्मन मायनरला भेटून त्याचा सल्ला विचारला. आम्ही या फ्रेंच माणसा



बरोबर खूप वेळ बोललो, आणि तो परत फ्रान्सला जाण्यापूर्वी आम्ही एकमेकांचे मित्र बनलो. त्याने आपल्या शिक्षकाच्या पेशाला रामराम ठोकला आणि तेव्हापासून त्याने आपला पूर्ण वेळ फ्रान्समध्ये बालग्राम उभे करण्यासाठी देण्याचे ठरविले. त्याने स्वतःच्या आयुष्याचे ते मिशन मानले. एक वर्षानंतर मायनर आणि मी उत्तर फ्रान्समध्ये (Busigny) येथे पहिले छोटे बालग्राम पहायला गेलो. बालग्रामचा एक आदर्श नमुना फ्रान्स देशात तयार झाला होता आणि एका यशस्वी विकासाची ती वाटचाल होती. आज बेल्जियमच्या सरहद्दीपासून अगदी खालच्या टोकाला म्हणजे मोर्सेलिसपर्यंत फ्रान्स देशात १० बालग्रामे अस्तित्वात आहेत. पुन्हा एकदा ही प्रचिती येते की मायनरच्या विचारसरणीने प्रभावित होऊन एका माणसाने त्यात संपूर्ण जीवन खर्च करून हे काम करून दाखवले.

आता इटली देशामध्ये पण बालग्रामाविषयी लोक आवाज उठवू लागले होते. तिथे पण मायनरने आपल्या अंगच्या कौशल्याने चांगल्या माणसांची निवड केली आणि एका इटालियन बालग्रामची निर्मिती झाली. ट्रेंटो शहरात हे बालग्राम बांधून कामाची सुरुवात झाली आणि नंतर थोड्याच दिवसांत ब्रिंडसीच्या जवळ ओस्टूनी येथे दुसरे बालग्राम बांधण्यात आले.

मला बऱ्याच भाषा अवगत होत्या आणि परदेशातील पण अनेक अनुभव माझ्या संग्रही होते. त्यामुळे बालग्रामच्या सुरुवातीपासूनच सोसायटीचे याबाबतीतील काम आपोआप माझ्याकडे आलेले होते. कारण हळूहळू आमच्या कामाचा विस्तार ऑस्ट्रियाच्या बाहेर होऊ लागला होता. लवकरच एक गोष्ट माझ्या ध्यानात आली की, नवीन बालग्रामे सुरू करण्याची चळवळ तर आम्हाला प्रेरित करावीच लागेल, पण त्याचबरोबर ही नवीन बालग्रामे आपल्या मूळच्या योजनेला धरून आहेत हे पण आम्हाला काळजीपूर्वक पहावे लागेल. त्यामुळे आता आंतरराष्ट्रीय बालग्राम संस्थेचे जे नवीन रोपटे लावले जात होते त्याची काळजी घेऊन त्याची नीट वाढ होईल हे पाहाणे जरूर होते. नाहीतर हे वाढणारे झाड खुरटलेले व वाकडेतिकडे झाले असते. हे सर्व नीट, व्यवस्थित करण्यासाठी एक नवीन आंतरराष्ट्रीय संघटनेची स्थापना करणे आवश्यक होते.

१९६० साली नोव्हेंबरला स्ट्रॉसबर्ग येथे "युरोप खंडाची बालग्राम सोसायटी" स्थापन झाली. आत्तापर्यंत जेवढी बालग्रामे निर्माण झाली होती, त्यांचे प्रतिनिधी तेथे जमले. ऑस्ट्रिया, जर्मनी, फ्रान्स, इटाली व आम्ही सर्वांनी मिळून निर्णय घेतला की आपण आपले नाव 'एस ओ एस चिल्ड्रेनस् व्हिलेजेस' ठेवू व चिन्ह हे कायदेशीररीत्या नोंदवून घेऊ. ज्या नवीन संस्था आपल्या तत्त्वांना मानतील व आपल्या पद्धतीचा अवलंब करतील, त्यांनाच आपण नियमित सभासद म्हणून मानू. ही सर्व

तत्त्वे / नियम हर्मन मायनरने लिहून काढले आणि ते आजतागायत लागू आहेत.

एस ओ एस बालग्राम ही संस्था निराधार मुलांना परमेश्वर नियोजित नैसर्गिक घरात कुटुंबात वातावरण मिळवून देण्याचे काम करील. त्यांचे मुख्य काम म्हणजे आईबापविरहित किंवा वंचित मुलांना आधार देऊन त्यांच्या गरजा पुरवून त्यांना सामाजिक संरक्षण देणे. एस ओ एस बालग्राम या संस्थेतील शिक्षण हे कौटुंबिक शिक्षण आहे आणि म्हणून प्रत्येक बालग्रामात अशी काही कुटुंबाची रचना केलेली असेल की त्या कुटुंबात राहून मुलांना योग्य ते शिक्षण मिळत राहील. प्रत्येक कुटुंबात ७ ते ९ मुले राहातील. त्यात मुली व मुलगे असतील. ती सर्वजण वेग-वेगळ्या वयाची असतील आणि ती भावाबहिणींप्रमाणे एकत्र वाढतील. अशा एस ओ एस कुटुंबाची प्रमुख कुटुंबकर्ता ही 'आई' असेल. ही बाई एकटी असेल आणि तिच्यावर सोपविलेल्या सर्व मुलांचा संभाळ ती आईप्रमाणे करील आणि या मातेच्या चांगल्या कामाला ती स्वतःचे आयुष्य वाहून घेईल.

ह्या एस ओ एस बालग्रामातली मुले नैसर्गिक कुटुंबातील मुलांप्रमाणेच तशा वातावरणात वाढतील. प्रत्येक कुटुंबाला स्वतःचे असे एक घर असेल, आणि ते घर चालविण्याची जबाबदारी त्या कुटुंबाची राहील. बसण्या-उठण्याची (ओटीवरील) खोली आणि घरगुती स्वयंपाकघर असल्यामुळे कौटुंबिक वातावरण निर्माण होईल आणि त्यात मुलाला सुरक्षितता वाटेल.

एस ओ एस बालग्रामात राहणाऱ्या सर्व मुलांचा येथील वातावरणाशी निकटचा संबंध जोडलेला असेल. इतर मुलांपेक्षा ती अलग किंवा वेगळी आहेत असे त्यांना वाटणार नाही. बालग्रामची उभारणी करताना मुले आणि यांच्यामध्ये अडसर निर्माण होईल अशी प्रत्येक गोष्ट कटाक्षाने टाळली जाईल. त्याचप्रमाणे त्यांच्या बालग्रामच्या स्वतंत्र शाळा असणार नाहीत. शहरात ज्या शाळा असतील, त्यात ही मुले जातील व तिथे त्यांचे शालेय व धार्मिक शिक्षण होईल.

एस ओ एस बालग्रामात ही मुले मोठी होऊन मार्गाला लागेपर्यंत त्यांचा सांभाळ केला जाईल. त्यांचे बालसदन हे त्यांचे कायमचे घर राहील. शालेय सक्तीचे शिक्षण पूर्ण करीपर्यंत साधारण ही मुले बालसदनात राहतील. नंतर जेव्हा ते उद्योगधंद्याचे व्यावसायिक शिक्षण घेण्यास बाहेर पडतील, तेव्हा त्यांच्यासाठी मुलांसाठी स्वतंत्र व मुलींसाठी स्वतंत्र असे निवास बांधले जातील.

कोणत्या मुलाला एस ओ एस बालग्राममध्ये प्रवेश द्यायचा हे त्या मुलाच्या गरजेवर अवलंबून राहील. फक्त शारीरिक व मानसिकदृष्ट्या निरोगी मुलांनाच प्रवेश मिळेल. ही मुले सज्ञान होईपर्यंत बालग्रामच्या कमिटीच्या देखरेखीखाली राहतील. प्रत्येक मुलाला तो ज्या धर्माचा असेल, त्या धर्मातच वाढविले जाईल. एका बाल-



सदनात एका धर्माची सर्व मुले राहतील. ही एस ओ एस बालग्राम म्हणजे आधुनिक समाजकल्याणाच्या कल्पनेतील अनाथालये आहेत. त्यांचे हे काम आहे, की त्यांनी शासकीय व खाजगी संस्थांना उत्तेजन देऊन प्रतिकूल परिस्थितीला बळी पडलेल्या अनाथ मुलांच्या संरक्षणासाठी ही योजना राबविण्यासाठी मदत करणे.

एस ओ एस बालग्राममध्ये वाढलेल्या मुलांना माणुसकीचा सन्मान व आंतर राष्ट्रीय विचारसरणीचे शिक्षण दिले जाईल. जगाचा शांततामय विकास सर्व प्रकारच्या स्वातंत्र्याची स्थापना करण्यासाठी ही शिकवणच होईल.

आंतरराष्ट्रीय सोसायटीच्या स्थापनेची जी सर्वसाधारण सभा झाली, त्यात हर्मन मायनर यांची अध्यक्ष म्हणून व माझी जनरल सेक्रेटरी म्हणून निवड झाली. आम्हा दोघांना ही कल्पना कधीच आली नव्हती की आमची लहानशी संस्था अवघ्या १५ वर्षांच्या कालावधीनंतर एक जागतिक स्वरूपाची संघटना म्हणून विकसित होईल, ५३ देशांतल्या ६२ संस्था त्याच्या सभासद बनतील आणि सुमारे १०० बालग्रामांची देखरेख आम्हाला करावी लागेल. त्यावेळी आम्हाला आमच्या युरोपीय संस्थेचाच गर्व होता, कारण आमची चळवळ ऑस्ट्रियाच्या हद्दी ओलांडून बाहेर पडली होती व इतर युरोपातल्या देशांत फैलावत होती.

युरोपातील चळवळीचा हा फैलाव आणि प्रभाव आता कुणीही थांबवू शकत नव्हते. नंतरच्या काही वर्षांत ह्या चळवळीने प्रस्थापित समाजसुधारणांना अगदी वर उत्तरेत फिनलंडमध्ये आणि दक्षिण युरोपात स्पेन व पोर्तुगाल या देशांत पण नवीन वळण दिले.

फिनलंडमध्ये एक प्रौढ कुटुंब राहात होते. त्यांना मूलबाळ नव्हते. त्यांना आमच्या योजनेविषयी खूप उत्सुकता वाटू लागली. आम्ही, मी व हर्मन मायनर ह्या निस्तेज आणि बावळट वाटणाऱ्या कुटुंबाला भेटायला गेलो, जेव्हा ह्या जोडप्याने सांगितले की, त्यांना फिनलंडमध्ये एक बालग्राम बांधायची इच्छा आहे. तेव्हा आम्ही दोघांनी एकमेकांकडे चटकन् बघितले. ह्या छोट्याशा दिसणाऱ्या माणसाची कुवत काय आहे? तो अगदी हळू व चाचरल्या आवाजात मोडक्या तोडक्या जर्मन भाषेत बोलत होता व सांगत होता की त्याचे सर्व उरलेले आयुष्य तो ह्या कामासाठी वाहून टाकायला तयार आहे! मायनरला जी लोकांची पारख करण्याची निसर्गदत्त देणगी होती, ती पण यावेळी बरोबर ठरली नाही. आम्ही जरा आखडलो व मनात साशंक राहिलो. आम्ही आमच्या बऱ्याचशा अटी त्याला सांगितल्या. आणि नंतर त्यांची पूर्ती झाल्यावर बालग्राम सुरू करायचे की नाही ते ठरवू असे म्हणालो. तो लहानसा फिन मनुष्य, आल्बिन गेबहार्ड (Albin Gebhard) थोडासा निराश होऊन हेलसिंकीला विमानाने परत गेला. पण त्याने पुन्हा आमच्याशी संपर्क साधला. आमच्या सर्व

अटींची पूर्तता केली. त्याने स्वतःच्या शिलकीतून हेलसिंकीजवळ टापिओला ह्या उद्यानांच्या शहरात एक सोईस्कर अशी जागा विकत घेतली आणि एका प्रसिद्ध फिलिश आर्किटेक्टकडून घरांचा नकाशा पण विनामूल्य बनवून घेतला. त्याने खूप सभासद करून घेण्याची मोहीम सुरू केली आणि ऑस्ट्रियाचे उदाहरण डोळ्यांसमोर ठेवून त्याने फिनिश भाषेत 'बालग्राम संदेश' छापायला सुरुवात केली. त्याने स्वतः भोवती निःस्वार्थी पण पत असलेल्या मंडळींना जमा केले, वर्तमानपत्रांना मुलाखती दिल्या आणि सरकारी समाज-कल्याण खात्यात खळबळ उडवून दिली. त्याने आपल्या निश्चयी स्वभावाने सतत परिश्रम करून, शून्यातून पहिले बालग्राम फिनलँडमध्ये सुरू केले.

मी जेव्हा प्रथमच ते बालग्राम पाहिले आणि जेव्हा ती सुंदर सोनेरी केसांची मुले व मुली मला भेटायला आली, तेव्हा माझी खात्री पटली की पुन्हा एकवार ह्या बाल-ग्रामच्या कल्पनेने अद्‌भुतरम्य रूप धारण केले आहे. थोड्या काळात आल्विन गेबहार्ड हा फिनलँडमधील सर्व बालग्रामांचा आजोबा बनला. ज्यात टापिओलापासून पुंकाहारजु-पर्यंतची सर्व बालग्रामे समाविष्ट झाली होती.

दूर युरोपच्या दक्षिणेकडे गरम हवेच्या प्रांतात एक तरुण स्त्री डॉक्टर होती. तिचे नाव होते मारिया... कोरिया. तिच्या कानांवर हर्मन मायनरचे काम पडून ते करण्याची तिला इच्छा झाली होती. लिस्बन येथे झालेल्या युनेस्कोच्या मीटिंगमध्ये तिने प्रथम हे बालग्रामचे नाव ऐकले होते. तिने आपले कान टवकारून ते ऐकले व ती एक दिवस ईम्स्टमध्ये येऊन पोचली. आणि पोर्तुगालमध्ये असे बालग्राम बांधायचे असे नक्की ठरवून ती परत गेली. पण हे कसं होणार ? त्यासाठी पैसा हवा, ओळखी हव्यात आणि सर्वांत महत्त्वाचं म्हणजे अनुभव हवा ! तिची एक मैत्रीण पाल्मिया मारिआस तिच्याचप्रमाणे मंत्रालयात काम करीत होती. त्या दोघी एकत्र आल्या व त्यांनी हे काम करायचे ठरवले. मायनरला पण वाटले, ह्या दोन बायकांना कुणाची मदत नसताना हे काम कसं जमणार ? ह्या फक्त ह्यांच्या रम्य कल्पना आहेत. परंतु आज लिस्बनजवळील प्रसिद्ध समुद्रकिनाऱ्यावर एक सुरेख असे बालग्राम आपल्याला दिसते. त्यात १५ बालसदने आहेत. युरोपातील ते एक अति रम्य व सुंदर बालग्राम म्हणून ओळखलं जातं आणि पोर्तुगाल देशात तर तो समाजकल्याणाचा एक उत्तम नमुना मानला जातो. जेव्हा त्या बालग्रामाचा उद्‌घाटन समारंभ झाला तेव्हा पोर्तुगाल देशातून सर्व मोठी माणसे उपस्थित झाली होती. त्यातल्या देशाचा पंतप्रधान मुख्य पाहुणा होता. त्यानंतर मायनरने व मी कधी रम्य कल्पनांचा नुसता विलास मानला नाही. कारण आम्हाला या दोन्ही स्त्रियांनी चांगलाच धडा शिकवला होता.

अशा प्रकारे युरोपमधील बहुतेक सर्व देशांत बालग्राम चळवळीला पोषक अशी



जमीन मिळाली. आणि ती चळवळ विकसित झाली. त्या विकासात आमचा सहभाग फारच थोडा होता. आम्हाला फक्त एकच गोष्ट लक्षपूर्वक पहायची होती की नवीन बालग्रामे हर्मन मायनरच्या कल्पनेप्रमाणे चालतात की नाही ? आज युरोपमध्ये ४० बालग्रामे आहेत आणि ती जुन्या घालून दिलेल्या नमुन्याप्रमाणे सुरळीत चालू आहेत. आणि पूर्वेकडील विभागातील देशांतून देखील अशा तऱ्हेने कुटुंबात राहून शिक्षण देण्याच्या पद्धतीबद्दल जनमानसात अनुकूलता निर्माण झाली आहे. समाज-कल्याण खाते त्याचा विचार करीत आहे आणि बालग्रामशी दळणवळण ठेवून एस ओ एस पद्धतीच्या बालग्रामचे बीज तिथे पण पेरण्याचे प्रयत्न सुरू आहेत.

## ईम्स्ट-. १० वर्षांनंतर...

बालग्राम चळवळ आपल्या यशस्वी मार्गावरून भराभर प्रसार पावत होती. सुरुवात खूपच चांगली झाली होती, पण आम्ही ते डोक्यात चढवून घ्यायचे नाही असे ठरवले होते. कित्येक वर्षांचे अथक प्रयत्न आणि वैयक्तिक दृष्ट्या केलेल्या त्यागांनी आम्हाला शिकविले होते की, कितीही यश दारावर येऊन उभे ठाकत असले तरी स्वतःचे प्रयत्न कधीही शिथिल होऊन द्यायचे नाहीत. आम्ही कित्येक दिवस व रात्री एकत्र बसून चर्चा केल्या. आपल्या देशातील व बाहेरच्या देशात पण पसरलेली ही बालग्रामाची चळवळ शुद्ध व मजबूत पायांवर कशी उभी करायची ? तिचे व्यव-स्थापन कसे करायचे ? आम्ही अनेक योजना राबवल्या व त्यांचा तुलनात्मक दृष्टीने विचार केला. पुढच्या कामांची रूपरेषा पण आखली. आम्हाला मिळालेल्या यशाच्या लाटा आमच्या डोक्यावर फुटायला आम्हाला नको होत्या.

आत्तापर्यंत ईम्स्टमधील घराला सुरुवात होऊन १० वर्षे झाली होती. हर्मन मायनर व त्याच्या मूठभर मित्रांचे ते कर्तृत्व होते.

आता ईम्स्टचा १०वा वाढदिवस साजरा होत होता. त्यासाठी ईम्स्टने नवीन परिवेष धारण केला होता. १० वर्षांपूर्वी फक्त एक तरुण गरीब विद्यार्थ्यांचा छोटा समूह येथे आला होता आणि उद्‌घाटनासाठी जेव्हा फक्त एक जरी पाहुणा आला होता, तरीसुद्धा तेव्हा त्यांना अतिशय आनंद झाला होता. आत्ताच्या या वाढ-दिवसाला ऑस्ट्रिया देशातून हजारो लोक आले होते. त्यांनी ते सुंदर छोटे बालग्राम फुलून गेले होते. खूप महत्त्वपूर्ण व्यक्ती त्यात होत्या. टिरोलचे मुख्य धर्मगुरू आणि लोकपाल आले होते. तो सबंध टिरोल गावाचा मुख्य सण झाला होता आणि त्याची सविस्तर माहिती युरोपच्या सर्व वर्तमानपत्रांनी प्रसिद्ध केली होती. पुन्हा एकदा १०

वर्षानंतर हर्मन मायनर व्यासपीठावर उभा राहिला. फरक इतकाच की तो मंच आता मजबूत होता आणि फुलांनी सजविलेला होता. ह्या बालग्रामच्या निर्मात्याचे शब्द मात्र तेच होते. १९४९ प्रमाणेच तो शांत व गंभीर होता आणि कळकळीने बोलत होता. हर्मन मायनर अजिबात बदलला नव्हता.

"प्रिय मित्रांनो, १० वर्षांपूर्वी ह्या बालग्रामच्या संस्थापनेचा समारंभ म्हणजे एक अतिशय धाडसी व काळाशी अनुकूल नसलेला असा एक प्रसंग होता. हरविलेल्या, गृहहीन मुलांसाठी एक स्वतंत्र वसाहत बांधण्याची कल्पना त्यावेळी किती अवघड होती, याचा तुम्ही विचार करू शकता. अशा वसाहतीत इमारती बांधायला आणि मुलांचा दैनंदिन खर्च चालवायला, तो कितीही कमी असला तरी अनेक स्वार्थत्याग करणाऱ्या मित्रांची त्यासाठी गरज होती. आपण सर्वजण अजून युद्धोत्तर काळात वावरत होतो. गरिबी होती, अतृप्त गरजा होत्या. उद्याची चिंता होती आणि दुसरीकडे लाजिरवाणा स्वार्थ आणि हिंसक क्रूरता होती. अशा परिस्थितीत हे पहिले बालग्राम बांधायला माझ्या विनंतीपत्रांना कोण पाठिंबा देणार होतं आणि कोण मदत करणार होतं ?

आणि त्यावेळी ती पूर्वीची म्हण पुन्हा एकदा खरी आहे हे अनुभवाला आले. सत्कृत्य हे कधीच नष्ट होत नसतं. भलाई हा समाजाचा स्थायी भाव असतो. स्वतःवर कितीही मोठे संकट आलेले असले तरी जर दुसऱ्याचे दुःख त्यापेक्षा मोठे असले तर मला माझ्याजवळ जे काही आहे, त्यातून त्याला दिलेच पाहिजे. बालग्रामच्या देणगीदार मित्रांची संख्या दररोज वाढत गेली आणि त्यामुळे आपले हे ईम्स्टचे बालग्राम यशस्वी झाले. हजारो-लाखो लोक आमचे मित्र व मानलेले पालक बनले आणि या बालग्रामातील मुले त्यांनी दिलेल्या देणगीवर जगू शकली.

आत्ताच्या तरुण पिढीला हे समजले पाहिजे आणि त्याचा कधीही विसर पडता कामा नये की, ह्या पहिल्या मित्रांनी आणि देणगीदारांनी आपल्या घासातील अर्धा घास काढून दिलेला आहे. ही महत्त्वाची गोष्ट पुढच्या येणाऱ्या पिढीला ठाऊक असली पाहिजे. आजदेखील आपल्यापैकी पुष्कळ लोकांची सांपत्तिक स्थिती सुधारलेली आहे, परंतु तरीदेखील बालग्रामचे काही सच्चे मित्र अजून गरिबीत राहणारे आहेत. अशा स्त्रिया व पुरुष आमचे वर्गणीदार आहेत की, ज्यांना दरमहा शिलिंग किंवा तत्सम वर्गणी पाठविणे जड जाते. पण ते ही रक्कम विश्वासाने व श्रद्धेने त्यागपूर्वक पाठवीत असतात. कित्येक पेन्शनर आणि प्रौढ माणसांची आवक आज कमी झालेली आहे पण ते आपल्या काही गरजा व करमणुकीवरच्या खर्चात कपात करून आम्हाला मदत पाठवतात. त्यांच्या ह्या अपूर्व त्यागाबद्दल त्यांचे आभार मानण्यास माझ्याजवळ यथार्थ शब्द नाहीत.



माझा विश्वास आहे की, जगात जे काही मोठं व चांगलं असतं त्याचा व खऱ्या त्यागाचा जवळचा संबंध असतो. आपण जो काही त्याग करतो, जी गोष्ट चांगली आहे, त्यासाठी आपण जो त्याग करतो, त्यामुळे आपल्याला आतून समाधान वाटत असते. आत्मा आनंदी होतो आणि आपला सर्व व्यवहारच सुखमय होतो. त्यामुळे पुष्कळदा आपल्याला वाटणारी भीती दूर होते. मग काळाचा ओघ कसाही असो किंवा मानवी प्रवृत्तींच्या द्वंद्वात आपण सापडलेलो असो. आपण काहीतरी चांगले काम करीत आहोत, ही भावना ह्या सर्व अडचणींतून पार व्हायला समर्थ असते. ह्या त्यागाच्या भावनेवर माझी मनस्वी श्रद्धा आहे. मी अंतःकरणपूर्वक तुमचे आभार मानतो. माझ्या मित्रांनो, तुमच्या मदतीनेच आज ह्या बालग्रामाला यशस्वी अशी १० वर्षे पूर्ण झाली आहेत. पण हे मनःपूर्वक आभार मानत असताना मला आपल्याला विनंती करायची आहे की, तुम्ही तुमच्या या कामावर अखंड श्रद्धा ठेवा. कामाची सुरुवात जरी उत्तम झाली असली तरी काम अजून पूर्ण झालेले नाही. मोठमोठ्या कंपन्यांच्या डायरेक्टरांनी आणि उद्योगपतींनी देणगी देऊनही घरे बांधून दिली आहेत. पण तितक्याच महत्त्वाचे ते एक छोटे नाणे आहे की जे मला एका वृद्ध स्त्रीने शेवटचे नाणे तिच्या शिलकीतून आणून दिले आहे. ह्या उत्सवासाठी एका रोजंदारी करणाऱ्या मजुराने त्याची पूर्ण आठवड्याची मजुरी मला देऊन टाकली आहे. आणि ती देताना तो म्हणाला आहे की, "माझ्या या छोट्या देणगीने जगात किंचित सुधारणा झाली तरी मला त्याचा आनंद वाटेल."

प्रिय मित्रांनो, आपली सर्वांची या सुधारणांवर श्रद्धा आहे. आपण आपल्या चांगल्या विचारांनी व चांगल्या कर्मांनी एका चांगल्या जगाची स्थापना करूया. ते जग सुधारलेले असेल, म्हणून आजच्या या बालग्रामाच्या वर्धापनदिनी आपण तसा संकल्प करूया."

## कोरियाचा पाहुणा

आम्ही हे जे खासगी क्षेत्रात समाजसेवेचे काम सुरू केले होते, त्या बालग्राम चळवळीला आता एक तप होऊन गेले होते, आणि आता चालू असलेल्या दुसऱ्या तपात आम्ही त्याचा जागतिक विस्तार पाहत होतो.

१९६२ मध्ये कुठल्याही तऱ्हेचा गाजावाजा न करता किंवा पूर्वसूचना न देता मारिया हाईसेनबर्गर (Maria Heissenberger) नावाची एक नाजूकशी बाई आमच्याकडे आली. मायनर पुन्हा हिंटरब्रूलला गेलेला होता. मी माझ्या ऑफिसमध्ये असताना

मला एक टेलीफोन आला. मायनरने मला बोलाविले होते. "माझ्याकडे एक लहानशी बाई आली आहे. ती आशियात काम करते आणि आता घरी सुट्टीवर आलेली आहे."

ही लहानशी बाई म्हणजे मारिया हाईसेनबर्गरच होती. विकसनशील देशांत ती धैर्याने काम करीत होती. ऑस्ट्रियन कॅथोलिक महिला आंदोलनाच्या वतीने ती कोरियात काम करीत होती. कोरियाच्या युद्धानंतर तिथली टंचाई भयानक वाढली होती.

"माय गॉड." मायनरने तिला विचारले, "जगाच्या त्या कोपऱ्यात तू कुठे काम करते आहेस ?"

"आम्ही ऑस्ट्रियातील बऱ्याच भगिनी तिथे काम करीत असतो." तिने उत्तर दिले. "जर विमानाने गेलो तर आपण तिथे २४ तासांत पोहोचू शकतो. तिथले लोक फार चांगले आहेत आणि त्यांना आपल्या मदतीची अपेक्षा आहे."

तिने युद्धानंतरच्या कोरिया देशाचे वर्णन केले. सबंध देश उद्ध्वस्त झालेला होता. ९० टक्के इमारती कोसळून जमीनदोस्त झाल्या होत्या. शेकड्यांनी व हजारोंनी कोरियाचे लोक मृत्युमुखी पडले होते. सर्व झाडेझुडे नष्ट झाली होती. भातशेती जळून गेली होती. गुरा-ढोरांना मारून टाकले होते. जवळपास अर्धी लोकसंख्या क्षयाने आजारी होती. महारोग, कॉलरा, आणि टायफॉईडची भयानक साथ होती. दिवसांमागून दिवस जात होते आणि लोक भुकेने मरत होते. कोरियाचे दुर्दैव हात धरून मागे लागले होते. मोठा भाऊ चीन देश कोरियाला वारंवार धमक्या देत होता. आक्रमण करीत होता, हजारो वर्षांचा हाच इतिहास होता. पुन्हा पुन्हा हा शूर देश मुसंडी मारून वर येत होता आणि बंड करून स्वतःचे स्वातंत्र्य परत मिळवीत होता. पण आता कोरियाचे २ तुकडे झाले होते. उत्तरेकडचा भाग, ज्यात भरपूर खनिजे आणि उद्योगधंदे होते, तो कम्युनिस्ट बनला होता. दक्षिणेत राहाणारे गरीब लोक भातशेतीवर निर्वाह करून जगणे अशक्यच होते. त्या फ्राऊ हाईसेनबर्गर बाईने तिच्या सौम्य शब्दांत ह्या कोरियाचे चित्र आमच्या डोळ्यांसमोर उभे केले. तिने तिथे बी पेरले असल्याची जाणीव आम्हाला झाली. तिचे त्या कोरियावर आणि तिथल्या लोकांवर मनापासून प्रेम होते, टेगोमधे (Taegu) ती राहत होती. टेगो हे त्या देशातले तिसऱ्या नंबरचे मोठे शहर आहे आणि ही बाई तिथे राहून मानवतेचे काम करीत होती.

ऑस्ट्रियात जन्म घेतलेल्या ह्या समाजसेविकेला कोरियातील भटकणाऱ्या मुलांची चिंता वाटत होती. तिने त्यांच्यापुरती एक तात्पुरती जागा घेतली होती आणि नंतर एका पडक्या घराचा आश्रय घेऊन तिथे तिने ह्या मुलांना ठेवले होते. दिवसभर ती मुले रस्त्यावर बसून बूट पॉलिशचे काम करीत असत, आणि संध्याकाळी ही फ्राऊ हायसेनबर्गर नावाची स्त्री त्या मुलांना त्यांच्या पैशांतून किंवा तिने मिळविलेल्या देणगीतून जेवण आणून देत असे. तिने एका शिक्षकाची पण नेमणूक केली होती. रोज



संध्याकाळी तो शिक्षक येऊन ह्या उत्साही विद्यार्थ्यांना शिकवीत असे. कोरियातील प्रत्येक मुलाला लिहायला व वाचायला येणे ही प्राथमिक गरज होती पण ह्या बिचाऱ्या मुलांसाठी आता शाळा पण नव्हत्या आणि शिक्षक पण नव्हते.

अशा तऱ्हेने बूट-पॉलिश करणाऱ्या त्या मुलांचे टेगोमधील घर भरगच्च भरले होते व आता त्यात आणखी मुले ठेवायला जागा नव्हती. फ्राऊ हाईसेनबर्गरला रोज सर्वांना जेवण घालणे पण कठीण जात होते.

"कृपा करून टेगोमधील माझ्या या गरीब मुलांसाठी तुम्ही तिथे बालग्राम बांधा" फ्राऊ हायसेनबर्गर मायनरला हात जोडून विनवणी करीत होती आणि एखादा चहाचा कप मागावा इतक्या सहजतेने तिने ही मागणी केली होती.

मायनर गंभीर झाला. "कोरियातल्या मुलांसाठी बालग्राम !" अजून त्याच्या कल्पनेची झेप तिथपर्यंत पोचत नव्हती.

"का नाही ?" फ्राऊ हायसेनबर्गरने विचारले. "ती पण तुमच्या-आमच्या सारखीच माणसे आहेत. तिथे तुम्हाला चांगल्या माता मिळवायचा पण त्रास पडणार नाही. कोरियाचे लोक तुमच्या योजनेचे उत्साहपूर्वक स्वागत करतील. कुटुंब व्यवस्थेला त्या देशात अग्रस्थान आहे आणि म्हणूनच अजूनपर्यंत तरी तिथे अनाथाश्रम नाहीत. प्रत्येक मूल आपल्या जमातीत सुरक्षित असते. जेव्हा एखाद्या मुलाची आई मरते, तेव्हा त्याची मावशी, आजी किंवा दुसरे कुणीतरी नातेवाईक त्याला आपल्या घरी नेहेमीच राहायला नेतात. युद्धामुळे सगळा नुसता गोंधळ झाला आहे. हजारो कुटुंबे इकडे तिकडे पसरली गेली आहेत. त्याचप्रमाणे आईबाप नसलेली हजारो मुले रस्त्यावर येऊन भरकटत आहेत. आत्ताशी कुठे मोठाल्या निर्वासितांच्या छावण्या तयार होत आहेत आणि या छावण्या म्हणजे वाईटापेक्षा वाईट अनाथाश्रम आहेत. हर्मन मायनर, आपण या मुलांसाठी काहीतरी केलंच पाहिजे."

फ्राऊ हाईसेनबर्गरची सुट्टी थोडी होती. परत जाताना आम्ही तिला थोडी आशा दाखवली होती. आम्ही तरी तिथे कोरियात बालग्राम कसे बांधणार होतो ? त्यासाठी आम्हाला पैसे कोण देणार ? ऑस्ट्रियात जमवीत असलेला प्रत्येक शिलिंग हा ऑस्ट्रियन बालग्रामच्या मुलांसाठी दिलेला होता. कोरियात खर्च करणे फार दूरची गोष्ट होती.

तरीदेखील आमच्या डोक्यातून ते विचार जात नव्हते. मी व मायनर या बाबतीत मधून मधून बोलत होतो.

एक दिवस फ्राऊ हाईसेनबर्गर बाईने आणखी एक पत्र पाठविले. तिने विचारले होते, 'आम्ही काही निर्णय घेतला की नाही ?' तिला आता सत्वर मदतीची जरूर होती. 'कृपा करून मला आता तोंडघाशी पाडू नका.'

१९६२ च्या उन्हाळ्यात मायनरने मला एक आश्चर्याचा छोटा धक्काच दिला. त्याने बातमी दिली की, ऑस्ट्रियातील ज्या एका बँकेने आम्हाला बालसदन बांधून दिले होते, ती बँक आता कोरियाच्या अभ्यास-प्रवासाला पैसे द्यायला तयार होती.

'हे कसं जमवलं ?' मी मायनरला विचारलं.

'अगदी सहजपणे जमलं ते.' मायनर म्हणाला "मी त्या बँकेच्या मॅनेजरला फ्राऊ हाईसेनबर्गरच्या भेटीची माहिती सांगितली. आणि त्यानंतर म्हणाला की आपल्याला या परिस्थितीचा नीट विचार केला पाहिजे. कदाचित आपण ही आपली ऑस्ट्रियातील बालग्रामची कल्पना त्या देशात थोडीशी पेरून टाकू शकू. त्याला कोरिया देशाची चांगली माहिती आहे आणि त्याला वाटते की अतिपूर्वेकडे राहाणारे हे कोरियन लोक युरोपातील ऑस्ट्रियनांना सारखेच आहेत. ते राष्ट्र म्हणजे गायकांचे आणि शाहिरांचे आहे. आपण त्यांच्या मागणीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही आणि त्याने आपल्याला विमानांची तिकिटे देण्याचे कबूल केले आहे. त्यामुळे फ्रिटझ् हेडर पण आपल्या सोबत येऊ शकेल. आता आपण तिघेजण जाऊन त्या क्षेत्राची पाहणी करून येऊ या.

## तांदुळाच्या दाण्याची कथा

जानेवारी १९६३ची ती सुरुवात होती. आम्ही सर्वजण तयार होतो. हिंटरब्रूल बालग्रामातील सर्व माता व मुले हिरवळीवर एकत्र जमली होती. व आम्हाला निरोप देत होती. सर्व मुलांनी आपली छोटी शिल्लक आम्हाला सुपूर्त केली होती व टेगोच्या गरीब मुलांसाठी ती त्यांची भेट होती. एस ओ एस बालग्रामाचा पहिला आंतर-राष्ट्रीय धाडसाचा तो प्रयत्न होता. एक दिवसाने आम्ही सीऑल विमानतळावर उतरलो. आमच्या पुढे परके जग उभे होते आणि त्या आनंदी मारिया हाईसेनबर्गरने पुढे होऊन हर्मन मायनरला मिठीच मारली. डोळ्यांतील अश्रू आवरीत ती म्हणाली, "मला वाटत होतं की तू मला तोंडघशी पाडणार नाहीस."

कोरियातील आमच्या पहिल्या आठवड्यात आम्ही खूप काही पाहिलं. वर्णन करणे अशक्य असे दुःख दारिद्र्य– भुकेली माणसं– थंडीने कुडकुडणारी माणसं एकटी पडलेली माणसं– ती सर्वजण रस्त्यावर सर्वदूर झोपलेली दिसत होती. थंडगार बर्फाचे वारे वाहत होते आणि इथून सैबेरिया फार दूर नसल्याची आठवण करून देत होते. बर्फ पडत होता आणि काही लोक त्याखाली थिजून मरत होते. काही भुकेने तडफडून मरत होते. सगळीकडे मुलेच मुले दिसत होती. नुसते हाडांचे सापळे



शिल्लक असलेली, अंगावर चिंध्या पांघरलेली, निराधार मुलं हातात एक पत्र्याचा कप घेऊन भीक मागत फिरत होती पण तो कप कधी भरत नव्हता. अनाथालये म्हणून ओळखल्या जाणाऱ्या त्या घाणेरड्या बराकीतून आम्ही अशी शेकडो मुलं पाहिली. त्यांची डोकी भेदरलेली होती. ती एकमेकाला चिकटून रांगेत बसली होती. अधाशी, दुःखी विटलेले असे त्यांचे चेहेरे दिसत होते.

इतक्या शोकाकूल वातावरणाची आम्ही कल्पना केली नव्हती. आम्ही खूप दुःख पाहिले होते. आता आणखी दुःख बघण्याची सहनशक्ती आमच्यात उरली नव्हती. आणि थोड्याच दिवसांत आम्हाला या लोकांविषयी प्रेम वाटू लागले. ती माणसे दिसायला रुबाबदार होती. म्हातारी माणसे, छोटी पांढरी दाढी ठेवलेली, त्यांचे पांढऱ्या रंगाचे कुडते, त्यांच्या त्या विशिष्ट नमुन्याच्या काळ्या रंगाच्या टोप्या आणि त्यांच्या हातात धरलेले लांबलचक पाईप. त्यांच्याकडे पाहून ते मोठे तत्त्वज्ञानी असा-वेत असे आम्हाला वाटायचे. सर्व दुःखे आणि उपासमार त्यांनी जणू पचविली होती. आम्हाला वाटले की ह्या माणसांना मदत केलीच पाहिजे.

फ्राऊ हायसेनबर्गरने आम्हाला विश्वासात घेऊन सांगितले होते की बाल-ग्रामच्या इमारती बांधणे तिथे सहज शक्य होते. तिने तर आमची काही कोरियन स्त्रियांशी ओळख करून दिली होती. व त्या स्त्रिया बालमातेची कामे करण्यास तयार होत्या. तिने आम्हाला काही सोयिस्कर अशा जागा दाखवल्या आणि साध्या, छोट्या घरांच्या बांधकामाचे नकाशे पण दाखविले. थोड्याच महिन्यांत कोरियातील बालग्राम ही एक सत्यकथा ठरणार होती. पण त्याला पैसे कोण देणार ? ह्या खडकावर आद-ळून बहुधा आमचं जहाज फुटणार ही भीती आम्हाला वाटत होती.

आणि मग किम आला. त्याच्याबरोबरचा आमचा अनुभव एखाद्या परीकथे-प्रमाणे वाटेल, पण ती एक सत्य घटना होती. त्या छोट्या दिसणाऱ्या किम चुंग शुकचा विचार आज जरी मनात आला तरी त्याने जे जादूमय काम केले व आम्ही ते अनुभवले, त्या आठवणी ताज्या होऊन जातात. एक दिवस तो आम्हाला टेगोतील रस्त्यावर भेटला. आश्चर्याने आमच्याकडे म्हणजे आमच्या परदेशी मुखवट्यांकडे तो पाहातच राहिला. आमची लांबलांब नाके, मोठाले डोळे आणि फिकट चेहेरे त्याने त्याच्या नजरेत टिपून घेतले. तो आमच्या बाजूने धावत आला, खुणा केल्या, आणि तो हसला. आम्ही त्याला काहीतरी खायला दिलं आणि त्याचं नाव विचारलं. आम्ही हस्तांदोलन केलं आणि किम आमचा छोटा मित्र बनला. संध्याकाळी तो परत आला. त्याने आपल्या खिशात हात घालून तांदुळाचा एक दाणा काढला आणि तो माय-नरच्या हातावर ठेवला. एवढे करून तो अदृश्य झाला. ते काय असावे असा विचार

करीत करीत आम्ही बूटपॉलिश करणाऱ्या मुलाच्या त्या घरात झोपायला आलो. फ्राऊ हायसेनबेर्गरने हसतहसत आम्हा त्या तांदुळाच्या दाण्याचा अर्थ समजावून सांगितला. "तांदुळ हा येथे मंगल मानला जातो. किमने तुम्हाला जो दाणा दिला त्याचा अर्थ तुमचे मंगल होवो ! तुम्हाला आरोग्य, शांती, दीर्घायुष्य आणि समाधान लाभो' हा होता. किमच्या त्या तुम्हाला दिलेल्या शुभेच्छा होत्या. तुम्हाला दिलेले धन्यवाद होते."

आणि त्याच दिवशी संध्याकाळी त्या तांदुळाच्या दाण्याने नवीन प्रेरणेला जन्म दिला. मायनरने विचारपूर्वक सांगितले, "आपण हे कोरियातील तांदुळाचे दाणे विकूया. प्रत्येक तांदुळाला एक डॉलर" लवकरच त्याचे घोषवाक्य पण तयार झाले.

"एक दाणा तांदुळाचा, कोरियाच्या मदतीचा." दुसऱ्या दिवशी पुन्हा जेव्हा किम आमच्याकडे आला तेव्हा मायनरने फ्राऊला पण बोलावले. कारण तिला कोरियन भाषा उत्तम बोलता येत होती. तिच्यामार्फत मायनरने किमला सांगितले की, त्याने आपल्या जास्तीत जास्त मित्रांना भेटावे आणि असे तांदुळाचे दाणे घेऊन त्यांना बोलवावे. ह्या दाण्यांचे सोन्यात रूपांतर होईल आणि त्यातून कोरियातील हे पहिले बालग्राम बांधले जाईल. किमच्या ते लक्षात आले. असंख्य मुले त्याच दिवशी आमच्याकडे एकेक तांदुळाच्या दाण्याची भेट घेऊन आली. तो सर्व तांदूळ आम्ही एक पोत्यात भरला. मार्च १९६३ मधे मायनर हे पोते घेऊन विमानातून खाली उतरला. त्यानंतर हे तांदुळाचे दाणे व आणखी पण कोरियातील तांदुळाचे दाणे ऑस्ट्रिया, जर्मनी, स्कँडीनेव्हिया, अमेरिका व इतर अनेक देशांतून वाटण्यात आले. कोरियातील या तांदुळाच्या दाण्यात लाक्षणिक शक्ती होती. लाखो डॉलर्स गोळा झाले. त्याच वर्षी टेगोतल्या त्या बालग्रामचे बांधकाम पुरे होऊन राहाण्याजोगी तयारी झाली. युरोपच्या बाहेरील एक एसओएस बालग्राम सत्यसृष्टीत उभे राहिले. फ्राऊ हायसेनबर्गर आपल्या बुटपॉलिश करणाऱ्या व आणखी इतर मुलांना आता राहायला स्वतःचे नवीन घर देऊ शकणार होती.

आज दक्षिण कोरियात हे टेगोचे बालग्राम म्हणजे एक सुप्रसिद्ध अशी संस्था आहे. बालग्रामातून बाहेर पडणाऱ्या तरुण युवकांसाठी पण तिथे एक मोठा निवास बांधलेला आहे. आणि पूर्वी तिथे बुटपॉलिश करणारी मुले राहात होती. घरात आता तरुण मुलींचा निवास आहे. फ्राऊ हायसेनबेर्गरने त्यानंतर नवीन कामांकडे लक्ष देण्यास सुरुवात केली आहे. ती आता कोरियात समाज सेवेचे प्रशिक्षण देत आहे. आणि तिची एक ऑस्ट्रियन मैत्रीण फ्राऊ फ्रान्सिस्का टेगो येथील बालग्रामातील मुलांच्या भवितव्याची काळजी घेत आहे. बाकी सर्व कार्यकर्ते कोरियातील आहेत. जागतिक स्वरूपाच्या बालग्रामच्या कुटुंबात कोरियाचे बालग्राम जागा पटकावून बसले



आहे.

१९६८च्या मे महिन्यात मायनर पुन्हा एकदा कोरियाला गेला आणि एका तांदुळाच्या दाण्यातून निर्माण झालेले ते प्रचंड बालग्राम स्वतःच्या डोळ्यांनी पाहून आला. विमानातून परत येताना त्याचे विमान काही तास सेऊल विमानतळावर थांबले होते. तिथे तो उभा असताना एक तरुण कोरियन मुलगा धावत धावत त्याचेकडे आला आणि त्याने मायनरच्या पायावर लोळण घेतली आणि मोडक्या तोडक्या इंग्रजी भाषेत सांगू लागला, "तुम्ही माझे बाबा आहात."

१९६३ साली बांधकाम पुरे झाल्यानंतर जी बूटपॉलिश करणारी मुले बालग्रामात आली त्यामध्ये त्याचा पहिला नंबर होता. १९६८ मधे त्याची लष्करातील सेवा पूर्ण झाली होती. तेव्हा त्याला त्याच्या बालसदनाच्या आईने सांगितले की मायनर टेगोला येणार आहे, आणि थोडा वेळ सेऊल विमानतळावर थांबणार आहे. तेव्हा त्या मुलाच्या मनात प्रबळ इच्छा उद्‌भवली 'पितृ-स्थानी असलेल्या हर्मन मायनरना भेटायचे.' खूप दूर अंतर पायी चालून तो विमानतळावर पोचला होता. त्याला मायनरची पुसट आठवण होती आणि त्याच्या हातात मायनरचा फोटो होता. त्याने आपल्या बालग्रामच्या पित्याला लगेच ओळखले आणि कोरियन मुलगा ज्याप्रमाणे आपल्या वडिलांना भेटतो, त्याप्रमाणे तो भेटला. त्याने त्याच्या पायांवर डोके टेकले.

## पंडित नेहरू

१९६३ साली आम्ही जेव्हा कोरियातून परत आलो तेव्हा येताना आम्ही काही देशात थांबून तिथल्या मुलांच्या परिस्थितीचे अवलोकन केले. जपान, हाँगकाँग, फिलिपाईनस्, थायलँड, भारत आणि जवळचे पूर्वेचे प्रदेश आम्ही पाहिले. प्रत्येक ठिकाणी आमच्या कल्पनेचे, म्हणजे अनाथ मुलांसाठी कुटुंबव्यवस्था निर्माण करून त्यामार्फत शिक्षण देण्याची जी बालग्रामची कल्पना आहे त्याचे, चांगले स्वागत झाले आणि त्यामुळे बऱ्याच देशांत आम्ही बालग्राम चळवळीविषयी उत्सुकता निर्माण करू शकलो आणि पुढे मागे बालग्रामे सुरू करण्यासाठी पाया घालण्याचे काम केले आणि भारत देशात तर आमच्या कार्यासाठी दारे उघडण्याचे काम सुरूच झाले होते.

"आपण भारत देशात काय करणार आहोत ?" जेव्हा मायनरने कलकत्ता व बनारस येथील भारत बघितला तेव्हा त्याने मला वरील प्रश्न विचारला होता.

इथे आपण काहीच करू शकणार नाही. लोकांच्यात फार मोठी मरगळ आहे. उपासमार ही नित्याचीच बाब झालेली दिसते. त्याची कुणालाच पर्वा दिसत नाही. इथे

सर्व गोष्टी कल्पनेच्या बाहेर दुःखदायक आणि निराशामय दिसतात. अशा ह्या देशात बालग्राम उभे करण्याची आशा दिसत नाही. इथली हिंदू बाई बालमाता कशी होईल याचे चित्र तू उभे करू शकशील ? इथे आपण काय म्हणतो हे कुणाला समज-णारच नाही. भारताची ह्या योजनेला अजून तयारी नाही. त्यांच्यापुढे आणखी कठीण समस्या आहेत. फ्रिटझ् हेडर आणि मी पण पूर्णपणे आश्चर्यचकित व निराश झालो होतो. कोरियात आम्हाला जो अनुभव आला होता त्यावरून आम्हाला आशा वाटत होती की आशिया खंडात बालग्रामची चळवळ उभी राहू शकेल. दुसरीकडे कदाचित् होईल, पण भारतात नक्की नाही !

ही कल्पना उराशी बाळगूनच आम्ही नवी दिल्लीत आलो. तिथे आमच्या ऑस्ट्रियन वकिलाने बालग्रामविषयक एक प्रदर्शन भरविले होते आणि त्याचे उद्घाटन श्रीमती इंदिरा गांधी, त्यावेळचे प्रधानमंत्री जवाहरलाल नेहरू यांची कन्या, करणार होत्या.

त्या म्हणाल्या, ''आम्हाला हुबेहूब ही व्यवस्था भारतात हवी आहे.'' आम्ही त्यांच्याबरोबर व आणखी बऱ्याच तज्ज्ञ मंडळींबरोबर दीर्घकाळपर्यंत चर्चा केल्या. ते सर्वजण प्रदर्शनाच्या उद्घाटन समारंभाला आलेले होते. आत्तापावेतो आम्ही फक्त हिंदुस्थानचा एकच हिस्सा पाहिला होता. त्यामुळे बऱ्याच गोष्टींविषयी गैरसमज मनात होता. पण आता आम्ही ज्या लोकांना भेटत होतो, त्यांना आपल्या देशाच्या भवितव्याची खूप काळजी वाटत होती. त्यांना नवीन योजना आणि नवीन उपाय यांची माहिती हवी होती. आणि त्यांना हेही समजत होते की, हिंदुस्थानच्या ५० कोटी लोकांना जर मरगळ झटकून टाकून जागृत केले नाही, तर त्यांच्यात कधीच प्रगती होणार नाही !

दुसऱ्या दिवशी सकाळी आम्हांला हॉटेलमधे एक आमंत्रण मिळाले. पंडित नेहेरूंनी हर्मन मायनरना भेटायला बोलावले होते. महात्मा गांधींच्या त्या महान शिष्याला त्यांच्या मुलीने बालग्राम चळवळीची संपूर्ण माहिती दिलेली होती.

"तुमच्या योजनांसारख्या योजना आम्हाला हव्या आहेत.'' नेहरू मायनरला म्हणाले. ''आम्हाला नवीन भारत बांधायचा आहे आणि त्यासाठी नवीन योजनांची जरुरी आहे. त्यासाठी आम्हांला प्रेरणा मिळायला हवी. तुमची बालग्रामची कल्पना ही प्रेरणा देईल असे मला वाटते. इथे या भारतात, जर एखादे मूल रस्त्यावर पडून भुकेने व्याकूळ झाले असले, तरी त्याच्याकडे कुणी लक्ष देणार नाही. लोक घाईने पुढे सरकतील. पण एखादा युरोपियन मनुष्य असेल तर तो थांबेल आणि त्या मुलाला मदत करण्याचा प्रयत्न करील. ह्या तत्त्वाचा खरा अर्थ हा आहे. 'शेजाऱ्यावर प्रेम करा.' आम्हाला त्याची जरुरी आहे, आणि आमच्या लोकांना ते शिकवलं पाहिजे. नाहीतर



आमचे जे राजकीय व आर्थिक उत्थानाचे कार्यक्रम आहेत ते सर्व वाया जातील. शेजाऱ्यावरील प्रेमाच्या उभारणीत मुलांचे बालग्राम हा एक छोटा दगड ठरेल. मी हे बालग्राम भारतात नमुना म्हणून सुरू करण्यासाठी आज तुम्हाला आमंत्रण देत आहे.''

आम्ही त्यांच्या आमंत्रणाचा पाठपुरावा केला. ह्याच आमच्या भेटीच्या भेटीत न्यू दिल्लीच्या ग्रीन फील्डमधे आम्हाला एक सोईस्कर जागा पण मिळाली. बालग्राम सोसायटी स्थापन झाली व त्याचा व्यवस्थापक म्हणून थोड्याच दिवसांत एक भारतीय समाजसेवक पण आम्हाला लाभला. ह्या सोसायटीच्या अध्यक्षा इंदिरा गांधी स्वतः होत्या. नंतर जेव्हा त्या वडिलांच्या मृत्यूनंतर भारताच्या पंतप्रधान झाल्या, तेव्हा त्यांनी या सोसायटीचे काम इतरांकडे सोपवले. परंतु त्या चळवळीतील त्यांची आस्था मात्र कायम राहिली. त्यांनी ग्रीनफील्डच्या बालग्रामचे उद्घाटन केले आणि त्यांच्या या भाषणात त्यांचा या विषयीचा खोल अभ्यास दिसून आला.

''नवीन जन्मलेल्या मुलाच्या अंगी अनेक सुप्त शक्ती असतात. त्याचा विकास, त्याचे कुटुंब, त्याची शाळा आणि समाज यावर अवलंबून असतो. ते मूल दोन जगांत वावरत असते. एक त्याचे स्वतःचे छोटे विश्व आणि दुसरे त्याच्या भोवतालचे मोठ्या माणसांचे जग. आपल्याला वाटतं की मुलांचं जग म्हणजे फक्त निरागसता आणि खेळ यांचेच बनलेले असते. पण वस्तुस्थिती तशी नसते. त्याच्या छोट्या जगात पण असुरक्षितता भीती, हेवादावा आणि स्पर्धा यांचे मिश्रण असते. त्या मुलाला आपल्याभोवती असलेल्या वस्तुस्थितीशी जुळवून घ्यायचे असते. पण बऱ्याच गोष्टी त्याच्या शारीरिक व मानसिक ताकदीच्या आवाक्याबाहेरच्या असतात. त्यातच मोठ्या माणसांच्या वागण्याचा परिणाम होत असतो. आशा आणि भीती, प्रेम आणि तिरस्कार, उदारता आणि पूर्वग्रह दूषितता, लहान-मोठ्या इच्छा आणि त्यावरील निर्बंध या सर्वांचा मुलावर परिणाम होत असतो. त्याची कल्पनेतील सृष्टी आणि भोवतालचे वातावरण यांचा कुठे मेळ बसत नाही. मुले म्हणजे ह्या जगाचे आरसे आहेत. जर आपल्याला आपलं जग बदलायचं असेल, तर आपल्याला त्याची सुरुवात मुलापासून करायला हवी.

''आपण स्वच्छता व आरोग्य याविषयी बोलतो, पण आपली औद्योगिक उन्नती आपल्या श्वासोच्छ्वासाची हवा प्रदूषित करीत असते. आपण लोकशाही व समानतेच्या गोष्टी करतो पण आपल्या अवतीभोवती पाहिलं तर अनेक ठिकाणी सामाजिक व आर्थिक असमानता आहे हे सिद्ध होतं. आपण आपल्या धार्मिक तत्त्वांचा सतत उदोउदो करीत असतो, पण प्रत्यक्ष आपल्या जीवनात मात्र आपण त्याकडे दुर्लक्ष करतो. आपण संतपुरुषांना व्यासपीठावर नेऊन बसवतो पण साधुत्वाच्या प्रत्येक कार्याची चेष्टा करीत असतो. आपण शांततेच्या गोष्टी करतो, पण

आपण युद्ध थांबवू शकत नाही. आपण आपला तंत्रज्ञानाचा विकास दुय्यम गोष्टीं-साठी वापरतो. पण हे जग चांगले व्हावे म्हणून ज्या काही मूलभूत गोष्टींत परिवर्तन आणायला हवे आहे त्यासाठी त्याचा उपयोग करत नाही. या सर्व गोष्टीमुळे आपली तरुण मुलं बेचैन आहेत, अधीर झाली आहेत यात काय आश्चर्य ?"

"भारत हा विकसनशील देश आहे. पण आपल्या मुलांना अन्न व शिक्षण मिळावं यासाठी सबंध देशाला उन्नतावस्था येण्याची वाट पाहण्यात अर्थ नाही. देशां-तील सर्व मुलांच्या ह्या प्राथमिक, भौतिक गरजा पुरविल्याच पाहिजेत. मुलांची उत्तम व सर्वांगीण वाढ होण्यासाठी यापेक्षा आणखी कितीतरी गोष्टी त्याला देण्याची आव-श्यकता आहे. त्यातल्या काही गोष्टी अगदी मूलभूत स्वरूपाच्या गरजा आहेत. मुलाला प्रेम हवं आहे, समजून घ्यायला हवं आहे, असं प्रेम पाहिजे की, जेव्हा वेळ येईल तेव्हा ते त्यांचे रक्षण करू शकेल आणि ते प्रेम इतकं उदात्त असेल, की त्यामुळे मुलाचे व्यक्तित्व मुक्ततेने विकसित होईल.

"मानवाच्या परिस्थितीची आणि त्याच्या आत्मिक बलाची जास्तीत जास्त ओळख आपल्याला होत आहे, अशा वेळी आपल्या या ज्ञानाचा यशस्वी उपयोग दूर-दृष्टीने आणि सहानुभूतिपूर्वक करायची जरुरी आहे."

आम्हाला मिळालेल्या जागेचे ग्रीनफील्ड होतं, म्हणजे हिरवीगार शेती. पण प्रत्यक्षात मात्र दगडधोंड्यांनी भरलेली जमीन. तिथे पाणी नाही, वीज नाही, विषारी सापांची वस्ती. त्यातल्या काही जातीच्या विषारी सर्पांनी पुढे बालसदनाच्या मातांना चांगलाच उपद्रव केला. मध्यवर्ती इमारत जी बालग्रामात मधोमध उभी राहणार होती, तिला बांधायला बरेच दिवस लागले.

पंडित नेहरूंनी केलेल्या विनंतीला आम्ही २ वर्षेपर्यंत प्रतिसाद देऊ शकलो नव्हतो. बालग्राम सोसायटीची रीतसर स्थापना झाली होती. दर काही महिन्यांनी इंदिरा गांधी सोसायटीची मीटिंग घेत होत्या. पण काही प्रगती नव्हती. म्हणून आम्ही असा निर्णय घेतला की, सर्व सूत्रे आपण हातात घेऊन त्या दगडांच्या ग्रीनफिल्डचे बालग्रामात रूपांतर करून टाकू. एका ऑस्ट्रियन आर्किटेक्टने नकाशे काढले. आणि आमची सहकारी फ्राऊ एडिश पोल हिने सर्व सूत्रे हातात घेतली. बांधकामासाठी आम्ही तिथलेच दगड वापरले ! परिणामस्वरूप २० घरे उभी राहिली, एक समाज-मंदिर बांधलं गेलं, एक रुग्णांचा हॉल आणि इतर आवश्यक इमारती बांधून तयार झाल्या. थोड्याच महिन्यांत ग्रीनफील्डचे बालग्राम मूर्त स्वरूपात दिसू लागलं. फुलांनी सजविलेल्या ५० कमानी उभारून त्यातून पंतप्रधान इंदिरा गांधींना मिरवणुकीने बालग्रामात आणण्यात आले आणि तिथे घराचा आसरा मिळालेल्या शेकडो मुलांनी



त्यांचे उत्स्फूर्त आनंदाने भव्य स्वागत केले.

हिंदूंच्या जगात पहिल्या मुलांच्या बालग्रामाने आपले पाय रोवले. माता पण हिंदू होत्या. प्रत्येक जण त्या कल्पनेला हसत होता. विचार करणें पण अशक्य वाटत होते कारण अशी गैरसमजूत होती, की हिंदू स्त्रिया इतर माणसांच्या मुलांची पर्वा करणार नाहीत. त्यांना आपल्या शेजाऱ्याविषयी प्रेमाची भावना नसते. पण प्रत्यक्षात मात्र आम्हाला उलटे दर्शन झाले. मातृत्वाची भावना ही सर्व संस्कृतींना व्यापून टाकणारी भावना आहे आणि आज आपण त्या भावनेचा आविष्कार सर्व जगभर पाहात आहोत.

## दलाई लामांची भेट

आज ग्रीनफील्डचा उत्तम नमुना सबंध भारताला प्रकाशित करतो आहे. शेकडो संस्था व होमस्नी ह्या नमुन्याच्या धर्तीवर अनेक बालग्रामांची स्थापना केली आहे. बवाना, जयपूर अहमदाबाद, आणि कलकत्ता येथे तर बालग्रामे आहेतच, पण अगदी भारताच्या उत्तर टोकाला ८०० तिबेटी निर्वासित मुलांसाठी पण बालग्राम उघ-डले आहे. खुद्द दलाई लामांनी आमच्याकडे त्यासाठी मदत मागितली होती.

मी भारतीय पोशाख खरेदी केला होता. एक मोठी रुंद विजार मला फक्त १ डॉलरला मिळाली होती. तो पांढरा खादीचा कपडा होता. त्यामुळे त्यातून हवा खेळत होती. १९७१च्या मेमधली ती भयानक उन्हाळ्याची वेळ होती. मी हा पोशाख घालून न्यू दिल्लीला गाडीत बसलो. ती आगगाडी उत्तरेकडे प्रवास करीत होती. अगदी कंटाळवाणा व त्रासदायक असा तो प्रवास होता. माझी सर्व हाडं खिळखिळी झाली. अशा अवस्थेत मी त्या गलिच्छ पठाणकोट स्टेशनवर उतरलो. तिथे मला २ तरुण तिबेटी लोक भेटले. दलाई लामांनी मला घेऊन येण्यासाठी त्यांना जीप देऊन पाठवले होते. आम्ही जवळपास १० तास त्या पर्वताच्या अरुंद रस्त्यावर जीपने जात होतो. ती हिमालयाची कठीण वाट होती. अखेर २००० मीटर उंचीवर असलेल्या धरम-शाला गावात आम्ही पोहोचलो. जंगल, कडे, पठारे आणि आमच्याकडे असतात तशा पर्वतावरील लहान झोपड्या आणि सगळीकडून हिमालयाचे उत्तुंग भव्य दर्शन घडत होतं. तो पर्वत हिंदुस्तानच्या उत्तरेकडून थेट तिबेटपर्यंत पसरलेला होता.

ह्याच ठिकाणी १९५९साली भारताचे पंतप्रधान पंडित नेहरूंनी ह्या निर्वासि-तांच्या देवाला तिबेटहून तो आल्यावर स्वागतपूर्वक देशात घेतले होते. हिंदूंना पण दलाईलामा हा परमेश्वराचा अवतार वाटत होता. नेहरू दलाई लामांसमोर वाकले

होते व त्यांनी त्यांचे आशीर्वाद मागितले होते. नंतर त्यांनी एक जुना ब्रिटिशांच्या वेळचा बंगला त्यांना राहायला दिला होता. तिथे तिबेटीयन सरकारने आपले अज्ञातवासातील सरकार स्थापन केले होते. पण जगातल्या मोठ्या सत्तांनी त्यांचे अस्तित्व मानले नव्हते. हिमालयाच्या ह्या अत्यंत बिकट रस्त्यांतून दलाई लामांचे २ लाख अनुयायी स्वतंत्र भूमीत येऊन पोचले होते. काही लोक नेपाळ व भूतानकडे भटकत गेले, तर काही यूरोप-अमेरिकेकडे निघून गेले. पण ७०,००० लोक भारतात राहिले. ते सर्व निर्वासित आहेत व त्यांचे एकमेकांशी मित्रत्वाचे संबंध आहेत. ते भारतात कायमचे निर्वासित बनून राहिले आहेत. पण मनातून त्यांची अतृप्त इच्छा आपल्या तिबेटच्या हिमालयन राज्यात परत जाण्याची आहे. दलाई लामा हे त्यांचे धार्मिक गुरू आहेत. त्यांना अमर्यादित सत्ता आहे. ते अत्यंत पवित्र मानले जातात आणि त्यांच्यासाठी कुणीही तिबेटी मनुष्य निःसंदेह स्वतःचा प्राणत्याग करायला तयार असतो. तरीदेखील दलाई लामा त्यांच्या पळून आलेल्या लोकांकडून फक्त एकाच गोष्टीची मागणी करतात ती म्हणजे पूर्ण विश्वास ठेवला पहिजे की, तिबेट एक ना एक दिवस स्वतंत्र होईल. मग ते आपल्या ७०,००,००० तिबेटन् पुरुषांना, स्त्रियांना व मुलांना घेऊन ह्या अवांच्छनीय जागेतून आणि एकाकी असलेल्या पर्वतीय खेड्यांतून परत स्वदेशी निघून जातील !

दलाई लामांच्या अतिथीगृहात त्यांची बहीण ग्यालपोने माझे स्वागत केले. सर्व तिबेटच्या लोकांना ती म्हणजे मुलांची सेवा करणारी मूर्तिमंत देवीच वाटत होती. मसूरी आणि धरमशाला येथील २ छावण्यांतून तिने आईबापांविरहित असलेली १०००हून अधिक मुले गोळा केली होती. त्यांच्या वरील बाजूस झुलुतालमध्ये १०,००० तिबेटी लोक अत्यंत कठीण श्रमाचे रस्ता बांधणीचे काम करीत होते. प्रत्येक दिवशी अधिकाधिक मुले पोरकी होत होती. घराची त्यांना ओढ लागलेली होती. आणि प्रतिकूल हवामानाचा त्यांना खूप त्रास होता होता. तेथील सर्वात मोठा शत्रू म्हणजे क्षयरोग. आता या मुलांसाठी ह्या २ छावण्यांतून कितीतरी पटींनी चांगली इमारत बांधून बालग्रामे वसवली आहेत आणि मध्यंतरीच्या काळात त्या घाणेरड्या बराकीतील राहिलेली बाकीची सर्व मुलेपण बालग्रामात हलवली आहेत. तिथे शाळा आहेत आणि बालवाड्या पण आहेत. त्यांना खूप शिकायला हवे आहे, मनन करायला हवे आहे आणि पुष्कळसे साध्य पण करून घ्यायला हवे आहे.

धरमशालेत आल्यानंतर २ दिवसांनी मी स्वच्छ पांढरा सिल्कचा मफलर गळ्याभोवती गुंडाळून घेऊन दलाई लामांना भेटायला त्यांच्या त्या साध्या घरात गेलो. भारतीय सरकारच्या खूप सुरक्षा चौकशीतून मला जावे लागले व बरीचशी तारेची कुंपणे पण ओलांडावी लागली. निर्वासित होऊन आलेल्या व उच्च धर्मगुरूला कसे संरक्षण



द्यावे याची पूर्ण माहिती भारतीयांना होती. दयाघन परमेश्वराचा तो १४ वा अवतार होता. त्याच्या रूपाने बुद्धदेव वावरत होता आणि स्वतःचा निर्वाणाचा विचार न करता मानवजातीची मदत करीत होता. १३वा दलाई लामा देवाघरी गेल्यावर त्याचे जागी हा सध्याचा दलाई लामा निवडला गेला. तेव्हा तो फक्त २ वर्षांचा होता. त्याचे वडील एक सामान्य शेतकरी होते आणि त्यांच्या गरीब झोपडीत तो राहात होता. अमडो ह्या अगदी टोकाच्या जिल्ह्यात राहणाऱ्या ह्या गरीब शेतकरी मुलाला दयाघन परमेश्वराचा अवतार मानलेला होता. जे अनेक बौद्ध भिक्षू तिबेटभर पसरलेले होते, त्यांना सर्वांना दिव्यदृष्टी प्राप्त होऊन दृष्टांत पण मिळाला होता. म्हणून ते मोठ्या संख्येने त्या झोपडीकडे जात होते. तिथे त्यांना हा लहान मुलगा दिसला. त्याने सर्व परीक्षा व खाणाखुणा पटवून दिल्या. आपल्या बुद्धीला त्या कधीच पटणाऱ्या नाहीत. आणि त्यामुळे त्या बौद्ध भिक्षूंची खात्री पटली की, ह्या मुलात परमेश्वराचा अंश आहे. त्या मुलाला त्यांनी ल्हासा येथे नेले, आणि तिथल्या ''गॉटरबर्ग'' मधे त्याला प्रशिक्षण दिले. त्या शिक्षणामुळे (Potala) तो भविष्यातील कामासाठी तयार झाला.

१९५० साली जेव्हा तो १५ वर्षांचा झाला तेव्हा चीन देशाच्या लाल सेनेने तिबेट जिंकून घेतला. दलाई लामाने आपली भूमी व लोकांना वाचवायचा प्रयत्न केला. सबंध वर्षभर तो पेकिंगमध्ये माओ-त्से-तुंगशी बोलणी करीत होता. एका तहाचा मसुदा तयार झाला व त्यात तिबेटच्या संस्कृतीच्या रक्षणाची वरवरची हमी दिली गेली. पण पुन्हा जागृत झालेला तो चिनी ड्रॅगन स्वस्थ बसणारा नव्हता. तिबेटच्या दीर्घ इतिहासात चिनी लोकांनी अनेक वेळा तिबेटवर आक्रमण केले होते. आणि त्या दुःखी देशाचे तुकडे गिळंकृत केले होते. त्यांची पुन्हा कारवाई सुरू झाली. हळूहळू एकेक जिल्हा चिनी आक्रमणाखाली दडपला जाऊ लागला. कम्युनिस्टांचे राज्य सुरू झाले. शेकडो-हजारो लोकांचे प्राण गेले आणि सरतेशेवटी त्या राजधानीवर हल्ला झाला. ल्हासावर आक्रमण झाले. Potala धार्मिक मंदिर जाळले गेले. म्हणून दलाई लामा अज्ञातवासात निघून गेले आणि वेश बदलून त्यांनी महत्त्वाच्या कागदपत्रांसह तिबेटची सरहद्द ओलांडली. तिबेट बुडाला, पण त्यांचा गुरू, परमेश्वर जिवंत राहिला !

आणि मी त्यांच्यासमोर उभा राहिलो. त्यांचा चेहेरा आनंदी, तरुण व बुद्धिमान दिसत होता. सूचना मिळाल्याप्रमाणे मी त्यांच्यापुढे वाकलो आणि पांढरा मफलर त्यांना भेट म्हणून दिला. दलाई लामांनी दोन्ही हातांनी तो मफलर स्वीकारला, त्याचे चुंबन घेतले आणि स्वतःच्या गळ्याभोवती टाकला. नंतर त्यांनी मला बसायला सांगितले. त्यांच्या स्वीय चिटणीसांनी मला चहा दिला. अजूनपर्यंत आम्ही काहीच बोललो नव्हतो. दलाई लामांनी आपल्या पाहुण्याकडे हसून बघितले. त्यात आतिथ्याची भावना

होती आणि ती भावना प्रत्येक संभाषणात अनुभवास येत होती. मी थोडा वेळ थांबलो. नंतर त्यांनी थोड्याशा मंद गतीने थांबत थांबत व सौम्य आवाजात माझ्याशी बोलायला सुरुवात केली. सुरुवातीस त्यांनी ऑस्ट्रिया, व्हिएन्ना व युरोपातील राजकीय परिस्थितीबाबत विचारणा केली. लवकरच आमचा मोकळा संवाद सुरू झाला आणि आम्ही कला, राजकारण, धर्म, लोक, तंत्रज्ञान, आत्मा, परमेश्वर, अशा अनेक विषयांवर बोलू लागलो.

ते म्हणाले, "ख्रिश्चन धर्माबद्दल माझ्या मनात अतिशय आदरभावना आहे." त्यांनी बायबलचा चांगला अभ्यास केला असावा असे वाटले.

"आपल्या शेजाऱ्यावर प्रेम करा" ह्या संदेशात सर्व राष्ट्रांचे कल्याण निहित आहे. आजच्या जगातील दुष्ट भावनेवर विजय मिळविण्यास यापेक्षा अधिक चांगला दुसरा मंत्र नाही. खरंच, उद्याच्या जगात दुसरं काहीच शिल्लक उरणार नाही. माणसाला हा निर्णय घ्यावा लागेल की, शत्रुत्व पत्करून सर्व जगाचा नाश करायचा की प्रेमभावना जागृत करून सर्व बंधने तोडून माणसाला माणसाच्या जवळ आणण्याची आशा बाळगायची." नंतर आम्ही बराच वेळ बालग्राम चळवळीविषयी बोललो. दलाई लामांनी स्वतःच्या चिंता मोकळेपणाने सांगितल्या. शेवटी आम्हाला जी योजना तिबेटी मुलांसाठी करायची होती त्याबद्दल त्यांनी माझे आभार मानले.

ह्या सर्व गोष्टीत काही तास निघून गेले. ते तास खूप संस्मरणीय व महत्त्वपूर्ण असे होते. मी पत्रकार असल्यामुळे त्यावेळच्या जगातल्या अनेक पुढारी व्यक्तींना भेटण्याची संधी मला मिळाली होती. पण दलाई लामांच्या भोवती जे आकर्षणाचे वलय होते, ते काहीतरी विशेष आहे असे मला वाटते. त्यांच्याबद्दल माझ्या मनात अवर्णनीय असा आदर निर्माण झाला.

तेव्हापासून आमच्या बालग्रामच्या मदतीच्या कार्यक्रमात तिबेटचे नाव कायमचे घातलेले आहे. ह्या प्रश्नासाठी देखील मायनरचा परिपाठच उपयोगी पडला.

अशाप्रकारे ईम्स्टची कल्पना आशिया खंडातील सुपीक जमिनीत पण रूजली. आज आम्ही जॉर्डन, लेबनॉन, थाईलँड, फिलिपाईनस्, इंडोनिशिया, तैवान, बांगला देश, नेपाळ आणि व्हिएतनाममधे देखील बालग्रामे चालवीत आहोत.

जेव्हा व्हिएतनामचे बालग्रामचे काम पुरे झाले, तेव्हा आम्ही आमच्या आशिया खंडातील कामाचे शिखर गाठले. तिथली बालग्रामची योजना म्हणजे एक अद्‌भुत साहसच होते. कोणत्याही सामाजिक कार्याच्या क्षेत्रात इतकी कठीण परिस्थिती आली नसेल. पण शेवटी ते साध्य झाले, आणि त्या साहसी पराक्रमाने आम्हाला शेजाऱ्यावरील प्रेमाने कैक वर्षे गुरफटून टाकले. त्याने आमच्या शक्तीवर शिलकीवर आणि



विचारशक्तीवरही ताण पडला. परंतु २० वर्षांच्या बालग्राम चळवळीतील आमच्या कामाने आम्हाला एक मोठी शिकवण दिली. मानवतेने काम करणारी आपण माणसे सतत एकमेकांजवळ येत असतो. आपल्या ध्येयावरची आपली निष्ठा अधिक बळकट होते आणि आपल्या सर्वांना एकत्र बांधून घेण्याची प्रक्रिया आपोआप होत असते.

## लॅटिन अमेरिका - एक जागृत खंड

लॅटिन अमेरिकेत पण बालग्रामची कल्पना रूजू लागली होती. त्या खंडातून बरीच तज्ज्ञ मंडळी ये-जा करीत होती आणि स्पॅनिश व पोर्तुगीज भाषेतील आमचा पत्रव्यवहार रोज खूपच वाढत होता. त्यामुळे मला पूर्वसूचना मिळत होती. आता माझा आंतरराष्ट्रीय कामाचा विस्तार इतका वाढला होता, की माझे ते काम आणि शिवाय हिंटरब्रुलचा डायरेक्टर म्हणून असलेली माझी जबाबदारी सांभाळणं मला कठीण जात होतं. पुन्हा एकदा व्यक्तिगत निर्णय घेण्याची वेळ आली होती. मी बाल ग्राम संचालक म्हणून काम करून पूर्णवेळ मुलांच्या शिक्षणाकडे लक्ष द्यावे की आंतरराष्ट्रीय कामांचा वाढता व्याप संभाळण्यासाठी मायनरच्या सोबत त्याची ऑफिसची व्यवस्था संभाळावी ? शेवटी मी व्यापक कामाला माझी गरज आहे हे लक्षात घेऊन हिंटरब्रुलच्या मातांचा निरोप घेतला.

लॅटिन अमेरिका एक ना एक दिवस जगावर आपली छाप पाडल्याशिवाय राहाणार नाही. हे प्रचंड भूखंड असून जवळपास २ कोटी स्क्वेअर किलोमीटरचा त्याचा विस्तार आहे. रशियाला धरून जेवढे युरोप खंड आहे, त्याच्या दुप्पट हा भूखंड आहे. सध्या ह्या प्रदेशातून प्रचंड आर्थिक विकासाचे कार्यक्रम सुरू आहेत. अर्थात् अजून राजकीय दृष्टीने त्यांना स्थैर्य मिळायला अवधी लागणार आहे.

१९४५ सालापासून लॅटिन अमेरिका ही अविकसित राष्ट्राच्या समूहापासून स्वतःला अलग करून आता तेथील लोक स्वतःला विकसनशील राष्ट्रसमूहाचा एक घटक मानतात. पण ह्या विकासासाठी अत्यंत परिश्रम करावे लागत आहेत आणि खूप मोठ्या प्रमाणावर त्याग पण करावा लागणार आहे. शेतीची व्यवस्था आमूलाग्र बदलावी लागेल आणि उद्योगधंद्याला जोराची चालना द्यावी लागेल.

तरीदेखील, लॅटिन अमेरिका हे एक अतिउत्साही खंड आहे हे मानावेच लागेल. ते हळूहळू जागृत होत आहे आणि उज्वल भविष्याकडे बघत आहे. तिथे सर्वोत्तम आर्किटेक्चरचा नमुना पाहावयास मिळतो व त्याचबरोबर अगदी पुरातन जगातील जुनाट झोपड्या पण आढळतील. सामाजिक प्रश्न विविध आहेत. मोठाल्या शहराकडे

लाखो लोक जात आहेत व लोकसंख्या अमर्यादित वाढायची शक्यता आहे. उपेक्षित मुलांचा प्रश्न मोठा आहे. त्या मुलांना रस्त्यावर बूटपॉलिश करताना आणि भींक मागताना पाहून मन विषण्ण होऊन जाते.

लॅटिन अमेरिकेत कॅथॉलिक चर्चचा मोठा पगडा आहे. मध्यंतरी हा पगडा थोडा कमी झाला होता पण आता पुन्हा तो वाढत आहे. तरुण व त्यागी धर्मप्रचारक समाज-कार्य करण्यासाठी पुढे सरसावले आहेत. पूर्वीच्या काळात चर्चचे मोठमोठे धर्म-गुरू एखाद्या राजाप्रमाणे राहत असत, पण ती गोष्ट आता इतिहासजमा झाली आहे. कारण आम्हाला असा वारेमाप खर्च करणारे धर्मप्रचारक कुणीही भेटले नाहीत. चर्चने बदलत्या काळाची पावले ओळखली आहेत आणि नवीन पद्धतीने लोकांना पुन्हा धर्माकडे प्रवृत्त करण्याचे त्यांचे प्रयत्न सुरू आहेत.

अशा या संक्रमणाच्या काळात बालग्रामचे काम हे सर्वांना एकत्र जोडणारे काम ठरू शकेल. आम्ही जे काही बालग्रामचे नमुने उभे केले त्यांनी लोकांना इतकी प्रेरणा मिळाली आहे की, आम्हा युरोपीय लोकांना त्याची कल्पना येणार नाही. विशेषतः सामाजिक कार्यात नव्या व आधुनिक योजनांवर तत्काळ लक्ष दिले जाते.

पण त्याचबरोबर बालग्रामच्या कामात अनेक अडचणी पण निर्माण झाल्या होत्या. त्यात मुख्य अडचण अर्थात् पैशांची होती. युरोपमध्ये जसे आम्ही सार्वत्रिक साधारण सभासद लाखोंच्या संख्येने नोंदवले, तसे इतर ठिकाणी नोंदणे शक्य नव्हते. त्याची दोन मुख्य कारणे होती. एकतर मध्यमवर्गीय लोकसंख्या तुरळक होती, आणि दुसरं म्हणजे पोस्टाने पैसे पाठविण्याची सुलभ व्यवस्था नव्हती. त्यामुळे बालग्राम सोसायटीने जे मित्र व आश्रयदाते जमवले, त्यांची संख्या फार कमी होती आणि त्यापैकी बरेच लोक दरमहा किंवा दरवर्षी बरीच जास्ती रक्कम पाठवीत होते आणि हे पैसे जमा करण्यासाठी त्यांना पगारी माणसे नेमावी लागली होती. बाकीच्या सर्व संस्थांना, उदाहरणार्थ रेड क्रॉस वगैरे हे करावेच लागत होते. पण ह्यामुळे देणगी जमा करण्याचे काम आणखीच अवघड होत असते. लोकांना एकदम खूप उत्साह वाटत असतो, पण तो दीर्घकाळ टिकत नाही. एकतर ते लवकर विसरून तरी जातात किंवा थंड पडतात किंवा आणखी कशाच्या तरी मागे लागतात.

दुसरी मोठी अडचण कार्यकर्त्यांची असते. अजून सामाजिक कार्यकर्त्यांना तितकी मान्यता नाही. युरोपीय लोकांपेक्षादेखील अधिक प्रमाणात प्रत्येक तरुण मुलीचे ध्येय लग्न करून मुलेबाळे होऊन संसार करावा असेच असते. ह्या व्यतिरिक्त माणसांच्या मनोवृत्ती वेगवेगळ्या असतात. सर्वांना स्वतःची जबाबदारी किंवा कर्तव्य याबाबत फारसे खोलवर काही वाटत नसते. त्यामुळे त्यांचे काम हे वरवरचे असते आणि लहर लागेल तेव्हा करायचे असते. मध्यमवर्ग छोटा असतो. तेव्हा त्यातून



बऱ्या संख्येने मातेचे काम करण्यास स्त्रिया मिळणे कठीण असते. कनिष्ठ वर्गाच्या स्त्रिया आहेत, त्या अडाणी व निरक्षर असतात आणि त्यामुळेच योग्य अशा स्त्रिया मिळविण्यासाठी खूप जोरदार प्रयत्न करावे लागतात आणि त्यांच्या प्रशिक्षणाची पण व्यवस्था करावी लागते. बालग्राम संचालकाची निवड पण तितकेच अवघड काम आहे. त्यामुळे तिथल्या सर्व समाज कल्याणकारी संस्था आणि शासकीय समाजसेवा संस्था पण बहुतांशी धर्मप्रचारकांच्या हातात आहेत.

## शुभारंभ : ट्रॅम गाडीतले बालग्राम

(Buenous Aires) ब्यूअेनोस आयरिस ह्या गावी लॅटिन अमेरिकेतील पहिला प्रयोग सुरू झाला. तिथे एक कल्पक धर्मगुरू पादकार्लोसर्डेला नावाचे होते. त्यांनी हे काम हाती घेतले. अर्जेंटिनामधे ते मुख्य पोलिस- धर्मगुरू आणि टेलिव्हिजनचे मंत्री होते. एकदा ते व्हिएन्नाला प्रवास करीत आले असताना त्यांनी हिंटरब्रूल पाहिले होते व तिथे असलेल्या बालग्रामाने ते प्रभावित झालेले होते. परत अर्जेंटिनाला गेल्यावर राजधानीच्या शहरातील उच्चवर्गीय स्त्रियांना एकत्र जमवून ते सतत बालग्रामचा डंका पिटत होते व ब्युअेनोस आयरिसमध्ये हे बालग्राम बनविण्याच्या गोष्टी करीत होते. बिचाऱ्या त्या श्रीमंत स्त्रिया मुकाटपणाने ऐकून घेत होत्या. कारण धर्मगुरूंची आज्ञा प्रमाण होती. राजधानीच्या प्रमुख शासकीय लोकांना पण त्याने एकत्र केले व त्यांच्याकडून त्याने जुन्या वापरलेल्या ट्रॅमगाड्या देणगी म्हणून मागून घेतल्या आणि एक विस्तृत अशी मोठी जमीन पण मागितली. त्यांनी एका आर्किटेक्टला बोलावून ३/३ गाड्या त्याला एकत्र जोडण्यास सांगितले, आणि त्यात सर्व घरगुती सामान सुमान खरेदी करून लावले आणि त्यांची आरामशीर घरे बनवली आणि अशारीतीने अवघ्या ३ महिन्यांच्या आत अर्जेंटिनाचे पहिले बालग्राम सुरू होऊन त्यात चैतन्याचे वारे खेळू लागले. अर्जेंटिनाच्या इतिहासात त्याची नोंद 'ट्रॅम गाडीतले बालग्राम' म्हणूंन झाली आणि कित्येक वर्षे ते तसेच चालले. त्यानंतर पाद्र गार्डेलाने आणि त्याच्या त्या श्रीमंत स्त्रियांनी पुरेसे पैसे जमवून गारीन (Garin) ला ब्युअेनोस आयरिसच्या जवळ एक मोठे बालग्राम बांधून काढले आणि त्या देशात समाज-कार्याचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून ते गणले जाते.

मायनर व मी जेव्हा प्रथम लॅटिन अमेरिकेला पोचलो आणि तिथल्या बालग्रामच्या लोकांशी व कामाशी आमचा परिचय झाला, तेव्हा मायनरने तिथला एक उपद्रवी जिल्हा पाहण्याची इच्छा प्रगट केली. तिथे जवळपास ८० लाख लोक रहात होते आणि हा जिल्हा गुंडगिरीबद्दल प्रसिद्ध होता. पाद्री गार्डेलाला मायनरची इच्छा

समजू शकली आणि तो आम्हाला त्या शेजारच्या जिल्ह्यात स्वतः गाडी चालवून घेऊन गेला. तिथे गाडी लावून तो आमच्याबरोबर त्या वस्तीत फिरत होता. "ब्यूऐनोस तार्देस गार्डेला" असे संबोधून त्याचे सर्व ठिकाणी लोक स्वागत करीत होते. एका हॉटेलच्या गुंड मालकाने आमचे स्वागत केले. त्याने पाद्र्याचा खांदा पकडला आणि आम्हाला त्याच्या त्या हॉटेलमध्ये घेऊन येण्याचे आमंत्रण दिले. त्याचे पाहुणे मानून त्याने आमचे स्वागत केले. त्या त्याच्या अड्ड्यात अंधार होता आणि आमच्या टेबलाभोवती अशा लोकांचे चेहरे दिसत होते की, रात्रीच्या अंधारात एकट्याने त्यांना भेटण्याची भीतीच वाटावी. पाद्र गार्चेलाने जणू काय प्रतिष्ठित लोकांचा तो समुदाय आहे असे मानून स्वतःचे भाषण सुरू केले व बालग्राम योजनेची माहिती सर्वांना दिली. आम्ही निघण्यापूर्वी बऱ्याच लोकांनी गरीब मुलांसाठी त्याच्या हातावर पैसे ठेवले.

दुसऱ्या दिवशी पाद्र्याबरोबर आम्ही तिथल्या प्रांताच्या मुख्य अधिकाऱ्याला भेटायला गेलो. त्याने पाद्र गार्डेलाला प्रेमाने मिठी मारली आणि तो म्हणाला, "खरंच हे एक चांगले काम आहे आणि आमचा पाद्र जर ही बालग्रामची योजना राबवीत आहे, तर ती चांगली असलीच पाहिजे आणि आमची आता पक्की खात्री झाली की अर्जेंटिनातील बालग्रामचे काम हे समर्थ हातात पडले आहे.

क्विटोमधे एका जर्मन कारखानदाराने त्याचे नाव गेरहार्ड एंगेल होते. बालग्रामाविषयी माहिती ऐकलेली होती. तो युरोपात प्रवासात आला होता, तेव्हा मला व्हिएन्नात येऊन भेटला होता आणि सर्व माहिती माझ्याकडून घेतली होती. इक्वेडोर मधे बालग्राम बांधण्याबाबत त्याने चर्चा पण केली होती. त्याप्रमाणे "SOS Aldeade Ninos Ecnador" ही सोसायटी स्थापन झाली आणि क्विटोच्या सीमेच्या बाहेर डोंगराच्या पायथ्याशी मक्याच्या शेतीने वेढलेले असे एक सुंदर बालग्राम बांधले गेले. त्या ठिकाणी पण एका माणसाच्या संकल्पाने व कर्तृत्वाने बालग्राम उभे राहिले होते आणि पैशांची व्यवस्था पण त्यानेच केली होती. बोलिव्हिया देशात कोचाबंबा ह्या गावी एक बालग्राम अजिबात गाजावाजा न करता उभे राहिले. साल्झबर्ग येथील हॅलेन स्कूलच्या सिस्टर्सनी पुष्कळ वर्षांपूर्वी तिथे अनाथ मुलांसाठी एक घर बांधलेले होते. त्या घराचे नाव "La Gotade Leche Drop Of Milk" "दुधाचा एक थेंब" असे होते. कारण त्या सिस्टर्सनी मुलांना दूध देण्यापासून त्यांच्या कामाला सुरुवात केली होती. एके दिवशी मला त्यांच्यापैकी एका ननचे पत्र आले. "कृपा करून आमच्या जुन्या अनाथाश्रमाचे नवीन बालग्राममधे रूपांतर करून द्या." आम्ही जरा टाळाटाळ केली म्हणून त्या सिस्टर्स साल्झबर्गच्या मुख्य धर्मगुरूंना भेटल्या आणि त्या डॉ. रोराखर (Rohracher) ने त्यांना घरे बांधण्यासाठी पैशांची मदत केली. मी



आणि मायनर जेव्हा कोचाबंबाला पोचलो, तेव्हा त्या जुन्या अनाथाश्रमाच्या अखेरच्या भिंती पडत होत्या. आणि त्यांनी एका आकर्षक बालग्रामाच्या इमारतीला जागा करून दिली होती. तिथल्या सिस्टर्सनी मातेचे काम स्वीकारले. त्यांनी आपले सर्व नियमित व्यवहार थांबविले. गणवेश वगैरे कपाटात बंद करून ठेवले व फक्त चर्चला महत्त्वाच्या समारंभाला जाताना ते त्या वापरीत असत. बाकीचा त्यांचा चर्चच्या सेवेचा सर्व वेळ त्या मुलांच्या सेवेत घालवीत असत आणि ही सर्व मुले स्थानिक भारतीय अनाथ मुले होती. दरम्यान त्या सिस्टर्सनी आणखी एक शेतीची जागा मिळवली होती आणि त्यात त्यांनी युवानिवास बांधला होता. त्यात राहाणारे मोठे मुलगे शेतीचे प्रशिक्षण घेत होते. आणि काही दिवसांनंतर शेतीवर आपली उपजीविका करणार होते. बोलिव्हिया देश जेव्हापासून समुद्रकिनाऱ्यापासून आत दूर खेचला गेला, तेव्हापासून त्या देशातले जीवन प्रामुख्याने शेतीवरच निर्भर आहे.

## चिली देशातील उंदरांचे बीळ

ला कोस्टानेरा ही एक झोपडपट्टी आहे. त्यात विशेष असे काहीच नाही कारण लॅटिन अमेरिकेतील प्रत्येक शहरात अशा झोपडपट्ट्या आहेत. परंतु ला कोस्टानेरा ही अतिशय घाणेरडी झोपडपट्टी होती. कचरा, उकिरडा, घाण, उंदीर सर्वांनी व्याप्त होती. तरीदेखील ३०,००० लोक तिथे राहत होते. त्यांची घरे उकिरड्यावर होती, कुत्री तिथे हुंगत फिरत असत. मुलं आणि वृद्ध माणसं तिथं कुजत होती. पुठ्ठ्याची आणि पत्र्यांच्या तुकड्यांची त्यांची घरं होती आणि त्यातही उपाशी, कळवळणारी माणसं राहात होती. चोऱ्या करीत होती आणि अनैतिकतेच्या गर्तेत लोळत होती.

पुष्कळजण म्हणत असत की, ही ला कोस्टानेराची झोपडपट्टी जाळून टाकली पाहिजे; म्हणजे गुन्हेगारांना जन्म देणारी एक वसाहत नष्ट होईल.

एकदा आंद्रे श्लोसर (Andre Schosser) ह्या अल्सेसच्या धर्मतत्त्व शिकविणाऱ्या पाद्र्याला कुणीतरी ही गोष्ट सांगितली. एकदा तो तिथे गेला आणि त्याने आपली मोटार त्या झोपडपट्टीतील गटारांच्या बोळाबोळांतून चालविली. आज तो हे कबूल करतो की, त्यावेळी त्याला अनेक वेळा ओकाऱ्या आल्या. ती घाण त्याला अजिबात सहन होईना, आणि त्या भेटीनंतर त्याची मनःशांतीच हरवून गेली. त्याने स्वतःचे प्रोफेसरचे काम सोडून दिले आणि तो ला कोस्टानेराच्या झोपडपट्टीत आला.

हे १५ वर्षांपूर्वी घडले होते. आजदेखील ला कॉस्टानेराचे दृश्य बदललेले नाही पण तिथली माणसे बदललेली आहेत. मानवतेचा स्पर्श त्यांना झालेला दिसतो आणि

ते भविष्याची आशा बाळगताना दिसतात. आशा पुन्हा पालवते आणि त्यांपैकी बऱ्याच जणांना त्यामुळे ती झोपडपट्टी सोडून चांगल्या समाजात जाऊन राहण्याचा मार्ग पण दिसला आहे.

ह्या झोपडपट्टीच्या मधोमध आज एक बालग्राम उभे आहे. ला कॉस्टानेरामधे निराधार मुलांसाठी चांगली बांधलेली घरे, कुटुंबे, शाळा आणि दवाखाना पण आहे. तिथे राहणाऱ्या प्रत्येक मुलाला लिहिता-वाचता येण्याची संधी मिळाली आहे. आजारी लोकांची तिथे काळजी घेतली जाते. भुकेलेल्यांना अन्न मिळते. म्हाताऱ्या लोकांना विश्राम मिळतो आणि बेकार लोकांना शक्यतो काम पुरविले जाते.

१५ वर्षे जवळपास आंद्रे श्लोसरने स्वतःच्या हिंमतीवर हे काम केले. सुरुवातीला त्याला फार कठीण गेले. तो तिथे परकीय होता व त्याने तेथील अवर्णनीय पीडा बघितलेली होती. परंतु परकीय असल्यामुळे लोकांनी त्याचे स्वागत केले नव्हते. आंद्रे श्लोसर आपले ओठ घट्ट आवळून ठेवून त्या वस्तीत फिरत असे. त्याने त्याचा झगा घातला नाही. लोकांना वाटायचे की तो डॉक्टर आहे. कारण तो आजारी माणसांकडे जायचा, मुलाच्या जन्माचे वेळी मदत करायचा आणि मृत्युशय्येवरील माणसाच्या शेजारी बसायचा. तो औषधे, कपडे व अन्न घेऊन यायचा आणि या सर्वांपेक्षा अधिक म्हणजे तो आस्थेने व प्रेमाने, आपुलकीने सर्वांची चौकशी करायचा. तो कधी कुणाला प्रश्न विचारीत नसे, किंवा कुणाची निंदा करीत नसे. तो फक्त सर्वांना मदत करायचा. अशाप्रकारे त्याने लोकांचा विश्वास संपादन केला. त्याने मुलांसाठी बराकी बांधल्या, आणि चिली व फ्रान्स देशातील आपल्या मित्रांना बोलावले. त्याचा एक भाऊदेखील धर्म प्रचारक होता. तो पण आला. ह्या सर्व स्वार्थत्यागी लोकांनी केलेली मदत हळूहळू परिणाम करू लागली आणि शेजाऱ्यावरील प्रेमभावना विकसित होऊ लागली.

एक दिवस हर्मन मायनर व मी ला कोस्टानेराला भेट द्यायला गेलो. कारण आंद्रे श्लोसरने आम्हाला येण्याविषयी खूपच आग्रह केला होता. त्या वस्तीतील मुलांच्या रक्षणाच्या प्रश्नाने लक्ष वेधून घेतले होते. बालग्रामच्या पायाचा दगड एक दिवस रोवला गेला आणि जर्मनी व स्कँडिनेव्हिया देशातील बालग्रामच्या मित्रांनी देणग्या जमवून पाठविल्या. जेव्हा घरे बांधली जात होती, तेव्हाच मातांना शोधण्याचे व त्यांना प्रशिक्षण देण्याचे काम सुरू झालेले होते. लवकरच ह्या स्त्रियांनी मुलांना आपल्याजवळ घेतले आणि आयुष्यात कधी न मिळालेले प्रेम आणि सुरक्षितता त्या मुलांना मिळाली. ही सर्व मुले ला कोस्टानेराची होती आणि सर्वप्रथम त्यांच्या आरोग्याकडे लक्ष देणे आवश्यक होते.

आज ह्याच झोपडपट्टीतील मुलांसाठी कोन्सोप्सिआनेजवळ आणखी ३ बालग्रामे बांधलेली आहेत. त्या बालग्राम सोसायटीने जवळच शेती विकत घेऊन तिथे मुलांसाठी अन्नधान्याचे उत्पादन सुरू केले आहे. कारण चिली देश गरीब आहे. लॅटिन अमेरिकेतील दुसऱ्या कुठल्याही चिली देशाइतकी गरीबी, उपासमार, बेकारी किंवा क्षयरोगाचा प्रसार नसेल. मुले व मुली जसजशी मोठ्या वयाची होऊ लागली, तसतसे त्यांच्यासाठी युवानिवास पण बांधले गेले.



ला कोस्टानेरा अजून अस्तित्वात आहे. पण आज ती इतर झोपडपट्ट्यांसारखी दिसणारी वस्ती आहे . जुनी गलिच्छ उंदरांची बिळे आता नाहीत. ला कोस्टानेराच्या लोकांना बालग्रामच्या योजनेचे महत्त्व पटले आहे. ते आता स्वतःची घरे पण ठीकठाक बांधतात, आतील सर्व रचना रहायला आवडेल अशी असते आणि आता पुष्कळ स्वच्छता पण दिसते. सुरुवातीस जे अशक्य वाटत होते, ते आता घडलेले आहे. त्या गलिच्छ जिल्ह्यात सामाजिक सुधारणा घडवून आणण्यास बालग्राम कारणीभूत झाले आहे.

ज्याप्रमाणे चिलीमध्ये आंद्रे श्लोसर निघाला त्याप्रमाणे होनडुरास (Honduras) मधे बालग्रामच्या आघाडीवर सोर मारिया रोझा नावाची एक छोटीशी गोलगोल आकाराची नन् उभी राहिली. हा प्रदेश कॉफी आणि केळींच्या उत्पादनाबद्दल प्रसिद्ध आहे. अशा ह्या प्रदेशात तिचे नाव सर्वांच्या तोंडी होते. सर्व लोकांच्या मनात एक संतमहिला म्हणून तिची प्रतिमा आहे. मारिया रोझाने आपले सर्व जीवन देशातल्या निराधार लोकांसाठी वाहून घेतले आहे. Tegucigalpa ह्या राजधानीच्या शहरात ती झोपडपट्टीतल्या प्रत्येक घरात तर जातेच, पण श्रीमंत लोकांच्या दिवाणखान्यात पण ती दिसत असे. गरीब लोकांना ती दिलासा व आराम देत असे. तर धनवान लोकांना ती मदत करण्याची प्रेरणा द्यायची. मारिया रोझाला पैसे कुठून मिळवायचे ते माहीत होते. ती स्वतःच्या देशांतील लोकांना पण सोडत नसे. तिथले श्रीमंत लोक जेव्हा स्वतःच्या संपत्तीचा गर्व करून बोलत तेव्हा ती त्यांची कानउघाडणी करायला मागेपुढे पाहत नसे.

सुरुवातीपासूनच लहानशा बालग्रामाची कल्पना मारिया रोझाला पसंत नव्हती. इथल्या निराधार मुलांची संख्या इतकी मोठी आहे की, मला त्यांच्यासाठी ४० घरांचे बालग्राम बांधलेच पाहिजे अशा आशयाचे पत्र तिने एक दिवस आम्हाला पाठवले. हर्मन मायनरने एक उसासा टाकला. त्यातून काय साधणार आहे ? पण त्यातून सर्व चांगलेच निघाले आणि लॅटिन अमेरिकेत एक मोठे बालग्राम उभे राहिले. एका गरीब वस्तीच्या मध्यभागी ते बांधले गेले. सॅन पेट्रोसुला या ठिकाणी तिने थोड्याच दिवसांत दुसरे बालग्राम बांधले आणि आता ती तीसरे सुरू करीत आहे. मारिया रोझा स्वतःचा श्वासोच्छ्वास पूर्ण करायला पण थांबत नाही. जवळपास १८ ते २० तास ती रोज

काम करते आणि त्या कष्टांचा तिच्या प्रकृतीवर परिणाम झालेला दिसतो. मी तिला जेव्हा थोड्या वर्षांपूर्वी भेटलो होतो, तेव्हा तिला पाठीचे दुखणे होते. डोकेदुखी होती आणि छातीत दुखत होते. आम्ही तिला ताबडतोब युरोपमध्ये आणली व तिला साल्झ बर्गच्या हॉस्पिटलमधे ३ आठवडे ठेवली. तिथून तिने मला दुसऱ्याच दिवशी फोन करून सांगितले, "डॉक्टर, प्लीज मला येथून ताबडतोब घेऊन जा. मी इथे आता आणखी राहू शकत नाही. जर मला काही काम नसेल तर मी मरून जाईन."

मला तिला दटावून सांगावे लागले की जर ती येथे राहून उपचार करून बरी झाली नाही, तर तिला आम्ही होंडुरासला परत जाऊ देणार नाही." तीन आठवड्यां-नंतर जेव्हा मी तिला घ्यायला गेलो, तेव्हा ती धावतच मला भेटायला आली. म्हणाली, "माझ्या पुऱ्या आयुष्यात मला इतके चांगले कधीच वाटले नव्हते आणि आता मला पण समजलंय, की काही न करता वेळ घालविणे पण मजेशीर असतं !" पण तिच्या दुर्दैवाने तिला पुन्हा अशी आरामाची सुट्टी कधी मिळालीच नाही. होंडुरासच्या बाल-ग्रामने तिला पूर्ण वेळ कामात ठेवले.

मेक्सिकोतील बालग्रामची सुरुवात अगदी वेगळ्या तऱ्हेने झाली. एका प्रसिद्ध स्त्री-रोग-तज्ज्ञ डॉक्टरला बालग्रामच्या कल्पनेने पछाडले. तिथे भारतीय यात्रेकरूंच्या लोकांच्या प्रसिद्ध गाऊडालुप (Guadalupe)च्या मंदिराच्या पाठीमागे निसर्गरम्य अशा पर्वताच्या पायथ्याशी पहिल्या बालग्रामची सुंदर घरे त्याने बांधली. त्यातल्या प्रत्येक बालसदनाला एका महिलेचे नाव दिलेले आहे...

"ह्याचे विशेष महत्त्व काय आहे ?" मी प्रथमच त्या बालग्रामला भेट देत होते.

त्याने मिस्कीलपणे डोळा मारला. "त्या सर्व स्त्रिया माझ्या पेशंट होत्या. ऑपरे-शन करण्यापूर्वी मी त्यांना सांगत असे की त्यांनी मला बालसदनाच्या बांधकामाची देणगी दिली पाहिजे. नाहीतर मी त्यांना ऑपरेशनच्या वेळी भूल देणार नाही."

अर्थात हे त्याचे सर्व बोलणे विनोदाचे होते. तो मेक्सिकन होता ! ह्या लॅटिन अमेरिकेतील बालग्रामातल्या काही ठळक आठवणी सागंता येतील अशा आहेत. एक मूक क्रांती देशादेशांतून संक्रमण करीत होती. प्रत्येक ठिकाणी अर्थात विरोध होतच होता. ज्या संस्था ह्या क्षेत्रात परंपरागत काम करीत होत्या, त्या नवीन योजनांना धुड कावून लावण्याची खटपट करीत होत्या. वर्तमानपत्रातून पण टीकास्त्रे उडत होती. बालग्राम म्हणजे वादविवाद. लोकमानसात बेचैनी आणि नवे आव्हान होते. पण मायनरने व मी पहिल्याच भेटीत हे ओळखले की बालग्राम कल्पनेला जे यश लॅटिन अमेरिकेत मिळाले, तसे यश जगातील दुसऱ्या कुठल्याही देशात मिळाले नाही. आज बालग्रामच्या कल्पनेने लॅटिन अमेरिकेच्या सर्व राष्ट्रांत मूळ धरले आहे आणि तिथे



२७ बालग्रामे केव्हाच सुरू पण झाली आहेत.

## वाढती कामे - वाढत्या जबाबदाऱ्या

बालग्रामच्या कल्पनेचा जो प्रचंड विस्तार आशिया व लॅटिन अमेरिकेत झाला, त्यामुळे १९६० साली युरोपात जी संस्था "युरोपियन सोसायटी ऑफ एस ओ एस चिल्ड्रनस् व्हिलेजस्" या नावाने स्थापन झाली होती, तिचे कार्यक्षेत्र अपुरे वाटू लागले. म्हणून एका सर्वसाधारण सभेत आम्ही त्या संस्थेचे जुने नाव बदलून आमच्या मातृसंस्थेला "एस ओ एस चिल्ड्रेन व्हिलेज इंटरनॅशनल" हे नवीन नाव दिले. संस्था निर्माण झाल्यापासून अवघ्या ५ वर्षातँच ४ सभासद संस्थांचे जागी आता ३० सभा-सद संस्था झाल्या होत्या. युरोपच्या बाहेरील देश संस्थेत येण्यासाठी जोरदार प्रयत्न करीत होते आणि जवळपास एका रात्रीत ह्या संस्थेने विकसनशील राष्ट्रांना मदत करायला सुरुवात केली.

ह्या सर्व विस्ताराच्या मुळाशी एक मुख्य कारण असे होते की, संस्थेचे उत्पन्न वाढत होते. जे यश आम्हाला तांदळाच्या दाण्याच्या मोहिमेने मिळवून दिले होते त्या-मुळे आमची खात्री पटली होती की, असे पुष्कळ लोक विकसनशील देशात पण भेटतील की जे बालग्रामची कल्पना उचलून धरून आर्थिक मदत करू शकतील. म्हणून आम्ही एक देणग्यांची योजना आखली. श्रीमंत देशांतून देणग्या गोळा करा-यच्या, आणि त्या पैशांचा विनियोग गरीब देशांतील बालग्रामे बांधण्यासाठी आणि त्याचा दैनंदिन खर्च भागवण्यासाठी करायचा. थोड्याच वेळात आम्ही अशा नवीन देणग्या गोळा करण्यासाठी संस्था स्थापन केल्या. जर्मनीत ह्या संस्थेचे नाव 'हर्मन मायनर कॉर्डिस डचलँड' होते तर स्विझरलँडमध्ये 'श्वास्झर फाइण्ड डेअर sos किडर डॉर्फ', हॉलंडमध्ये 'नेदरलँड किंडरडॉर्फ मित्रमंडळ' तर डेन्मार्कमध्ये, नॉर्वेमध्ये, स्वीडनमध्ये 'SOS childrens' village commitee' स्थापल्या. अमेरिकेत 'SOS बालग्राम मित्रमंडळ' स्थापन झाले. प्रत्येक ठिकाणी बालग्रामचे मित्र होते. त्यांनी हे काम विनावेतन स्वीकारले. नवीन कामे पण सुरु केली. 'बालग्राम संदेश' हे त्रैमासिक पुष्कळ भाषांतून निघू लागले. नवीन देणगीदार मिळविण्याचा आणखी एक उपक्रम सुरू केला. तो म्हणजे स्पॉन्सरशिप पालक मिळविणे. या उपक्रमात कुणाही माणसाला जगातल्या कुठल्याही मुलाचे ईश्वरदत्त पालकत्व घेता येते. तो दरमहा ठराविक देणगी देतो आणि आपल्या ईश्वरदत्त मुलाशी त्याला सरळ संपर्क ठेवता येतो. ह्या पालक त्वाच्या नात्यामुळे शेजार-पाजाऱ्यांशी प्रेमाचे सेतू बांधता आले. आज व्हिएन्नाचे

आंतर राष्ट्रीय ऑफिस जवळपास १५,००० पालक सभासदांशी संपर्क ठेवून आहे. त्यांच्याकडे जी दरमहा वर्गणी जमा होते, त्यातून ते जगातल्या गरीब देशातील बालग्रामांना खर्चासाठी मदत पाठवीत असतात. हर्मन मायनर डच मित्र-मंडळ या संस्थेने लक्षणीय प्रगती करून फार मोठे यश मिळविले. आज ही संस्था जगातील सर्व बालग्रामांच्या बांधकामांचे मोठे खर्च भागवीत आहे व तज्ज्ञ लोकांच्या सल्ल्यासाठी पण खर्च करीत आहे. त्याचप्रमाणे असणारी जर्मनीतील दुसरी संस्था 'German SOS Childrens' Village Society' ही फक्त जर्मनीतील बालग्रामांच्या बांधकामांचा व खर्चाचा भार सोशीत आहे. 'Herman-land' या संस्थेने अंदाजे १० लाख देणगीदार जोडलेले आहेत आणि ते मायनरच्या विश्वव्यापक कामांना नियमित मदत करीत असतात.

अर्थात ही गोष्ट पण खरी आहे की, या नवीन जलद गतीने झालेल्या विकासामुळे नवीन कामे खूपच वाढली आहेत. आमच्या समाजकार्याचा पण नव्याने विचार करण्याची जरूरी निर्माण झाली आहे. ईस्टमधल्या एका छोट्या बालग्रामची चिंता करणे आणि एका विश्वव्यापी मूळ धरणाऱ्या चळवळीचे नियोजन करणे ह्या दोन गोष्टीत फार मोठा फरक आहे. त्यामुळे आरंभी कामाची जी चौकट व जो हेतू होता, तो पार बदलून गेला आहे. आणि कामाच्या मर्यादा अपेक्षेबाहेर वाढल्या आहेत. ह्या सर्व विस्तारात मूळ कल्पनाच हरवून जाण्याची भीती आहे. विकासाने आम्हालाच गुंडाळून ठेवले तर पंचाईत होणार आहे, आणि मायनरच्या मूळच्या कल्पनेशी विसंगत असे आम्हाला काहीही करायचे नाही हे पण तितकेच खरं आहे. बालग्रामाची जी मूळची कल्पना आहे, ती तशीच शुद्ध आणि निर्मळ राहायला हवी.

पुष्कळ प्रश्न उद्भवतात. बालग्रामच्या कल्पनेशी ही विकासोन्मुख मदत कितपत सुसंगत वाटते ? आमचे काही देशात जे काम चालू आहे, उदाहरणार्थ, भारत. तिथे हे काम म्हणजे तापलेल्या शिलेवर पाण्याचा एक थेंब पडल्यासारखे आहे. मायनरच्या ह्या कल्पनेने इतर संस्कृतींशी अन्याय केला आहे का ? आम्ही हे सर्व प्रश्न टाळले नाहीत. आम्ही वारंवार चर्चा, सभा घेतल्या. ह्या प्रश्नाची जवळून व कठोर मनाने छाननी केली आणि बुद्धीच्या कसावर तिला तावून सुलाखून बघि-तली. आमच्या हे लक्षात आले की, आर्थिक व तांत्रिक विकासामुळे विकसनशील राष्ट्रे ही एकमेकांजवळ येत आहेत आणि तिथल्या लोकांना आपल्या गरिबीची, उपासमारीची, दुःखाची आणि दुखण्यांची वाढती चिंता वाटत आहे. विकसनशील राष्ट्रांतून वाढणाऱ्या भयानक लोकसंख्येने लोकांच्या राहणीमानात दरोज घट होत आहे. राहणीचा दर्जा खालावत आहे. सतत वाढत जाणाऱ्या श्रीमंतांच्या व गरिबांच्या दर्जातील वाढत्या दरीमुळे जागतिक शांततेला धोका निर्माण झाला आहे. ज्या कोणत्याही



संस्थेला ह्या विकसनशील राष्ट्रांत जाऊन सामाजिक कार्य करावयाचे आहे, त्यांनी ही सर्व परिस्थिती नीट समजून घेतली पाहिजे. आंतरराष्ट्रीय बालग्राम संघटनेचे काम नुसते पैसा पुरवून किंवा नवीन बालग्राम उभारले गेले आहे. त्या देशातील विकासाच्या आराखड्यात ह्या बालग्रामची भूमिका कोणती असावी ?

ह्या प्रश्नाचे उत्तर फक्त आमच्याजवळ आहे. कारण आम्हाला आता निर्णय घेण्याची वेळ आलेली आहे. जी राष्ट्रे विकासाच्या मार्गावर आहेत, त्यांना तटस्थपणे मदत करणे आणि आधुनिक जीवनाकडे वळण्यास त्यांना प्रवृत्त करणे किंवा श्रीमंत व गरीब राष्ट्रांत जो वर्गकलह चालू आहे त्याला उत्तेजन देणे !

ह्या लढाईचा, ह्या कलहाचा अंत काय होणार हे कुणीच सांगू शकत नाही. कारण एका बाजूला वाढत्या लोकसंख्येचा संख्यात्मक दबाव आहे तर दुसऱ्या बाजूला वैज्ञानिक प्रगतीची आघाडी आहे. पाश्चिमात्य राष्ट्रांच्या सामर्थ्याच्या प्रभावाने आणि त्यांच्या चैनीच्या राहाण्याच्या पद्धतीमुळे पारंपरिक, रुढिबद्ध वागत असलेल्या समाजात सामाजिक व आर्थिक तोल बिघडला आहे, आणि त्यामुळे ह्या लोकांच्यात आपल्या जुन्या समाजव्यवस्थेबद्दल व सामाजिक, सांस्कृतीक वळणाबद्दल असमाधान निर्माण झाले आहे. भविष्यकाळात हे जुने लेणे उपयोगी नाही, ही त्यांची खात्री झाली आहे. आपल्याला मिळालेले ज्ञान आणि आपल्याला अवगत असलेली कला ही अर्धविकसित राष्ट्रांना परिचित करून देणे ही पाश्चिमात्य संस्कृतीला स्वतःची नैतिक जबाबदारी वाटते आणि हे ज्ञानकलेचे दान देत असताना त्यासाठी फक्त भांड-वलांची तरतूद करून भागत नाही, तर त्याबरोबर तिथल्या लोकांच्या मनोवृत्तीत बदल घडवून आणणे आवश्यक असते. कारण नाहीतर नवीन तंत्रज्ञानाची अंमलबजावणी अचूक होणार नाही. लहान मुलांचे बालग्राम ही एक अशीच बुद्धिवादी वृत्ती आहे आणि म्हणूनच आपण त्याचा प्रसार थांबवू शकत नाही. आणखी पण एका गोष्टीमुळे हा बालग्राम कल्पनेचा प्रचार योग्य मानावा लागतो. विकासासाठी देण्यात येणारी मदत ही प्रत्येक व्यक्तीचा पूर्ण विकास आणि वाढ व्हावी यासाठी दिलेली असते आणि बालग्रामचे ध्येय आणि मध्यवर्ती कल्पना पण नेमकी हीच आहे. प्रत्येक व्यक्तीला चांगले हेतुपूर्ण जीवन जगता येण्यासाठी किमान पुरेशा साधनसंपत्तीची गरज असते. पण ही फक्त जगण्यासाठी व वाढण्यासाठी आवश्यक असलेली कमीत कमी गरज असते. पण प्रत्येक माणसाला ह्या पलीकडे जाऊन आणखी काहीतरी मिळविण्याचा व आणखी कुणीतरी बनण्याचा प्राथमिक हक्क असतो व त्याबरोबरच त्याचे प्राथमिक कर्तव्य पण असते. म्हणून प्रत्येक बालग्राम हे विकसनशील देशाला मिळालेली एक बौद्धिक देणगी आहे आणि ही देणगी आवश्यक आहे. ह्या संदर्भात भारताचे माजी पंतप्रधान पंडित जवाहरलाल नेहरू हे आमचे मार्गदर्शक आहेत. पूर्वी सांगितल्याप्रमाणे

नेहेरूंनी हर्मन मायनरला समजावून सांगितले होते की बालग्रामची स्थापना भारतात होणे आवश्यक आहे. कारण त्यामुळे एक बौद्धक प्रगती होण्यास मदत मिळते आणि ही बौद्धिक प्रगती झाल्याशिवाय देशाचा खरा विकास होणारच नाही. वास्तविक पाहता आमची ही बालग्रामे म्हणजे एक अगदी सूक्ष्मबीजे आहेत. ती फळतील की नाही, केव्हा व कशी अंकुरतील हे आज आम्हाला पण ठाऊक नाही. असे असून-देखील ही बीजे जमिनीत पेरणे हे आम्ही आमचे कर्तव्य मानतो.

सबंध विश्वाच्या विकासाच्या मदतीच्या कामाने लवकरच आकार धारण केला. मुलांची ही बालग्रामे म्हणजे नमुने आहेत. आंतरराष्ट्रीय तज्ज्ञांच्या परिभाषेत बोलायचे तर ते Pilot-projects आहेत, नमुन्यादाखल निवडलेले प्रकल्प आहेत.

त्यामुळे भविष्यातील कामाचे मार्गदर्शन मिळू शकेल. बालग्रामचे अंतिम ध्येय आध्यात्मिकतेकडे आहे. पण अजून ते कुणाच्या लक्षात येत नाही, कुणी त्यांचा स्वीकार करीत नाही, आणि अजून त्याचा खोलवर परिणाम दिसून येत नाही. पण आमची कल्पना मात्र लवकर सुस्पष्ट झाली. आम्ही असा एक नमुना जगात उभा केला, की विकासोन्मुख देशातील निराधार वंचित मुलांनादेखील चांगलेपणाने जग-ण्याचा हक्क आहे. त्याला राहाण्यासाठी एक घर मिळाले पाहिजे आणि त्याला एक आई पण असायला हवी. ज्यावेळी माणसाची भौतिकदृष्ट्या उन्नती होत आहे, आणि विकसनशील देशांत विकास होत आहे, अशा वेळी अनाथ मुलांचे कल्याण ही योजना मागे रेंगाळून चालणार नाही. युरोपातून आम्ही भारताला अत्यंत आधुनिक अशी यंत्र-सामग्री पाठवीत असतो, आणि त्याच्या बरोबरच गुंतागुंतीची वाटणारी इलेक्ट्रॉनीक आयुधे पण पाठवितो. असे असताना अनाथ मुलांच्या संरक्षणाच्या बाब-तीत मात्र आपण त्यांना १९व्या शतकातच सोडून द्यायचे का ? असे करणे ही अत्यंत अयोग्य गोष्ट होईल.

## कुरणातील पाळणा

बेथलहेम– एक कुरण. मावळत्या सूर्याच्या चमकणाऱ्या किरणांनी नेटिव्हिटी चर्चचा घुमट दुरून सुंदर दिसत होता. इथे जवळपास ती (Manger) पागा आहे. जिच्या दर्शनास लोक सुमारे २००० वर्षांपासून जात. गरिबी ! प्रेम ! मुक्ती. इथे येणाऱ्या प्रत्येक माणसाच्या मनावर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहात नाही.

इथे पण असंतोषाच्या उद्भवाला सुरुवात झाली होती. गेल्या काही वर्षात किती लढाया होऊन गेल्या होत्या ? काटेरी तारांच्या कुंपणांनी तो प्रदेश वेडावाकडा वेढलेला होता. देशभर सर्व ठिकाणी पहारा बसविलेला होता. ठिकठिकाणी द्वेश भर-



लेला होता. सर्व भूखंडावर निर्वासित लोक राहात होते. त्यातच आईबाप नसलेली मुले होती. ज्यांची घरे नाहीशी झाली आहेत, अशी गृहहीन मुले होती. छोटी, निराधार मुले. ह्या मुलांना येऊन मदत करावी अशी आमची इच्छा होती.

हर्मन मायनर डचलँड मित्रमंडळ सोसायटीच्या फंडाच्या पैशातून आम्ही बेथल हॅमचे बालग्राम बांधले. अशा ह्या अस्वस्थ भूमीत आम्ही ते सुरु केले. अवतीभोवती लोकांच्यात द्वेशाची भावना होती.

एका कुरणाच्या मध्यभागी आम्ही होतो आणि २००० वर्षांपूर्वी ज्याप्रमाणे एक पाळणा ठेवला गेला, तसाच एक पाळणा आज आम्ही बालग्रामच्या रुपाने तिथे ठेवला होता आणि त्या पाळण्यात एक लहान बालक पण विसावले होते. १९७० साली एका रविवारी ते मूल आम्हाला ऑलिव्ह झाडाच्या खाली सापडलं. त्याला त्याचे आईबाप कधीच माहिती होणार नाहीत. त्याला नाव नाही, त्याला भूतकाळ नाही. पण आता त्याला भविष्यकाळ निश्चित आहे आणि बेथलहॅम बालग्रामात राहणाऱ्या प्रत्येक मुलालाही आता भविष्य नक्की आहे.

एका बालग्रामाच्या अनुभवी कार्यकर्त्याने हे बालग्राम बांधायचे कठीण काम अंगावर घेतले. त्याचेजवळ बांधकामाचे सामान नव्हते, पाणी नव्हते आणि वीज पण नव्हती. शेतातले दगड उचलून तेच बांधकामासाठी वापरले. पाणी शोधण्यासाठी खूप खोलवर अशा विहिरी खणाव्या लागल्या आणि एक जनरेटर बसवून वीज खेळवावी लागली. १२ बालसदने बांधून तयार झालेले हे बालग्राम, त्यात एक समाजमंदिर व एक बालवाडीची इमारत पण बांधली.

पण आमच्या ह्या मुलांसाठी माता कोठून शोधायच्या हा प्रश्न होता. मुस्लीम स्त्रिया ! सोडून द्या तो विचार ! काही शहाणी माणसं म्हणाली. पण ही मुलं तर मुस्लिम आहेत आणि एस ओ एस बालग्रामचे हे मूलतत्व आहे की, मुलं ज्या धर्माची असतील त्याच धार्मिक वातावरणात ती वाढवायची, त्यांची संस्कृती पण तीच ठेवायची आणि त्यांच्या राहाण्याच्या पद्धतीत पण बदल करायचा नाही. जेव्हा जेम-तेम एक बालसदन बांधून झालं, तेव्हा तिथे एक मुस्लिम बाई त्या कार्यकर्त्याला मदत करायला त्या ठिकाणी आली. ती बेथलहॅम बालग्रामाची पहिली माता बनली. आज त्या सर्व घरांतून अशा स्त्रिया व्यग्रतेने काम करीत आहेत. अरबी लोकांना पण मुलांच्यासाठी सुरू केलेले हे धर्मयुद्ध समजले आहे. शेजाऱ्यांवरील प्रेम गतिमान झाले आहे.

आज ह्या बालग्रामाची संचालिका म्हणून व्हिएन्नाची एक महिला नेतृत्व करीत आहे आणि तिच्या देखरेखीखाली मुस्लिम स्त्रियांना मातृत्वाचे शिक्षण मिळून त्या माता बनत आहेत.

आज जी माणसे बेथलहॅममध्ये तीर्थयात्रेसाठी जातात, ती तिथल्या बाल-ग्रामाला पण भेट देतात. अरब येतात, तसेच ज्यू पण येतात. सर्वांना त्या बालग्रामातील प्रेमाचे वातावरण पाहून आनंद वाटतो. व्हिएन्नाचे डॉ. फान्झ क्योनिश यांनी त्यांच्या भेटीत त्याचे अर्थपूर्ण नाव ठेवले.

"आजच्या काळातील एक बेथलहॅम."

## कौटुंबिक भावना हीच प्रमुख

हे सर्व आंतरराष्ट्रीय पातळीवर काम सुरू होते, तरीदेखील मायनर ईम्स्ट येथील बालग्रामाशी प्रामाणिक राहिला होता. ते त्यांचं खरं घर होतं. तो दमला असला, किंवा खडतर प्रवास नुकताच संपला असला तरी त्यानंतर लगेच ईम्स्टला येत असे. तिथे येऊन त्याला विश्रांती मिळत असे आणि नवीन उत्साह वाटत असे. संध्याकाळी तो बसून बालमातांशी गप्पागोष्टी करीत असे आणि त्यांच्या चिंता व समस्या असतील त्यांना बोलके करीत असे. कारण त्या सर्व चिंता व समस्या स्थूल मानाने त्याच्या पण होत्या. तो एकाकी जीवन जगत होता. कारण त्याने कधी लग्न केलेच नव्हते. सुरुवातीस त्यांचे काम म्हणजेच त्याच्या जीवनाची साधना होती. नंतर त्या कामाची वाढ होत होती आणि त्यात तो पूर्ण व्यस्त झाला होता. आता त्याला खासगी जीवन उरले नव्हते.

दोस्तोव्स्की (Dostoevski) ह्या तत्वज्ञान्याने म्हटले आहे की, "दुसऱ्यांसाठी घरे बांधणाऱ्याने प्रथम स्वतःचे घर मोडून टाकले पाहिजे." हे बालग्रामच्या ह्या पित्याला बरोबर लागू पडते. त्याच्या कल्पनेने त्याचा सर्व वेळ व्यापलेला आहे. आजच्या मोठ्या जगात तो प्रतिनिधीत्व करतो व कामांची आखणी करतो. तर बाल ग्रामच्या छोट्या जगात तो हजर राहतो. जेव्हा बालग्राम संचालकाच्या बैठकी होतात, तेव्हा तो त्यात नेहेमी उपस्थित असतो, त्यांच्या प्रश्नाची सविस्तर चर्चा करतो. त्यावर मनन करून कल्पनेला रोज नवीन रूप देत असतो.

"ही बालग्रामे म्हणजे सर्व शैक्षणिक विकासाच्या मुळापाशी असलेली एक लहानशी कल्पना आहे." मायनर अलीकडे म्हणाला होता. "त्यात मुख्य आधार हा धरला आहे की, कोणाचेही मूल हे कुटुंबाशिवाय वाढू शकत नाही. मुलाला ह्या कुटुंबाची गरज असते. कारण त्यातूनच त्याची वाढ होत असते आणि त्याच्या शारिरिक, मानसिक व आंतरिक शक्तींना फुलण्यास वाव मिळत असतो. आजच्या शिक्षणविषयक समस्या सोडविण्याचे जे प्रयत्न चालू आहेत, त्याच्या मुळाशी पूर्वी-



पासून ही कल्पना आहे!"

शेवटी विश्लेषण करताना हे पण ध्यानात ठेवले पाहिजे की, ते कुटुंब श्रीमंत आहे किंवा प्रभावी आहे किंवा त्यांच्याजवळ ऐश्वर्य आहे, यासारख्या कुठल्याही गोष्टी महत्वाच्या नाहीत. अगदी धनवान असलेल्या घरातदेखील मुलाकडे दुर्लक्ष केले जाते. ज्याप्रमाणे गरिबाच्या झोपडीत पण त्याच्याकडे कुणी लक्ष देत नाही. प्रश्न आहे मुलांकडे लक्ष देण्याचा !

विख्यात शिक्षक पेस्टॉलोझी म्हणतो, त्याप्रमाणे एकाच गोष्टीची आवश्यकता आहे, आणि ती म्हणजे त्या मुलाला घरगुती, कौटुंबिक जीवन मिळाले पाहिजे. आजच्या न्यूक्लियर बॉंबच्या युगातदेखील एक गोष्ट चांगली आहे की, प्रत्येकाला कुटुंबव्यवस्था ही जीवनाला आवश्यक व पोषक वाटते. मोठाली स्टॉक मार्केट असली किंवा भरपूर धन-दौलत असली, तरी हे विसरता कामा नये की, जीवन एक पवित्र साधना आहे आणि अशा या दैवी साधनेचा महत्वाचा पैलू हा आहे की, पुढे येणाऱ्या तरुणांसाठी आपण सकस जीवन आणि आरोग्यसंपदा ही आपोआप दिली पाहिजेत. आपण जेव्हा त्यांना वाढवितो, तेव्हा त्यात त्याग अंतर्भूत असतो. आजच्या जगातील लाखो मातापिता ह्या भावनेने जीवन व्यतीत करीत आहेत आणि आपल्या मुलांच्या कल्याणाची काळजी घेत आहेत. ही जी त्यांची चिंता सर्व राष्ट्राची आणि सर्व खंडांची बनली पाहिजे. माझी अशी खात्री आहे की, हे मानवतेचे संशोधन आज सुरू आहे आणि ते कुटुंबव्यवस्थेच्या माध्यमातून सुरू झालेले आहे. आपण ह्या प्रक्रियेला उचलून धरून मदत केली पाहिजे आणि आपल्याकडे जे आहे, ते सर्व त्यासाठी दिले पाहिजे.

जेव्हा ही बालग्रामची चळवळ देशभर पसरत होती, त्यावेळी मायनरला पहिली ऑनररी डॉक्टरेट ही पदवी मिळाली होती. न्यूयॉर्कच्या फोर्डहॅम विद्यापीठाने ती प्रदान केली होती. मायनर आपले डोके खाली वाकवून विद्यापीठाच्या रेक्टरसमोर मान-सन्मान घ्यायला उभा होता आणि ऐकत होता,

"ह्या प्रेमाच्या पुजाऱ्याने सर्व जगाची जी सेवा केली आहे त्याबद्दलचा हा बहुमान." हर्मन मायनरचे मन इन्नसब्रुकच्या ओला (Aula) विद्यापीठात गेले आणि त्याला तो दिवस आठवला. ज्या दिवशी त्याने आपल्या मित्राकडे एका खोलीची याचना केली होती, त्या दिवशी त्याचे विख्यात प्रोफेसर डॉ. ब्राईटनर त्याच्यावर किती रागावले होते आणि म्हणाले होते, "हे बॉय स्काऊटचे खेळ आता बंद कर." आणि नंतर त्याला त्याची वादळी सेना आठवली. त्यांचे फिकट पण हसरे चेहरे त्याच्यापुढे उभे राहिले. नंतर त्याला आणखी काही हसरे चेहरे आठवले. ईम्स्ट येथील सगळ्या माता, आलम्यूस्टर, हिंटरब्रूल, डायसेन हॅंबुर्ग फिनलंड.....

मायनरने बालग्रामची अंगठी आपल्या डाव्या हाताच्या बोटात घातली होती. त्याचे शेकडो सहाय्यक कार्यकर्ते पण ती अंगठी वापरतात. माता, बालग्राम संचालक आणि या व्यतिरिक्त त्यांचे जवळचे मित्र पण वापरतात. ती अंगठी बोटात घालून सर्वांच्या सामाजिक कामावरील आपली अढळ निष्ठा ते व्यक्त करीत असतात. त्याने बोटात ती अंगठी फिरवली व २ बोटांत ती दाबून ते बालग्रामचे चिन्ह त्यात नीट दिसेल अशा रीतीने ठेवली. होय, ह्याच खुणेने त्याने रस्तेच्या रस्ते ओलांडले होते आणि काही निराधार मुलांना तिथून उचलून त्यांना नवीन घर व आई मिळवून दिली होती. ह्याच चिन्हाच्या आधाराने आज जगातल्या कित्येक मुलांना अशी घरे मिळाली आहेत, आणि ह्याच खुणेला धरून तो काम सुरू ठेवणार आहे. त्याग करणार, एक चांगले जग निर्माण व्हावे म्हणून परिश्रम करणार, आणि एका उज्वल भविष्याच्या दिशेने ही सर्व वाटचाल चालू राहणार !

१३ जानेवारी १९६६ या दिवशी हर्मन मायनरला पोप पॉल-६ ह्या प्रमुख धर्मगुरुंना खाजगीरीत्या भेटण्याची संधी मिळाली. हा पण बालग्राम चळवळीच्या मार्गातील एक महत्वाचा मैलाचा दगड आहे. मायनर हा जरी कॅथॉलिक युवकांपैकी होता, आणि त्याच्या शेतकरी कुटुंबाकडून त्याला धार्मिकतेचा वारसा मिळाला होता तरीदेखील त्याच्या या चळवळीस सर्वात कडक विरोध चर्चकडूनच झाला होता. ह्या सामान्य माणसाच्या कामगिरीकडे धर्मगुरूंच्या व्यासपीठाने नेहमीच साशंक नजरेने पाहिले होते. चर्चमधील कित्येक लोकांना असं वाटायचं की हा एकटा मनुष्य व्यक्तिशः जगाचं काय भलं करणार आहे ? ह्या कल्पनेचा स्वीकार करायला ते तयार नव्हते. अशी धर्मादाय कल्याणाची कामे करणाऱ्या संघटित संस्था नाहीत का ? ह्या चर्चच्या लोकांना त्याच्या कल्पनेचे नीट आकलन न झाल्यामुळे मायनरला खूप त्रास सोसावा लागला. टिरोलचा बिशप मात्र नेहमी ह्या युवक नेत्याच्या पाठीशी उभा राहिला होता आणि त्याने कित्येक वेळा मायनरची बाजू घेतली होती. मायनरने ती सर्व टीका मुकाट्याने सोसली होती आणि त्याने प्रतिटीका करण्याचे विचारपूर्वक टाळले होते.

पण आज मायनर हिज होलीनेस– ख्रिश्चनांच्या परमश्रेष्ठ गुरूच्या पुढ्यात बसला होता आणि त्या धर्मगुरूंना मायनरच्या बालग्रामाची सविस्तर माहिती त्याच्याकडून ऐकायची होती. त्यांनी असंख्य प्रश्न विचारले आणि आमच्या सामाजिक सेवेतील यशामुळे ते फार प्रभावित झाले. आम्ही जे विकासोन्मुख गरीब देशात बालग्राम उभारणीचे प्रयत्न करीत होतो आणि त्यात सर्वधर्मीय मुलांचा समावेश करीत होतो त्यात त्यांना विशेष गोडी वाटली आणि जेव्हा आम्ही इटली देशातील अपुलिया ह्या गरीब प्रदेशात बालग्राम उघडणार असल्याचे त्यांना सांगितले, तेव्हा त्यांना विशेष



आनंद वाटला. त्यांनी हर्मन मायनरने मिळविलेल्या यशाचे कौतुक केले आणि त्यांना आपला प्रसाद- म्हणून सर्व मातांना आणि मुलांना, कार्यकर्त्यांना, मित्रांना, देणगीदारांना सर्वांना ह्या खासगी सामाजिक कल्याणाच्या कामाबद्दल आशिर्वाद दिले.

## आफ्रिकेत पण बालग्रामांची गरज आहे !

आता सबंध एक आफ्रिका खंडच असे उरले होते की जिथे बालग्राम चळवळीने अजून पाऊल टाकले नव्हते. दक्षिण अमेरिका व आशिया खंडात बालग्राम चळवळ यशस्वी झाल्यानंतर हे ठरूनच गेल्यासारखे होते की, एक दिवस ही चळवळ आफ्रिकेत पण पोहोचणार.

पण हे करण्यात बऱ्याच मुलभूत स्वरूपाच्या अडचणी होत्या. आफ्रिकेतील जन मानस अजून ह्या मुलांच्या प्रश्नासाठी जागृत झाले नव्हते. आफ्रिकेत अनाथ, सोडून दिलेली मुले पण नव्हती. कारण तिथे अजून आदिवासी जीवनाचा प्रभाव होता आणि दुसरी गोष्ट म्हणजे तिथे बालमाता मिळणे ही एक अशक्य कोटीतली गोष्ट होती. पण अशा तऱ्हेने अडचणी सुरुवातीच्या काळात आम्हाला आशिया खंडात व दक्षिण अमेरिकेत पण आल्या होत्या. याव्यतिरिक्त आफ्रिकेतील कित्येक देशात बालग्राम सोसायट्या स्थापित झाल्या होत्या, ही एक जमेची बाजू होती.

हर्मन मायनरवर व माझ्यावर आफ्रिकेतील काम पाहून अभ्यासपूर्वक नोट तयार करायची जबाबदारी आली. बालग्राम उभारणीच्या दृष्टीने आम्ही काही प्रांतांशी यापूर्वी संपर्क साधला होता. उदाहरणार्थ इथीओपिया, केनिया, कांगो, नायजेरिया, घाना, आयव्हरी कोस्ट आणि सियारा लिऑन या देशात आम्ही संबंध निर्माण केले होते.

ह्या देशांतून आम्ही आधी स्थापित केलेल्या समित्या तज्ज्ञ मंडळी, संस्थांचे प्रतिनिधी व शासकीय अधिकारी यांच्याशी सविस्तर चर्चा केल्या. सध्याच्या संस्था काम करीत होत्या. त्यांना आम्ही भेटलो, आणि शहरात व ग्रामीण भागात राहणाऱ्या लोकजीवनाचा जवळून अभ्यास केला. आम्ही तिथे असलेल्या खास स्थानिक लोकांशी संपर्क साधला आणि त्यामुळे आम्हाला तिथली सामाजिक, आर्थिक आणि राजकीय परिस्थिती आजमावता आली. वर्तमानपत्रे, रेडियो आणि टेलिव्हीजनने आमच्या भेटीला चांगली प्रसिद्धी दिली.

आम्हाला हे समजले होते की, आंतरराष्ट्रीय बालग्रामच्या चळवळीत आम्हाला आफ्रिकेत बरेच काम करावे लागणार आहे. एकदा केलेला हा अभ्यास दौरा म्हणजे

पहिले पाऊल होते. आमचे मत अनुकूल बनले होते. इतर गोऱ्या लोकांप्रमाणे आम्ही साशंक होऊन परत फिरलो नव्हतो. आम्हाला तिथल्या लोकांची मनोवृत्ती समजू शकत होती. मग ते लोक पूर्व, मध्यम किंवा दक्षिण आफ्रिकेत कुठेही राहणारे असोत.

दुसऱ्या महायुद्धानंतर आफ्रिका म्हणजे एक राजनैतिक नाटक बनले होते. खास करून १९६० साल जेव्हा 'आफ्रिका वर्ष' म्हणून मानले गेले तेव्हापासून तिथे स्वातंत्र्याची लाट उसळू लागली होती. सर्व जगाला कळून चुकले होते की, आफ्रिका आक्रमक बनत आहे आणि दाराशी येऊन ठेपली आहे. म्हणून सामाजिक समजुतीच्या क्षेत्रात आपल्याला ह्या खंडाशी मिळते घेण्याचा प्रयत्न केलाच पाहिजे.

आफ्रिका खंडाचा विस्तार युरोप खंडाच्या तिप्पट आहे. (युरोपात असलेला रशियाचा विस्तार धरून) आणि त्याची लोकसंख्या २,५०,०००,००० इतकी आज आहे. इ.स. २००० मधे ही लोकसंख्या दुप्पट होणार आहे ! ही आपल्यासारखीच माणसे आहेत. काही चांगली तर काही वाईट, काही मूर्ख तर काही बुद्धिवान ! आणि त्या सर्वांची इच्छा आहे की, त्यांना माणसांप्रमाणे वागवावे. पूर्वी ज्याप्रमाणे त्यांना लहान मुलांच्याप्रमाणे किंवा गुलामाप्रमाणे वागवत होते, तसे न होता माणुसकीच्या भावनेने त्यांच्याकडे पाहावे. आफ्रिका खंडात असे खूप लोक आहेत, की जे सर्वसामान्य युरोपियन माणसांपेक्षा अधिक शिक्षित आहेत. पण काही लोक असेही आहेत की, जणू ते अजून जुनाट अश्म युगात (Stone Age) राहात आहेत. 'काळा' माणूस' असा प्रकार अस्तित्वात नाही. आफ्रिकन लोकांना समजून घ्यायची ज्यांना इच्छा आहे, त्यांना हे विसरून चालणार नाही की या वसाहतीवर साम्राज्यवादाच्या अवशेषाच्या खुणा खोलवर उमटलेल्या आहेत आणि त्यासोबत आपण हा पण विचार केला पाहिजे की, आफ्रिकेत जी तरुण राष्ट्रे डोके वर काढीत आहेत, त्यांना एका फार मोठ्या संक्रमण काळातून जायचे आहे. मध्ययुगातून आजच्या युगात येण्यास त्यांना एका पिढीचादेखील पुरा अवधी नाही. इतका विकास घडवण्यासाठी युरोपला कित्येक शतकांचा काळ मिळाला होता आणि त्यांनी पुष्कळ गंभीर चुका पण केल्या होत्या. म्हणून आम्हाला सर्वप्रथम हे समजावून घ्यावे लागेल की, आफ्रिकन लोकांना नुकतेच स्वातंत्र्य मिळाले आहे आणि त्यांच्यापुढे अनेक भयानक अशा आर्थिक, सामाजिक आणि राजकिय समस्या उभ्या आहेत आणि त्या सोडवताना त्यांच्या हातून चुका होणे स्वाभाविकच आहे. परंतु आफ्रिकेने आता २०व्या शतकाच्या सीमेवर पाऊल टाकले आहे. तिथल्या लोकांना त्यांच्या परिणामाप्रमाणे जोखण्याचा त्यांना पूर्ण अधिकार आहे आणि त्यासाठी आपली परिमाणे त्यांना लावून चालणार नाही.



आणि याचमुळे आफ्रिकेतील बालग्रामच्या कामात पण बराच वेगळेपणा येणे अटळ होते. बालग्रामच्या मूळ कल्पनेला धरूनच तिथे काम सुरू झाले. पण ज्या लोकांनी ती बालग्रामे बांधली व जे लोक ती चालवीत होते, जे लोक शिकवित होते व प्रशिक्षण देत होते ते लोक वेगवेगळ्या तऱ्हेने विचार करणारे होते. त्यांच्या श्रद्धा वेगळ्या होत्या, त्यांच्या प्रतिक्रिया पण वेगळ्या होत्या. हा वेगळेपणा म्हणजे चूक नव्हती. आम्ही तो फरक स्वीकारायला स्वतःला शिकविले.

आफ्रिकेत ते लोक आपल्यासारखी स्वप्ने पाहात नाहीत, किंवा आपल्यासारख्या चिंता पण त्यांना वाटत नाहीत. त्यांचे अनुभव आणि त्यांच्या रुढींमुळे काळ्या आफ्रिकन लोकांचे मानस वेगळे बनले आहेत. इतर सांस्कृतिक क्षेत्रांप्रमाणे त्यांनी आपल्या खेळांचे अनुकरण बालग्रामक्षेत्रात पण केले आहे. पण ते जो खेळ खेळतात त्यासाठी बोर्ड मात्र दुसरा वापरतात.

आम्ही जेव्हा तिथल्या क्षेत्राचा अभ्यास केला, तेव्हा आम्ही काही आवश्यक व ठळक अशा खूणगाठी पक्क्या बांधल्या. आफ्रिका खंडात आधुनिकीकरण आणि औद्योगीकरण हे प्रचंड वेगाने होत आहे आणि त्याची सुरुवात वाढणाऱ्या शहरांतून प्रथम होत आहे आणि त्यामुळे आफ्रिका खंडात आत्तापर्यंत परिचित नसलेले अनेक सामाजिक प्रश्न उद्भवत आहेत. जी एक सुरक्षित आदिवासी रचना होती, ती आता शहरांतून मोडकळीस आलेली आहे. पूर्वीप्रमाणे म्हाताऱ्या माणसांच्या चरितार्थाची सोय टोळीकडून आपोआप होईल अशी आता परिस्थिती नाही. त्याचप्रमाणे आजारी माणसे व मुलांचीपण कोणी पर्वा करीत नाही. आपण ज्याला सामाजिक कल्याण असे समजतो, व ती शासनाची जबाबदारी मानतो तसे तिथे कागदावर असेल. पण प्रत्यक्षात मात्र काही नाही. खासगी संस्था फारच थोड्या आहेत आणि ज्या आहेत त्या गोऱ्या लोकांच्या, मिशनऱ्यांच्या हातात आहेत आणि त्यामुळे त्यांचे सामाजिक अभिसरण झालेले नाही. तरुणांच्या कल्याणकारी योजनांमध्ये बालग्रामची योजना ही अग्रस्थानी आहे. आम्हाला इथे एक फायदा मात्र अभूतपूर्व असा झाला आणि तो म्हणजे जुन्या प्रस्थापित संस्थांशी किंवा अनाथाश्रमांशी आम्हाला झगडा करावा लागला नाही.

ही बालग्रामाची कल्पना आफ्रिकन कृष्णवर्णियांना अंशतः पटणारी आहे. कारण मुलाला अनाथाश्रमात ठेवणे ही कल्पना आफ्रिकन आदिवासी संवेदनशीलतेला वैचारिक पातळीवरही मान्य नाही. पण अशा अनाथ मुलांना आपले मूल मानून त्यांना वाढवणारी बालमाता मात्र त्यांना पसंत आहे. त्याचप्रमाणे कौटुंबिक घर ही कल्पनाही त्यांना आवडते.

सुरुवातीस आफ्रिकेत अविवाहीत स्त्रिया किंवा एकट्या रहाणाऱ्या विधवा ह्या

बालमातेचे काम करायला पुढे येतील, हे स्वप्नातदेखील खरे वाटले नसते. परंतु ज्या ज्या देशांना आम्ही भेटी दिल्या, तेथे ही सामाजिक परिस्थिती बदलली असून अशा स्त्रिया कामासाठी मिळणे सहज शक्य झाले आहे. फक्त त्यांना प्रशिक्षण देणे हे मात्र कठीण काम होते. पण त्याची सुरुवात करणे म्हणजे एक प्रौढशिक्षणाचाच पाठ ठरणार होता.

कुठल्याच देशात आमच्या पदरात निराशा आली नाही. जिथे गेलो तिथे आम्हाला सुपीक जमीन मिळाली. तिथे बीज रोवणे सहज शक्य होते आणि आम्ही त्याचा पुरेपूर फायदा करून घेतला. ज्या सात देशांत आम्ही गेलो, तिथे आम्ही हे बालग्रामचे रोपटे रोवूनच आलो आणि त्या बहुतेक सर्व देशात त्या रोपट्याचा आता एक भरदार वृक्ष बनला आहे.

## सायगावला बोट निघाली...

१९६० सालानंतर आम्ही बालग्राम (Childrnos Village) या शब्दामागे योजलेल्या SOS ह्या शब्दोच्चाराची विशेष जाणीव ठेवून आमचे कार्य करायचे ठरवले. जगातल्या कुठल्याही कोपऱ्यातले कुठलेही मूल जर संकटात असेल, मग ते संकट निसर्गनिर्मित असो किंवा युद्धकालीन परिस्थितीने आणलेले असो. अशा गरजू मुलाला ताबडतोब मदत पुरविणे हे आम्ही आमचे आद्य कर्तव्य मानले. अशा तऱ्हेने मदतीची एक करूण हाक आम्हाला खूप दिवसांपूर्वी व्हिएटनाम ह्या गरीब, पीडीत देशातून आली होती.

व्हिएटनामसाठी आमच्या आंतरराष्ट्रीय बालग्राम सोसायटीने काय करावे, याचा आम्ही बरेच वेळा विचार केला. मायनरने त्या सर्व चर्चा व संवाद यांची एक गोळा-बेरीज केली व एक साधा निष्कर्ष काढून आमच्यापुढे मांडला.

"आपण मदत करायची, तर आत्ता ताबडतोब करूया. नाहीतर मदतीचा विचार डोक्यातून पूर्णतया काढून टाकूया." ह्या शब्दांसोबत त्याने स्वतःला कार्यप्रवृत्त केले व आम्हाला पण. कारण आम्हा सर्वांना मदत करायची इच्छा होतीच.

१९६६ साली ९ डिसेंबरला मायनर सायगावला उतरला. त्याचेबरोबर आंतरराष्ट्रीय बालकल्याण संघटनेचे (International Union for child Welfare) सेक्रेटरी जनरल मुलोख हूवर पण होते आणि ही संस्था जगातील सर्व खासगी बाल-कल्याण संस्थांची मध्यवर्ती संस्था होती आणि आंतरराष्ट्रीय बालग्राम सोसायटी ही ह्या मध्यवर्ती संस्थेची सभासद होती. आम्ही तिथे जाऊन त्या भूप्रदेशाचा अभ्यास करून



नंतर आमच्या कामाची उभारणी कुठे व कशी करायची हे ठरवावे असा निर्णय झाला होता.

मायनरने काही आठवड्यांचा अभ्यासदौरा पूर्ण करून खालील माहितीपूर्ण अहवाल सादर केला होता.

"विमानातून मी एक अत्यंत आकर्षक असा भूखंड पाहिला. खूप नद्या आणि कालवे, भाताची शेते आणि ट्रॉपीकल जंगले. तिथे विमानतळावर उतरल्यानंतर मात्र लक्षात येते की, आपण एका प्रचंड मोठ्या लष्कराच्या छावणीत उतरलो आहोत. व्हिएटनाममध्ये लढाई चालू आहे आणि प्रत्येकाच्या ते लगेच लक्षात येते. सायगाव आणि त्याच्या अवतीभवतीचा प्रदेश भरपूर युद्धसामुग्रीने भरलेला आहे. सायगावमध्ये मी प्रत्येक ठिकाणी वाळूची पोती, काटेरी तारा आणि सैनिकांच्या छावण्या पाहिल्या. सगळीकडे मशीनगन्स रोखलेल्या दिसत होत्या. त्याच्याच बाजूला मी एक संभ्रमात टाकणारे, रंगीबेरंगी दिव्यांनी नटलेले, सुंदर, गजबजलेले मोठे राजधानीचे शहर पाहिले. ह्या सायगावमध्ये २० लाख लोक रहातात. स्वभावाने ते मोकळे आहेत आणि दिवसभर त्यांच्या कामाच्या गडबडीत जा-ये करीत असतात. मी ज्या हॉटेलमध्ये राहत होतो, त्याच्यासमोर निषेध मर्यादा होत्या. तशाच मर्यादा मला बँकाच्या समोर, सरकारी कार्यालयासमोर, बारच्या समोर आणि दुकानाच्या बाहेर पण दिसल्या. ह्या दुकानाच्या काचेच्या खिडकीतून सबंध जगातून आलेला माल तिथे भरलेला दिसत होता. आपल्या मनाला येईल ती वस्तू आपल्याला या दुकानात मिळू शकते आणि त्या वस्तूच्या किंमती पण मला भरमसाठ वाटल्या नाहीत. पॅरिसच्या रस्त्यावर जशी रहदारी सुरू असते, तशीच रहदारी मला इथे पण वाटली. ती गर्दी पाहून भोवळच येते. पण सर्व शहरभर जे रस्ते आहेत, त्यावरून जर तुम्हाला चालायचे असेल, तर संरक्षक पोलिस बरोबर असावा लागतो आणि रात्री जाऊच शकत नाही. व्हिएटनाममध्ये लढाई चालू आहे. एक अत्यंत क्रूर, काळी लढाई. अशा लढाईत मोठाले हल्ले होत नाहीत. पण अशा लढाईत लबाडी, सूड आणि अत्याचार भरपूर असतात. ह्या लढाईच्या सोबत आणि ह्या लढाईमुळे निर्माण झालेल्या परिस्थितीत अवर्णनीय अशी वंचना दररोज वाढतच असते. ह्या सर्वांबद्दल आपल्याला चिंता वाटायला हवी.

व्हिएटनामध्ये लहान, निरागस, मातापिताविहीन अशा मुलांची सैन्ये उभी आहेत. मी तिथे जे दुःख प्रत्यक्ष पाहिले, ते दुःख जगातल्या कुठल्याही दुःखापेक्षा मोठे आहे. त्याच्या भीतीची आणि निराशेची मी कल्पनाच करू शकत नाही.

जी माहिती खात्रीपूर्वक मानता येईल अशा गोटातून असे जाहिर केले आहे

की, दक्षिण व्हिएटनाममध्ये १० लाख निर्वासित लोक आहेत आणि त्यात ३ लाख मुले आहेत. ह्या मुलांना आपण मदत केलीच पाहिजे. कारण त्यांना मदत करणारं दुसरं कुणी नाही. इतर आशिया खंडातील देशांप्रमाणे व्हिएटनामची सामाजिक रचना पण टोळ्यांनी किंवा जमातींनी बनलेली आहे. शांततेच्या काळात अनाथ मुलांची काळजी त्या त्या जमातीत घेतली जात असे. जिथे तिथे युद्धामुळे समाजरचना मोडून गेली, असंख्य मुले रस्त्यावर आली आहेत. अक्षरशः त्यांना स्वतःचे असे कोणी नाही, कुणालाही त्यांची जबाबदारी वाटत नाही. कुणीही त्याची काळजी घेत नाही.

सायगावमध्ये ७० अनाथालये आहेत. त्यापैकी २ शासकीय आहेत. जगातल्या इतर धर्मादाय संस्थांनी बाकीची अनाथालये चालविली आहेत. मी अशी २५ अनाथांची घरे पाहिली. बहुतेक सर्व तात्पुरत्या उभारलेल्या प्रचंड छावणीप्रमाणे दिसत होत्या किंवा क्वचित जोडतोड करून उभारलेले निवारे होते. ह्या छावण्यांतून हजारो मुलांना कोंबून ठेवलेले आहे आणि त्यांना आलटून पालटून कपडे घालायला देतात. मातीच्या जमिनीवर ते जेवतात आणि तिथेच झोपतात. व्हिएटनाममध्ये काही स्त्रिया व पुरुष प्रेरित झाले आहेत आणि त्यांनी ह्या वचनांविरुद्ध एक शांत लढाई सुरू केली आहे. पण ही माणसे फार थोडी आहेत. साधारणपणे दर १०० मुलांमागे अशी १ प्रौढ माणसे आहेत. जी त्यांची सर्वतोपरी काळजी घेतात. त्यांना खाऊपिऊ घालतात आणि त्याचा खेळ, अभ्यास याकडे लक्ष पुरवतात.

तिथल्या अधिकाऱ्यांच्या प्रतिनिधींनी माझे चांगले स्वागत केले. मला जे पाहायचे होते, ते सर्व मला दाखवले. त्या मुलांचे ते हाल पाहून मला अक्षरशः डोळ्यांपुढे अंधारी आली.

व्हिएटनामला मिळालेल्या मदतीबद्दल लोकांत खूप आदराची भावना आहे आणि मला लोकांनी हे पण सांगितले की, ज्याला मदत करण्याची प्रामाणिक इच्छा आहे, त्याला लढाई करणाऱ्या दोन्ही बाजूंच्या लोकांपासून भीती वाटायचे कारण नाही.

मी व्हिएटनाम सोडताना मनाशी ठरवून टाकले की, आपल्याला शक्य असेल ते सर्व करायचे. आमच्या आतल्या वर्तुळातील सभासदांना मायनरने व्हिएटनामची सर्व माहिती सांगितली. त्याने दक्षिण व्हिएटनाममध्ये बालग्रामसाठी सोईस्कर जमीन खरेदी करण्याचा प्रयत्न केला होता. व्हिएटनाममध्येदेखील बालग्रामची उभारणी करणे हा एकच सर्वव्यापी प्रयत्न होता, की ज्यामुळे मुलांचे प्रश्न सुटले असते. ह्या सोयीस्कर जागेची पाहणी करण्यासाठी मायनर एका जीपमधून फिरला होता. सायगावच्या समाज-कल्याण मंत्रालयाने ही व्यवस्था केली होती. व त्याच्याबरोबर ६ बंदूकधारी लष्करी सैनिक पण दिले होते. अशा ह्या लष्करी बंदोबस्तात मायनर



दक्षिण व्हिएटनामच्या राजधानीच्या आसमंतात फिरला. त्याने पाहिलेल्या सर्व जागा सायगावच्या सुरक्षित क्षेत्रात येत नव्हत्या आणि त्यामुळे तिथे भयाचे वातावरण होते. पण मायनर त्यापासून परावृत्त होणार नव्हता.

सायगावच्या उत्तर पश्चिमेकडे साधारणपणे ६० मैल अंतरावर, जंगलाच्या कडेला मायनरने ११,००० चौरस मीटरची मोकळी जागा हेरली आणि त्याला ती जागा बालग्राम बांधण्याच्या दृष्टीने अतिशय सोईस्कर वाटली. त्या जागेचे नाव होते गोव्हाप. अर्थात आम्ही सर्वांनी त्याला मान्यता दिली. कारण मायनरचे ऐकण्याशिवाय दुसरा काही पर्याय पण नव्हता. हा जो निर्णय घेतला गेला तो पुढे आम्हाला मार्गदर्शक ठरला आणि पुढे येणाऱ्या काही वर्षात तो आमच्या नशिबाचा ध्रुवतारा बनला. आमच्या या शेजाऱ्यांवर प्रेम करण्याच्या प्रक्रियेला व्हिएटनाममध्ये सुरुवात केल्यावर आम्हाला काय काय अडचणी व संकटे येतील, याची त्यावेळी आम्हाला कल्पनादेखील आली नाही.

आम्ही सर्वांनी मिळून असे ठरविले की, व्हिएटनामचे बालग्राम खूप मोठे राहील. त्यात कमीत कमी ४० बालसदने असतील. त्यांचीच स्वतःची शाळा व दवाखाना असेल.

मायनरने पण असे मोठे बालग्राम बांधता येईल का? या शक्यतेची नीट चौकशी केली होती. त्याला ते बालग्राम ताबडतोब सायगावलाच बांधायचे होते. पण त्या बाबतीत त्याच्या पदरात निराशाच येत होती. कित्येक महिने सिमेंट मिळाले नाही. मग इमारतीचे लाकूड मिळेना. विटा नव्हत्या. नेहेमीप्रमाणे बांधकाम करून घेणे अशक्यच होते. कुणीही कॉंट्रॅक्टर हे काम करायला तयार होईना. ती पण आशा संपली होती. ह्या व्यतिरिक्त कामासाठी मजूर पण नव्हते. लढाईमुळे बहुतेक सर्वच माणसे सैन्यात भरती झाली होती. फक्त अमेरिकन लोकांनी तिथे बारक्या खिळ्यापर्यंतचे सर्व सामान हवाई मार्गाने नेले होते आणि तेच बांधकाम करीत होते. आता काय करावे? ह्या अडचणीमुळे सर्व प्रकल्पच गुंडाळून टाकावा की काय? आम्ही अगतिक झालो होतो. दीर्घ वेळ एकत्र बसून आम्ही या सर्व अडचणींचा विचार केला. इमारतीचे सामान हाँगकाँग किंवा सिंगापूरला जाऊन विकत आणावे असा पण विचार केला. पण तिथे आम्ही लगेच अडचणींच्या आणखी चक्रव्यूहातच सापडलो. आमच्या या अडचणी चालू असतानाच मायनरच्या चेहेऱ्यावरील हास्य मात्र कायम होते. त्याने त्याच्या स्वतःच्या योजना आखल्या होत्या. लवकरात लवकर हे बालग्राम चांगल्या रितीने कसे बांधून होईल व अडचणींवर कशी मात करता येईल हे त्याने ठरवून टाकले होते.

आम्हाला चर्चा करण्यास काही समय दिल्यानंतर तो एकदम म्हणाला, "आपण

बांधून तयार केलेले बालग्राम तिथे नेऊन ठेवले तर कसे होईल ?" नक्कीच तेच त्या प्रश्नाचे उत्तर होते. आम्हाला यापूर्वीच ही गोष्ट कशी नाही सुचली, कुणास ठाऊक !

त्याने आमच्या कामाला आरंभ झाला. पण नवीन प्रश्न उभे राहिले. एक प्रश्न असा होता की, ही बांधलेली तयार घरे तिथल्या ओलसर, दमट हवेत टिकतील का ? पुन्हा आम्ही थबकलो. आमच्या बालग्रामच्या इमारती यापूर्वी ज्याने बांधल्या होत्या, त्या आर्किटेक्टला आम्ही फोन करून बोलावून घेतले. त्याचे हेच मत पडले की, फक्त बांधलेली तयार घरेच आमची समस्या सोडवू शकतील. फक्त आपल्याला विशिष्ट डिझाईन देऊन ती मुद्दाम बनवून घ्यावी लागतील आणि तिथल्या हवामानाला टिकेल व वाळवीपासून संरक्षण होईल अशा लाकडाची ती बनवावी लागतील आणि मग ती सायगावला न्यावी लागतील.

काही दिवसांनंतर आमचा आर्किटेक्ट सायगावच्या प्रवासास निघाला. दोन आठवड्यानंतर आमच्यापुढे घराचे प्लॅनस् बघण्यासाठी आले. सहा सिमेंटच्या पाईप-वर (जमिनीत पुरलेले खांब) ही घरे उभी करण्यात येणार होती. त्यामुळे प्रत्येक घराच्या खाली छायेत एक खेळाचे मैदान तयार होणार होते. आम्ही खूष झालो. युरोपातील अनेक कंपन्यांची टेंडर्स ताबडतोब मागविली. व्होरालबर्ग खेड्यातील एका लहान ऑस्ट्रियन फर्मला ती ऑर्डर मिळाली. १९६७च्या उन्हाळ्यात बालग्रामची ४१ घरे तयार करण्याची ऑर्डर देण्यात आली आणि अशाप्रकारे व्हिएटनाम येथील बालग्राम प्रकल्प गती घेऊ लागला. जेव्हा इकडे ही लाकडाची घरे बांधून तयार होत होती, तेव्हा आमचा आर्किटेक्ट पुन्हा एकदा व्हिएटनामला जाऊन ती घरे ठेवण्या-साठी तिथली जमीन तयार करून घेत होता. पाणी व वीज आणली, ड्रेनेजचा प्रश्न सोडवला आणि त्या खांबासाठी व जिन्यासाठी मजबूत पाया घातला गेला. मध्यं-तरीच्या काळात सायगाव हे अधिकाधिक व्हिएटकाँगच्या ताब्यात जात होते. लढाई दक्षिण व्हिएटनामच्या राजधानीच्या जवळ येऊन पोचली होती. गो वॅपजवळ रोज चकमक सुरू होती. पण त्यामुळे आमचा आर्किटेक्ट मात्र डगमगला नाही. त्याला फक्त बालग्रामच्या साईटवर आलेले अनेक कामगार पाहून खूप आश्चर्य वाटले. ते सकाळीच जंगलातून बाहेर पडून कामावर येत असत, आणि रात्री पुन्हा जंगलात दडी मारीत.

सुरुवातीपासूनच आम्ही अमेरिकन लोकांबरोबर काम करण्याचे टाळले होते. जमीन सपाट करून देण्यासाठी त्यांनी विचारणा केली होती, पण आम्ही नकार दिला. दक्षिण व्हिएटनाममधील अधिकाऱ्यासोबत पण आम्ही कमीत कमी संपर्क ठेवला होता. आम्ही एक खासगी संस्था म्हणून मदत करायला आलेलो होतो. आम्हाला आमची तटस्थता सिद्ध करायची होती, आणि त्याचे चांगले फळ आम्हाला मिळाले.



इतका हा मोठा बालग्रामचा प्रकल्प राबविण्यासाठी आम्हाला अनेक कार्य-कर्त्यांची गरज लागणार होती. हे आम्ही पक्के ताडले होते. पण इतक्या थोड्या वेळात हे कार्यकर्ते कुठून आणायचे, आणि त्यांना प्रशिक्षण कसे द्यायचे हा मोठा प्रश्न होता. पण आमच्या कल्पनेपेक्षा ते लवकर घडले. स्विझर्लंडमधून एका किंटर गार्डन शाळेच्या शिक्षिकेने अर्ज केला. बेल्जियममधून एक बालरोगतज्ज्ञ स्त्री डॉक्टरचा अर्ज आला. पॅरिसमधून एका व्हिएटनामी नर्सने आम्हाला लिहिले आणि आमच्यातून एक सक्षम कार्यकर्ती हे काम करण्यास तयार झाली. तेव्हा सुरुवातीस काम सुरू करा-यला ह्या ४ स्त्रिया मिळाल्या, पण ह्या तुकडीला (टीमला) मार्गदर्शन कुणी करायचे ? त्या बेलजियम डॉक्टरने, की आमच्या इन्सब्रुकच्या कार्यकर्तीने ? कुणीतरी अनुभवी असा नेता आम्ही या पथकासाठी शोधू लागलो. त्याला बालग्रामच्या कामाचा अथ-पासून इतिपर्यंत अनुभव असायला पाहिजे. आम्ही पेचात पडलो.

त्यावेळी ईम्स्टमधे पूर्वी राहात असलेल्या हेलमूट कूटिन नावाचा एक २६ वर्षांचा तरूण मुलगा मायनरला येऊन भेटला. १९५० साली तो आमच्याकडे एक अनाथ मुलगा म्हणून आलेला होता आणि आमच्या हाऊस झ्ट्टीरोल नावाच्या घरात अन्तोनिआ कामरलान्डर (Antonia Kammerlander) ह्या बालमातेकडे वाढला होता. नंतर आमच्या Egerdach येथील युवानिवासातून तो कॉलेजला गेला होता. पदवीधर झाला होता आणि आंतरराष्ट्रीय व्यापाराचा अभ्यास करत होता. नंतर त्याने उथो-झ्ताल (Oetztal) ठिकाणी स्वतःची प्रवास मार्गदर्शन संस्था सुरू केली होती. तरी देखील त्याचे घर मात्र ईम्स्टमधील बालग्राम हेच कायमचे राहिले होते. पुष्कळ वेळा आठवड्याची सुट्टी व मोठी सुट्टी पडली की तो ईम्स्टच्या घरी राहायला येत असे.

तिथे त्याला त्याच्या आईकडून कळले की मायनर व्हिएटनाममध्ये बालग्राम सुरू करीत आहे. हेलमूट कुटिन आपल्या बालग्रामच्या पित्याकडे गेला. तो म्हणाला, "हर डायरेक्टर, तुम्ही जर माझा उपयोग व्हिएटनाममधे करून घेणार असाल, तर मी तुमच्या सेवेस हजर आहे." मायनरने क्षणभरदेखील विचार केला नाही. व्हिएट-नाम येथे जाणाऱ्या पथकासाठी त्याला नेता मिळाला होता. सबंध जगातल्या सर्वात मोठ्या बालग्रामची उभारणी, बालग्राममधेच वाढलेल्या मुलांच्या हातून होणार होती. हा एक अपूर्व योग होता. त्याच्यावर अवलंबून राहायला काही हरकत नव्हती. बाहेरच्या कुणाही माणसाला बालग्राम चालविण्यासाठी जो परिश्रमपूर्वक अभ्यास करावा लागला असता, तो याच्या बाबतीत आवश्यक नव्हता.

आमची ५ जणांची तुकडी प्रथम पॅरिसला गेली, आणि तिथे कित्येक आठवडे राहून त्यांनी व्हिएटनामी भाषेचा अभ्यास केला. "एक सुरसरम्य, पण भीती वाटेल, इतकी अवघड ती भाषा आहे. ती बोलण्यापेक्षा जास्ती गाईलीच जाते. असे म्हटले

पाहिजे की, ही भाषा शिकण्यास 'सुर' लावावा लागतो. जर हा सूर चुकून कमी अधिक दाबाचा लागला की, लगेच त्या शब्दाचा अर्थ बदलतो.'' आमच्या बेलजियम बालरोगतज्ज्ञ डॉक्टरने आम्हाला लिहिले होते. एक गोष्ट फारच फायद्याची झाली की, आमच्या लोकांना स्थानिक लोकांशी बोलता येऊ लागले व स्वतःचे म्हणणे समजाविता येऊ लागले. यामुळे व्हिएटनामी लोकांची अंतःकरणे लवकर खुली झाली.

पहिल्या २१ घरांचे वेगवेगळे सांगाडे आत्तापावेतो ४ महिन्यांच्या सतत कामानंतर तयार झाले होत आणि आता ते व्हिएटनामच्या भयप्रद प्रवासाला तयार होते. तज्ज्ञ माणसे व्हिएटनामी अनुभवी माणसं आणि राजकिय पुढाऱ्यांनी आम्हाला सुरुवातीपासूनच फारशी आशा दाखविली नव्हती, पण आत्तापर्यंत आम्ही हे नक्कीच शिकलो होतो की, जिथे इच्छा आहे तेथे मार्ग आहे. आम्ही आमचा धीर सोडला नाही. आम्ही निश्चिंत होतो की, आमची पहिली २१ घरे गोव्हापला नक्की सुरक्षितपणे जाऊन पोहोचणार. तो लांबचा प्रवास सुरू झाला. एक सबंध पुरे बालग्राम बहुतेक एका बालग्रामात १५ घरे असतात. व्होरालबर्गच्या शांत व बर्फाच्छादित पर्वताच्या दरीतून निघून एका उष्ण कटिबंधातील युद्धाच्या ज्वाला भडकत असलेल्या सायगावला जाण्यासाठी प्रवासास निघाले होते.

मायनर सायगावला प्रथम जाऊन आल्यानंतर बरोबर १ वर्षाने ४ डिसेंबर १९६७ ला ह्या प्रवासी बालग्रामचा २१ घरांचा ताफा ऑस्ट्रिया आणि जर्मनी देशांतील रेल्वेचा प्रवास आटोपून डॅनिश मालवाहतूकीच्या पासाडेना (pasadena) नावाच्या जहाजावर ब्रेमर हावेन या बंदरात चढवला गेला आणि त्यांचा सायगावचा लांबचा प्रवास सुरू झाला. ब्रेमर हावेनमधे आम्ही निरोप देण्यासाठी एकत्र आलो. त्या छोट्याशा समारंभात तिथले बंदराचे प्रमुख अधिकारी डॉ. गेओर्ग बोर्टशेलर ह्यांनी त्यांच्या छोट्या भाषणात सांगितले होते की, "ह्या बंदराच्या इतिहासात आजचा दिवस हा सुवर्ण-अक्षरांनी लिहिला जाईल. कारण येथून आज जे सामान पाठवले जात आहे, तो प्रवास म्हणजे एक खरे ख्रिश्चन धर्मकार्य आहे.''

तिथल्या डॅनिश कौन्सिलने पण स्वतःच्या भाषणात सांतिगले की, "ह्या जहाजातील माल म्हणजेच शेजाऱ्यावरील प्रेमाचे ओझे आहे.'' त्यावेळी विशेष उल्लेख करून सांगितले की, अशाच तऱ्हेची मालमत्ता २५ वर्षांपूर्वी मार्शल कार्गोनावची उतरवली गेली होती आणि ह्या दोन्ही गोष्टी म्हणजे मानवतेच्या सेवेची फलश्रुती आहे. शेकडो पेट्या जहाजावर रचल्या गेल्या. त्या प्रत्येक पेटीवर बालग्रामचे चिन्ह छापले होते आणि व्यवस्थित नंबर घातलेला होता. खूप जोराजोरात सायरनचा आवाज करीत ती बोट बंदराच्या बाहेर पडली. Worpwerde बालग्रामची मुलं त्यावेळी 'Muss i deun 3 um stadtele hinaus' हे गाणं गात होती आणि दूर दूर



जाणारी त्या बोटीची आकृती छोटी छोटी दिसत होती. शेवटी मावळत्या संध्याकाळी उत्तर समुद्राच्या लाटांत ती आमच्या डोळ्यांना दिसेनाशी झाली.

हा बोटींचा प्रवास फार स्फूर्तिदायक ठरला. त्या सामूहिक प्रयत्नांना त्यांनी एक नवीन घोषवाक्य दिले, "बालग्राम सायगावच्या सागरीप्रवासास जाते.'' हर्मन मायनर फंडातून पुऱ्या जर्मन देशातून याला, सायगाव बालग्रामला, पैशांचा पुरवठा झाला होता.

"एक तरंगते बालग्राम सायगावला निघाले.'' ही व्हिएटनामची देणगी अप्रसिद्ध राहिली नाही. वर्तमानपत्र व टेलिव्हिजनननी या महत्त्वाच्या बोटीची चित्रे छापून लोकांना माहिती दिली होती. लोकांकडे विशिष्ट प्रकल्पासाठी देणग्या मागितल्या होत्या. अनेक वर्षांपूर्वी केलेल्या 'तांदळाच्या दाण्याच्या' विनवणीप्रमाणे अनेक विनंती पत्रके पण पाठवली होती, आणि लाखोंनी देणगी जमा झाली होती. जर्मनीच्या सरकारने पण आर्थिक मदत पुरवून ह्या मोठ्या प्रकल्पाला मदत केली होती.

इकडे व्हिएटनाममध्ये प्रत्येक गोष्टच जवळपास अनिश्चित होत होती म्हणून आम्ही ठरविले की, सुरुवातीला आमच्या पथकाच्या महिला सभासदांनी सायगावला न जाता फक्त पथकाच्या नेत्याने म्हणजे हेलमूट कुटिनने तिथे विमानाने जावे. त्याने त्या पथकाच्या येण्याची सर्व पूर्वतयारी करावी आणि त्यांच्या सुरक्षिततेचा अंदाज घ्यावा. त्याचबरोबर त्याने आर्किटेक्टला मदत करून दोघांनी मिळून त्या जहाजातील माल ताब्यात घ्यावा, आणि तो गोवॅपला पाठवून द्यावा. मायनर पण कुटीनबरोबर गेला. ह्या बालग्रामच्या अत्यंत साहसी आघाडीवर त्याला उभे रहायचे होते.

आणि खरोखरच ती एक आघाडी ठरली. व्हिएटकाँगने सायगाववर मोठा हल्ला करायचे ठरवले. १९६८ साली टेटचा हल्ला झाला आणि एका क्षणाचाही विलंब न होता सायगाववर रॅकेटस्‌चा भडिमार झाला. व्हिएटकाँगचे जे लोक शहरात घुसले होते, त्यांनी मुख्य ठिकाणी हल्ले केले. अत्यंत हमरीतुमरीचा सामना सुरू होता. सायगावचे बंदर वाहतुकीला बंद झाले. आमची पासाडेना (Pasadena) बोट सर्व सामाना सकट दुसऱ्या दिवशी बंदराला लागणार होती. सायगावपासून ती जवळ पोचली होती मग त्या बोटीला जबरदस्तीने परत पाठवून दिले. कॅप्टनला ती बोट घेऊन सिंगापूरला जावे लागले व तिथे त्याने सर्व सामान उतरवून टाकले. इतक्या आशेने पाठविलेले तरंगते बालग्राम सायगावला पोहोचलेच नाही. उलट ते विदेशात एका बंदरात उतरवले गेले. आशेच्या भावनेने पाठविलेली एकेक पेटी आशियातील एका बंदरातल्या विदेशीय वखारीत रचली गेली. अशा रितीने बालग्रामचे हे व्हिएटनामी दर्याभ्रमणाचे जहाज फुटल्याप्रमाणे आम्हाला वाटले.

माझा टेलिफोन सतत व्यग्र राहात होता. प्रत्येक जण मायनर कुठे आहे याची

चौकशी करीत होता. तो वेळेवर बाहेर पडू शकला का ? पासाडेना बोट कुठे आहे ? कोपेनगेहेन मधल्या बोटीच्या कंपनीला पण काहीच माहिती नव्हती. आमचे बालग्राम कुठल्यातरी पाण्यात तरंगत होते. ते गटांगळ्या खातच राहाणार का ?

हे दिवस खूप गडबडीचे होते. शेवटी मायनरने हाँगकाँगहून आम्हाला कळविले की, बोट कंपनीने त्याला बोटीवरील माल सिंगापूरला उतरवून ठेवल्याची बातमी दिली आहे. लवकर काहीतरी निर्णय घेणे जरुरीचे होते. ते घर आता कुठे पाठवावे ? की परत जर्मनीला आणावे ? किंवा आणखी कुठल्यातरी आशिया खंडातील देशात पोहो-चवावे ? की सायगावचे बंदर पुन्हा खुलेपर्यंत वाट पहावी ? सायगावमध्ये कधीतरी बालग्राम सुरू करणे शक्य होणार आहे का ? पण आम्ही ठरविले की, तूर्त तरी निश्चयपूर्वक वाट पाहायची.

आमचा हा निर्णय बरोबर ठरला. सायगावसाठी सुरू झालेली लढाई मिटली आणि सायगावचे बंदर पुन्हा एकदा खुले झाले. १९६८ सालच्या मार्च महिन्याच्या सुरुवातीस आमच्या बालग्रामची मालमत्ता दक्षिण व्हिएटनामच्या राजधानीत येऊन पोचली.

व्हिएटनाममधल्या वकिलाने आपल्या अनुभवावर आधारित एक गोष्ट आम्हाला धोक्याची सूचना म्हणून सांगितली. "तुम्ही कदाचित् तुमचे हे बालग्राम सायगावपर्यंत नेऊ शकाल, पण गोव्यापला कधीच नाही. कारण तोपर्यंत त्यातले अर्धे सामान चोरीला जाईल." अमेरिकन लोकांनी अत्यंत काळजीपूर्वक आणि सावधगिरीने पाठविलेले खूप सामान व्हिएटनामला पोहोचवण्यापूर्वीच गडप झाले होते. आमची जरी एक पेटी हरवली असती तरी आमचे बालग्राम उभे राहू शकले नसते. कारण त्याच प्रत्येक तुकडा एका दुसऱ्यात फिट बसणारा होता. व्होरालबर्ग कोड्याप्रमाणे ते परत सोडवून पेट्यांतून पॅक केले होते. दक्षिण व्हिएटनामच्या सरकारने आम्हाला एक मिलिटरी गार्ड भरपूर पैसे घेऊन बंदरापासून गोवॅपला जायला सामानाच्या सोबत म्हणून दिला होत. आमचा व्हिएटनामचा ठेकेदार आम्हाला बजावत होता की, आम्ही मिलीटरी गार्ड सोबत घेऊ नये. कारण त्यामुळे व्हिएटकाँगच्या लोकांना शंका आली असती. त्याप्रमाणे मायनरने तो गार्ड सोबत घेतला नाही आणि त्या सर्व पेट्या गार्ड न घेता सुरक्षित पोचल्या.

बालग्रामचे चिन्ह वरती दिसणाऱ्या पेट्या बोटीतून काढून ट्रकवर चढवल्या गेल्या. सायगावच्या भर रहदारीच्या रस्त्यातून ते ट्रक गेले, सुरक्षित क्षेत्रे त्यांनी पार केली आणि गोवॅपला सुरक्षित व सरळ पोहोचले. आमच्या स्वतःच्या आर्किटेक्टने त्या पेट्या ताब्यात घेतल्या. पेट्यांची नंबरवार यादी त्यांच्याकडे होती. जेव्हा अगदी



शेवटच्या नंबरची पेटी पण पोचली तेव्हा लढाई जिंकल्याचा आनंद झाला. ऑस्ट्रियन आल्प्समधून निघालेली आमची पहिल्या बालग्रामची २१ घरे भला लांबलचक प्रवास करून दक्षिण व्हिएटनामच्या जंगलात एकदाची पोहोचली. आम्ही सुटकेचा निःश्वास टाकला.

आता ते तुकडे जोडून बसविण्याचा खेळ सुरू झाला. तयार केलेल्या सिमेंटच्या पाईप्सवर एकेक घर उभे राहू लागले. आमच्या व्हिएटनाम तुकडीच्या स्त्रिया विमानाने सायगावला पोचल्या. ह्या सर्व कार्यकर्त्यांच्या मदतीने हेलमूट कुटिनने पहिल्या व्हिएटनामी बालग्रामच्या माता निवडल्या व त्यांना स्वतः प्रशिक्षण दिले. अनाथ मुलांची पहिली लाट येऊन थडकली. एखाद्या धरणाचे फ्लडगेटस् उघडावेत, त्याप्रमाणे झाले. त्या लाटांनी कल्पनातीत अशी दुःखे बालग्रामात आणून पोचवली. बहुतेक सर्व मुलांचे आईबाप युद्धात मारले गेले होते. सर्व मुले भयग्रस्त होती. मृत्यू, आग, बाँब, सर्वच भय. पुष्कळांच्या अंगावर भाजल्याच्या खुणा होत्या. रात्रभर ही मुले किंचाळत असायची आणि त्यांना आईच्या प्रेमळ हाताने सावरायला बरेच दिवस लागले.

व्हिएटनामच्या स्त्रिया पण चांगल्या बालमाता होऊ शकतात, हे त्यांनी सिद्ध केले. बहुतेक सर्वजणांचे सर्व काही हरवले होते. स्वत्व, त्यांची घरे, कुटुंब, पती आणि मुले सर्व काही नष्ट झाले होते. बालग्रामात राहून नवीन आयुष्य पुन्हा सुरू करण्याची संधी त्यांनी घेतली.

नंतर उरलेली २१ बालसदने पण येऊन पोहोचली. गोव्यापच्या बालग्रामात आता ४२ घरे उभी राहिली होती. त्यातल्या काही घरांतून शाळा सुरू झाली, दवाखाना थाटला आणि समाजमंदिर पण स्थापले. बाकीच्या घरांतून मुले व माता राहू लागल्या.

गोवॅप तेथील बालग्रामचा औपचारिक उद्घाटन सभारंभ फेब्रुवारी १९६९ ह्या दिवशी झाला. २ वर्षांनंतर मायनरचे स्वप्न पुरे झाले व ह्या क्षेत्राचा अभ्यास करण्यासाठी मी त्या मोठ्या थोरल्या बालग्रामात, आनंदी मुलांच्या घोळक्यात पोचलो. स्टेजवर सभारंभ सुरू होता. मुले त्यांची विचित्र गाणी म्हणत होती आणि विचित्र नाच पण करत होती. तिथल्या नाजूक शरीराच्या नवीन मातांनी त्यांचे व्हिएटनामी पांढऱ्या शुभ्र सिल्कचे कपडे घातले होते आणि ताजी फळे आणून घराच्या मध्यभागी ती रचून ठेवली होती. आमचा आमच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. शेजाऱ्यांवरील प्रेमाचा तो एक यशस्वी साक्षात्कार होता. युद्धाच्या ऐन धुमश्चक्रीत आम्ही एक बालग्राम उभे केले होते. द्वेषाने भरलेल्या ह्या जगात आम्ही प्रेमाचे बेट निर्माण केले होते. एका जपानी पत्रकाराने आपल्या पेपरमध्ये बातमी दिली होती.

"मी पाहिलेला सायगावमधील चमत्कार !"

त्याच दिवशी सायगावमध्ये मायनरने मुलांचे संबंधित एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्याचा सर्व जगभर प्रचार झाला.

आजचे जग दु:खी, पीडित मुलांची कदर करीत आहे. आणि ती करीत असताना त्यांना मनस्वी शोक होत आहे. युद्धजन्य परिस्थितीमुळे ज्या मुलांचे आईबाप व घर नाहीसे झाले आहे, किंवा आर्थिक संकटामुळे आणि सामाजिक क्रूरतेमुळे मुलांचे जे हाल होत आहेत, त्याची आमच्या जगाला काळजी वाटत आहे.

मानवाचे भविष्य फक्त त्याने केलेल्या तांत्रिक प्रगतीवर किंवा राजकीय सत्तेवर अवलंबून नाही. पुढच्या पिढीला योग्य असे शिक्षण देऊन मानव्याच्या उदात्ततेकडे त्यांना वळविणे ह्यावर अधिक अवलंबून आहे. प्रत्येक मुलाला घर असण्याचा घोषित हक्क तर आहेच आहे, पण ते घर त्याला प्रत्यक्षात मिळायला पाहिजे. त्याला रोज पोटभर अन्न मिळायला पाहिजे. हा जरी त्याचा हक्क मानला तरी ते अन्न प्रत्यक्षात मिळायला पाहिजे. शिक्षण घेण्याचा मूलभूत हक्क जरी त्याला असला, तरी ते शिक्षण त्याला व्यवहारात मिळायला पाहिजे.

मी एस ओ एस बालग्राम चळवळीचा जनक या नात्याने बोलतो आहे. आज संपूर्ण जगातील २९ देशात ७० बालग्रामांचे प्रकल्प अस्तित्वात आहेत, आणि त्यामध्ये राहाणाऱ्या हजारो अनाथ मुलांना आज मानवतेचा स्पर्श होऊन नवीन जीवन जगता येत आहे. मी ह्या सर्व अनाथ, गृहहीन, निराधार, भूकग्रस्त अशा जगभर पसरलेल्या गरीब मुलांच्या वतीने आज बोलत आहे. मी फक्त पूर्वेकडच्या किंवा फक्त पश्चिमेकडच्या मुत्सद्यांना ही विनंती करीत नसून, सगळ्या जगाला ही विनवणी करीत आहे की, त्यांनी आपली सर्व शक्ती उपयोगात आणून ह्या मुलांचे हे भयंकर दु:ख दूर केले पाहिजे आणि एका सुधारलेल्या सुसंस्कृत जगात राहाणाऱ्या मुलाप्रमाणे त्यांना जीवन साध्य करून दिले पाहिजे.

ह्या मुलांचे नाव घेऊन मी सर्व मातापित्यांना विनंती करतो की त्यांनी मातापिता म्हणून असलेली स्वत:ची जबाबदारी नीट ओळखावी व त्याप्रमाणे मुलांची नीट वाढ करावी. ह्या मुलांचा प्रतिनिधी म्हणून मी जगातील सर्व तंत्रज्ञान आणि शास्त्रज्ञांना विनंती करतो की, त्यांनी आपल्या संशोधनात ह्या मुलांच्या कल्याणाकडे दुर्लक्ष होऊ देऊ नये.

मी या मुलांचे नाव घेऊन सर्व मानवतावादी धार्मिक आणि सामाजिक संस्थांना विनंती करतो की, त्यांनी अधिकाधिक साधने ह्या मुलांच्या मदतीसाठी उपलब्ध करून द्यावी.



ह्या मुलांच्या वतीने मी सर्व राजकीय पुढाऱ्यांना आणि मुत्सद्यांना विनंती करतो, की त्यांनी त्यांचे निर्णय घेताना या लहान मुलांच्या व युवक युवतींच्या भविष्याचा गंभीरतेने विचार करावा.

ह्या मुलांसाठी मी सर्व सद्भावना बाळगणाऱ्या मानवतेला आवाहन करतो की, त्यांनी अधिक सहाय्यभूत बनावे. अधिक स्वार्थत्याग करावा. ज्यामुळे ह्या मुलांचे दु:ख निवारण होईल.

जर तुम्ही या निराधार मुलांचा विचार केला नाहीत, तर मानवता कुठल्या ठिकाणी जाऊन पोचेल ? ती राजकीय यशस्वी सत्ता किंवा तो तांत्रिक विकास याचा काय फायदा होणार ? तो विकासच नव्हे की, जो हजारो लाखो मुलांची भूक शमवू शकत नाही.

मी एक साधा माणूस असून हा जाहीरनामा काढीत आहे. मी माझे पूर्ण आयुष्य जगातल्या ह्या निराधार मुलांच्या सेवेसाठी वाहून घेतले आहे. व्हिएटनामच्या युद्धात बळी पडलेल्या गरजू मुलांसाठी आम्ही एक मोठे बालग्राम सायगावला सुरू केले आहे आणि त्याच्या उद्घाटन प्रसंगी मी हा जाहीरनामा प्रसिद्ध करीत आहे. हे बालग्राम आम्ही जागतिक राजकारणांपासून दूर ठेवले आहे. त्याची उभारणी चांगल्या लोकांच्या मदतीवर आधारीत आहे आणि ते बालग्राम म्हणजे नवीन तरुण पिढीच्या उज्वल भविष्याचे द्योतक आहे. त्याचबरोबर सर्व मानव जातीला आवाहन करीत आहे, की आपल्या सर्व चिंतनात व कर्मात आपल्या मुलांचे कल्याण हाच केंद्रबिंदू असावा.

डॉ. एच्. सी. हर्मन मायनर

फेब्रुवारी, १९६९.

आजचे हो चीमीन्ह शहरातले बालग्राम युद्धाच्या झळीतून शाबूत राहिले आहे. आजच्या व्हिएटनामच्या स्वायत्त राज्यात ते पूर्वीप्रमाणे चालू आहे. हनोईने हा मुलांसाठी असलेला सामाजिक सुधारणेचा उपक्रम अंगीकारला आहे आणि SOS Kinderdorf International या संस्थेकडे अधिक मदतीची मागणी केली आहे.

व्हिएटनामच्या बालग्राम संस्थेने आमच्या समाजकार्याची कठिण कसोटी लावण्याचे ठरविले आहे. जर हर्मन मायनरच्या योजनेत एखादी कमजोर कडी असती, तर आज जगभर पसरलेल्या ह्या चळवळीची मजबूती कमी झाली असती बालग्रामच्या कार्यकर्त्यात जर एकी व समजूत नसती, तरीदेखील ती चळवळ अयशस्वी झाली असती आणि व्हिएटनामी जगात उघडी पडली असती. पण ह्या व्हिएट-

नामच्या बालग्रामच्या साहसातून आम्ही आणखी भक्कम होऊन बाहेर पडलो आहोत. सुरुवातीला आम्हाला भीती वाटत होती की कदाचित आपण ह्या कामास लायक नाही, ती भीती पण नष्ट झाली आहे. तोपर्यंत बांगलादेशातील बालग्राम (युद्धाच्या झळीनंतर, भूकेच्या माऱ्यानंतर) उभे राहिले आहे. तसेच निकाराग्वा येथे (मानागुवाच्या भूकंपाच्या नुकसानीनंतर) पण अत्यंत थोड्या वेळात बालग्राम बांधले गेले आहे. यामुळे आमची कर्तबगारी एका तऱ्हेने सिद्ध झाली आहे. तेव्हापासून आम्ही अनेक गोष्टी शिकलो व अधिक अनुभवी पण बनलो.

"२५ वर्षांच्या अथक् श्रमानंतर" मायनर म्हणाला, आता आपल्या हातात ही बालग्रामची चळवळ पूर्ण आवाक्यात आलेली आहे. १९४९ हे वर्ष म्हणजे एक अभिनव प्रयोग होता. एक मोठे आव्हान होते. अजूनपर्यंत ती कल्पना परिपक्व झालेली नव्हती. आज २५ वर्षांनंतर जगातील ५ खंडांमध्ये त्याच्या योजनेचा विस्तार होऊन १०० बालग्रामे उभी राहिली आहेत. त्यामुळे हर्मन मायनरला जो अंतःकरणापासून मुलांविषयी उमाळा होता व त्यांच्या कल्याणाची सतत चिंता होती त्याला मूर्त स्वरूप प्राप्त झाले आहे. आज सामाजिक न्यायापासून वंचित असलेल्या अनाथ मुलांना त्याने नव्या भविष्यकाळाची भेट दिली आहे.

मी पुन्हा जेव्हा उलरिशला भेटलो, तो एक अर्थपूर्ण प्रसंग होता. त्याने त्यांच्या दुसऱ्या मुलाच्या बारशाला मला आमंत्रण पाठविले होते. उलरिशचे लग्न होऊन त्याचे वैवाहिक जीवन सुखमय होते. तो एका मोठ्या कारखान्यात काम करीत होता. त्या बारशाच्या समारंभात त्याची बालमाता पण स्वाभाविकपणे उपस्थित होती. आम्ही तिघांनी म्हणजे उलरिशने, त्या मातेने व मी बरेच वेळा एकमेकांकडे पाहिले आणि मला वाटते की आमच्या सर्वांच्या मनात एकच विचार असावा. आमच्या जीवनात आम्हा तिघांना एकमेकांची किती गरज होती आणि कदाचित पुढेदेखील ही गरज जीवनात आम्हाला भासणार होती.

आज २०व्या शतकात राहणाऱ्या आपल्यालादेखील अशीच एक-दुसऱ्याची गरज आहे. आपण एकमेकांना शेजारी म्हणून हवे आहोत. पण देशादेशांतून, सरहद्दीवर आणि समुद्रावरदेखील ही शेजारपणाची, मित्रत्वाची भावना अतिशय आवश्यक आहे. कारण आता आपले जग हे खूप छोटे झाले आहे. आणि त्यात व्यक्ती एकटी पडेल अशी भीती निर्माण झाली आहे. बालग्रामची ही २५ वर्षांची कहाणी एक उज्ज्वल असा दाखला देत आहे की आजच्या या जगात देखील प्रेमाचे पाझर फुटू शकतात आणि या जगात प्रेमाची नवीन बंधने सर्वदूर शाश्वत अशी एक "प्रेमळ हृदयाची वाट" दाखवू शकतात.



रॉबर्ट लुई स्टिव्हनसन "Teller of Tales" चा इंग्लिश लेखक त्याने त्याचे घर पर्वताच्या शिखरावर बांधले होते. तिथे पोचायला माणसाला खूप रस्ता तुडवावा लागत असे. सहा समाओचे शिलेदार एकदा तिथे आले व स्टिवनसनने त्यांची खूप सेवा केली आणि म्हणून ह्या सहा शिलेदारांनी आपल्या हातांनी मेहनत करून त्याच्या घरापर्यंत जायला रस्ता तयार करून दिला होता आणि कृतज्ञतेचे स्मरण म्हणून त्याने त्या रस्त्याला "The Road of the loving heart" हे नाव दिले होते.

